॥ श्रीहरिः ॥

# प्रकाशकीय निवेदन

वेद अपौरुषेय आहेत, परमात्म्याच्या निःश्वासरूप आहेत. ते ज्ञानाचे अक्षय आणि अगाध भांडार आहेत. वेदवेद्य परमात्मा आणि वेद दोन्ही ब्रह्मस्वरूपच आहेत. म्हणून वेद हे ब्रह्माहून भिन्न नाहीत. म्हणून वेदार्थ ही अपौरुषेय असून पूर्णरूपाने भगवत्कृपा साध्य आहे. परमात्म्याच्या परम अनुग्रहानेच वेदार्थाचा बोध होत असतो. त्याचप्रकारे भगवान् श्रीकृष्णाच्या पावन वार्णातून निःसृत गीता ही वेदार्थ असल्याने अपौरुषेय आहे. गीता आणि परमात्मा दोन्ही अभिन्न आहेत. गीतेच्या कृपेनें परमात्म्याचा आणि परमात्म्याच्या कृपेने गीतार्थाचा बोध होतो. गीता स्वतः भगवंताची वाङमयीन मूर्ती आहे, प्रासदिक आहे आणि भक्तवांछाकल्पतरु आहे स्वतः भगवंतांनीच अर्जुनाला निमित्त बनवून लोककल्याणाच्या हेतूनें तिचे प्रकाशन केले आहे. गीतेच्या अर्थाचा विस्तारही भगवान् स्वतःच करीत असतात—'**तस्यात्मानुग्रहाभावेऽपि भूतानुग्रहप्रयोजनं ज्ञानधर्मोपदेशेन कल्पप्रलयमहाप्रलयेषु संसारिणः उद्धरिष्यामीति**'। (योगभाष्य) भगवंताच्या अनुग्रहाने अनादिकालापासून भूतानुग्रह होत राहीला आहे. अर्थात् सृष्टिच्या आदिकालापासून भगवान् अनेक रूपानें अनुग्रह करीत आले आहेत. अशा प्रकारें अनुग्रह करणें ही पण भगवंताची विवशता अगतिकता आहे कारण अनुग्रह केल्यावाचून ते राहूच शकत नाहीत.

पतित मनुष्य आणि मानवतेचा उद्धार करण्यासाठीं संत आणि भगवंत दोघांचे अवतार होत असतात. संत म्हणजे भगवंताचा प्रेममय विग्रहच असतात. अर्थात् भगवान् स्वतःच भक्त बनून प्रेमाचे आस्वादन करीत आणि करवीत असतात. तेच अर्जुन आणि श्रीकृष्ण दोन्ही रूपांत अभिव्यक्त झाले. म्हणून गीतेचा वक्ता, श्रोता आणि गीता तीन्ही भगवानच आहेत. म्हणून गीता ही विश्व-संस्कृतिचा खजिना आहे आध्यात्मिक जीवनाचा दिव्य संदेश आहे, संपूर्ण मानव जातिचा धर्मग्रंथ आहे, उपनिषद् आहे ज्ञानाचा उज्वल प्रदीप आहे, ब्रह्मविद्या आहे, योगशास्त्र आहे, नर-नारायण याचां संवाद आहे तसेच भगवत् साक्षात्काराचे द्वार आहे.

भगवानच गीतार्थ प्रकट करण्यासाठीं अनेकानेक संत, महापुरुषांच्या रूपांत प्रकट होऊन भाष्य, प्रवचनांच्या द्वारा गीतेची खरीखुरी व्याख्या आणि विस्तार करण्यासाठीं येत असतात. संत ज्ञानेश्वरमहाराजही '**ज्ञानेशो भगवान् विष्णुः**' या सदयुक्तिला अनुसरून गीतार्थ प्रकट करण्यासाठीच अवतरित झाले होते. कारण संत आणि भगवंत या दोहोत अभेद आहे. एवढेच नव्हे तर संतांची भोरवी भगवंतापेक्षांही अधिक आहे. देवर्षि नारदांनी म्हटले आहे—'**महत्संगस्तु दुर्लभोऽगम्योऽमोघश्च**' महापुरुषांचा संग दुर्लभ, अगम्य आणि अमोघ आहे, अर्थात् खऱ्या सत्पुरुषाची भेट झाली तर त्यांचा संग कधीं निष्फळ ठरत नाही, तात्काळ कल्याण करतो. संत ज्ञानेश्वर महाराज आणि ज्ञानेश्वरी यांचा परिचय केवळ महाराष्ट्रालाच आहे असे नाहीं तर संपूर्ण विश्वासच त्यांचा परिचय आहे. ज्ञानेश्वरी ग्रंथाची साक्षात् भगवंताचा विग्रह या रूपानें पूजा केली जाते. आजपर्यंत कोटयावधि लोकांनी ज्ञानेश्वरीतील दिव्य प्रकाशाच्या साहाय्यानें आपल्या कर्तव्याचा मार्ग निश्चित करून आत्मकल्याण साधले आहे. आजही अनेक लोक व्यक्तिशः आणि सामुदायिक रीत्या ज्ञानेश्वरीचा प्रचार आणि प्रसार यांत गढून गेले आहेत. अनेक संस्थानी, मुद्रकांनी, प्रकाशकांनी विविध रूपांनी या ग्रंथाचे प्रकाशन केले आहे आणि त्यांच्या या प्रयत्नांचा फायदा घेऊन श्रद्धाळु जनता आपले आत्मकल्याण साधून घेत आहे.

गीताप्रेसचा मुख्य उद्देश्य घराघरांतुन गीता आणि गीतार्थाचा प्रचार आणि प्रस्तार कमींत कमी मूल्य ठेवून जन-सामान्यांसाठीं सुलभ करणे हेच आहे. काही महानुभावांनी गीताप्रेसच्या संचालकांना ज्ञानेश्वरीच्या प्रकाशनासाठीं अनेक वेळा आग्रह केला. या आग्रह करणारांच्या मनांत अशी धारण झालेली आहे की अन्य प्रकाशकांच्या तुलनेत गीताप्रेस आपल्या पुस्तकांचे मूल्य खूपच कमी ठेवत असते. भगवंताच्या विशेष अनुकंपेमुळे गीताप्रेसचे लक्ष्य या महानुभावांच्या आग्रहाकडे वेधले गेले आणि गीताप्रेसच्या संचालकांनी मूळ ज्ञानेश्वरी दैनंदिन पाठासाठीं उपयुक्त अशा गुटक्याच्या स्वरूपांत प्रकाशित केली. धार्मिक लोकांनी पूर्ण श्रद्धेन या उपक्रमास स्वीकारून या ग्रंथाचे चांगले स्वागत केले. यानंतरही हा ग्रंथ सटीक मोठ्या ग्रंथाच्या आकारांत प्रकाशित व्हावा असा आग्रह होतच राहिला.

ज्ञानेश्वर महाराजांच्या कृपेनें त्यांचे अभिन्न भक्त श्रीगुलाबराव महाराज प्रणीत ज्ञानेश्वरी (गुढार्थ दीपिका) चे प्रकाशन करण्याचा आग्रह झाला. संत गुलाबराव महाराज वैकुंठवासी झाल्यानंतर या ग्रंथाच्या काही आवृत्ति छापल्या गेल्या होत्या. त्या ग्रंथासंबंधी महाराष्ट्रीय लोकांत भागवतासारखी श्रद्धा व आदराची भावना आहे. श्रीगुलाबराव महारज स्वत:ला ज्ञानेश्वरांची कन्या म्हणवीत असत आणि पिता भावनेनें ज्ञानेश्वरांची उपासना करीत असत। जन्मजात प्रज्ञाचक्षु (अंध) असूनही ज्ञानेश्वर महाराजांची असीम कृपा त्यांच्यावर असल्याने ज्ञानेश्वरी ग्रंथावर त्यांनी मोठ्या सुलभ आणि काव्यमय भाषेत गूढार्थ प्रकट करणारी टीका केली आहे. कुणी विद्याभिमानी व्यक्ति गीतार्थाचे प्रतिपादन करणें तर दूरच राहिले गीतार्थ समजू ही शकत नाही. सर्व साधारण लोकांची अशी धारणा आहे कीं ज्ञानेश्वर महाराजांच्या कृपेनेंच श्रीगुलाबराव महाराजांना गीतार्थ अवगत झाला. जरी श्रीगुलाबराव महाराजांची ग्रंथ संपदा विपुल आहे तथापि या गुढार्थ दीपिकेंत त्यांचे जवळजवळ सर्व भाव समाविष्ट झाले आहेत.

संत ज्ञानेश्वर महाराजांच्या भावांना अधिकाधिक श्रद्धाळु लोकसमुदायापर्यंत पोहोंचविण्याच्या उद्देशानें या ग्रंथाच्या प्रकाशनाचा निर्णय घेतला गेला. हे भगवंताचे कार्य आहे. त्यांच्या अनुग्रहानेंच हे कठीण कार्य संभवनीय झाले. आम्हांला निमित्त बनविण्यांतही त्यांचा अनुग्रहच कारण आहे. आमची सर्व मुद्रक आणि प्रकाशकांनाही विनंति आहे कीं त्यांनीही आपल्या शक्तिनुसार ज्ञानेश्वरी ग्रंथाचें प्रकाशन हिंदी तसेच अन्य भाषांतही करण्याचा सत्प्रयास करावा. शेवटीं भगवंतानी आपल्या प्रेमी भक्तांपर्यंत व श्रद्धाळु भाविक जनतेपर्यंत हा ग्रंथ पोहोंचविण्यांचे भाग्य आम्हांस दिले याबद्दल जनताजनार्दन चरणीं आम्ही अत्यंत कृतज्ञ आहोत.

**—प्रकाशक**

**हरिः ॐ तत् सत्**



श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगोपालकृष्णाय नमः ॥ ॐ अस्य श्रीमद्भगवद्गीतामालामन्त्रस्य भगवान् वेदव्यास ऋषिः। अनुष्टुप् छन्दः॥ श्रीकृष्णः परमात्मा देवता॥ अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे, इति बीजम्॥ सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज, इति शक्तिः॥ अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः, इति कीलकम्॥ अथ करन्यासः। नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः, इत्यङ्गुष्ठाभ्यां नमः॥ न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः, इति तर्जनीभ्यां नमः॥ अच्छेद्योऽयमदाह्योऽय-मक्लेद्योऽशोष्य एव च, इति मध्यमाभ्यां नमः॥ नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः, इत्यनामिकाभ्यां नमः॥ पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः, इति कनिष्ठिकाभ्यां नमः॥ नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च, इति करतलकरपृष्ठाभ्यां नमः॥ इति करन्यासः॥ अथ हृदयादिन्यासः॥ नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः, इति हृदयाय नमः॥ न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः, इति शिरसे स्वाहा॥ अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च, इति शिखायै वषट्॥ नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः, इति कवचाय हुम्॥ पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः, इति नेत्रत्रयाय वौषट्॥ नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च, इति अस्त्राय फट्॥ श्रीकृष्णप्रीत्यर्थे पाठे विनियोगः॥ ॐ॥ पार्थाय प्रतिबोधितां भगवता नारायणेन स्वयं व्यासेन ग्रथितां पुराणमुनिना मध्येमहाभारतम्। अद्वैतामृतवर्षिणीं भगवतीमष्टादशाध्यायिनीमम्ब त्वामनुसंदधामि भगवद्गीते भवद्वेषिणीम्॥ १॥ नमोऽस्तु ते व्यास विशालबुद्धे फुल्लारविन्दायतपत्रनेत्र। येन त्वया भारततैलपूर्णः प्रज्वालितो ज्ञानमयः प्रदीपः॥ २॥ प्रपन्नपारिजाताय तोत्त्रवेत्रैकपाणये। ज्ञानमुद्राय कृष्णाय गीतामृतदुहे नमः॥ ३॥ सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनन्दनः। पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत्॥ ४॥ वसुदेवसुतं देवं कंसचाणूरमर्दनम्। देवकीपरमानन्दं कृष्णं वन्दे जगद्गुरुम्॥ ५॥ भीष्मद्रोणतटा जयद्रथजला गान्धारनीलोत्पला शल्यग्राहवती कृपेण वहनी कर्णेन वेलाकुला। अश्वत्थामविकर्ण-घोरमकरा दुर्योधनावर्तिनी सोत्तीर्णा खलु पाण्डवै रणनदी कैवर्तकः केशवः॥ ६॥ पाराशर्यवचः सरोजममलं गीतार्थगन्धोत्कटं नानाख्यानककेसरं हरिकथा-संबोधनाबोधितम्। लोके सज्जनषट्पदैरहरहः पेपीयमानं मुदा भूयाद् भारतपङ्कजं कलिमलप्रध्वंसि नः श्रेयसे॥ ७॥ मूकं करोति वाचालं पङ्गुं लङ्घयते गिरिम्। यत्कृपा तमहं वन्दे परमानन्दमाधवम्॥ ८॥ यं ब्रह्मावरुणेन्द्ररुद्रमरुतः स्तुन्वन्ति दिव्यैः स्तवैर्वेदैः साङ्गपदक्रमोपनिषदैर्गायन्ति यं सामगाः। ध्यानावस्थिततद्गतेन मनसा पश्यन्ति यं योगिनो यस्यान्तं न विदुः सुरासुरगणा देवाय तस्मै नमः॥ ९॥ इति श्रीमद्भगवद्गीतान्यासध्यानादि॥

॥ श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ ॥

# श्रीज्ञानेश्वरी गूढार्थ दीपिका

## अध्याय पहिला

॥ श्रीगणेशायनमः ॥

**ॐ नमो जी आद्या। वेदप्रतिपाद्या। जय जय स्वसंवेद्या। आत्मरूपा॥**

**अर्थ—**भगवंता! ज्या तुझे ॐ हे मंगलकारक नाम आहे, जो तू सर्व कार्यरूप सृष्टीच्या पूर्वी कारणरूपाने असतोस, वेदांनी ज्या तुझे एकाचेच अनेक रूपांनी वर्णन केले आहे, जो तू स्वसंवेद्य म्हणजे आपणच आपल्याला जाणणारा असून, दुसऱ्या कशानेही जाणला जाऊ शकत नाहीस, ज्या तुझा स्वसंवेद्य (सच्चिदानंद) रूपाने सर्वत्र जयजयकार असून जो तू सर्व जीवांचे ठिकाणी आत्मरूपानेही आहेस, त्या तुला नमस्कार करतो. ॥ १ ॥

**गूढार्थदीपिका:—मंगलाचरण** ग्रंथारंभी भगवंताचे मंगलाचरण करावे असा शिष्टसंप्रदाय आहे. वेदादि वैदिक वाङ्मय प्रमाण मानणाऱ्या लोकांना शिष्ट म्हणतात. अशा शिष्टसंप्रदायाला अनुसरून या ग्रंथाचे आरंभी श्रीज्ञानेश्वर माऊलीने भगवंताचे मंगलाचरण केले आहे. मंगलाचरण तीन प्रकारचे असते. पहिले वस्तुनिर्देशरूप मंगलाचरण, दुसरे नमस्काररूप मंगलाचरण व तिसरे आशीर्वादरूप मंगलाचरण. श्रीज्ञानेश्वर माऊलीने येथे तिन्ही प्रकारचे मंगलाचरण केले आहे.

परमेश्वरवस्तू अत्यंत मंगलरूप असल्यामुळे कोणी ग्रंथकार आपल्या ग्रंथारंभी केवळ परमेश्वर वस्तूचा निर्देशच करतात. असा निर्देश वस्तुनिर्देशरूप मंगलाचरण होय. हे मंगलाचरण सगुणवस्तुनिर्देशरूप व निर्गुणवस्तुनिर्देशरूप असे दोन प्रकारचे आहे. जेव्हा रूपरहित ब्रह्मवस्तूचा निर्देश ग्रंथारंभी केला जातो किंवा जेव्हा नामरूप या वाच्यांशाच्या द्वारा नामरूपरहित अशी ब्रह्मवस्तू लक्षिली जाते, तेव्हा ते निर्गुणवस्तुनिर्देशरूप मंगलाचरण होते. या ओवीत माऊलींनी 'स्वसंवेद्या' व 'आत्मरूपा' या शब्दांनी निर्गुणवस्तुनिर्देशरूप मंगलाचरण केले असून 'आद्या' व 'वेदप्रतिपाद्या' या शब्दांनी सगुणवस्तुनिर्देशरूप मंगलाचरण केले आहे.

**ॐकार:—**नामरूपरहित निर्गुण ब्रह्मवस्तू अत्यंत सूक्ष व बुद्ध्यादिकांच्या पलीकडे असल्यामुळे, ती बुद्ध्यादिक वृत्तीने ग्रहण केली जात नाही. म्हणून ज्याप्रमाणे अत्यंत सूक्ष्म असा अरुंधतीचा तारा दाखविण्याकरिता प्रथम अरुंधतीच्या जवळ असलेला असा वसिष्ठांचा तारा दाखविला जातो, त्याप्रमाणे नामरूपरहित निर्गुण ब्रह्मवस्तू अत्यंत सूक्ष्म असल्यामुळे तिच्या साक्षात्काराकरिता शास्त्राने स्थूल अशा ॐकाराला त्या ब्रह्मवस्तूचे वाचक (नाव) ठरविले आहे. व त्या ॐकाराचे ठिकाणी ब्रह्मभावना दृढ करून पुढे ॐकार अनुच्चारित झाला असता जीव ब्रह्मस्वरूप होतो.

**ॐ कारश्चाथशब्दश्च द्वावेतौ ब्रह्मणः पुरा। कंठं भित्वा विनिर्यातौ तस्मान्मांगलिकावुभौ॥**

'ॐकार' व 'अथ' हे दोन शब्द ब्रह्मदेवाच्या कंठातून प्रथमच बाहेर पडले, त्यामुळे हे दोन्ही शब्द स्वभावत: मंगलकारक आहेत या अर्थाची वरील स्मृती आहे. याप्रमाणे ॐकार हा शब्द परमेश्वराचा वाचक व मंगलकारक असल्यामुळे माऊलींनी ॐकारद्वारा सगुण व निर्गुण परब्रह्माचे एकत्र मंगलाचरण केले आहे.

पण येथे या ओवीत ॐकाराचे ठिकाणी परमेश्वर भावना करून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ॐकाराचे मंगलाचरण केले आहे, असे कित्येक म्हणतात. पण ते योग्य नाही. कारण वर सांगितल्याप्रमाणे ॐकार हा परमेश्वराचे मंगलकारक नाव असल्यामुळे ज्या मंगलकारक ॐकाराच्या नुसत्या उच्चाराने परमेश्वराचे मंगल होऊ शकते त्या

मंगलाकारक शब्दाचेच मंगलाचरण कसे केले जाणार? येथे ॐकाराचे मंगलाचरण केले आहे हे दाखविण्याकरिता ॐकाराचे ठिकाणी परमेश्वराची भावना करून ॐकाराचे मंगलचरण केले आहे, असे विधान अभूतपूर्व आहे. परमात्मभावाने ॐकाराचे मंगलाचरण आजतागायत कोण्याही ग्रंथकाराने केलेले नाही. कारण तसे करण्याची आवश्यकताच नाही.

ॐकाराचे वाच्य व आकाशापेक्षाही सूक्ष्म असे जे परब्रह्म त्या परब्रह्माच्या अपरोक्ष साक्षात्काराकरिता स्थूलारुंधतीन्यायाने त्या परब्रह्मापेक्षा स्थूल असलेल्या त्याच्या ॐ या वाचक नामाचे ठिकाणी परब्रह्म भावना करण्याला श्रुतीने सांगितले आहे. मंगलाचरण करण्यासाठी ॐकाराचे ठिकाणी परब्रह्माची भावना करावयास सांगितली नाही. मंगलाचरण हे परमेश्वराचेच होऊ शकते व परमेश्वराचे मंगलाचरण करण्याकरिता ॐकाराचे ठिकाणी परब्रह्माची भावना करण्याची आवश्यकताही नाही. कारण परमेश्वराचा अपरोक्ष साक्षात्कार नसला तरी परमेश्वर आहे इतके परोक्ष ज्ञान असले की ॐकाराचे ठिकाणी ब्रह्मभावना न करता साक्षात् परब्रह्माचे मंगलाचरण अज्ञान्याला देखील करता येते. तेथे ज्ञानियांचे राजे म्हणविले जाणारे श्रीज्ञानेश्वरमहाराज यांना ॐकाराचे ठिकाणी परमेश्वर भावना करून ॐकाराचे मंगलाचरण करण्याचे कारणच काय? श्रुतिशास्त्रात जी काही परमेश्वरभावनेने ॐकारादिकांची उपासना सांगितली आहे, ती दृढ अपरोक्ष साक्षात्कार नसलेल्या अदृढ ज्ञान्याकरिता सांगितली आहे. श्रीज्ञानेश्वर महाराजासारख्या दृढ ज्ञान्यांकरिता मुळीच नाही. कारण दृढ ज्ञान होण्यापूर्वी केली जाणारी उपासना, ज्ञान दृढ झाल्यानंतर सुटून जाते. म्हणून येथे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी परमेश्वर भावनेने ॐकाराचे मंगल केलेले नसून या पहिल्या ओवीने साक्षात् परमेश्वराचेच 'सगुणनिर्गुणवस्तुनिर्देशरूप मंगलाचरण' केले आहे.

**आद्या:**—आता 'आद्या' शब्दाने श्रीमहाराज काय विशद करतात ते पाहू. प्रत्येक कार्याला उपादान व निमित्त अशी दोन कारणे असतात. कार्यरूप होणारे जे कारण ते उपादान कारण होय. उदाहरण—मातीचा घडा होतो, म्हणून माती हे घड्याचे उपादान कारण आहे. कार्य निर्माण करणाऱ्याला निमित्त कारण म्हणतात. कुंभार हा घडा निर्माण करतो म्हणून तो निमित्तकारण होय. जगातील प्रत्येक कार्याला उपादान व निमित्त अशी दोन कारणे दिसून येत असली तरी जगद्रूप कार्याच्या पूर्वी एक चेतन परमात्माच असतो. म्हणून जगद्रूप कार्याला अशी दोन भिन्न कारणे नसून, उपादान व निमित्त असे दोन्ही प्रकारचे कारण एक चेतन परमात्माच आहे. म्हणजे चेतन परमात्माच जगद्रूप झाला आहे व त्यानेच आपल्याला तसे जगद्रूप करून घेतले आहे. असा हा वेदान्तसिद्धान्त माऊलींनी 'आद्या' या शब्दाने सुचविला आहे.

**वेदप्रतिपाद्या:**—म्हणजे वेदाने ज्याचे वर्णन केले आहे असा परमात्मा वेदादि वाङ्मयात कर्म, कर्मकर्ता जीव, स्वर्गादिक भोगस्थाने, भोग इत्यादिकांचे वर्णन आले असले, तरी त्या सर्व नामरूपांनी केवळ एका परमेश्वराचेच वर्णन केले गेले आहे. हाच वेदान्ताचा अद्वैतसिद्धान्त माऊलींनी 'वेदप्रतिपाद्या' या शब्दाने मांडून, वेदप्रतिपाद्य अशा सगुण-भगवंताचा निर्देश करून सगुणवस्तुनिर्देशरूप मंगलाचरण केले आहे.

वेदस्ततीतील श्रीधराचार्य टीकेत

"**सगुणमेव-गुणैरनभिभूतं सर्वशक्तिं सर्वेश्वरं सर्वनियन्तारं सर्वोपास्यं सर्वकर्मफलदातारं समस्तकल्याणगुणनिलयं सच्चिदानंदं, भगवन्तं श्रुतय: प्रतिपादयन्ति**"

त्रिगुणातीत, पण आपल्या स्वरूपभूत षड्गुणैश्वर्याने व सच्चिदानंद गुणाने सगुण झालेल्या परमेश्वराचेच श्रुतीने वर्णन केले आहे. तसेच.

"**अपरिमेयभगोऽपरिमितैश्वर्य: न हि अन्येषामिव देशकालादिपरिच्छिन्नं, तवाष्टगुणितमैश्वर्यमपि तु परिपूर्णस्वरूपानु-बंधित्वादपरिमितमित्यर्थ:**"

परमेश्वराचे षड्गुणैश्वर्य इतरांप्रमाणे मर्यादित नाही. ते सच्चिनंदस्वरूपाला धरून असल्यामुळे अमर्याद सच्चिदानंदस्वरूपाप्रमाणे अमर्यादच आहे. या दुसऱ्याही वचनावरून वेदप्रतिपाद्य अशा सगुण भगवंताचे सगुणत्व

मायोपाधिक नाही हे वेदान्तानेच सिद्ध आहे. कारण जेवढे मायोपाधिक असते तेवढे मर्यादित असते व जेवढे आत्मस्वरूपाप्रमाणे अमर्याद असते तेवढे सर्व मायोपाधिवर्जित असते असा वेदान्ताचा सिद्धान्त आहे.

**स्वसंवेद्याः**—म्हणजे आपणच आपल्याला जाणणारा आत्मा ज्ञानरूप असून तो ज्ञानरूप वृत्तीनेच जाणला जातो, अज्ञानादिकाने जाणला जात नाही. हाच वेदान्ताचा सिद्धान्त असून तोच श्रीज्ञानेश्वर महाराजांनी अनुभवामृतात प्रतिपादिला आहे व येथे 'स्वसंवेद्य' शब्दाने मांडला आहे.

**आत्मरूपाः**—या प्रमाणे ॐकाराचा वाच्य, सृष्टीच्या पूर्वी असणारा, सृष्टीचे कारण, वेदाने प्रतिपादिलेला व आपणच आपल्याला जाणणारा 'स्वसंवेद्य' असा हा परमेश्वर कोणता तर याचे उत्तर माऊलींनी 'आत्मरूपा' या शब्दाने दिले आहे. म्हणजे प्रत्येकाचा आत्मा तोच परमात्मा आहे. आत्म्याहून परमात्मा भिन्न नाही असा भाव.

**आत्मा वा इदमेक एवाग्र आशीत्। ऐत. २—१**

पूर्वी हे जगत् आत्मस्वरूप होते म्हणजे जगताच्या पूर्वी आत्मा होता. तोच नामरूपात्मक जगद्रूप झाला. याही श्रुतिवचनावरून सर्व जगाला अधिष्ठानभूत असलेले चेतन म्हणजे परमात्मा, तो प्रत्येक देहाचे ठिकाणी अधिष्ठानभूत असलेले चेतन जो आत्मा, त्याहून भिन्न नाही, एकच आहे असा अर्थ निघतो.

**नमोः**—या पदाने नमस्काररूप मंगलाचरण केले आहे. कार्यरूप जगताचे कारण स्वसंवेद्य असा हा एक आत्माच आहे व त्याचेच वेदांनी प्रतिपादन केले आहे. जसे हरिपाठाच्या अभंगात.

**चहू वेदीं जाण। षट्शास्त्रीं कारण। अठराहि पुराणें। हरीसीं गाती॥**

असे म्हणून माऊली सर्व वेदशास्त्रात हरीची कीर्ती गायिली आहे असे सांगतात, तसेच येथेही 'आद्या', 'वेद प्रतिपाद्या', 'स्वसंवेद्या' आणि 'आत्मरूपा' या पदांनी ज्ञानीयांचे राजे केवलाद्वैत ब्रह्मसिद्धान्तच प्रतिपादन करीत आहेत. वरील विशेषणे ॐकाराला लागू शकत नाहीत म्हणून ॐकाराचे परमेश्वर भावनेने मंगलाचरण केले आहे असे म्हणणे वेदान्ताला धरून होणार नाही.

**देवा तूंचि गणेशु। सकलार्थमतिप्रकाशु। म्हणे निवृत्तिदासु। अवधारिजो जी॥ २॥**

**अर्थ**—श्रीनिवृत्तिनाथांचे दास श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, हे आत्मरूपा परमेश्वरा! माझ्या बोलण्याकडे लक्ष दे. वैदिक वाङ्मयातील संपूर्ण अर्थाच्या ज्ञानाचा प्रकाश किंवा स्फुरणस्वरूप असा जो गणेश तो तूच आहेस.॥ २॥

**गूढार्थदीपिका—अवधारिजो जी**—वैदिक वाङ्मयात ज्ञानदात्री देवता गणेश समजली जाते. सर्व देवतांचे ठिकाणी जो काही शक्तीचा उद्‌बोध दिसून येतो, तो सर्व माझ्याच शक्तीचा उद्‌बोध आहे असे भगवंतांनीच गीतेत 'गामाविश्य च भूतानि' इत्यादि श्लोकांनी सांगीतले आहे. याला धरूनच या ओवीत बुद्धीत होणाऱ्या अर्थज्ञानाच्या स्फुरणाला गणेश देवता हे नाव दिले आहे.

आता ग्रंथारंभी त्या देवतेला नमस्कार करण्याकरिता तिच्या शरीराचे वर्णन करतात. ज्याप्रमाणे राजाचे ठिकाणी प्रजेचे नियमन करण्याची असलेली शक्ती निरनिराळ्या अधिकारी वर्गाचे रूपाने प्रगट होते, त्याप्रमाचे परमेश्वराचे ठिकाणी सृष्टीचे नियमन करण्याची असलेली शक्ती, गणेशादि अधिकारी देवतांच्या रूपाने सृष्टिकाली प्रगट होते. म्हणून ज्याप्रमाणे प्रजेचे नियमन करणाऱ्या अधिकारी वर्गाचे ठिकाणी राजबुद्धीच केली जाते, त्याप्रमाणे मतिप्रकाश करणाऱ्या गणेश देवतेच्या ठिकाणी मतिप्रकाश करण्याची जी शक्ती आहे ती मूळची परमेश्वराचीच जीवानुग्राहकशक्ती असून ती गणेश या नामरूपाने प्रगट झाली असल्यामुळे परमेश्वरच गणेश होय, असा आपला अनुभवजन्य निर्धार श्रीज्ञानेश्वर महाराज "अवधारिजो जी" या शब्दाने व्यक्त करतात. हे परमेश्वरा! सर्वांच्या मतीत यथार्थ ज्ञानाने स्फुरणारा गणेश तूच आहेस असे म्हणून माऊलींनी सर्व श्रोतृवर्गाला यथार्थज्ञान होण्याकरिता गणेशरूप परमेश्वराच्या आशीर्वादाची याचना सूचित केली आहे. हेच तिसऱ्या प्रकारचे आशीर्वादरूप मंगलाचरण होय.

**हे शब्दब्रह्म अशेष। तेचि मूर्ति सुवेष। तेथ वर्णवपु निर्दोष। मिरवत असे॥ ३॥**

**अर्थ**—जेवढे काही वैदिक म्हणजे वेद व वेदानुकूल असलेले स्मृतिपुराणे वगैरे वाङ्मय आहे तेच या

गणेशरूपी परमेश्वराची उत्तम रेखीव वेष केलेली मूर्ती असून त्या वाङ्मयातील शब्द हे गणेशाचे निर्दोष म्हणजे अव्यंग असे शरीर शोभत आहे॥ ३॥

**गूढार्थदीपिका—वर्णवपुनिर्दोष**—येथे सर्व शब्दांवर म्हणजे श्रुति स्मृती, पुराणे इत्यादि वैदिक वाङ्मयावर गणेशाचे मूर्तीची कल्पना करून त्या सर्वांची एकवाक्यता श्रीज्ञानेश्वर महाराजांनी स्वीकारिली आहे. या वाङ्मयांतील शब्दरचना निर्दोष म्हणजे पूर्ण भ्रमप्रमादादि दोषरहित आहे. १—भ्रम म्हणजे विपरीत ज्ञान होणे; २-प्रमाद म्हणजे चुकणे; ३-करणापाटव म्हणजे इंद्रियांचे असामर्थ्य; ४-विप्रलिप्सा म्हणजे खोटे बोलून फसविण्याची बुद्धी. हे दोष जीवाच्या ग्रंथात असू शकतात, नि:स्वार्थी परमेश्वराच्या वाङ्मयात राहत नाहीत, हा 'निर्दोष' या शब्दाचा आशय आहे.

**स्मृती तेचि अवयव। देखा अंगीकभाव। तेथ लावण्याची ठेव। अर्थशोभा॥ ४॥**

**अर्थ**—निरनिळ्या स्मृति ह्या गणेशाच्या शब्दरूपी शरीराचे स्वाभाविक अंगभूत अवयव आहेत. त्या सर्व स्मृतिरूप अवयवांचे ठिकाणी त्या स्मृतीतील निरनिराळे सिद्धान्तरूप अर्थसौंदर्य हेच गणेशाच्या शरीराचे एकवटलेले सौंदर्य होय.

**गूढार्थदीपिका—अवयव अंगीकभाव**—श्रुती म्हणजे ज्याला आत्मविस्मृती कधीच झाली नाही अशा पुरुषाचे शब्द होत. असा एक परमात्माच आहे. म्हणून श्रुतीला म्हणजे वेदाला परमेश्वरप्रणीत म्हणतात. या श्रुती म्हणजे वेद, ब्राह्मण, उपनिषदे होत.

ज्यांना आत्मविस्मृती झाली त्यांना जीव म्हणतात. परमेश्वरप्रणीत श्रुतीवरून ज्यांना पुढे आत्मज्ञान झाले व नंतर त्यांनी जे ग्रंथ केले. त्या ग्रंथांना स्मृती म्हणतात. मन्वादिस्मृती व षड्दर्शने इत्यादि स्मृतीग्रंथ होत.

या सर्व श्रुति—स्मृति—पुराणे वगैरेतींल सर्व सिद्धान्तांची एकवाक्यता आहे. ज्याप्रमाणे शरीराचे निरनिराळे अवयव शरीर पोषणाचे निरनिराळे कार्य करून एका संपूर्ण शरीराला पुष्टी देतात, त्याप्रमाणे स्मृती श्रुतीचेच आंगीक म्हणजे अंगभूत अवयव आहेत. म्हणजे श्रुतीतीलच अर्थ किंवा सिद्धान्त त्यांनी व्यक्त केलेले आहेत म्हणून श्रुतीला पोषक आहेत. त्यात श्रुत्यर्थाला सोडून स्मृतिकाराने आपल्या बुद्धीतले काहीही सिद्धान्त ओतलेले नाहीत असे 'अवयव' व 'आंगीकभाव' या पदांनी सुचविले आहे.

**अष्टादश पुराणें। तींचि मणिभूषणें। पदपद्धती खेवणें। प्रमेयरत्नांची॥ ५॥**

**अर्थ**—अठरा पुराणे ही गणेशाच्या वर्णरूपी शरीरावरील रत्नालंकार आहेत व त्यातील शब्दरचना ही त्यात असलेल्या अनेक वेदान्तसिद्धान्तरूपी रत्नांची कोंदणे आहेत.

**गूढार्थदीपिका—तींचि मणिभूषणें**—येथे अठरा पुराणांना गणेशाच्या शब्दब्रह्म शरीरावरील रत्नालंकार म्हटले आहे. याचा आशय असा आहे की ज्याप्रमाणे अलंकाराने मनुष्याचे शरीर सुंदर दिसते, त्याप्रमाणे पुराणांनी वेदातील अर्थरूपी सिद्धान्त सुशोभित करून दाखविले आहेत व पुराणातील शब्दरचनेने ते सिद्धान्तरूपी अर्थ खुलवून ठसठशीत दिसतील असे मांडले आहेत. वेद हे अस्पष्टार्थबोधक असल्यामुळे त्यातील सिद्धान्त वेदशब्दावरूनच स्पष्टपणे कळत नाहीत. परंतु तेच सिद्धान्त स्पष्टपणे कळतील अशा शब्दांत पुराणातून मांडले आहेत. म्हणूनच,

**इतिहासपुराणाभ्यां वेदं समुबृंहयेत्। बिभेत्यल्पश्रुताद्वेदो मामयं प्रहरिष्यति॥**

इतिहास पुराणानुसार वेदाचा अर्थ करावा असे भारत, अविस्मृत्यादि ग्रंथातून सांगितले आहे व ऋग्वेदाच्या भूमिकेत विद्यारण्यांनी असेच म्हटले आहे. इतिहास पुराणे सोडून आपल्या बुद्धीने वेदांचा अर्थ करू पाहणारा माझा अर्थघात करील अशी वेदाला भीती वाटते. वेद श्रेष्ठ व इतिहास पुराणे गौण असे मानल्यास गौण अशा इतिहास पुराणानुसार श्रेष्ठ अशा वेदाचा अर्थ करावा असे म्हणणे सयुक्तिक नाही. म्हणून वरील वाक्यावरून वेद व इतिहास पुराणे यांचे तुल्य प्रामाण्य आहे असा अर्थ होतो.

वेद, स्मृति, पुराणे, इतिहास इत्यादि ग्रंथ निरनिराळ्या काळी झाले असल्यामुळे त्यांची एकवाक्यता कशी करावयाची अशी कित्येक शंका घेतात, पण ती अज्ञानमूलक अतएव निरर्थक आहे. अज्ञानी जीवांना यथार्थ

आत्मज्ञान व्हावे म्हणून नित्यज्ञानी परमेश्वराने निर्माण केलेल्या वेदग्रन्थानंतर निरनिराळ्या काळी इतिहास पुराणादि ग्रंथ निर्माण झाले असले तरी ते भगवंतांनीच आपल्या ज्ञानसंपन्न अशा निरनिराळ्या अधिकारी पुरुषांकडून प्रगट करविले आहेत. आणि परमेश्वरापासून पूर्ण साक्षात्कारी होणाऱ्या जीवापर्यंत जेवढे काही आत्मज्ञान प्रगट झालेले असते ते सर्वांचे एकरूपच असते. कारण ज्या परब्रह्माचा साक्षात्कार किंवा ज्ञान व्हावयाचे ते परब्रह्म एकजिनसी, पूर्ण, निरंश असे असल्यामुळे ते ज्ञान प्रत्येक साक्षात्कारी पुरुषांचे भिन्न-भिन्न राहू शकत नाही. ज्याप्रमाणे टीकाकार मूळ ग्रंथकाराचा आशय स्पष्ट करतो, त्याप्रमाणे पुराण, इतिहास, किंबहुना संतवाङ्मय यातून मूळ वैदिक सिद्धान्तच स्पष्ट केलेले असतात. म्हणून वेद, इतिहास, पुराण, संतवाङ्मय यांची एकवाक्यता करून यथार्थ सिद्धान्त कळू शकतो, असे सर्व साक्षात्कारी पुरुषांचे म्हणणे आहे व तशाच रीतीने त्यांनी वेदान्तसिद्धान्त ग्रहण केले आहेत.

**पदबंध नागर। तेंचि रंगाथिलें अंबर। जेथ साहित्य वाणें सपूर। उजाळाचें॥ ६ ॥**

**अर्थ**—त्यातील शब्दांची बांधणी ही गणेशाचे अंगावरील रंगविलेले वस्त्र असून त्यातील भरपूर उपमादि अलंकारसाहित्य हेच त्या वस्त्राला उठावदार व बहुमोलाचे दाखविणारे तेज किंवा चकचकितपणा होय. ॥ ६ ॥

**देखा काव्यनाटका। जें निर्धारितां सकौतुका। त्याचि रुणझुणती क्षुद्रघंटिका। अर्थध्वनि॥ ७ ॥**

**अर्थ**—जसा जसा विचार करावा तसतशी जी काव्यनाटके कौतुकास्पद व चित्ताकर्षक वाटतात, तीच गणेशाच्या पायातील घागऱ्या असून त्यातील ध्वन्यर्थ हाच त्या घागऱ्यांचा रुणझुण नाद होय. ॥ ७ ॥

**गूढार्थदीपिका—अर्थध्वनि**—येथे घागऱ्यांच्या ध्वनीप्रमाणे काव्य व नाटके ही वेदार्थाला गोड ध्वन्यर्थाने प्रगट करतात असे माऊली सूचित करीत आहे. म्हणून वेदार्थानुकूल वेदार्थाचा ध्वनी काढणारी काव्यनाटके येथे स्वीकारली पाहिजेत हे उघड आहे. धर्माविरुद्ध विषयवासना वाढवून इंद्रियांचे चाळे पुरविण्याची प्रवृत्ती उत्पन्न करणारी काव्यनाटके येथे घेता येत नाहीत.

**नाना प्रमेयांची परी। निपुणपणें पाहतां कुसरी। दिसती उचित पदें माझारीं। रत्नें भलीं॥ ८ ॥**

**अर्थ**—अर्थव्युत्पत्तीत निष्णात होऊन पाहणाऱ्याला या काव्यनाटकातून जे वैदिक सिद्धान्त कौशल्याने मांडले आहेत ते सिद्धान्त व्यक्त करणारी योग्य पदे हीच त्यातील रत्ने होत. ॥ ८ ॥

**जेथ व्यासादिकांची मती। तेचि मेखळा मिरवती। चोखाळपणें झळकती। पल्लवसडका॥ ९ ॥**

**अर्थ**—या वैदिक वाङ्मयातील व्यासादिक दर्शनकारांच्या विचारप्रान्ताची मर्यादा हाच गणेशाच्या कंबरेला बांधलेला शेला असून, त्यातील स्पष्टपणे झळकणारे विचार हेच शेल्याचे मोकळे सडक पदर होत. ॥ ९ ॥

**गूढार्थदीपिका—व्यासादिकांची मती**—शेल्याचे झळकणारे पदर अनेक असले तरी ते जसे एकाच शेल्याला शोभा आणतात, त्याप्रमाणे दर्शनकारांचे विचार भिन्न दिसले तरी ते एकाच अद्वैतवेदान्तमतालाच पोषक असतात असे येथे माऊलींनी पुन: दर्शविले आहे.

**देखा षड्दर्शनें म्हणिपती। तेचि भुजांची आकृती। म्हणऊनि विसंवादे धरिती। आयुधें हातीं॥ १० ॥**

**अर्थ**—वैदिक षड्दर्शने जी म्हटली जातात तीच निरनिराळ्या भुजांची आकृती होय. म्हणूनच निरनिराळी आयुधे हाती धरिली आहेत. ॥ १० ॥

**गूढार्थदीपिका**—गणेशपुराणात कृतयुगातील गणेशाचे षड्भुजात्मक वर्णन केले आहे. तेच येथे षड्दर्शनाच्या उपमेकरिता माऊलींनी घेतले आहे. षड्दर्शने ही बाहू आहेत व त्यातील प्रतिपाद्य विषय ही आयुधे होत. एक एक वैदिक दर्शन एका-एका भुजेच्या निरनिराळेपणासारखे निरनिराळे दिसते व भुजांचे निरनिराळेपणामुळे जसे निरनिराळ्या हातात निरनिराळी आयुधे धरिता येतात, त्याप्रमाणे निरनिराळ्या दर्शनांचा प्रतिपाद्य विषयही निरनिराळा दिसतो. एका शरीराच्या निरनिराळ्या हातात जरी निरनिराळी आयुधे असली तरी ती सर्व शरीरसंरक्षणार्थच उपयोगिली जातात त्याप्रमाणे सर्व वैदिक दर्शने निरनिराळा विषय प्रतिपादित असली, तरी ती वैदिक अद्वैतसिद्धान्ताचेच शेवटी पोषण करतात, किंवा तोच अर्थ सिद्ध करतात असे दिसून येते.

**चहूं वेदीं जाण षड्शास्त्रीं कारण। अठराहि पुराणें हरीसी गाती॥ हरिपाठ.**

चार वेद, सहा शास्त्रे व अठरा पुराणे एका अद्वैत ब्रह्मवस्तूचेच प्रतिपादन करितात असे श्रीज्ञानेश्वर महाराजांनी हरिपाठाचे अभंगात म्हटले आहे. महिम्नस्तोत्राच्या टीकेत,

**सर्वेषां प्रस्थानकर्तृणां साक्षात्परंपरया वा अद्वैते ब्रह्मण्येव तात्पर्यम्।**
**न हि ते मनुयोभ्रान्ताः सर्वज्ञत्वात् तेषाम्॥ मधुसूदन.**

सर्व स्मृतिकार व दर्शनकार यांच्या स्मृतीचे व दर्शनांचे तात्पर्य साक्षात् किंवा परंपरेने अद्वैतब्रह्म प्रतिपादन करण्यातच आहे. कारण ते सर्व परमेश्वरकृपेने सर्वज्ञ होते, भ्रान्त नव्हते, असे मधुसूदन सरस्वतीही म्हणतात. सर्व दर्शनकारांचे अद्वैतप्रतिपादनात तात्पर्य कसे आहे हे विद्यारण्यांनी सूतसंहितेवरील.

**अन्यागमाश्च विदुषामनुभूतिस्तथैव च। अस्मिन्नर्थे स्वसंवेद्ये पर्यवस्यंति नान्यथा॥**

या श्लोकाच्या टीकेत स्पष्ट दाखविले आहे भारतातही शान्तिपर्वात अध्याय ३४७ मधील श्लोकात याच अर्थाचे प्रतिपादन आले आहे. सर्व वैदिक वाङ्मयाचे प्रतिपाद्य सरते शेवटी एक अद्वैत ब्रह्मवस्तूच आहे व हेच श्रीज्ञानेश्वर महाराज यांनी या ओवीत सांगितले आहे.

**तरी तर्कु तोचि फरशु। नीतिभेदु अंकुशु। वेदान्तु तो महारसु। मोदकु मिरवे॥ ११॥**

**अर्थ**—सत्तर्क हा हातातील फरशू आहे, नीतिभेद हा अंकुश होय आणि वेदान्तदर्शनातील प्रतिपाद्य विषय जो परमानंद तो गणेशाचे हातातील मधुर मोदक होय॥ ११॥

## तर्कु तोचि फरशु

**गूढार्थदीपिका—१-न्याय—**येथे श्रीमहाराजांनी षड्दर्शनांना बाहू म्हणून, प्रतिपाद्य विषयांना आयुधे म्हटले आहे, न्याय—वैशेषिक, उत्तरमीमांसा—पूर्व मीमांसा, सांख्य—योग अशी वैदिक षड्दर्शने आहेत. श्रीज्ञानेश्वर महाराजांनी प्रथम न्यायदर्शनाला गणेशाच्या हाताची उपमा देऊन त्यातील प्रतिपाद्य विषय जो सत्तर्क त्याला गणेशाच्या हातातील फरशुची उपमा दिली आहे, ही उपमा फार समर्पक आहे. वाटेमध्ये आड येणाऱ्या पदार्थाचा छेद करण्याकरिता जसा फरशुचा उपयोग केला जातो, त्याप्रमाणे अद्वैत ब्रह्मज्ञान संपादन करताना जे संशय उत्पन्न होतात किंवा आक्षेप घेतले जातात. त्यांचा उच्छेद करून शुद्ध ब्रह्मविचार अंत:करणात ठसविण्याकरिता वेदान्तात सत्तर्काची आवश्यकता मानली आहे. "**जन्माद्यस्य यत:**" (ब्र० सू० १। १। २) या सूत्रावरील भाष्यात "**श्रोतव्यो मंतव्य:**" (बृह० २। ४। ५) ही श्रुती प्रमाण देऊन आचार्य म्हणतात.

**श्रुत्यैव च सहायत्वेन तर्कस्याभ्युपेतत्वात्।**

श्रुतीत सांगितलेला सिद्धान्त दृढ बिंबविण्याकरिता सहायार्थ वेदान्तात श्रुत्यनुकूल तर्काचा अंगीकार केला आहे. श्रुतिविरोधी तर्काचा मात्र वेदान्तात स्वीकार नाही. अशा रीतीने न्यायशास्त्र सत्तर्काचे स्वरूप दाखवून वेदान्ताला पोषक होते.

## नीतिभेदु अंकुशु

**२—वैशेषिकदर्शन:—**नीतिभेद म्हणजे वैशेषिक दर्शन होय. या वैशेषिक दर्शनाला नीतिभेद म्हणण्याचे कारण असे की नीती म्हणजे धर्म. पूर्वमीमांसादर्शन व वैशेषिकदर्शन या दोघांनीही धर्माची व्याख्या केली आहे. पूर्वमीमांसा दर्शनाने,

**चोदनालक्षणोऽर्थो धर्म:।**

'अमुक कर' अशी आज्ञा हे वचनावरून धर्माचे लक्षण ठरविले व वैशेषिक दर्शनाने थोड्या भिन्न रीतीने,

**यतोऽभ्युदयनि:श्रेयससिद्धि: स धर्म:।**

ज्याच्या पासून विषयसुख व मोक्षसुख मिळते तो धर्म अशी फलावरून धर्माची व्याख्या केली आहे. म्हणून वैशेषिक दर्शन नीतिभेद म्हणजे धर्मभेद किंवा भिन्न रीतीने धर्माची व्याख्या करणारे शास्त्र होय. या शास्त्राला

श्रीज्ञानेश्वर महाराजांनी गणेशाचे हातातील अंकुशाची उपमा दिली आहे. याचे कारण असे की वैशेषिक दर्शनाने जी धर्माची व्याख्या केली आहे तीत ज्या धर्माच्या योगाने अभ्युदय सिद्धि व नि:श्रेयस सिद्धी होते तो धर्म अशी अट आहे. ज्या धर्माचरणाने नि:श्रेयस अंतरेल व नुसता अभ्युदय साधेल, असे आचरण धर्मरूप नव्हे. येथे अभ्युदय साधताना नि:श्रेयस अंतरणार नाही इकडे लक्ष दिले पाहिजे. असा हा धर्मभेद आहे व तो अंकुशाप्रमाणे कार्य करतो अंकुशाच्या योगाने जसा माहुत हत्तीला वळवितो, तसा हा धर्मभेदही नि:श्रेयसाला घातक अशा स्वैरवृत्तीपासून वळविणारा होतो.

## वेदान्तु तो महारसु

**३—उत्तरमीमांसादर्शनः—**वेदान्त दर्शनाने परमानंदाची प्राप्ती होते, म्हणून त्या दर्शनाला गणेशाच्या हातातील मधुर अशा मोदकाची उपमा दिली आहे.

**एके हातीं दन्तु। जो स्वभावता खंडितु। तो बौद्धमतसंकेतु। वार्तिकांचा॥ १२॥**

**अर्थ—**गणेशाच्या एका हातात जो दात आहे तो बौद्धमताचे आपोआप [सहजलीलेने] खंडन करणारा वार्तिकांचा संकेत होय.॥ १२॥

## खंडित बौद्धमत

**गूढार्थदीपिका—४-पूर्वमीमांसादर्शन—**भगवती ज्ञानेश्वरीच्या अनेक भाषान्तरकारांनी या ओवीत बौद्धदर्शनाचा उल्लेख केला आहे. पण गणेशाच्या शरीराच्या ठिकाणी वेद, पुराण, इतिहासादि वैदिक वाङ्मयाचीच उपमा दिली आहे. तेव्हा गणेशाच्या सहा हाताच्या ठिकाणी सहा वैदिक दर्शनांचीच उपमा घेतली पाहिजे. पाच वैदिक दर्शने व एक बौद्ध जे अवैदिक दर्शन आहे व ज्याचे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी आपले अमृतानुभव ग्रंथात,

**शून्यसिद्धान्त बोधु। कवणें सत्ता होय सिद्धु॥ (अमृ० प्र० ४ ओ० २७)**

या ओवीने खंडन केले आहे, ते येथे घेणे सयुक्तिक होत नाही.वैदिक दर्शने सहा आहेत हे मागे सांगितलेच आहे. या दर्शनांचा जोडी जोडीनेच ग्रंथात उल्लेख केलेला दिसतो व श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी तसाच उल्लेख करून बाहूंना उपमा दिली आहे. न्याय—वैशेषिक या जोडीचा निर्देश केल्यानंतर पुढे वेदान्त दर्शनाचा उल्लेख आला आहे. तेव्हा त्याच्या जोडीचे जे पूर्वमीमांसा दर्शन तेच येथे घ्यावयास पाहिजे. म्हणून या ओवीत बौद्धदर्शनाचा उल्लेख नसून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पूर्वमीमांसेचा निर्देश करून उपमा दिली आहे.

**बौद्धमत संकेतु। वार्तिकांचा॥**

कुमारिल भट्ट यानी पूर्वमीमांसेवर तंत्रवार्तिक व श्लोकवार्तिक अशी दोन वार्तिके लिहिली आहेत. या वार्तिकात आत्मा कर्ताभोक्ता आहे असे प्रतिपादन केले आहे. त्यामुळे बौद्धांच्या क्षणिकविज्ञान आत्मवादाचे व आत्मशून्यवादाचे आपोआप खंडन झाले आहे. कारण आत्मा कर्ता व भोक्ता असे जे वार्तिककाराने मानले आहे, त्याचा अर्थ असा होतो की कर्मकर्त्यालाच त्याच्यां कर्माचे फळ मिळणे न्यायप्राप्त आहे व कर्माचे फळ भोगण्याकरिता कर्मकर्ता स्थिर असावयास पाहिजे व तसाच तो स्थिर आहे. या विधानाने बौद्धांच्या क्षणिकविज्ञान आत्मवादाचे व शून्यात्मवादाचे अनायासेच खंडन होत आहे.

येथे बौद्धदर्शन जर घेतले तर षड्दर्शनांपैकी एक वैदिकदर्शन (पूर्वमीमांसा किंवा योगदर्शन) उपमा दिल्यावाचून सुटून जाते. यास्तव या ठिकाणी वैदिक पूर्वमीमांसादर्शनच घेणे योग्य आहे.

''वार्तिकांचा'' या अनेकवचनी पदाने तंत्रवार्तिक व श्लोकवार्तिक या दोन वार्तिकांचा येथे निर्देश आहे.[१]

**मग सहजें सत्कारवादु। तो पद्मकर वरदु। धर्मप्रतिष्ठा तो सिद्धु। अभयहस्तु॥ १३॥**

**अर्थ—**मग गणेशाचा पांचवा हात हा सहज असणारा सत्कार्यवादरूपी सांख्य दर्शन असून तेथे भक्तांना इच्छित

---

१. **टीप—**याच विषयाचे विस्तृत विवेचन ''ज्ञानेश्वरीतील षड्दर्शने'' या माऊली मासिकातील लेखात केलेले आहे. [illegible] परिशिष्टात घेतला आहे, तो पहावा.

वर देणारे करकमल आहे. आणि सहावा हात हा धर्म म्हणजे सच्चिदानंद धर्म त्याची प्रतिष्ठा करून देणारे योगदर्शन असून त्यायोगे अभय प्राप्त होते, म्हणून त्या दर्शनाला माऊली अभय असे म्हणते. ॥ १३ ॥

**गूढार्थदीपिका—५-सांख्य दर्शन—**''सत्कारवाद'' म्हणजे सत्कार्यवाद. जगद्रूपी कार्य सत् म्हणजे खरे आहे, असा वाद. हा वाद सांख्यदर्शनाचा आहे. तो वाद ''सहज' आहे. म्हणजे न सांगता सर्व आबालवृद्ध अज्ञानी जीव जगत् खरे आहे असे स्वभावतः च मानतात. सांख्यदर्शनात प्रकृती व पुरुष यांच्या विवेकाने म्हणजे प्रकृती व पुरुष हे दोन निराळे पदार्थ आहेत असे समजल्याने पुरुष, प्रकृती व तिच्या कार्यापासून आपल्याला अत्यंत अलग पाहतो व दुःखापासून सुटतो. म्हणून माउलीने सांख्यदर्शनाला वरदहस्त म्हटले आहे.

पुरुषाने आपल्याला प्रकृती व तीचि चोवीस कार्ये यांपासून अलग करून घेणे हेच सांख्यज्ञानाचे ध्येय आहे, व हे ध्येय वेदान्तात पहिली पायरी म्हणून स्वीकारले आहे. प्रकृती व तीचि कार्ये यांपासून अलग करून घेणे हा व्यतिरेक होय. या व्यतिरेकाने पुरुष त्रिविध दुःखांपासून मुक्त होतो, परंतु त्याला परमानंदाची प्राप्ती होत नाही. त्याकरिता वेदान्तदर्शनाची आवश्यकता आहे. कारण वेदान्तदर्शनात नामरूपासह सर्व ब्रह्म आहे असा अन्वयविचार हाच वेदान्तातील मुख्य विषय आहे. या अन्वयाने पुरुषाला परमानंदाची प्राप्ती होते. अशा रीतीने सांख्यदर्शन प्रथम व्यतिरेक करवून पुरुषाला वेदान्तदर्शनाची भूमिका तयार करून देते. म्हणून ते दर्शन (सांख्य) वेदान्तदर्शनाची पहिली पायरी समजली जाते.

**६-योगदर्शन—धर्मप्रतिष्ठा—**योगशास्त्राने जीवाचे ठिकाणचे जीवधर्म जाऊन परमेश्वराचे सच्चिदानंदधर्म स्थापित होतात व तो अभयाला प्राप्त होतो, म्हणून योगदर्शनाला अभयहस्त असे म्हटले आहे.

**देखा विवेक तव सुविमळु। तोचि शुंडादंडु सरळु। जेथ परमानंदु केवळु। महासुखाचा॥ १४॥**

**अर्थ—**शुद्ध आत्मानात्मविवेक हाच गणेशाची सरळ शुंडा होय आणि तेथेच परमानंद व महासुखाची प्राप्ती होते. विवेकाने प्राप्त होणारा साम्यभाव हा परमानंददायक आहे असा अर्थ. ॥ १४ ॥

**गूढार्थदीपिका—**सांख्यशास्त्र विचाराने पुरुषप्रकृतीचा विवेक म्हणजे निराळेपणा झाला तरी त्या शास्त्रात प्रकृती ही स्वतंत्र निराळी वस्तू मानल्यामुळे द्वैत कायम राहते. तेथे प्रकृतीहून निराळा झालेला पुरुष उदासीन राहतो, म्हणून तो दुःखातून सुटतो, असे जरी सांख्यशास्त्र म्हणत असले तरी,

**अनुकूलवेदनीयं सुखम्। प्रतिकूलवेदनीयं दुःखम्।**

म्हणजे जे अनुकूल असते ते सुख व प्रतिकूल असते ते दुःख अशा सुखदुःखाच्या व्याख्या शास्त्रकार मानतात. उदासीनता ही काही सात्त्विक वृत्ती असली तरी प्रियवृत्ती नव्हे. थोडी प्रतिकूल वृत्तिच आहे.

**उदासीनोऽरिवद्वर्ज्यः।** (भाग० १०। २४। ५)

असे भागवतात म्हटले आहे. उदासीन म्हणजे मित्र नव्हे. म्हणून प्रकृतिविषयी सांख्यविचाराने उदासीन झालेला पुरुष निःशेष दुःखरहित होत नाही. वेदान्तातील आत्मनात्मरूपी शुद्ध विवेकाच्या योगाने प्रकृती व तिचे कार्य संपूर्ण मिथ्या ठरवून म्हणजे त्याला स्वतंत्र अस्तित्व व वस्तुत्व मुळीच नाही असे कळून आल्यावर, मग ''सरळ'' म्हणजे समरस असा एक आत्माच उरतो. तेथे प्रतिकूल मानण्याजोगे किंवा उदासीन असण्याजोगे असे कांहीच उरत नाही. उरलेला असा एक समरस आत्मा अत्यंत प्रिय अतएव अनुकूल असल्यामुळे त्याचे ठिकाणी जसजसे चित्त स्थिर होईल तसतसा महासुखाचा किंवा परमानंदाचा अखंड लाभ होतो.

**तरी संवादु तोचि दशनु। जो समता शुभ्रवर्णु। देवो उन्मेषसूक्ष्मेक्षणु। विघ्नराजु॥ १५॥**

**अर्थ—**सर्व दर्शनांची एकवाक्यता हाच गणेशाच्या मुखातील पांढरा शुभ्र एकसारखा समान असलेला दात होय. हा सर्व विघ्नांचा शास्ता असा गणेश, उन्मेष म्हणजे अद्वैतज्ञानरूपी सूक्ष्म दृष्टी असलेला देव होय॥ १५॥

**गूढार्थदीपिका—**येथे संवाद हा शब्द विसंवादीच्या विरोधी अर्थाने आला आहे. वैदिक षड्दर्शने वरवर विसंवादी म्हणजे भिन्न भिन्न मतांचे प्रतिपादन करणारी दिसत असली तरी ब्रह्मदृष्टीने त्यांची एकवाक्यता आहे असा

अर्थ. रजस्तमोगुणी दर्शनांचा आग्रह सोडल्यास शुद्धसत्वगुणात्मक समबुद्धीने त्यांची एकवाक्यता होते, हा 'जो समता शुभ्रवर्ण' या पदसमुच्चयाचा भाव आहे. प्रपंचाला जाणणारी स्थूल दृष्टी जीवाचे ठिकाणी असते. अत्यंत सूक्ष्म अशा परब्रह्माला जाणणारी दृष्टी सूक्ष्म किंवा चरम म्हटली जाते. परमेश्वराचे ठिकाणी एक तीच सूक्ष्म दृष्टी असते, स्थूल दृष्टी मुळीच नसते म्हणजे जीवाला जसे जगाचे भान आहे तसे ते परमेश्वराला मुळीच नाही असा भाव. ज्ञानेश्वरीत श्री माउली म्हणते.

**तो सृजी पाळी संहारी। ऐसें बोलती जें चराचरीं। तें अज्ञान गा अवधारीं। पंडुकुमरा॥** (ज्ञाने० ५-८२)

**जगचि हें होय जाये। तो शुद्धीही नेणे॥** (ज्ञाने० ५-७९)

'विघ्नराज' या शब्दाने आपल्या भक्ताची परमार्थ मार्गातील विघ्ने नाहीशी करण्याचे सामर्थ्य परमेश्वराचे ठिकाणी आहे, हे दाखविले आहे.

**मज अवगमलिया दोनी। मीमांसा श्रवणस्थानीं। बोधमदामृत मुनी-। अली सेविती॥ १६॥**

**अर्थ**—पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा या दोन मीमांसा गणेशाचे दोन श्रवण म्हणजे कान होत असे मला वाटते व त्यातील ज्ञान मादक अमृत असून, मुनिरूपी भ्रमर त्याचे सेवन करतात. ॥ १६ ॥

**गूढार्थदीपिका**—पूर्वमीमांसा दर्शन व उत्तरमीमांसा दर्शन यांची उपमा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वर दिली असून पुन: येथे त्यांची कानाचे ठिकाणी उपमा देत आहेत. याचे कारण हे आहे की, षड्दर्शनांपैकी पूर्वदर्शन व उत्तरदर्शन ही दोन दर्शने अशी आहेत की ज्यांचे दर्शन व मीमांसा असे दोन स्वतंत्र भाग पडतात. उपनिषदे हे उत्तरदर्शन असून कर्ममार्ग सांगणारे श्रौतस्मार्त ग्रंथ हे पूर्वदर्शन होय. या दोन्ही दर्शनातील नाना प्रकारचे जे वचनविरोध आहेत, त्यांचा परिहार करून त्यांची एकवाक्यता करणे व व्यवस्था लावणे, हा मीमांसेचा भाग होय. कर्मदर्शनात कर्मदेवता वगैरे प्रतिपादक जी वचने आहेत, त्यांचा विरोधपरिहार पूर्वमीमांसेत केला आहे आणि आत्मविषयक, ज्ञानविषयक, उपासनाविषयक वगैरे जी उपनिषदातील वचने आहेत त्यांचा विरोधपरिहार उत्तरमीमांसेत केला आहे. ही दोन दर्शने सोडून बाकीच्या न्यायादि दर्शनात विरोधपरिहाराचा संबंधच नसल्यामुळे त्या दर्शनांचे मीमांसाग्रंथ स्वतंत्र नाहीत. म्हणून षड्दर्शनांची उपमा देताना, निरनिराळ्या यज्ञयागादि कर्माचे नुसते निरूपण करणाऱ्या ग्रंथाचा पूर्वदर्शन या शब्दाने उल्लेख करून, उपनिषदांचा उत्तरदर्शन म्हणून उल्लेख केला गेला आहे व विरोध-परिहार करणारे पूर्वमीमांसा सूत्रग्रंथ व उत्तरमीमांसा सूत्रग्रंथ यांना मीमांसा म्हणून तेथे संबोधिले आहे.

सूत्रग्रंथांना देखील दर्शन म्हणून (पूर्वमीमांसा दर्शन व उत्तरमीमांसा दर्शन) संबोधण्यात येते. याचे कारण हे आहे की या सूत्रग्रंथात देखील मूळ दर्शनग्रंथातील सिद्धान्त देऊन त्यांची मीमांसा केली आहे. दर्शन ग्रंथांचे सिद्धान्त त्यात असल्यामुळे त्यांना दर्शन म्हणतात व मीमांसा केली आहे म्हणून मीमांसा म्हणतात. अर्थातच त्यांची गणेशाच्या कानाला योग्य अशी स्वतंत्र उपमा दिली गेली आहे. मीमांसा ऐकल्याखेरीज बरोबर कर्मज्ञान किंवा ब्रह्मज्ञान होणार नाही. निरनिराळ्या कर्माने प्राप्त होणाऱ्या स्वर्गादिकातील विषयसुखाच्या आसक्तीने मदांध झालेले मुनी कर्मज्ञानाची मीमांसा करणारी पूर्वमीमांसा ऐकतात व ब्रह्मज्ञानाने प्राप्त होणाऱ्या आत्मसुखाच्या आसक्तीने मदांध झालेले विरक्त मुनी शुद्ध ब्रह्मज्ञान करून देणारी उत्तरमीमांसा ऐकतात.

**प्रमेय प्रवाल सुप्रभ। द्वैताद्वैत तेचि निकुंभ। सरिसेपणे एकवटती इभ। मस्तकावरी॥ १७॥**

**अर्थ**—तेजस्वी प्रवाळाप्रमाणे असलेले द्वैत व अद्वैत ही दोन प्रमेये हीच त्या गणेशाची गंडस्थळे होत आणि तीच गणपतीच्या हत्तीच्या मस्तकावर सारखीच बरोबरीने राहिली आहेत. ॥ १७ ॥

**गूढार्थदीपिका—द्वैताद्वैत.......एकवटती:**—द्वैत व अद्वैत ही प्रमेये परस्परांचा विरोध न येता गणेशाचे मस्तकावर गंडस्थळाप्रमाणे राहिली आहेत. या म्हणण्याचा भावार्थ असा की वस्तू व वस्तूची शक्ती मिळून एक वस्तू होत असते. वस्तू व वस्तूची शक्ती या दोन निराळ्या वस्तू नसतात. म्हणून त्यांना यत्किंचित् अलग करता येत नाही.

ब्रह्मवस्तू ही तशीच शक्तिसहित एकरूप आहे. ब्रह्मवस्तू व तिची शक्ती अलग करता येत नाही. म्हणूनच त्यांचा निराळेपणा नाही. पाण्यावर लहरी स्फुरल्याबरोबर मुळच्या पाण्याचा एकपणाच दोनपणाने भासू लागतो, पण पाण्याहून लहरी किंवा लहरीहून पाणी निराळे करता येत नाही. कारण त्यांचे एकवस्तुत्व कायमच राहते. म्हणून त्यांचे ऐक्य किंवा अभेद खरे (कधीही नष्ट न होणारे) असल्यामुळे त्यांचे दोनपण भासमात्र ठरते. त्याप्रमाणे ब्रह्मवस्तू शक्तिस्वरूपाने किंवा वृत्तिस्वरूपाने स्फुरण पावली असता ब्रह्म व स्फुरण असे दोनपणाने दिसत असले तरी, त्यांचे ऐक्य किंवा एकवस्तुत्व नाहीसे होत नाही व त्यांना परस्परातून अलग निराळे करता येत नाही. म्हणून ब्रह्म व त्याची शक्ती यांचे दोनपण भासमात्र असते. ज्याप्रमाणे एक पाणीच लहरीच्या रूपाने दोनपणाला येते. म्हणून त्या दोनपणाचा पाण्याच्या एकपणाशी विरोध नसतो किंवा पाण्याच्या एकपणाचा लहरीमुळे होणाऱ्या दोनपणाशी विरोध नसतो; त्याप्रमाणे अद्वैत परब्रह्मच शक्तीच्या स्फुरणाने दोनपणाला येत असल्यामुळे अद्वैतब्रह्माचा शक्तीच्या स्फुरणामुळे भासणाऱ्या दोनपणाशी किंवा शक्तीच्या स्फुरणामुळे भासणारा दोनपणा ब्रह्माच्या अद्वैतपणाशी विरोधी नाही. कारण पाणी लहरीरूपाने दोनपणाला आले तरी पाणी व लहरी यात जसे पाणीच असते, त्याप्रमाणे ब्रह्मही शक्तीस्फुरणाने दोनपणाला आले तरी ब्रह्म व स्फुरण या दोहोतही एक सच्चिदानंद परब्रह्मच अनुभवाला येते. पाण्याच्या लहरीच्या स्फुरणाने पाण्याचे ज्ञान जसे झाकले जात नाही, त्याप्रमाणे ब्रह्माच्या शक्तिस्फुरणाने ब्रह्माचे सच्चिदानंद ज्ञान झाकले जात नाही.

**अद्वैत परमार्थोहि द्वैतं तत्कार्यमुच्यते।**

या मांडुक्यकारिकेवरील आपल्या भाष्यात आचार्यांनी हाच आशय दाखविला आहे. आचार्यांनी किंवा श्रीज्ञानेश्वर महाराजादि संतांनी जे द्वैताचे खंडन केले आहे, ते ज्या द्वैताच्या प्रत्ययाने अद्वैतप्रत्यय झाकला जातो व अद्वैतब्रह्माच्या सच्चिदानंद धर्माहून निराळ्या अशा जड विनाशी व दु:खरूप धर्माचा प्रत्यय येतो अशा द्वैत प्रत्ययाचे त्यांनी खंडन केले आहे. द्वैताला अद्वैतासारखेच त्रिकालाबाधित मानणारे जे लोक आहेत, ते आचार्याप्रमाणे द्वैताला अद्वैताचे कार्य मानीत नाही. कारण साखरेपासून बनलेल्या पदार्थात जशी साखर स्पष्ट असते तशाप्रमाणे सच्चिदानंद परब्रह्मापासून झालेल्या द्वैतरूप जगाचाही सच्चिदानंद धर्माने अनुभव त्यांना आला असता. पण ते ब्रह्मापासून झालेल्या द्वैतरूप जगाला जड, विनाशी, दु:खरूप मानतात म्हणून त्यांचा द्वैतप्रत्यय अद्वैतप्रत्ययाला झाकणारा होतो. तेथे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी द्वैताद्वैत ही अविरोधी गंडस्थळाप्रमाणेच आहेत असे जे म्हटले आहे ते द्वैती लोकांच्या म्हणण्याप्रमाणे नाही. हाच विषय त्यांनी अनुभवामृतात स्पष्ट केला आहे. सारांश अद्वैत त्रिकालाबाधित किंवा अखंड अबाधित असून द्वैत भासमात्र आहे असाच श्रीज्ञानेश्वर महाराजांचा येथे आशय आहे.

कोणी म्हणतात की या ओवीत 'निकुंभ' शब्दाचे ऐवजी 'कुंभ' शब्द योग्य आहे; कारण 'निकुंभ' हा शब्द गंडस्थलवाचक नसून 'कुंभ' हा शब्द गंडस्थलवाचक आहे. परंतु येथे 'निकुंभ' हाच शब्द योग्य आहे. कारण 'कुंभ' हा शब्द गंडस्थलवाचक असला तरी त्या शब्दाने एकाच गंडस्थलाचा बोध होईल परंतु गणेशाच्या मस्तकावर दोन गंडस्थले आहेत त्या दोघांचा बोध व्हावा म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी गटवाचक 'नि' हा उपसर्ग 'कुंभ' या शब्दाला लावून 'निकुंभ' या शब्दाने दोन गंडस्थलांच्या गटाचा बोध करून दिला आहे.

**उपरि वेदोपनिषदें। जियें उदारें ज्ञानमकरंदें। तियें कुसुमें मुगुटीं सुगंधें। शोभती भलीं॥ १८॥**

**अर्थ—**ज्यात उदारज्ञानरूपी मकरंद म्हणजे मध भरलेला आहे व जी वेदांचा अंतिम भाग म्हटली जातात ती उपनिषदे गणेशाच्या मस्तकाच्या मुकुटाचे ठिकाणी अत्यंत शोभणारी सुगंधी फुले आहेत. ॥ १८॥

**गूढार्थदीपिका:—**वेदातील मंत्र व ब्राह्मण यातील कर्मकांडाच्या भागात, यज्ञयागादिक क्रिया, देवता इत्यादिक भिन्न-भिन्न पदार्थाला धरून व अनेक निषेधाने युक्त असे संकुचित ज्ञान आहे. पण उपनिषदातून जे ज्ञान सांगितले गेले आहे, ते सर्व भेद नाहीसे करून, मुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत अखिल चराचर पदार्थांचे ठिकाणी एक पूर्ण ब्रह्मदृष्टीच उत्पन्न करून देते. म्हणून उपनिषदातील ज्ञानाला अत्यंत 'उदार' म्हणजे पदार्थमात्राला एक सारखे समदृष्टीने पाहणारे ज्ञान असे म्हटले आहे व ज्ञानाने सर्व दु:ख नाहीसे होऊन पुढे परमसुखाची प्राप्ती

होते. म्हणून त्या ज्ञानाला सुगंधित फुलातील गोड मधाची उपमा दिली आहे.

कोणी, आचार्यानी दशोपनिषदावर भाष्य केले म्हणून दशोपनिषदेच प्रमाण मानून, येथे 'दशोपनिषदाचा' पाठ घेतात. पण आचार्यानी नृसिंहतापनीय, श्वेताश्वतर, या उपनिषदांवरही भाष्य केले असून ब्रह्मसूत्रभाष्यात 'जाबालोपनिषद्' 'मैत्रेयोपनिषद्' 'नारायणोपनिषद्' इत्यादि उपनिषदातील वचने प्रमाण घेतली आहेत. म्हणून 'उपनिषद्' या शब्दाचा दशोपनिषदापुरताच मर्यादित (संकुचित) अर्थ करणे योग्य नव्हे. दश ही संख्या सर्व उपनिषदांचे उपलक्षण आहे.

**अकार चरणयुगुल। उकार उदर विशाल। मकार महामंडल। मस्तकाकारें॥ १९॥**

**अर्थ**—अकार म्हणजे सर्व स्थूल नामरूपे ही गणपतीचे दोन चरण होत. उकार म्हणजे सर्व सूक्ष्म नामरूपे ही गणपतीच्या पोटाचे ठिकाणी आहेत आणि मकार म्हणजे नामरूपांची अव्यक्तदशा ही गणपतीच्या विशाल मंडलाकार मस्तकाचे ठिकाणी होय. ॥ १९ ॥

**हे तिन्ही एकवटले। तेथ शब्दब्रह्म कवळलें। तें मियां श्रीगुरुकृपा नमिलें। आदिबीज॥ २०॥**

**अर्थ**—अकार उकार मकार ह्या तिन्ही मात्रा ज्या ॐकारात एकरूप आहेत, त्या ॐकारात सर्व वैदिकशब्दब्रह्म साठविले आहे. तो ॐकारच सर्व जगाचे 'आदिबीज' म्हणजे कारण असल्यामुळे श्रीगुरूकृपेने ते जाणून मी त्याला नमस्कार केला. ॥ २० ॥

**गूढार्थदीपिकाः**—

**तरी अनादि परब्रह्म। जें जगदादि विश्रामधाम। तयाचें एक नाम। त्रिधा पैं असे॥** (ज्ञाने० १७-३२८)

मनोवाग्गोचर असे परब्रह्म जाणण्याकरिता वेदाने परब्रह्माचे ॐ हे नाव ठेविले, ते अ, उ, म असे तीन मात्रात्मक आहे जगदुत्पत्तीपूर्वी परब्रह्माचे ठिकाणी ॐकाराचे स्फुरण होऊन, परमात्मा ॐकारवाच्य होतो. नंतर ॐकाराच्या अ, उ, म, अशा तीन मात्रा प्रगट होऊन त्यातून सर्व नामरूपे प्रगट होतात व त्या प्रगट झालेल्या नामरूपाचे योगाने परमात्मा जगद्रूपाला येतो. ज्याप्रमाणे पोळपाट, लाटणे, खुर्ची, मेज वगैरे कार्य एका लाकूड या पदार्थाचे केवळ नामरूपांचा बदल होऊनच निर्माण होतात, त्याप्रमाणे परब्रह्म हे प्रकट झालेल्या विविध नामरूपांमुळे अज्ञानी लोकांना जगद्रूप भासते. या सर्व नामरूपांचा विस्तार ॐकारात प्रथम साठविलेला असतो. म्हणून ॐकार जगाचे 'आदिबीज' म्हणजे मूळ कारण होय.

याचा अर्थ ॐकार हा जगताचे उपादान कारण आहे व ॐकार जगद्रूप झाला आहे असा नसून, ॐकारापासून सर्व वैदिक शब्द व त्या वैदिकशब्दपूर्वक सर्व सृष्टी निर्माण झाली आहे, असा त्याचा अर्थ आहे. हाच आशय आचार्यांनी.

**शब्द इति चेन्नातः प्रभवात्प्रत्यक्षानुमानाभ्याम्।** (ब्र० सू० १-३-२८)

या सूत्रावरील भाष्यात स्पष्ट केला आहे. प्रथम ओवीत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सगुणनिर्गुणरूप परमेश्वराला नमस्कार करून या ओवीत शब्दब्रह्मरूप ॐकाराला नमस्कार केला आहे.

**आतां अभिनव वाग्विलासिनी। जे चातुर्यार्थकलाकामिनी।**
**ते शारदा विश्वमोहिनी। नमस्कारिली मियां॥ २१॥**

**अर्थः**—अपूर्व शब्दविलासाची जी परमेश्वरशक्ती, चातुर्यपूर्वक अर्थाची कला दाखविणारी, सर्व चौसष्ट कलेची स्त्रीमूर्ती व तशाच शब्दविलासामुळे जगाला मोह पाडणारी अशी जी शारदा, तिला मी नमस्कार केला. ॥ २१ ॥

**गूढार्थदीपिकाः**—शब्दाधिष्ठात्री जी शारदा देवता तिने जग आहे. विधिनिषेध आहे, बंधमोक्ष आहे इत्यादि शब्दांनीच भ्रान्ती उत्पन्न केली आहे. जो जो शब्द जीव ऐकतो, त्या त्या शब्दाला परब्रह्माहून निरनिराळ्या अर्थाची तो कल्पना करतो असा अर्थ.

**विधिनिषेधाचिया वाटा। दाविता हाचि दिवटा। बंधमोक्ष कळिकाटा। शिष्टु हाचि॥ ५॥**

**हा अविद्येचिया आंगा पडे। तैं नाथिले ऐसे रूढे। न लाहिजे तीन कवडे। साचा वस्तु॥ ६॥** (अमृ० प्र० ६)

इत्यादि ओव्यांनी हा अर्थ श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अमृतानुभवाात स्पष्ट केला आहे.

वास्तविक पाहता श्रुती म्हणते विश्व हे केवळ वाचारंभण म्हणजे शब्दमात्र आहे. म्हणजे नुसते शब्दच आहेत. शब्दांप्रमाणे अर्थ नाहीत. सर्व शब्दांचा अर्थ एक परमात्माच आहे. पण विचार न करणाऱ्या जीवाला या शब्दाने भ्रम उत्पन्न केला व निरनिराळ्या शब्दांचे अनेक अर्थ आहेत असे तो मानू लागला. म्हणून शब्दाधिष्ठात्री शारदेला 'विश्वमोहिनी' म्हटले आहे.

**मज हृदयीं सद्‌गुरु। जेणें तारिलों हा संसारपूरु। म्हणऊनि विशेषें अत्यादरु। विवेकावरी॥ २२॥**

**अर्थः**—ज्यांनी आत्मानात्मविवेक सांगून या मायेच्या संसाररूपी पुरातून मला वाचविले, तो सदगुरु अखंड माझ्या हृदयात आहे. म्हणूनच माझा विवेकावर अत्यंत आदर किंवा प्रेम आहे. ॥ २२॥

**गूढार्थदीपिका**—संसारातून सुटण्याच्या तळमळीने ज्यांच्या अंत:करणात संसारसमुद्रापासून तारणाऱ्या ज्ञानभक्तिसंपन्न श्रीगुरूंचे सारखे ध्यान असते अशा मुमुक्षू शिष्याला सद्‌गुरूनी आत्मानात्मविवेक सांगितल्याबरोबर तो विवेक त्याच्या अंत:करणात अत्यंत दृढ ठसतो व त्या विवेकाच्या अत्यंत आस्थापूर्वक चिंतनाने, तात्काळ संसारमिथ्या ठरवून, शिष्याची संसारासक्ति नाहीशी होते. हे शिष्याचे श्रीगुरुवचनावर अत्यंत प्रेमामुळे असलेल्या विश्वासाचे फळ होय.

**जैसें डोळयां अंजन भेटे। ते वेळीं दृष्टीसी फांटा फुटे। मग वास पाहिजे तेथ प्रगटे। महानिधी॥ २३॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे पायाळू मनुष्याच्या डोळ्याला अंजन लाविले असता त्याच्या दृष्टीचे तेज वाढून त्या दृष्टीला भूमिगत धन दिसू लागते. ॥ २३॥

**कां चिंतामणि आलीया हातीं। सदा विजयवृत्ति मनोरथीं।**
**तैसा मी पूर्णकाम श्रीनिवृत्ती। ज्ञानदेवो म्हणे॥ २४॥**

**अर्थ**—चिंतामणी हाती लागल्यास ज्याप्रमाणे मनुष्याचे सदा सर्वदा केलेले मनोरथ पूर्ण होतात, त्याप्रमाणे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात श्रीनिवृत्तिनाथांमुळे मीही पूर्णकाम झालो. म्हणजे माझी कोणतीच इच्छा निष्फळ होत नाही. ॥ २४॥

**गूढार्थदीपिका:**—प्रेमळ शिष्याच्या प्रेमपूर्वक सेवेने तो दु:खरूप संसारसमुद्रातून पार व्हावा म्हणून श्रीगुरूच्या अंत:करणांत जो त्याच्याविषयी अत्यंत कळवळा उत्पन्न होतो, त्या कळवळ्याने श्रीगुरू शिष्याचे सर्वस्वी स्वाधीन होतात आणि चिंतामणी हातात सापडला असता, जसे सर्व मनोरथ पूर्ण होतात, तसा सर्व समर्थ श्रीगुरु शिष्याच्या स्वाधीन झाल्यावर शिष्याचेही मनोरथ पूर्ण होतात. मुमुक्षू शिष्य, विषयसुखांची नि:शेष वासना सोडून परमसुखरूप अशा परमेश्वराशी ऐक्य पावण्याकरिताच श्रीगुरुला शरण जात असल्यामुळे, निरनिराळ्या विषयसुख-प्राप्तीचे मनोरथ कधीच करीत नसतो, म्हणून येथे ''मनोरथ या शब्दाचा अर्थ परमार्थ साधक अशा मनोरथाची पूर्ती'' असाच घेतला पाहिजे.

**म्हणोनि जाणतेनें गुरु भजिजे। तेणें कृतकार्य होईजे।**
**जैसे मूळसिंचनें सहजें। शाखा पल्लव संतोषती॥ २५॥**

**कां तीर्थे जियें त्रिभुवनीं। तियें घडती समुद्रावगाहनीं। ना तरी अमृतरसास्वादनीं। रस सकळ॥ २६॥**

**तैसा पुढतपुढती तोचि। मियां अभिवंदिला श्रीगुरुचि। जो अभिलषित मनोरुचि। पुरविता तो॥ २७॥**

**अर्थ**—श्रीगुरुचे महिमान जाणणाऱ्या व परमेश्वर प्राप्तीचा मार्ग आक्रमू पाहणाऱ्या शहाण्या पुरुषाने श्रीगुरुचेच भजन करावे व त्या श्रीगुरुच्या भजनाने कृतकृत्य व्हावे. ज्याप्रमाणे झाडाच्या मुळाशी पाणी घातले असता, झाडाचे सर्व शाखादि अवयव संतुष्ट होतात म्हणजे टवटवीत होतात॥ २५॥ किंवा सृष्टीत जेवढी तीर्थे आहेत त्या सर्व तीर्थात स्नान केल्याचे पुण्य एका समुद्रात स्नान केल्याने मिळते किंवा अमृताच्या रसाचा स्वाद घेतला असता सर्व सहाहि

रसांचा स्वाद मिळतो॥ २६ ॥ त्याप्रमाणे सर्व कामना पुरविणारा एक श्रीगुरु आहे असे जाणून त्यालाच मी वारंवार वंदन केले.॥ २७॥

**गूढार्थदीपिका—जाणतेने गुरु भजिजे**—सच्छिष्याला श्रीगुरुच्याच ठिकाणी पूर्ण परब्रह्म परमात्म्याचा अनुभव येतो व तोच एक सर्व भावाने सेव्य ठरतो. वेदान्त निरूपणात अध्यारोपाने किंवा भ्रमाने जगताचा भास कसा होतो हे सांगताना शिष्याला श्रीगुरुचे ठिकाणी ब्रह्मदेवाचा अनुभव येतो. अपवादाने म्हणजे ब्रह्मविचाराने संसारभ्रमाची निवृत्ती करून दाखविताना श्रीगुरुचे ठिकाणी त्याला शंकराचा अनुभव येतो व ब्रह्मबोध करीत असताना परमार्थ मार्गात येणारे अडथळे दूर करून शिष्याला त्याची मूळची अविनाशी सच्चिदानंदरूप स्थिती प्राप्त करून देऊन मायामय संसारातून त्याचा श्रीगुरु उद्धार करतात, तेव्हा त्याला ते विष्णुरूप दिसतात व एक माझे सद्गुरुनाथच पूर्ण ब्रह्म होत असा अनुभव येतो. हाच आपला अनुभव श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अमृतानुभवाच्या दुसऱ्या प्रकरणात निवेदन केला आहे. श्रीगुरुहून ब्रह्म निराळे नाही. श्रीगुरुच पूर्ण होय. म्हणून एका श्रीगुरुचीच सेवा करावी म्हणजे जीव कृतकृत्य होतो असे माउली स्वानुभवाने सांगत आहे. श्रीगुरुला मनुष्य समजणाऱ्याचा परमार्थ कधीच साधत नाही असे नाथांनी ठिकठिकाणी म्हटले आहे.

**आम्हा सद्गुरु तेचि परब्रह्म। ऐसा नित्य निजभाव सप्रेम।**
**हेचि गुरुसेवा उत्तमोत्तम। शिष्य परब्रह्म स्वयें होय॥** (ना० भा० अ० २ ओ० ५०२)
**गुरुच्या ठायीं नीचपण। शिष्ये देखिलिया असे जाण।**
**अणुमात्र केलिया हेळण। ब्रह्मज्ञान कदां नुपजे त्या॥** (चतु० भा० ओ० ५७)

नीचपण म्हणजे जीवभाव असा अर्थ.

**आतां अवधारा कथा गहन। जे सकळ कथां जन्मस्थान। कीं अभिनव उद्यान। विवेकतरुचें॥ २८॥**
**ना तरी सर्व सुखांची आदि। जे प्रमेयमहानिधि। नाना नवरससुधाब्धि। परिपूर्ण हे॥ २९॥**
**कीं परमधाम प्रकट। सर्व विद्यांचें मूळपीठ। शास्त्रजातां वसौट। अशेषांचें॥ ३०॥**
**ना तरी सकळ धर्मांचें माहेर। सज्जनांचें जिव्हार। लावण्यरत्नभांडार। शारदेचें॥ ३१॥**
**नाना कथारूपें भारती। प्रकटली असे त्रिजगतीं। आविष्करोनि। महामतीं। व्यासाचिये॥ ३२॥**
**म्हणोनि हा काव्यां रावो। ग्रंथ गुरुवतीचा ठावो। एथूनि रसां झाला आवो। रसाळपणाचा॥ ३३॥**

**अर्थ**—सृष्टीतींल सर्व ऐतिहासिक कथांचे, जी भारत कथा उगमस्थान आहे किंवा जी कथा अध्यात्म विवेकरूपी अपूर्व वृक्षांची बाग आहे॥ २८॥ किंवा सर्व सुखाचे जी मूळ आहे. जी नाना प्रकारच्या जाणण्यायोग्य अशा प्रमेयांचा किंवा सिद्धान्ताचा थोर साठा आहे किंवा नवरसांचा पूर्ण भरलेला सुखसागरच आहे॥ २९॥ किंवा जी कथा उघड परमगती होय. सर्व विद्यांचे जी जन्मस्थान होय. जी सर्व शास्त्रांचे वसतिस्थान आहे॥ ३०॥ किंवा जी सर्व धर्माचे माहेर होय. जी सत्पुरुषांचा जिव्हाळा आहे. जी सरस्वतीचे सौंदर्याचे कोठार आहे॥ ३१॥ किंवा जी कथा म्हणजे भगवान् व्यांसांच्या महान् विशाल बुद्धीचा आश्रय करून तिन्ही लोकात कथारूपाने प्रगट झालेली प्रत्यक्ष सरस्वती होय॥ ३२॥ म्हणून महाभारत ग्रंथ म्हणजे सर्व काव्यांचा राजा होय. इतर सर्व ग्रंथांच्या श्रेष्ठपणाचे एकमेव राहते ठिकाण होय. या ग्रंथापासूनच सर्व रसांना रसाळपणाची प्राप्ती झाली.॥ ३३॥

**गूढार्थदीपिका**—भगवान् व्यासांनी प्रथम एक लक्ष श्लोकात महाभारत ग्रंथाची रचना केल्यावर त्यांनी आणखी एकूण साठ लक्ष श्लोक रचले व दुसरी एकंदर साठ लक्ष श्लोकांची एक भारत संहिता तयार केली. ह्या संहितेपैकी तीस लक्ष संहिता देवलोकी प्रसिद्ध आहे, पंधरा लक्ष संहिता पितृलोकी प्रसिद्ध आहे; चौदा लक्ष संहिता गंधर्वलोकी प्रसिद्ध आहे आणि एक लक्ष संहिता मृत्यलोकी प्रसिद्ध आहे असे आदि पर्वात सांगितले आहे. (श्रीमन्महाभारत अनुक्रमणिका पर्व-अध्याय १). महाभारतात जे आहे तेच सर्व त्रिभुवनात आहे महाभारतात नाही ते कोठेच नाही.

**तेवींचि आइका आणीक एक। एथूनि शब्दश्री सच्छास्त्रिक। आणि महाबोधीं कोंवळीक। दुणावली॥ ३४॥**
**एथ चातुर्य शहाणें झालें। प्रमेय रुचीस आलें। आणि सौभाग्य पोखलें। सुखाचें एथ॥ ३५॥**
**माधुर्यीं मधुरता। शृंगारीं सुरेखता। रूढपण उचितां। दिसले भलें॥ ३६॥**
**एथ कळाविदपण कळा। पुण्यासि प्रतापु आगळा। म्हणऊनि जनमेजयाचे अवलीळा। दोष हरले॥ ३७॥**
**आणि पाहतां नावेक। रंगीं सुरंगतेची आगळीक। गुणां सगुणपणाचें बिक। बहुवस एथ॥ ३८॥**
**भानुचेनि तेजें धवळलें। जैसें त्रैलोक्य दिसे उजळलें। तैसें व्यासमति कवळलें। मिरवे विश्व॥ ३९॥**
**कां सुक्षेत्रीं बीज घातलें। तें आपुलियापरी विस्तारलें। तैसें भारतीं सुरवाडलें। अर्थजात॥ ४०॥**
**ना तरी नगरांतरीं वसिजे। तरी नागरचि होईजे। तैसें व्यासोक्तितेजें। धवळित सकळ॥ ४१॥**
**कीं प्रथमवयसाकाळीं। लावण्याची नव्हाळी। प्रकटे जैसी आगळी। अंगनाअंगीं॥ ४२॥**
**ना तरी उद्यानीं माधवी घडे। तेथ वनशोभेची खाणी उघडे। आदिलापासोनि अपाडें। जियापरी॥ ४३॥**
**नाना घनीभूत सुवर्ण। जैसें न्याहाळितां साधारण। मग अळंकारीं बरवेपण। निवाडु दावी॥ ४४॥**
**तैसें व्यासोक्ती अळंकारिलें। आवडे तें बरवेपण पातलें। तें जाणोनि काय आश्रयिलें। इतिहासीं॥ ४५॥**
**ना ना पुरतिये प्रतिष्ठेलागीं। सानीव धरूनि अंगीं। पुराणें आख्यानरूपें जगीं। भारता आलीं॥ ४६॥**
**म्हणऊनि महाभारतीं जें नाहीं। तें नोहेचि लोकीं तिहीं। येणें कारणें म्हाणिपे पाहीं। व्यासोच्छिष्ट जगत्रय॥ ४७॥**

**अर्थ**—त्याचप्रमाणे आणिक एक गोष्ट सांगतो, ऐका. या महाभारत ग्रंथापासूनच शब्दाच्या सौंदर्याला शास्त्रीयपणाची बैठक मिळाली. ब्रह्मबोधाची रुक्षता जाऊन त्याचा मृदुपणा पुष्ट झाला॥ ३४॥ चातुर्याला चतुरता येथून प्राप्त झाली. नीरस ब्रह्मसिद्धान्ताला रुची आली. सुखाचे वैधव्य म्हणजे विषयसुखाचा नाशिवंतपणा जाऊन त्याचे सौभाग्य वाढले म्हणजे त्या सुखाला अखंडता प्राप्त झाली ''कैवल्याहि चढावा। करीत विषयसेवा (अमृता० प्र० ९)''॥ ३५॥ गोडीचा गोडपणा, शृंगार रसाचा सुरेखपणा, योग्यपणाला योग्य म्हणून जी प्रसिद्धी आली ती यामुळेच॥ ३६॥ कलांना कळानैपुण्य याचेपासूनच आले, पुण्याचे दोष जाळण्याचे सामर्थ्य येथूनच विलक्षण वाढले. म्हणूनच महाभारत श्रवणाने जनमेजयाचे दोष सहज नाहीसे झाले॥ ३७॥ घटकाभर विचार केला तर असे दिसून येते की बहारीचा बहारपणा विलक्षण वाढला आणि गुणाला सद्‌गुणपणाची खूप वाढ झाली. ॥ ३८॥ सूर्याचे तेजस्वी प्रकाशाने त्रैलोक्य जसे प्रकाशित झालेले दिसते तसे भगवान् व्यासांच्या बुद्धीने आकलन झालेले असे संपूर्ण विश्व शोभत आहे. ॥ ३९॥ किंवा ज्याप्रमाणे चांगल्या मशागत केलेल्या जमिनीत पेरलेले बी जितके विस्तार पावू शकेल तितके विस्तार पावते; त्याप्रमाणे या महाभारत ग्रंथात सर्व पुरुषार्थ किंवा सर्व प्रकारचे ज्ञान पूर्ण विस्तारपूर्वक निरूपिले आहे. ॥ ४०॥ किंवा ज्याप्रमाणे शहरात राहणारा मनुष्य सुविद्य, चतुर, शहाणा होतो, त्याप्रमाणे भगवान् व्यासांच्या वचनरूपी तेजाचाच सर्वत्र प्रकाश पडला आहे. ॥ ४१॥ किंवा ज्याप्रमाणे स्त्रियांच्या ठिकाणी तारुण्यदशेत त्यांचे अपूर्व सौंदर्य अधिकच प्रगट होते. ॥ ४२॥ किंवा बगीच्यात वसंतऋतूने प्रवेश केला असता तेथे पहिल्यापेक्षा कितीतरी पटीने अधिक वनश्रीची खाण उघडली जाते किंवा वनसौंदर्य वाढते. ॥ ४३॥ किंवा सोन्याची लगड पाहिली असता साधारण वाटते. ती मन हरण करीत नाही. पण तीच अलंकाराचे रूपात आली असता मन मोहून आपले विशेषपण दाखविते. ॥ ४४॥ त्याप्रमाणे भगवान व्यासांचे शब्दालंकाराने सुशोभित केलेले आणि ज्या ज्या तऱ्हेने आवडेल त्या त्या तऱ्हेने आवडू लागलेले, असे हे महाभारत आहे, असे पाहून इतिहासांनी त्या महाभारताचा आश्रय केला. ॥ ४५॥ किंवा आपली पूर्ण प्रतिष्ठा वाढावी या उद्देशाने पुराणांनी नम्रपणा धारण करून आख्यानाच्या रूपाने महाभारतग्रंथात प्रवेश केला. ॥ ४६॥ म्हणूनच महाभारताची अशी प्रसिद्धी झाली की महाभारतात जे नाही ते त्रैलोक्यातही नाही. म्हणूनच तिन्ही लोकात जे आहे ते सर्व भगवान व्यासांचे उच्छिष्टच आहे. ॥ ४७॥

**गूढार्थदीपिका**—सर्वज्ञ अशा भगवान व्यासांनी आपले विविध ज्ञाननैपुण्य महाभारतात ओतले व महाभारता-वरूनच जे ज्ञान निरनिराळ्या शास्त्रकारांनी आपल्या शास्त्रातून सांगितले, असा हा महाभारत ग्रंथ सर्व शास्त्रसमन्वित आहे असा भाव.

**ऐसी जगीं सुरस कथा। जे जन्मभूमि परमार्थां। मुनि सांगे नृपनाथा। जनमेजया॥ ४८॥**
**जें अद्वितीय उत्तम। पवित्रैक निरुपम। परम मंगलधाम। अवधारिजो॥ ४९॥**

**अर्थ**—वर वाखाणलेली अशी ही गोड व परमार्थाला किंवा परमपुरुषार्थाला प्राप्त करून देणारी महाभारत-रूपी कथा वैशंपायनाने राजा जनमेजयाला सांगितली.॥ ४८॥ ही कथा अद्वितीय आहे म्हणजे हिच्या बरोबरीची पावन करणारी दुसरी कथा नाही. अशी ही केवळ पवित्रतेची मूर्ती आहे व ही अत्यंत कल्याणाचे माहेरघर आहे ऐका.॥ ४९॥

**आतां भारतकमळपरागु। गीताख्यु प्रसंगु। जो संवादला श्रीरंगु। अर्जुनेसी॥ ५०॥**

**अर्थ**—आता जो श्रीकृष्ण व अर्जुन या दोघांचा संवादरूप प्रसंग झाला, ज्याला गीता म्हणतात व जो भारतरूपी कमळांतील सूक्ष्म सुगंधित रेणूच आहे.॥ ५०॥

**गूढार्थदीपिका:—भारत कमळपराग:**—चौदा विद्या, चौसष्ट कला, सर्व शास्त्रे व पुराणे इत्यादी ज्ञान-भांडाराचे माहेरधर असलेल्या भारतग्रंथात कमलाच्या परागाप्रमाणे सर्व ज्ञानांचा, गीतोपदेश हा सारभूत आहे. म्हणजे तो अत्यंत ग्राह्य आहे.

**ना तरी शब्दब्रह्माब्धि। मथिलेया व्यासबुद्धि। निवडिलें निरवधि। नवनीत हें॥ ५१॥**

**अर्थ**—किंवा ज्याला भगवान व्यासांनी सर्व श्रुतिस्मृतिरूप शब्दब्रह्माचे मंथन करून काढलेले लोणीच म्हणता येईल.॥ ५१॥

**मग ज्ञानाग्निसंपर्कें। कडसिलें विवेकें। पद आलें परिपाकें। आमोदासी॥ ५२॥**

**अर्थ:**—मग ज्ञानरूप अग्नीने तापवून विवेकाने कढल्यावर ज्याला सुंदर सुवास प्राप्त झाला.॥ ५२॥

**गूढार्थदीपिका:**—ज्याप्रमाणे मंथन करून काढलेल्या लोण्याचा अग्निसंपर्काने लोण्यातील घृताव्यतिरिक्त भाग जळून जाऊन, उर्वरित सुगंधयुक्त तूप राहते त्याप्रमाणे गीतोपदेशरूप नवनीतातील ब्रह्मज्ञान विचाररूप अग्नीच्या योगाने आत्मानात्मविवेकाने मायोपाधिरूप ब्रह्मव्यतिरिक्त असलेला भाग जळून जाऊन सुगंधित तूपाप्रमाणे परमप्रेमरूप सगुणभक्ती राहते. परमप्रेमरूप भक्ती व त्या भक्तीचा विषय सगुण परमात्मा हे दोन्ही शुद्ध म्हणजे मायोपाधिरहित आहेत असा भाव.

**जें अपेक्षिजे विरक्तीं। सदा अनुभविजे संतीं। सोहंभावें पारंगतीं। रमिजे जेथ॥ ५३॥**
**जें आकर्णिजे भक्तीं। जें आदिवंद्य त्रिजगतीं। ते भीष्मपर्वी संगती। सांगिजैल॥ ५४॥**
**जें भगवद् गीता म्हणिजे। जें ब्रह्मेशांनीं प्रशंसिजे। जें सनकादिकीं सेविजे। आदरेसी॥ ५५॥**

**अर्थ**—विरक्त पुरुष, विरक्तीची उदासीनता नाहीशी करण्याकरिता, ज्याची इच्छा करतात, सोहंभावाने ज्ञानात पारंगत झालेले देखील सगुण भगवंताच्या सुगंधित तुपाप्रमाणे असलेल्या परमप्रेमभक्तीमध्ये रममाण होतात, भक्तलोक ज्याचे नेहमी श्रवण करतात, ज्याला तिन्ही लोकात सर्वश्रेष्ठ म्हणून नमस्काराचा पहिला मान मिळतो तो भीष्मपर्वातील कृष्णार्जुन संवादाचा कथाभाग मी सुसंगत सांगतो॥ ५३-५४॥ या संवादाला भगवद् गीता म्हणतात. याची ब्रह्मादी देवांनी फार प्रशंसा केली आहे. सनकादिकासारखे विरक्त पुरुष देखील अत्यंत पूज्यभावाने याचे सेवन करतात.॥ ५५॥

**गूढार्थदीपिका:**—योगज्ञानादिकांच्या योगाने ब्रह्मात्मैक्यतेच्या जाणीवेचा येणारा प्रत्यय शांत होऊन शेवटी एक सगुण भगवंताची ज्ञानोत्तर भक्तीच उरते. तीच अंतिम प्राप्य असून भगवद्गीतेचा मुख्य सारभूत विषय आहे. म्हणून ती त्रैलोक्यात ब्रह्मदेव, शंकर व सनकादिक मुनी यांच्या सारख्या पूर्ण ज्ञान्यांना देखील सेव्य झाली आहे असा भाव.

**कोणी एक अकृत्रिम। भक्तीचें हें वर्म। योगज्ञानादि विश्राम। भूमिका हे॥** (अमृ० प्रक० ९ ओ० ५९)

या ओवीत श्रीज्ञानेश्वर महाराजांनी हाच आशय व्यक्त केला आहे.

**आत्मारामाश्च मुनयो निर्ग्रंथा अप्युरुक्रमे। कुर्वन्त्यहैतुकीं भक्तिमित्थंभूतगुणो हरि॥**

(भाग० स्कं० १, अ० ७ श्लो० १०)

प्रेमभक्तीचे सुख किती मधुर आहे व ज्ञानी लोक त्यात कसे लंपट होतात हे या भागवताचे श्लोकांतही सांगितले आहे.

**जैसें शारदीयेचे चंद्रकळे। माजीं अमृतकण कोंवळे। ते वेंचिती मनें मवाळें। चकोरतलगें॥ ५६ ॥**
**तियापरी श्रोतां। अनुभवावी हे कथा। अतिहळुवारपण चित्ता। आणुनियां॥ ५७॥**
**हे शब्देविण संवादिजे। इंद्रियां नेणतां भोगिजे। बोलाआदि झोंबिजे। प्रमेयासी॥ ५८ ॥**
**जैसे भ्रमर परागु नेती। परी कमळदळें नेणती। तैसी परी आहे सेविती। ग्रंथीं इये॥ ५९ ॥**
**कां आपुला ठावो न सांडितां। आलिंगिजे चंद्रु प्रगटतां। हा अनुरागु भोगितां। कुमुदिनी जाणे॥ ६० ॥**
**ऐसेनि गंभीरपणें। स्थिरावलेनि अंतःकरणें। आथिला तोचि जाणे। मानूं इये॥ ६१ ॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे शरद ऋतूतील पूर्ण चंद्राच्या किरणातील सूक्ष्म अमृतमय कण चकोर व त्यांची पिलेच अत्यंत कोमल मनाने वेचू शकतात. ॥ ५६ ॥ त्याप्रमाणे श्रोत्यांना गीतेतील प्रेमभक्तितत्त्वाचा अनुभव अत्यंत कोमल चित्ताने श्रवण करूनच घेता येणे शक्य आहे (येथील ''कोंवळे'', ''हळुवार'' इत्यादि पदे अत्यंत प्रेमाने श्रवण करावे याचे द्योतक आहेत). ॥ ५७ ॥ शब्दावाचून म्हणजे शब्दावरच लक्ष न ठेवता अर्थाकारवृत्ती करीत जाऊन या गीतेतील ज्ञान व भक्तिप्रेमाचे श्रवण व निरूपण केले पाहिजे. ''इंद्रियां नेणतां भोगिजे'' म्हणजे इंद्रिये आपले विषय विषयाला आपल्याहून निराळे ठेवून जसे विषयीविषयभावाने किंवा भोक्तृभोग्य भावाने भोगतात, तशा रीतीने गीतेतील सिद्धान्ताचा अनुभव आपल्याला निराळे ठेवून न घेता आपण अर्थाशी तद्रूप होत गेले पाहिजे आणि निरूपण ऐकतेवेळी वक्त्याचे तोंडून शब्द निघताच आपले चित्त अर्थाकार होईल इतकी चित्ताची एकाग्रता पाहिजे. ॥ ५८ ॥ ज्याप्रमाणे कमळातील रेणू वेचताना भ्रमर कमलदळावरच बसलेला असतो तरी त्याचे कमलदळावर लक्ष नसते. कमलदळावर बसलेलो आहो हे त्याला स्मरत नाही इतका तो त्यात गढून जातो. त्याप्रमाणे एकनिष्ठ आवडीने या ग्रंथाचे सेवन करावयास पाहिजे, तरच ग्रंथार्थ समजू शकतो. ॥ ५९ ॥ ज्या पाण्याचे ठिकाणी चंद्रविकासिनी कमलिनी असते ते पाण्याचे ठिकाण न सोडताच ती तेथूनच ज्या प्रेमाने चंद्राला आलिंगन देऊन चंद्राचे आलिंगनसुख भोगते, ते प्रेमसुख कमलिनीलाच माहीत. ॥ ६० ॥ अशा स्थिर एकचित्ताने जो श्रवण करील तोच या गीतोपदेशाचा अधिकारी होय व तोच गीतेचा अर्थ जाणण्यास समर्थ होतो. ॥ ६१ ॥

**गूढार्थदीपिकाः—शब्देविण संवादिजेः**—अनेक विषयव्यापृत चित्ताला व केवळ शब्दांकडे लक्ष देणाऱ्याला गीतेचा यथार्थ अर्थ समजू शकत नाही. कारण अद्वैताचे निरूपण करताना शब्दाने द्वैत निर्माण करूनच अद्वैत सांगितले जाते व शब्दांवर लक्ष देणारा अद्वैत ग्रहण न करता द्वैतच ग्रहण करतो. म्हणून शब्द ऐकल्याबरोबर शब्दावर म्हणजे शब्दाने निर्माण केलेल्या द्वैतावर लक्ष न देता गीतेतील जो अद्वैत अर्थ, त्या अर्थाच्या आकाराचे मन करावे, असा भाव.

**अहो अर्जुनाचिये पांती। परिसणया योग्य होती। तिहीं कृपा करूनि संतीं। अवधान द्यावें॥ ६२ ॥**
**हें सलगी म्यां म्हणितलें। चरणां लागोनि विनविलें। प्रभु सखोल हृदय आपुलें। म्हणऊनियां॥ ६३ ॥**
**जैसा स्वभावो मायबापांचा। अपत्य बोले जरी बोबडी वाचा। तरी अधिकचि तयाचा। संतोष आथी॥ ६४ ॥**
**तैसा तुम्हीं मी अंगिकारिला। सज्जनीं आपुला म्हणितला। तरी उणें सहजें उपसाहला। प्रार्थूं कायी॥ ६५ ॥**

**अर्थ**—श्रवण करताना अर्जुनाचे पंक्तीस बसून म्हणजे अर्जुनासारखे अत्यंत एकनिष्ठ आवडीने ज्यांना श्रवण करण्याची योग्यता आहे अशा संतमंडळींनीच कृपा करून श्रवण करावे॥ ६२ ॥ ही माझी आज्ञा नव्हे तर आपण थोर अंतःकरणाचे आहात हे जाणून आपल्या चरणापाशी लडिवाळपणाने मी विनंती करीत आहे. ॥ ६३ ॥ लहान मुलगा बोबडे जरी बोलत असला तरी त्याचे बोलण्याचे मायबापाला मोठे कौतुक वाटते. जितके जितके लहान मुलगा बोबडे बोलतो तितका तितका त्यांना अधिक संतोष होतो. हा मायबापांचा स्वभावच असतो. ॥ ६४ ॥ त्याप्रमाणे तुम्ही सज्जनांनी मला आपला म्हणून माझा अंगीकार केल्यामुळे माझ्या उण्यापुऱ्या बोलाबद्दल सहजच क्षमा कराल. क्षमा करा म्हणून प्रार्थना करण्याची गरजच नाही॥ ६५ ॥

**गूढार्थदीपिका:**—यात निरूपण करतेवेळी वक्त्यांनी श्रोत्यांना आपले आई-बापाप्रमाणे लेखावे व आपण थोरपणाचा व विद्वत्तेचा अभिमान न धरता अत्यंत मुलासारखे निरहंकार असावे हे दाखविले आहे. ह्या इतक्या निरहंकार स्थितीत जीवभाव जाऊन परमात्मा किंवा श्रीगुरुच अंत:करणात उरत असल्यामुळे त्यांचेकडून जे निरूपण होते ते परमात्म्यांनी किंवा श्रीगुरुनीच केलेले असते.

**परी अपराधु तो आणीक आहे। जें मी गीतार्थु कवळुं पाहें।**
**तें अवधारा विनवूं लाहे। म्हणऊनियां॥ ६६ ॥**
**हें अनावर न विचारितां। वायांचि धिंवसा उपनला चित्ता।**
**येऱ्हवीं भानुतेजीं काय खद्योता। शोभा आथी॥ ६७ ॥**
**कीं टिटिभू चांचूवरी। माप सूये सागरीं। मी नेणतु त्यापरी। प्रवर्ते एथ॥ ६८ ॥**
**आयका आकाश गिंवसावें। तरी आणीक त्याहूनि थोर होआवें।**
**म्हणऊनि अपाडु हें आघवें। निर्धारितां॥ ६९ ॥**

**अर्थ:**—पण येथे माझा एक प्रमाद होत आहे. तो असा की मी गीतेतील संपूर्ण अर्थ बुद्धीने आकलन करून स्पष्ट करू पाहतो, म्हणून तुमची प्रार्थना करीत आहे, पहा. ॥ ६६ ॥ कारण गीतार्थाचा विचार करू गेल्यास तो सर्वथा अनाकलनीय आहे, पण याचा विचार न करताच मनात गीतार्थाचे विवरण करण्याचे मी धैर्य धरीत आहे. एरव्ही पाहता सूर्यप्रकाशापुढे काजव्याच्या प्रकाशाला काय किंमत आहे ? ॥ ६७ ॥ किंवा गीतार्थाचे अनाकलनीयत्व न जाणता माझे विवरण करण्याचे धैर्य म्हणजे टिटवीने आपले सामर्थ्य न जाणता समुद्रात चोच घालून आपल्या चोचीने समुद्राच्या पाण्याचा अंत पाहण्यासारखे आहे. ॥ ६८ ॥ हे पहा, आकाशाला कवटाळू म्हटले तर त्याहून थोर व्हायला पाहिजे (पण ते शक्य नसते) तसेच ज्याच्या बरोबरीचे दुसरे काहीच नाही असे गीतातत्त्व अमर्याद आहे—म्हणजे 'असे आहे, तसे आहे', असा निश्चय करता येत नाही. ॥ ६९ ॥

**गूढार्थदीपिका:—अपाड हें आघवें—निर्धारितां**—परब्रह्म हे सर्व वृत्तीचे साक्षी असल्यामुळे ते सर्व वृत्तीच्या पलीकडे राहते; म्हणून कोणत्याही निश्चयादी वृत्तींचा ते विषय होऊ शकत नाही. निश्चय, अनुभव इत्यादि वृत्ती जाणीवस्वरूप असल्यामुळे जोपर्यंत जाणीव उरली आहे तोपर्यंत जीव हा निर्विकल्प ब्रह्मस्वरूप होत नाही असा भाव.

**या गीतार्थाची थोरी। स्वयें शंभू विवरी। जेथ भवानी प्रश्नु करी। चमत्कारोनी॥ ७० ॥**
**तेथ हरु म्हणे नेणिजे। देवी जैसे कां स्वरूप तुझें। तैसें हें नित्य नूतन देखिजे। गीतातत्त्व॥ ७१ ॥**

**अर्थ**—असे हे अतिगंभीर व सूक्ष्म निर्विकल्प ब्रह्म गीतेचा अर्थ आहे. त्या गीतार्थाची थोरवी भगवान शंकर कथन करीत असताना देवी पार्वतीला आश्चर्य वाटून, त्याविषयी तिने शंकराला प्रश्न केला॥ ७० ॥ शंकर म्हणतात की देवी, गीतार्थाला मीही पूर्ण जाणत नाही. तुझे स्वरूप जसे नित्य नवीन आहे तसे गीतातत्त्वही नित्य नूतन आहे॥ ७१ ॥

**गूढार्थदीपिका—नित्यनूतन देखिजे—गीतातत्त्व**—नित्यनूतन म्हणजे प्रथम क्षणी जसे असते तसेच शेवटपर्यंत कायम राहणे. नव्या वस्तूचे प्रथमक्षणी प्रेम वाटते. पण ती वस्तू जशी जशी जुनी होते किंवा भोगली जाते तसे तसे तिचे प्रेम क्षीण होत जाते. म्हणून विषयाचे प्रेम असे क्षीण होत असल्यामुळे त्या विषयप्रेमाला नित्यनूतन प्रेम म्हणता यावयाचे नाही. आणि विषयही नित्यनूतन म्हटला जात नाही. सारखेच टिकून राहणारे जे प्रेम त्यालाच परमप्रेम म्हणतात किंवा परमप्रेमस्वरूप वस्तूच नित्यनूतन असते. देवी पार्वतीचे स्वरूप नित्यनूतन म्हणजे परमप्रेम स्वरूप आहे. परमप्रेमालाच भक्ती म्हणतात. असे प्रेम, भगवान अविनाशी असल्यामुळे त्याचे विषयीच राहू शकते. भगवंताविषयीचे नित्यनूतन म्हणजे परमप्रेम तेच गीतेचे तत्त्व होय. भगवंताची परमप्रेमभक्तीच मुख्यत: गीतेत प्रतिपादिली आहे.

गीतेतील प्रत्येक अध्याय कोणत्या ना कोणत्या प्रक्रियेच्या द्वारा परमप्रेमरूप अशा सच्चिदानंद ब्रह्माचेच प्रतिपादन करीत असल्यामुळे कोणत्याही अध्यायात साक्षात् किंवा परंपरेने परब्रह्माची प्राप्ती होते असा भाव.

**हा वेदार्थसागरु। जया निद्रिताचा घोरु। तो स्वयें सर्वेश्वरु। प्रत्यक्ष अनुवादला॥ ७२ ॥**

**अर्थ**—हा वेदार्थरूपीसागर ज्या परब्रह्म परमात्म्याचे घोरणे होय, तो परब्रह्म परमात्मा साक्षात् जागृतिदशेतील मनुष्याच्या बोलण्याप्रमाणे अर्जुनाशी बोलला॥ ७२॥

**गूढार्थदीपिका**—जागृती असो किंवा निद्रा असो ह्या अवस्था अविद्याजन्य आहेत व अविद्यायुक्त जीवाचे ठिकाणीच असतात. पण परमेश्वर अविद्यारहित आहे. तो कधीच अविद्येच्या स्वाधीन होत नाही; म्हणून त्याचे ठिकाणी निद्रा किंवा जागृति नाही. तेव्हा निद्रेत बेसावध राहून घोरणे व जागृतीत सावधपणे बोलणे हे भगवंताचे ठिकाणी संभवत नाही. त्याचप्रमाणे परमात्मा सर्वज्ञ, पूर्ण सच्चिदानन्दस्वरूप व सर्वशक्तिमान राहूनच अवतार घेत असल्यामुळे भगवंताचा अवतारविग्रहही अविद्यारहितच असतो व त्याचे ठिकाणीही जागृती किंवा सुषुप्ती ह्या अवस्था नसून जागृतीतला सावधपणा किंवा सुषुप्तीतला बेसावधपणा हे धर्म त्याचे ठिकाणी नसतात. म्हणून या ओवीचा अर्थ असा आहे की, ज्याप्रमाणे स्वप्नात मनुष्य घोरत असला तरी तो घोरण्याचा प्रयत्न करून घोरत नसतो तर सहज घोरतो, त्याप्रमाणें भगवंतापासून घोरण्याप्रमाणे म्हणजे अप्रयत्नपूर्वक (सहज) वेद निर्माण झाले आहेत. आणि त्यातील ज्ञान, भ्रमादिदोषरहित असल्यामुळे जर प्रमाण आहेत तर मग, त्याच परमात्म्याने अवतार घेऊन जागृतीत असलेल्या माणसाप्रमाणे प्रत्यक्ष सांगितलेले गीतेतील ते ज्ञान भ्रमरहित व प्रमाण आहे हे काय सांगायचे? जीवाने आपल्या कल्याणाकरिता भ्रमरहित ज्ञान व्हावे म्हणून गीतेनुसारच वेदाचे ज्ञान करून घेतले पाहिजे, एवढी गीतेची योग्यता आहे. भगवंतापासून प्रकट झालेल्या वेद व गीता या दोघात, वेद अस्पष्टार्थबोधक व गीता स्पष्टार्थबोधक आहे. म्हणून गीतेला धरून वेदादी भागाचा अर्थ करावा असा भाव.

**ऐसें जें अगाध। जेथ वेडावती वेद। तेथ अल्प मी मतिमंद। काय होय॥ ७३॥**

**अर्थ**—असा गीतेतील अर्थ अगाध आहे. ज्या गीतार्थाचे आकलन वेदालाही झाले नाही, तेथे माझ्यासारख्या मंदमतीचा पाड काय? (त्या गीतार्थाचे आकलन माझ्यासारख्याला कसे होणार?)॥ ७३॥

**गूढार्थदीपिका—ऐसें जे अगाध—जेथ वेडावती वेद**—गीतार्थाचे आकलन वेदालाही झाले नाही या म्हणण्याचा आशय हा आहे की वेदाने जाणीव ठेवून जेवढे सविशेष किंवा सविकल्प निरूपण करता आले तेवढे केले. पण ज्याप्रमाणे आंबा, द्राक्षे, साखर इत्यादि निरनिराळे मधुर पदार्थ खाल्ले तरी त्यांच्या रुचीतला फरक शब्दाने सांगता येत नाही, तो मनानेच कळतो, त्याप्रमाणे गीतेतील जाणीवरहित परमप्रेमरूप भक्तितत्त्वही अनिर्वचनीय म्हणून शब्दाचे पलीकडचे असे स्वसंवेद्य किंवा अनुभवरूप असल्यामुळे वेदाला शब्दाने सांगता आले नाही असा भाव.

**हे अपार कैसेनि कवळावें। महातेज कवणें धवळावें। गगन मुठीं सुवावें। मशकें केवीं॥ ७४॥**

**अर्थ**—असा हा अमर्याद व जाणीवेला आकलन न होण्याजोगा गीतार्थ बुद्धीत कसा आणावा? अत्यन्त थोर प्रकाशाला कशाने प्रकाशित करणार? एवढ्याशा चिलटाने आपल्या मुठीत आकाशाला कसे साठवायचे?॥ ७४॥

**परि एथ असे एक आधारु। तेणेंचि बोलें मी सधरु। जे सानुकूळ श्रीगुरु। ज्ञानदेवो म्हणे॥ ७५॥**
**येऱ्हवीं तरी मी मुर्खु। जरी जाहला अविवेकु। तरी संतकृपादीपकु। सोज्वळु असे॥ ७६॥**
**लोहाचें कनक होये। हें सामर्थ्य परिसींच आहे। कीं मृतही जीवित लाहे। अमृतसिद्धि॥ ७७॥**
**जरी प्रकटे सिद्धसरस्वती। तरी मुकया आथी भारती। एथ वस्तुसामर्थ्यशक्ती। नवल कायी॥ ७८॥**
**कां जयातें कामधेनु माये। तयासी अप्राप्य कांहीं आहे। म्हणऊनि मी प्रवर्तों लाहें। ग्रंथीं इये॥ ७९॥**

**अर्थ**—श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात अशा रीतीने गीतार्थ आपल्या स्वतंत्र बुद्धीने आकलन होणे जरी सर्वस्वी अशक्य आहे, तरी एका आधाराने ते शक्य आहे. व त्या आधाराच्या बळावरच मी धैर्याने गीतार्थ सांगू इच्छितो. तो आधार म्हणजे श्रीगुरुची कृपा होय.॥ ७५॥ एऱ्हवी पाहता मी अत्यंत अज्ञानी असून अति गंभीर असा गीतार्थ सांगण्याचा अविचार करीत आहे. पण माझ्या दृष्टीसमोर संतकृपेचा मोठा लखलखीत दिवा लागला असल्यामुळे, मी मूर्ख आहे तरी त्या दिव्याचे योगाने मला सर्व चक्क दिसते.॥ ७६॥ ज्याप्रमाणे परिसातच लोखंडाचे सोने करण्याचे सामर्थ्य आहे किंवा अमृताच्या योगाने मेलेला पुरुषही जीवंत होतो॥ ७७॥ मुक्याच्या मुखात जर सरस्वती

बसली तर मुकाही पंडित होईल. हे त्या त्या वस्तूचे सामर्थ्य आहे यात नवल नाही. ॥ ७८ ॥ किंवा ज्याला कामधेनू हीच माता प्राप्त झाली त्याला न प्राप्त होण्यासारखे काय आहे? त्याप्रमाणे सर्व समर्थ अशी श्रीगुरुची कृपा मला लाभल्यामुळे मी गीतार्थ सांगण्यास धजत आहे. ॥ ७९ ॥

**गूढार्थदीपिका—बोलें मी सधरु। जैं सानुकूळ श्रीगुरु**

**परमप्रेमभक्तिरूप जो गीतेचा अर्थ तो, 'तत्तु मुख्यतस्तु महत्कृपयैव भगवत्कृपालेशाद्वा।'**

(नारदभक्तिसूत्र ३८)

या नारदभक्तिसूत्राप्रमाणे संतरूपी श्रीगुरु किंवा भगवान यांच्या कृपेनेच प्राप्त होणारा आहे. तो संतकृपेवाचून स्वत:च्या बुद्धीने आकलन होऊ शकत नाही असे सर्व संतांचे म्हणणे आहे.

**तरी न्यून तें पुरतें। अधिक तें सरतें। करूनि घेयावें हें तुमतें। विनवितु असें॥ ८० ॥**
**आतां देइजो अवधान। तुम्हीं बोलविल्या मी बोलेन। जैसें चेष्टे सूत्राधीन। दारुयंत्र॥ ८१ ॥**
**तैसा मी अनुग्रहीतु। साधूंचा निरूपितु। ते आपुला अलंकारितु। भलतयापरी॥ ८२ ॥**
**तंव श्रीगुरु म्हणती राहीं। हें तुज बोलावें नलगे कांहीं। आतां ग्रंथा चित्त देईं। झडकरी वेगा॥ ८३ ॥**
**या बोला निवृत्तिदासु। पावूनि परम उल्हासु। म्हणे परियेसा मना अवकाशु। देऊनियां॥ ८४॥**

**अर्थ—**तरी उणे काही वाटल्यास आपण पुरे करून घ्यावे व अधिक शब्द तोंडातून निघाल्यास आपण गोड करून घ्यावे ही माझी तुम्हाला प्रार्थना आहे. ॥ ८० ॥ आता निरूपणाकडे लक्ष द्यावे. तुम्ही जसे बोलवाल तसे मी निरूपण करीन. ज्याप्रमाणे लाकडाची कळसूत्री बाहुली जशी नाचविणाऱ्याच्या स्वाधीन असते, तसा मीही तुम्हा गुरुजनांचा कृपापात्र असून आज्ञेप्रमाणे वागणारा आहे. आता ते साधुजन आवडेल तसा आपल्या लेकराला अलंकृत करतील. ॥ ८१-८२ ॥ श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात "अशी प्रार्थना केल्याबरोबर श्रीगुरु निवृत्तिनाथांनी आश्वासन देऊन सांगितले, तुला प्रार्थना करण्याची गरजच नाही. ग्रंथ सांगण्याकडे लवकर चित्त द्रे म्हणजे झाले" ॥ ८३ ॥ हे आश्वासन ऐकून निवृत्तिदास श्रीज्ञानेश्वर महाराजांना परम आनंद झाला. परम उल्हास पावलेले श्रीज्ञानेश्वरमहाराज श्रोत्यांना मनाला अवकाश देऊन ऐकण्याची विनंती करतात. ॥ ८४ ॥

**गूढार्थदीपिका—परिसा मना अवकाशु। देऊंनियां**

येथे मनाला अवकाश देऊन असे जे म्हटले आहे, त्याचा अर्थ, दुसरे काही न ऐकू देता मनाला गीतार्थच ऐकण्याला सवड द्या म्हणजे अत्यंत एकाग्र चित्ताने ऐका, असा आहे.

*धृतराष्ट्र उवाच*

**धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः। मामकाः पाण्डवाश्चैव किमकुर्वत सञ्जय॥ १ ॥**

**अर्थ—**राजा धृष्टराष्ट्र म्हणतो, संजया! धर्मक्षेत्र असे जे कुरुक्षेत्र, जेथे माझे मुलगे व पांडूचे मुलगे आपसात युद्ध करण्याकरिता एकत्र मिळालेले आहेत, तेव्हा ते काय करते झाले. ॥ १ ॥

**तरी पुत्रस्नेहें मोहितु। धृतराष्ट्र असे पुसतु। म्हणे संजया सांगें मातु। कुरुक्षेत्रींची॥ ८५ ॥**
**जें धर्मालय म्हणिजे। तेथ पांडव आणि माझे। गेले असती व्याजें। झुंजाचेनि॥ ८६ ॥**
**तरी तिहीं येतुला अवसरीं। काय किजत असे येरयेरीं। तें झडकरी कथन करीं। मजप्रती॥ ८७॥**

**अर्थ—**पुत्रप्रेमाने वेडा झालेला धृतराष्ट्र संजयाला विचारतो की, संजया! कुरुक्षेत्राकडील हकीगत सांग. ॥ ८५ ॥ ज्या कुरुक्षेत्राला धर्माचे ठिकाण (म्हणजे जेथे गेले असता दुर्बुद्धी नाहीशी होऊन सुबुद्धीच सुचायची असे ठिकाण) म्हणतात त्या कुरुक्षेत्राचे ठिकाणी पांडव व माझे पुत्र कौरव युद्धाकरिता गेले आहेत. ॥ ८६ ॥ ते इतका वेळ परस्परात काय करीत आहेत हे लवकर मला सांग॥ ८७ ॥

**गूढार्थदीपिका—धर्मालय—**

सर्व सृष्टी त्रिगुणात्मक आहे; म्हणून देशही त्रिगुणात्मक आहेत. त्या त्या गुणाचे देशाचे ठिकाणी गेले असता

त्यांच्या त्यांच्या गुणानुसार मनुष्याची मती होत असते. कुरुक्षेत्र हा देश धर्मक्षेत्र म्हणजे पुण्यक्षेत्र. त्या ठिकाणी गेलेल्या मनुष्याची वृत्ती सात्त्विक होऊन त्याचे मतीत सद्विचार उत्पन्न होतात. युद्धाकरिता कौरव अशा पुण्यभूमीवर गेल्यावर युद्ध करणे योग्य नाही, तर पांडवांचे न्याय्य राज्य त्यांना परत करावे असा त्यांच्या मतीमध्ये पालट झाला किंवा काय, अशी धृतराष्ट्राला शंका आली, असे ''धर्मक्षेत्र'' या पदाने सुचविले आहे.

*सञ्जय उवाच*

**दृष्ट्वा तु पाण्डवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा। आचार्यमुपसङ्गम्य राजा वचनमब्रवीत्॥ २॥**
**पश्यैतां पाण्डुपुत्राणामाचार्य महतीं चमूम्। व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता॥ ३॥**

**अर्थ**—राजा धृतराष्ट्राचा प्रश्न ऐकून संजय म्हणतो ''राजा धृतराष्ट्रा! व्यूहरचित पांडवांचे सैन्य पाहून राजा दुर्योधन द्रोणाचार्यापाशी आला व त्यांना म्हणाला.॥ २॥ अहो आचार्य! तुमच्या बुद्धिमान शिष्याने व द्रुपद राजाच्या पुत्राने पांडवांच्या या अफाट सैन्याची कशी व्यूहरचना केली आहे, पहा.''॥ ३॥

**तिये वेळीं तो संजय बोले। म्हणे पांडवसैन्य उचललें। जैसें महाप्रळयीं पसरलें। कृतांतमुख॥ ८८॥**
**तैसें तें घनदाट। उठावलें एकवट। जैसें उसळलें कालकूट। धरी कवण॥ ८९॥**
**नातरी वडवानलु सांदुकला। प्रलयवातें पोखला। सागर शोषूनि उधवला। अंबरासी॥ ९०॥**
**तैसें दळ दुर्धर। नानाव्यूहीं परिकर। अवगमले भयासुर। तिये काळीं॥ ९१॥**
**तें देखोनि दुर्योधनें। अव्हेरिलें कवणे मानें। जैसें न गणिजे पंचाननें। गजघटांतें॥ ९२॥**
**मग द्रोणापासीं आला। तयातें म्हणे हा देखिला। कैसा दळभारु उचलला। पांडवांचा॥ ९३॥**
**गिरिदुर्ग जैसे चालते। तैसे विविध व्यूह भंवते। हे रचिले आथि बुद्धिमंतें। द्रुपदकुमरें॥ ९४॥**
**जो कां तुम्हीं शिष्य आपुला। विद्या देऊनि कुरुठा केला। तेणें हा सैन्यसिंधु पाखरिला। देख देख॥ ९५॥**

**अर्थ**—त्यावेळी तो संजय म्हणाला, युद्धाकरिता खवळलेले पांडवाचे सैन्य प्रलयकाळी तोंड फाडून सृष्टीचा संहार करू पाहणाऱ्या काळाच्या मुखाप्रमाणे भासले.॥ ८८॥ ज्याप्रमाणे समुद्रमंथनातून निघालेले काळकूट विष देवदैत्यांना अनावर दिसू लागले त्याप्रमाणे घनदाट पसरलेले पांडवसैन्य कौरवांवर चाल करून जाण्यास सिद्ध झाले तेव्हा अनावर झाले॥ ८९॥ किंवा समुद्रातील वडवानळ पेटून त्याला प्रलयकाळच्या वायूचे साह्य मिळाले असता तो जसा संपूर्ण सागराला शोषून आकाशाला जाऊन भिडतो.॥ ९०॥ त्याप्रमाणे पांडवांचे अफाट व अनेकप्रकारच्या सैन्यरचनेने सज्ज झालेले सैन्य त्यावेळी भयानक दिसत होते.॥ ९१॥ ते सैन्य पाहून ज्याप्रमाणे सिंहाने हत्तीच्या कळपाला काही जुमानू नये, तसे दुर्योधनाने मात्र त्याला तुच्छच लेखिले.॥ ९२॥ मग दुर्योधन द्रोणाचार्यापाशी येऊन त्यांना म्हणू लागला, आचार्य! हे पाहिले का पांडवांचे सैन्य कसे सज्ज झाले आहे ते.॥ ९३॥ तुमचा बुद्धिमान शिष्य द्रुपदराजाचा मुलगा, जो धृष्टद्युम्न, त्यांनी नानाप्रकारची सैन्याची रचना केली असून ते सैन्य जणू चालत्या डोंगरी किल्ल्याप्रमाणे दिसत आहे.॥ ९४॥ अहो, पहा! पहा! ज्या ज्या शिष्याला तुम्ही धनुर्विद्या देऊन त्यात पूर्ण निष्णात केले, त्याने ही समुद्राप्रमाणे पसरलेल्या सैन्याची रचना केली आहे.॥ ९५॥

**गूढार्थदीपिका—सैन्यसिंधु**—पराक्रम या गुणाला उद्देशून सिंहाची उपमा दिली जाते. पण येथे दुर्योधनाला पांडवसैन्याचा पराक्रम तुच्छ वाटत होता हे.

**ते देखोनि दुर्योधनें। अव्हेरिले कवणे माने। जैसे न गणिजे पंचाननें। गजघटांतें॥**

या ओवीवरून स्पष्ट आहे; म्हणून येथे सिंहाची उपमा योग्य नाही. पांडवांचे सैन्य कसे अफाट पसरले आहे हे दुर्योधनाला सांगावयाचे होते व त्याला अनुलक्षून पांडवांच्या सैन्याच्या अफाटपणाला सिंधूची उपमा दिली; म्हणून या ठिकाणी ''सिंधु'' हाच शब्द योग्य वाटतो.

**अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि। युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः॥ ४॥**
**धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान्। पुरुजित्कुन्तिभोजश्च शैब्यश्च नरपुङ्गवः॥ ५॥**

**युधामन्युश्च विक्रान्त उत्तमौजाश्च वीर्यवान् । सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥ ६ ॥**

**अर्थ**—या सैन्यात भीम, अर्जुन यांच्या तुल्य महान पराक्रमी व थोर धनुर्धारी असे युयुधान, विराट, महारथी द्रुपद, धृष्टकेतू, चेकितान, पराक्रमी काशीराज, पुरुजित्, कुन्तिभोज, नरश्रेष्ठ शैब्यराजा, युधामन्यु, विक्रान्त, पराक्रमी उत्तमौजा, अभिमन्यू, द्रुपदराजाचे पुत्र इत्यादी महारथी आहेत. ॥ ४-५-६ ॥

**आणीकही असाधारण। जे शस्त्रास्त्रीं प्रवीण। जे क्षात्रधर्मीं निपुण। वीर आहाती॥ ९६ ॥**
**जे बळें प्रौढी पौरुषें। भीमार्जुनांसारिखे। ते सांगेन कौतुकें। प्रसंगेंची॥ ९७ ॥**
**एथ युयुधानु सुभटु। आला असे विराटु। महारथी श्रेष्ठु। द्रुपद वीरु॥ ९८ ॥**
**चेकितान धृष्टकेतु। काशीश्वरु विक्रांतु। उत्तमौजा नृपनाथु। शैब्य देख॥ ९९ ॥**
**हा कुंतिभोजु पाहें। एथ युधामन्यु आला आहे। आणि पुरुजितादि राय हे। सकळ देखें॥ १०० ॥**
**हा सुभद्राहृदयनंदनु। जो अपरु नवा अर्जुनु। तो अभिमन्यु म्हणे दुर्योधनु। देखें द्रोणा॥ १०१ ॥**
**आणीकही द्रौपदीकुमर। हे सकळही महारथी वीर। मिती नेणिजे परि अपार। मीनले असती॥ १०२ ॥**

**अर्थ**—आणिकही पांडवसैन्यात शस्त्र व अस्त्र यात विशेष प्रवीण व क्षात्रधर्मात विशेष निपुण असे वीर आहेत. ॥ ९६ ॥ जे बळात, थोरवीत व पराक्रमात भीमार्जुनासारखे आहेत, असे पुष्कळ वीर पांडवसैन्यात आहेत. त्याचीं नावे या प्रसंगी सांगतो. ॥ ९७ ॥ महान योद्धे युयुधान व विराट येथे आले आहेत व महारथी द्रुपदराजाही येथे आहे. ॥ ९८ ॥ धृष्टकेतू, चेकितान, पराक्रमी काशीराज, उत्तमौजा, नृपति, शैब्य. ॥ ९९ ॥ हा पहा, कुंतिभोज, हा युधामन्यू पहा, हे पुरुजितादी राजे, पहां ॥ १०० ॥ दुर्योधन म्हणाला द्रोणाचार्य! हा सुभद्रेचा मुलगा जो प्रत्यक्ष दुसरा अर्जुनच म्हटला जातो व जो सुभद्रेच्या चित्ताची साक्षात् करमणूक आहे, तो अभिमन्यू पहा. ॥ १०१ ॥ आणखी हे द्रौपदीचे मुलगे पहा. हे सर्व महारथी असून, असे जे पुष्कळ वीर येथे आले आहेत त्यांची संख्या करवत नाही ॥ १०२ ॥

**अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम । नायका मम सैन्यस्य सञ्ज्ञार्थं तान्ब्रवीमि ते ॥ ७ ॥**
**भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिञ्जयः । अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥ ८ ॥**
**अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः । नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥ ९ ॥**

**अर्थ**—आचार्य, आता आपल्या सैन्यात कोण कोण थोर योद्धे आहेत, हे आपल्या माहितीकरता सांगतो, ऐका. ॥ ७ ॥ आपण स्वतः, भीष्माचार्य, कर्ण, कृपाचार्य, समितिंजय, अश्वत्थामा, विकर्ण, तसाच राजा सौमदत्ती हे आहेत. ॥ ८ ॥ आणखी महान पराक्रमी, माझ्याकरिता आपल्या जीविताची आशा सोडणारे, नाना प्रकारच्या शस्त्रांचा युद्धात उपयोग करणारे, असे पुष्कळ वीर आहेत व ते सर्व युद्धशास्त्रात निपुण आहेत. ॥ ९ ॥

**आतां आमुच्या दळीं नायक। जे रूढ वीर सैनिक। ते प्रसंगें आइक। सांगिजती॥ १०३ ॥**
**उद्देशें एक दोनी। जायिजती बोलोनी। तुम्ही आदिकरूनी। मुख्य जे जे॥ १०४ ॥**
**हा भीष्म गंगानंदनु। जो प्रतापतेजस्वी भानु। रिपुगजपंचाननु। कर्ण वीरु॥ १०५ ॥**
**या एकेकाचेनि मनोव्यापारें। हें विश्व होय संहरे। हा कृपाचार्य न पुरे। एकलाचि॥ १०६ ॥**
**एथ विकर्ण वीरु आहे। हा अश्वत्थामा पैल पाहें। याचा अडदरु सदा वाहे। कृतांतु मनीं॥ १०७ ॥**
**समितिंजयो सौमदत्ति। ऐसे आणीकही बहुत आहाती। जयांचिया बळा मिती। धाताही नेणे॥ १०८ ॥**
**जे शस्त्रविद्यापारंगत। मंत्रावतार मूर्त। हो कां जें अस्त्रजात। एथूनि रूढ॥ १०९ ॥**
**हे अप्रतिमल्ल जगीं। पुरता प्रतापु अंगीं। परी सर्व प्राणें मजचिलागीं। आराइले असती॥ ११० ॥**
**पतिव्रतेचें हृदय जैसें। पतीवांचूनि न स्पर्शे। मी सर्वस्व या तैसें। सुभटांसी॥ १११ ॥**
**आमुचिया काजाचेनि पाडें। देखती आपुलें जीवित थोकडें। ऐसे निरवधि चोखडे। स्वामिभक्त॥ ११२ ॥**
**झुंजती कुळकणी जाणती। कळे कीर्तीसी जिती। हे बहु असो क्षात्रनीती। एथोनियां॥ ११३ ॥**
**ऐसें सर्वांपरी पुरते। वीर दळीं आमुतें। आतां काय गणूं यांतें। अपार हे॥ ११४ ॥**

**अर्थ**—आता आमच्या सैन्यात जे प्रसिद्ध सेनानी आहेत तेही या प्रसंगाने सांगतो, ऐका. ॥ १०३ ॥ तुमच्या माहितीकरिता एक दोन जे तुम्ही आदिकरून मुख्य मुख्य वीर आहेत ते सांगतो. ॥ १०४ ॥ हा गंगापुत्र भीष्माचार्य, पराक्रमरूपी अती दैदीप्यमान सूर्यच आहे. शत्रुरूपी हत्तींना सिंहासारखा वाटणारा हा कर्णवीर पहा. ॥ १०५ ॥ या एकेकाने नुसते मनात आणल्यास सर्व सृष्टीचा संहार होईल. कृपाचार्य हा एकटाच सर्व शत्रुसैन्याला पुरून उरणारा आहे. ॥ १०६ ॥ एथ हा विकर्ण वीर आहे. हा त्याच्या पलीकडेंच असलेला अश्वत्थामा पहा. याचे काळाला देखील सदा भय वाटत असते. ॥ १०७ ॥ समितिंजय सौमदत्ती यांचेसारखे आणिकही असे पुष्कळ वीर आहेत की ज्यांचे सामर्थ्य ब्रह्मदेवही जाणत नाही. ॥ १०८ ॥ हे शस्त्रविद्येत पूर्ण निष्णात असून अस्त्रविद्येचे तर मूर्तिमंत मंत्रच आहेत. असे वाटते की सर्व अस्त्रविद्याच यांच्यापासून प्रगट झाली. ॥ १०९ ॥ यांच्या तोडीचा जगात कोणी दुसरा मल्ल नाहीं. यांच्या अंगी पराक्रम पूर्णपणे वास करतो. असे असून माझ्याकरिता ज्यांनी जीवितावर पाणी सोडले आहे. ॥ ११० ॥ पतिव्रतेचे मन जसे पतीवाचून दुसरे कशालाही शिवत नाही त्याप्रमाणे या योद्ध्यांचे सर्व काही मी आहे. ॥ १११ ॥ आमच्या कार्यापुढे त्यांना त्यांचे जीवितही तुच्छ वाटते. असे हे पराकाष्ठेचे स्वामिभक्त आहेत. ॥ ११२ ॥ आपल्या पूर्वजांचा लौकिक जाणून युद्ध करतात. आपल्या युद्धकौशल्याने कीर्ती मिळवितात. बहुत काय सर्व क्षात्रधर्मच येथून प्रगट झाला असेच मी म्हणतो. ॥ ११३ ॥ सर्व दृष्टीने निष्णात असे हे वीर आमच्या सैन्यात आहेत व त्यांची संख्याही करवत नाही. ॥ ११४ ॥

**अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् । पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ॥ १० ॥**

**अर्थ**—म्हणून भीष्माचार्यांनी रक्षण केलेले आमचे सैन्य अमर्याद असून भीमाने रक्षण केलेले पांडवांचे सैन्य मर्यादित आहे. ॥ १० ॥

**वरी क्षत्रियांमाजी श्रेष्ठु। जो जगजेठी जगीं सुभटु। तया दळवैपणाचा पाटु। भीष्मासि पैं॥ ११५॥**
**आतां याचेनि बळें गवसलें। हें दुर्ग जैसें पन्नासिलें। येणें पाडें थेंकुलें। लोकत्रय॥ ११६॥**
**आधींच समुद्र पाहीं। तेथ दुवाडपण कवणा नाहीं। मग वडवानळु तैसे याही। विरजा जैसा॥ ११७॥**
**ना तरी प्रलयवन्हि महावातु। या दोघां जैसा सांघातु। तैसा हा गंगासुतु। सेनापति॥ ११८॥**
**आतां येणेंसि कवण भिडे। हें पांडवसैन्य कीर थोकडे। वरचिलेनि पाडें। दिसत असे॥ ११९॥**
**वरी भीमसेन बेथु। तो जाहला असे सेनानाथु। ऐसें बोलोनि हे मातु। सांडिली तेणें॥ १२०॥**

**अर्थ**—आणखी त्यात सर्व क्षत्रियात श्रेष्ठ, सर्व जगात नावाजलेले थोर योद्धे अशा भीष्माचार्यांना सर्व सैन्याच्या सेनापतिपणाचा अधिकार दिला आहे. ॥ ११५ ॥ आता यांच्या सामर्थ्याने आवरलेले हे सैन्य बांधलेल्या किल्ल्याप्रमाणे पसरले आहे. यांच्या तुलनेने पांडवसैन्यच काय पण त्रैलोक्यही अल्प आहे. ॥ ११६ ॥ आधीच समुद्र विशाल, तो पाहून कोणाला भय वाटत नाही? त्यातच जसे वडवानलाचे आणखी साह्य व्हावे. ॥ ११७ ॥ किंवा प्रलयकालचा अग्नी व प्रलयकालचा वायू दोघांचा ज्याप्रमाणे मेळ व्हावा त्याप्रमाणे हा गंगासुत सेनापती आहे. ॥ ११८ ॥ आता अशा या आमच्या सैन्याशी कोण युद्ध करणार? हे पांडवांचे सैन्य तर अगदीच अपुरे आहे. ॥ ११९ ॥ आणखी युद्धचातुर्यहीन आडदांड असा हा भीमसेन त्या पांडवसेनेचा सेनापती आहे. असे बोलून त्याने ही गोष्ट तेथेच सोडून दिली. ॥ १२० ॥

**अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः । भीष्ममेवाभिरक्षन्तु भवन्तः सर्व एव हि॥ ११॥**

**अर्थ**—आपआपल्या मार्‍याच्या ठिकाणी स्थित राहून व आपल्या अधिकाराखाली असलेल्या सैन्यानिशी आपण सर्वांनी भीष्माचार्यांचे संरक्षण केले पाहिजे. ॥ ११ ॥

**मग पुनरपि काय बोले। सकळ सैनिकांतें म्हणितलें। आतां दळभार आपुलाले। सरसे करा॥ १२१॥**
**जया जिया अक्षौहिणी। तेणें तिया आरणी। वरगण कवणकवणी। महारथिया॥ १२२॥**
**तेणें तिया आवरिजे। भीष्मातळीं राहिजे। द्रोणातें म्हणे पाहिजे। तुम्ही सकळ॥ १२३॥**
**हाचि एकु रक्षावा। मी तैसा हा देखावा। येणें दळभारु आघवा। साचु आमुचा॥ १२४॥**

**अर्थ**—मग पुन: दुर्योधन सर्व सेनापतींना उद्देशून बोलू लागला की आता सर्वांनी आपापले सैन्यभार सज्ज करावे ॥ १२१ ॥ ज्यांच्या ज्यांच्या स्वाधीन ज्या ज्या अक्षौहिणी असतील त्या त्या रणभूमीवर त्यांनी महारथ्यांच्या हुकमतीखाली वाटून द्याव्या ॥ १२२ ॥ त्या त्या महारथ्यांनी त्या आपल्या स्वाधीन ठेवाव्या आणि सर्वांनी मिळून भीष्माचार्यांच्या आज्ञेत राहावे. द्रोणाचार्यांना मग म्हणाला ॥ १२३ ॥ आपण सर्वांनी, भीष्माचार्यांना 'मी' समजून त्यांचे रक्षण केले पाहिजे. यांच्या योगानेच आपले सैन्य समर्थ ठरणार आहे ॥ १२४ ॥

**तस्य सञ्जनयन् हर्षं कुरुवृद्धः पितामहः । सिंहनादं विनद्योच्चैः शङ्खं दध्मौ प्रतापवान् ॥ १२ ॥**
**ततः शङ्खाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः । सहसैवाभ्य हन्यन्त स शब्दस्तुमुलोऽभवत् ॥ १३ ॥**

**अर्थ**—राजा दुर्योधनाचे भाषण ऐकून नंतर कौरवांच्या कुलात सर्वात वडिल असलेले पितामह जे भीष्माचार्य त्यांनी अत्यंत आवेशाने सिंहासारखी गर्जना करून व शंखनाद करून दुर्योधनाच्या चित्तात अत्यन्त हर्ष उत्पन्न केला ॥ १२ ॥ भीष्माचार्यांच्या शंखनादाबरोबर जिकडे तिकडे शंख, भेरी, पणवानक, गोमुख वगैरे यांचे ध्वनी उठले व तो सर्व मिळून एकच भयंकर ध्वनी झाला ॥ १३ ॥

**या राजयाचिया बोला। सेनापति संतोषला। मग तेणें केला। सिंहनादु ॥ १२५ ॥**
**तो गाजत असे अद्भुतु। दोन्हीं सैन्यांआंतु। प्रतिध्वनि न समातु। उपजत असे ॥ १२६ ॥**
**तयाचि तुलगासवें। वीरवृत्तीचेनि थावें। दिव्य शंख भीष्मदेवें। आस्फुरिला ॥ १२७ ॥**
**ते दोन्ही नाद मिनले। तेथ त्रैलोक्य बधिरीभूत जाहलें। जैसें आकाश का पडिलें। तुटोनियां ॥ १२८ ॥**
**घडघडीत अंबर। उचंबळत सागर। क्षोभलें चराचर। कांपत असे ॥ १२९ ॥**
**तेणें महाघोष गजरें। दुमदुमिताती गिरिकंदरें। तंव दळामाजि रणतुरें। आस्फुरिलीं ॥ १३० ॥**
**उदंड सैंघ वाजतें। भयानकें खाखातें। महाप्रळयो जेथें। धोकडांसी ॥ १३१ ॥**
**भेरी निशाण मांदळ। शंख काहळा भोंगळ। आणि भयासुर रणकोल्हाळ। सुभटांचे ॥ १३२ ॥**
**आवेशें भुजा त्राहाटिती। विसणैले हांका देती। जेथ महामद भद्रजाती। आवरती ना ॥ १३३ ॥**
**तेथ भेडांची कवण मातु। कांचया केर फिटतु। जेणें दचकला कृतांतु। अंग नेघे ॥ १३४ ॥**
**एकां उभयांचि प्राण गेले। चांगांचे दांत बैसले। बिरुदांचे दादुले। हिंवताती ॥ १३५ ॥**
**ऐसा अद्भुत तूरबंबाळु। ऐकोनि ब्रह्मा व्याकुळु। देव म्हणती प्रळयकाळु। वोढवला आजी ॥ १३६ ॥**

**अर्थ**—या दुर्योधनाच्या बोलण्याने भीष्माचार्यांना फार संतोष होऊन त्यांनी भयंकर सिंहनाद केला ॥ १२५ ॥ तो सिंहनाद जिकडे तिकडे दोन्ही सैन्यात घुमत होता व त्याचा प्रतिध्वनी इतका उमटत होता की तो कोठे मावेना ॥ १२६ ॥ तो प्रतिध्वनी उमटत असताच भीष्माचार्यांनी वीरवृत्तीच्या आवेशाने दिव्य शंख फुंकला ॥ १२७ ॥ ते दोन्ही नाद मिळाले तेव्हा आकाश तुटून पडावे त्याप्रमाणे भयंकर आवाज होऊन त्रैलोकांच्या कानठाळ्या बसल्या ॥ १२८ ॥ आकाशात घडघड आवाज होऊ लागला. समुद्र उचंबळू लागला. सर्व चराचर भयभीत होऊन कांपू लागले ॥ १२९ ॥ त्या भयंकर नादाने पर्वताच्या गुहा दुमदुमून गेल्या, तितक्यातच सैन्यात जिकडे तिकडे रणवाद्येही वाजू लागली ॥ १३० ॥ तेथेच भयंकर व कर्कश अशी अनेक प्रकारची वाजंत्रे वाजू लागली, तेव्हा मोठमोठ्या धैर्यवानांनाही महाप्रलय होतो असे वाटले ॥ १३१ ॥ नौबत, डंके, ढोल, शंख, झांजा, तुतारी आणि जिकडे तिकडे योद्ध्यांचे युद्धासंबंधीचे ओरडणे या सर्वांचा एकच कल्लोळ झाला ॥ १३२ ॥ योद्धे जिकडे तिकडे वीरश्रीने दंड थोपटू लागले. कित्येक युद्धाच्या आवेशाने शत्रूंना हाका देवू लागले. त्या ठिकाणी मदोन्मत्त हत्ती आवरेनासे झाले ॥ १३३ ॥ भेकड असे कच्चे वीर तर पांचोळ्यासारखे उडाले. प्रत्यक्ष मृत्युदेखील भयभीत होऊन तेथे पाय ठेऊ इच्छित नव्हता ॥ १३४ ॥ कित्येकांनी उभ्या उभ्या प्राण सोडले. मी मी म्हणणाऱ्यांची दांतखिळी बसली, जे अजिंक्यपणाचे ब्रीद वागविणारे होते तेही थरथर कांपू लागले ॥ १३५ ॥ असा हा भयंकर ध्वनी ऐकून ब्रह्मदेवालाही काही सुचेनासे झाले. देव तर आता प्रलय होतो असेच म्हणू लागले ॥ १३६ ॥

ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यन्दने स्थितौ। माधवः पाण्डवश्चैव दिव्यौ शङ्खौ प्रदध्मतुः॥ १४॥
पाञ्चजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनञ्जयः। पौण्ड्रं दध्मौ महाशङ्खं भीमकर्मा वृकोदरः॥ १५॥
अनन्तविजयं राजा कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः। नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ॥ १६॥
काश्यश्च परमेष्वासः शिखण्डी च महारथः। धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः॥ १७॥
द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते। सौभद्रश्च महाबाहुः शङ्खान्दध्मुः पृथक् पृथक्॥ १८॥
स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत्। नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन्॥ १९॥

**अर्थ**—नंतर ज्याला पांढरे शुभ्र घोडे जोडलेले आहेत अशा थोर रथात असलेल्या भगवान् श्रीकृष्ण व अर्जुन या दोघांनी आपल्या दिव्य शंखांचा नाद केला॥ १४॥ भगवान् श्रीकृष्णाने आपला पांचजन्य शंख फुंकला व अर्जुनाने आपला देवदत्त शंख वाजविला. अचाट कर्म करणाऱ्या बलशाली भीमाने आपला पौण्ड्र नावाच्या शंखाचा नाद केला॥ १५॥ कुन्तिपुत्र युधिष्ठिराने आपला अनंतविजय नावाचा शंख वाजविला आणि नकुल सहदेव यांनी आपले सुघोष, मणिपुष्पक या नावाचे शंख फुंकले॥ १६॥ हे राजा! महाधनुर्धारी काशीराज, महारथी शिखंडी, धृष्टद्युम्न, विराट आणि कोणाहीकडून जिंकला न जाणारा असा सात्यकी, द्रुपद व द्रुपदराजाचे पुत्र या सर्वांनी व सुभद्रापुत्र अभिमन्यूने हे राजा! आपले निरनिराळे शंख फुंकले॥ १७-१८॥ या सर्व शंखांच्या एकवटलेल्या नादाने धृतराष्ट्रांच्या मुलांची अंत:करणे विदीर्ण झाली व तो भयंकर नाद पृथ्वी व अंतरिक्षातही दुमदुमु लागला॥ १९॥

ऐसी स्वर्गीं मातु। देखोनि तो आकांतु। तंव पांडवदळाआंतु। वर्तलें कायी॥ १३७॥
हो कां निजसार विजयाचें। कीं तें भांडार महातेजाचें। जेथ गरुडाचियें जावळियेचे। कांतले चाऱ्ही॥ १३८॥
कीं पाखांचा मेरु जैसा। रहंवरु मिरवतसे तैसा। तेजें कोंदाटलिया दिशा। जयाचेनि॥ १३९॥
जेथ अश्ववाहकु आपण। वैकुंठींचा राणा जाण। तया रथाचे गुण। काय वर्णूं॥ १४०॥
ध्वजस्तंभावरी वानरु। तो मूर्तिमंत शंकरु। सारथी शारंगधरु। अर्जुनेंसीं॥ १४१॥
देखा नवल तया प्रभूचें। अद्भुत प्रेम भक्तांचें। जें सारथ्य पार्थाचें। करितु असें॥ १४२॥
पाइकु पाठीसीं घातला। आपण पुढां राहिला। तेणें पांचजन्यु आस्फुरिला। अवलीळाचि॥ १४३॥
परी तो महाघोषु थोरु। गर्जतु असे गंहिरु। जैसा उदैला लोपी दिनकरु। नक्षत्रांतें॥ १४४॥
तैसे तूरबंबाळु भंवते। कौरवदळीं गाजत होते। ते हारपोनि नेणों केउते। गेले तेथ॥ १४५॥
तैसाचि देखें येरें। निनादें अति गहिरें। देवदत्त धनुर्धरें। आस्फुरिला॥ १४६॥
ते दोनी शब्द अचाट। मिनले एकवट। तेथ ब्रह्मकटाह शतकूट। हों पाहत असे॥ १४७॥
तंव भीमसेनु विसणैला। जैसा महाकाळु खवळला। तेणें पौण्ड्र आस्फुरिला। महाशंखु॥ १४८॥
तो महाप्रलयजलधरु। जैसा घडघडिला गंहिरु। तंव अनंतविजयो युधिष्ठिरु। आस्फुरित असे॥ १४९॥
नकुळें सुघोषु। सहदेवें मणिपुष्पकु। जेणें नादें अंतकु। गजबजला ठाके॥ १५०॥
तेथ भूपती होते अनेक। द्रुपद द्रौपदेयादिक। हा काशीपति देख। महाबाहू॥ १५१॥
तेथ अर्जुनाचा सुतु। सात्यकि अपराजितु। धृष्टद्युम्नु नृपनाथु। शिखंडी हन॥ १५२॥
विराटादि नृपवर। जे सैनिक मुख्य वीर। तिहीं नाना शंख निरंतर। आस्फुरिले॥ १५३॥
तेणें महाघोषनिर्घातें। शेष कूर्म अवचितें। गजबजोनि भूभारातें। सांडूं पाहती॥ १५४॥
तेथ तिन्ही लोक डंडळित। मेरु मांदार आंदोळित। समुद्रजळ उसळत। कैलासवेरी॥ १५५॥
पृथ्वीतळ उलथों पहात। आकाश असे आसुडत। तेथ सडा होत। नक्षत्रांचा॥ १५६॥
सृष्टि गेली रे गेली। देवां मोकळवादी जाहली। ऐसी एक टाळी पिटिली। सत्यलोकीं॥ १५७॥
दिहाचि दिन थोकला। जैसा प्रळयकाळ मांडला। तैसा हाहाकारु उठिला। तिहीं लोकीं॥ १५८॥
तें देखोनि आदिपुरुष विस्मितु। म्हणे झणें होय पां अंतु। मग लोपिला अद्भुतु। संभ्रमु तो॥ १५९॥

**म्हणोनि विश्व सांवरलें। एऱ्हवीं युगांत होतें वोडवलें। जैं महाशंख आस्फुरिले। कृष्णादिकीं॥ १६०॥**
**तो घोष तरी उपसंहरला। परी पडिसाद होता राहिला। तेणें दळभार विध्वंसिला। कौरवांचा॥ १६१॥**
**जैसा गजघटाआंतु। सिंह लीला विदारितु। तैसा हृदयातें भेदितु। कौरवांचिया॥ १६२॥**
**तो गाजत जंव आइकती। तंव उभेचि हिये घालिती। एकमेकांतें म्हणती। सावध रे सावध॥ १६३॥**

**अर्थ**—कौरव सैन्यात होत असलेला भयंकर ध्वनी ऐकून देव स्वर्गात अशा रीतीने गोष्टी करीत असताना, इकडे पांडवसैन्यात काय वर्तमान चालले होते॥ १३७॥ जणू विजयाचे सर्व सार असलेला (म्हणजे ज्याच्यावर बसून युद्ध केले असता विजय येणारच असा) किंवा जो थोर तेजाचे कोठराप्रमाणे अति दैदीप्यमान आहे, ज्याला गरुडासारखे वेगवान असलेले चार घोडे जुंपले होते. ॥ १३८॥ किंवा जो पंख असलेल्या मेरुपर्वताप्रमाणे दिसत होता, ज्याच्या तेजाने सर्व दिशा भरून गेल्या होत्या, असा तो अर्जुनाचा रथ तेथे शोभत होता॥ १३९॥ ज्या अर्जुनाचे रथावर साक्षात् वैकुंठीचा राजा स्वत: घोडे हाकणारा होता, त्या रथाचे गुण काय वर्णन करू?॥ १४०॥ रथाच्या ध्वजस्तंभावर मूर्तिमंत शंकर असलेले मारुतिराय असून अर्जुन योद्धा व सारथी भगवान् श्रीकृष्ण होते॥ १४१॥ पहा, भगवंताचे आपल्या भक्तावर कसे आश्चर्यकारक प्रेम असते. आपण स्वत: भगवान् अर्जुनाचे सारथ्य करू लागले॥ १४२॥ भगवंतांनी आपला दास पाठीशी घालून आपण शत्रूच्या समोर झाले. त्या भगवंताने सहज लीलेने पाञ्चजन्य शंख फुंकला. ॥ १४३॥ पण त्याचा ध्वनी इतका मोठा झाला की सूर्य उगवला असता ज्याप्रमाणे नक्षत्रे लोपून जातात॥ १४४॥ त्याप्रमाणे त्या नादानेही कौरवसैन्यात जे नाद घुमत होते ते सर्व कोठे लोपले गेले, कोण जाणे॥ १४५॥ तसेच ज्याचा आवाज फार घुमणारा व गंभीर गर्जना करणारा आहे असा आपला देवदत्त शंख अर्जुनाने वाजविला॥ १४६॥ देवाचा पाञ्चजन्य व अर्जुनाचा देवदत्त या दोन्ही शंखांचे भयंकर शब्द एकत्र मिळाले, तेव्हा या ब्रह्मांडाचे आता तुकडे तुकडे होणार असे वाटले॥ १४७॥ तितक्यात भीमसेन महाकाळासारखा खडबडून जागा झाला व त्याने आपला पौंड्र नावाचा शंख फुंकला॥ १४८॥ प्रलयकाळच्या मेघाप्रमाणे त्याचा गडगडाट झाला. तितक्यात युधिष्ठिराने आपला अनंतविजय नावाचा शंख वाजविला॥ १४९॥ नकुलाने सुघोष व सहदेवाने मणिपुष्पक नावाचे आपापले शंख वाजविले; त्या सर्वांच्या एकत्र झालेल्या नादाने यमही घाबरून गेला॥ १५०॥ त्या सैन्यात आणखी जे द्रुपद, द्रौपदीचे मुलगे, विशालबाहूचा काशीपती॥ १५१॥ अर्जुनाचा मुलगा अभिमन्यू, सात्यकी, अपराजित धृष्टद्युम्न राजा, शिखंडी, विराटादी राजे जे सेनाधिपती होते तेही आपापले शंख सारखे वाजवू लागले॥ १५२-१५३॥ ते सर्व निनाद एक होऊन, होत असलेल्या त्या भयंकर गडगडाटाने शेष, कूर्म हे अकस्मात् भयभीत होऊन आपल्या डोक्यावरील भूमीचा भार टाकून देण्यास पाहू लागले. ॥ १५४॥ त्यामुळे तिन्ही लोक डळमळू लागले. मेरु, मंदार पर्वत हेही झोके घेऊ लागले. समुद्राचे पाणी कैलासापर्यंत उसळू लागले. ॥ १५५॥ पृथ्वी उलटी होण्याच्या बेतात आली. आकाश तुटून पडण्याच्या बेतात आले. नक्षत्रांचा पृथ्वीवर सडा पडला. ॥ १५६॥ अरे! सृष्टि बुडाली, देवांचा त्राता कोणी नाही असे सत्यलोकामध्ये सर्व एकदम ओरडू लागले॥ १५७॥ प्रलयकाल होतो त्याप्रमाणे दिवसाच दिवस संपला, तसेच त्रैलोक्यात जिकडे तिकडे हाहाकार माजून गेला. ॥ १५८॥ हे पाहून आदिनारायणाला प्रलय होतो की काय असे वाटले, पण तो मग तेवढाही गडगडाट थांबला॥ १५९॥ म्हणूनच सर्व विश्वरचना कायम राहिली, नाही तर जेंव्हा श्रीकृष्णार्जुनादिकानी शंखनाद केलेत, तेव्हा प्रलयकालच प्राप्त झाला होता॥ १६०॥ तो भयंकर नाद तर लोपला, पण त्याचा प्रतिध्वनी जो राहिला होता त्याच्या योगानेच कौरवाचे काही सैन्य नाश पावले. ॥ १६१॥ ज्याप्रमाणे हत्तीच्या समुदायांचा सिंह लीलेनें नाश करतो त्याप्रमाणे तो प्रतिध्वनी कौरवांच्या हृदयाला फाडू लागला. ॥ १६२॥ तो गाजत असलेला नाद ऐकत असता उभे असलेल्याचे धैर्य सुटू लागले व परस्परांस 'सांभाळा रे, सांभाळा' असे म्हणू लागले. ॥ १६३॥

**अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान् कपिध्वजः। प्रवृत्ते शस्त्रसम्पाते धनुरुद्यम्य पाण्डवः॥ २०॥**

*अर्जुन उवाच*

**हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते। सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत॥ २१॥**

**यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धु कामानवस्थितान्। कैर्मया सह योद्धव्यमस्मिन्रणसमुद्यमे॥ २२॥**
**योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः। धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः॥ २३॥**

**अर्थ**—नंतर धृतराष्ट्राची सर्व मुले सावध झाली आहेत व परस्पर शस्त्रवर्षावाला सुरुवात झाली आहे असे पाहून, ज्याच्या रथावर स्वतः मारुति हा ध्वज आहे. अशा अर्जुनाने धनुष्यबाण उचलून हाती घेतले व तो श्रीकृष्णाला असे वचन बोलला. अर्जुन म्हणाला देवा! या रणसंग्रामामध्ये युद्ध करण्याच्या इच्छेने सज्ज होऊन आलेल्या दुर्योधनाकडील योद्ध्यांपैकी मी कोणाशी युद्ध करावे याचे निरीक्षण करीत आहे, तोपर्यंत दोन्ही सैन्यांच्या मध्ये आपण रथ स्थिर करा॥ २०-२१-२२॥ या युद्धात दुर्मति अशा दुर्योधनाचे हितसाधू असे, येथे युद्धाकरिता जमलेल्या सर्व योद्ध्यांना मी पाहू इच्छितो॥ २३॥

**तेथ बळें प्रौढीपुरते। जे महारथी वीर होते। तिहीं पुनरपि दळातें। आवरिलें॥ १६४॥**
**मग सरिसेपणें उठावले। दुणवटोनि उचलले। तया दंडी क्षोभलें। लोकत्रय॥ १६५॥**
**तेथ बाणवरी धनुर्धर। वर्षताती निरंतर। जैसे प्रळयांत जलधर। अनिवार कां॥ १६६॥**
**ते देखलिया अर्जुनें। संतोष घेऊनि मनें। मग संभ्रमें दिठी सेने। घालितसे॥ १६७॥**
**तंव संग्रामीं सज्ज जाहले। सकळ कौरव देखिले। मग लीला धनुष्य उचलिलें। पंडुकुमरें॥ १६८॥**
**ते वेळीं अर्जुन म्हणतसे देवा। आतां झडकरी रथु पेलावा। नेऊनि मध्यें घालावा। दोहीं दळां॥ १६९॥**
**जंव मी नावेक। हे सकळ वीर सैनिक। न्याहाळीन अशेख। झुंजते जे॥ १७०॥**
**एथ आले असती आघवे। परी कवणेसीं म्यां झुंजावें। हें रणीं लागे पहावें। म्हणऊनियां॥ १७१॥**
**बहुतकरूनि कौरव। हे आतुर दुःस्वभाव। वांटिवावीण हांव। बांधिती झुंजीं॥ १७२॥**
**झुंजाची आवडी धरिती। परी संग्रामीं धीर नव्हती। हें सांगोनि रायाप्रती। काय संजयो म्हणे॥ १७३॥**

**अर्थ**—त्या सैन्यात पराक्रमाने व नावाने थोर गाजलेले जे महारथी वीर होते त्यांनी आपआपले सैन्य आवरले॥ १६४॥ मग दोन्हीकडील सैन्यांनी सारखी उठावणी केली. त्यांच्यात लढण्याचा दुप्पट हुरूप आला. याप्रमाणे दोन्हीकडील सैन्ये एकमेकांशी भिडली असता ते पाहून तिन्ही लोक भयभीत झाले.॥ १६५॥ त्या ठिकाणी प्रलयात जसा एकसारखा मुसळधार पाऊस पडतो, त्याप्रमाणे धनुर्धरांनी एकमेकांवर एकसारखा बाणांचा वर्षाव सुरू केला॥ १६६॥ ते पाहून अर्जुनाला संतोष वाटला व त्याने लागबगीने तात्काळ सर्व सेनेकडे दृष्टी दिली.॥ १६७॥ पाहतो तो त्या युद्धात सर्व कौरव सज्ज झालेले दिसले. तेव्हा अर्जुनाने हळूच आपले धनुष्य उचलले.॥ १६८॥ तेव्हा अर्जुन देवाला म्हणू लागला की, देवा! आता लवकर रथ हाकावा व दोन्ही सैन्यामध्ये नेऊन उभा करावा॥ १६९॥ कारण या युद्धात जे वीर लढण्याकरिता आले आहेत त्या सर्वांना घटकाभर पाहून घेऊ म्हणतो.॥ १७०॥ कारण या ठिकाणी सर्वजणच आले आहेत तरी मी कोणाशी युद्धात लढावे हे पाहिले पाहिजे.॥ १७१॥ बहुधा हे कौरव फार दुष्ट व उतावळ्या स्वभावाचे आहेत. पराक्रमावाचून युद्धाची हौस बाळगतात.॥ १७२॥ आवड तर धरतात, पण युद्धात धैर्य धरून लढत नाहीत, असे धृतराष्ट्राला सांगून पुढे संजय म्हणतो.॥ १७३॥

*सञ्जय उवाच*

**एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत। सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम्॥ २४॥**
**भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम्। उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरूनिति॥ २५॥**
**तत्रापश्यत्स्थितान् पार्थः पितृनथ पितामहान्। आचार्यान्मातुलान्भ्रातृन्पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा॥ २६॥**
**श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि। तान्समीक्ष्य स कौन्तेयः सर्वान्बन्धूनवस्थितान्॥ २७॥**
**कृपया परयाविष्टो विषीदन्निदमब्रवीत्।**

**अर्थ**—संजय म्हणतो राजा! याप्रमाणे ज्याने निद्रा जिंकली आहे. अशा अर्जुनाने भगवान् श्रीकृष्णाने दोन्ही दळांमध्ये आपला उत्तम रथ उभा करून भीष्मद्रोणादिक व मोठमोठे राजे पाहत असता भगवान् अर्जुनाला म्हणाले—

हे सर्व जमलेले कौरव पहा. त्याठिकाणी जमलेल्या दोन्ही सैन्यांमध्ये अर्जुनाने पितृतुल्य वडिल, आजे, गुरु, मामे, बंधू, मुलगे, नातू, सखे, सोयरे, आपले निरपेक्ष हितकर्ते असे मित्र पाहिले. त्या सर्व उपस्थित युद्धाला सज्ज झालेल्या बांधवांना पाहून अर्जुनाच्या अंत:करणात त्यांच्याविषयी अत्यंत मोह उत्पन्न झाला व खिन्न होत्साता असे बोलू लागला. ॥ २४-२७ ॥

**आइका अर्जुन इतुकें बोलिला। तंव श्रीकृष्णें रथु पेलिला। दोहीं सैन्यांमाजीं केला। उभा तेणें ॥ १७४ ॥**
**जेथ भीष्मद्रोणादिक। जवळिकेचि सन्मुख। पृथिवीपति आणिक। बहुत आहाती ॥ १७५ ॥**
**तेथ स्थिर करूनिया रथु। अर्जुन असे पाहातु। तो दळभार समस्तु। संभ्रमेंसीं ॥ १७६ ॥**
**मग देवा म्हणे देख देख। हे गोत्रगुरु अशेख। तंव कृष्णा मनीं नावेक। विस्मो जाहला ॥ १७७ ॥**
**तो आपणयां आपण म्हणे। एथ कायी कवण जाणे। हें मनीं धरिलें येणें। परि कांहीं आश्चर्य असे ॥ १७८ ॥**
**ऐसी पुढील से घेतु। तो सहजें जाणे हृदयस्थु। परि उगा असे निवांतु। तिये वेळीं ॥ १७९ ॥**
**तंव तेथ पार्थु सकळ। पितृ पितामह केवळ। गुरु बंधु मातुळ। देखता जाहला ॥ १८० ॥**
**इष्ट मित्र आपुले। कुमरजन देखिले। हे सकळ असती आले। तयांमाजीं ॥ १८१ ॥**
**सुहृज्जन सासरे। आणीकही सखे सोइरे। कुमर पौत्र धनुर्धरें। देखिले तेथ ॥ १८२ ॥**
**जयां उपकार होते केले। कां आपदीं जे रक्षिले। हें असो वडिल धाकुले। आदिकरूनी ॥ १८३ ॥**
**ऐसें गोत्रचि दोहीं दळीं। उदित जालें असे कळीं। हें अर्जुनें तिये वेळीं। अवलोकिलें ॥ १८४ ॥**
**तेथ मनीं गजबज जाहाली। आणि आपैसी कृपा उपजली। तेणें अपमानें निघाली। वीरवृत्ति ॥ १८५ ॥**
**जिया उत्तम कुळींचिया होती। आणि गुणलावण्य आथी। तिया आणिकीतें न साहती। सुतेजपणें ॥ १८६ ॥**
**नविये आवडीचेनि भरें। कामुक निजवनिता विसरे। मग पाडेंवीण अनुसरे। भ्रमला जैसा ॥ १८७ ॥**
**कीं तपोबळें ऋद्धी। पातलिया भ्रंशे बुद्धी। मग तया विरक्तता सिद्धी। आठवेना ॥ १८८ ॥**
**तैसें अर्जुना तेथ जाहलें। असतें पुरुषत्व गेलें। जें अंत:करण दिधलें। कारुण्यासी ॥ १८९ ॥**
**देखा मंत्रज्ञु बरळु जाय। मग तेथ कां जैसा संचारु होय। तैसा तो धनुर्धर महामोहें। आकळिला ॥ १९० ॥**
**म्हणऊनि असता धीरु गेला। हृदया द्रवो आला। जैसा चंद्रकळीं शिवतला। सोमकांतु ॥ १९१ ॥**
**तयापरी पार्थु। अतिस्नेहें मोहितु। मग सखेद असे बोलतु। श्रीअच्युतेंसीं ॥ १९२ ॥**

**अर्थ—**संजय धृतराष्ट्राला म्हणतो, अर्जुन असे बोलला असता श्रीकृष्णाने रथ चटकन् हाकला व दोन्ही सैन्याचे मध्ये उभा केला. ॥ १७४ ॥ जेथे समोरच भीष्मद्रोणादिक असे जवळचे आप्तसंबंधी व आणिक पुष्कळ दुसरे राजे होते तेथे रथ उभा केला. अर्जुन सर्व दळभार मोठ्या उल्हासाने पाहू लागला ॥ १७५-१७६ ॥ मग तो श्रीकृष्णाला म्हणू लागला, देवा! पहा, पहा हे सर्व गोत्र व गुरुजन. हे ऐकताच क्षणभर श्रीकृष्णांच्या मनात आश्चर्य वाटले. ॥ १७७ ॥ तो श्रीकृष्ण आपल्याशीच म्हणू लागला हे अर्जुनाने काय मनात धरले कोणाला ठाऊक! पण काही तरी आश्चर्य आहे! ॥ १७८ ॥ असा थोडा पुढला विचार श्रीकृष्ण करू लागले. तो परमात्मा सर्वांच्या अंतर्यामी असल्यामुळे त्याला कळलेच. पण काही न बोलता गुपचूप राहिले. ॥ १७९ ॥ इतक्यात अर्जुन आपले सर्व चुलते, आजे, गुरुजन, भाऊ, मामे पाहू लागला. ॥ १८० ॥ आपले प्रेमाचे मित्र मुले असे सर्व येथे युद्धात आले आहेत असे पाहू लागला ॥ १८१ ॥ आपले निष्काम हितकर्ते, सासरे, आणखी इतर सखे सोयरे, मुलगे, नातू इत्यादी अर्जुन पाहू लागला ॥ १८२ ॥ ज्यांच्यावर संकटात उपकार केले किंवा आपत्काळी ज्यांचे रक्षण केले असे वडिल धाकटे सर्वच आलेले पाहिले ॥ १८३ ॥ अशा रीतीने सैन्यात आपले गोत्रजच युद्ध करावयाला उभे ठाकले आहेत. असे त्यांनी त्यावेळी पाहिले. ॥ १८४ ॥ त्याबरोबर अर्जुनाचे मन व्याकुळ झाले व त्यामुळे अनायासे दया उत्पन्न झाली. ती उत्पन्न झालेली दयावृत्ती पाहून अर्जुनाच्या मनातील वीरवृत्तीला आपला अपमान झाला असे वाटून ती वीरवृत्ती निघून गेली. ॥ १८५ ॥ खरेच आहे, उत्तम कुलातीत गुणलावण्यांनी संपन्न ज्या स्त्रिया असतात त्या दुसऱ्या स्त्रियांचा वरचष्मा सहन करीत

नाहीत. ॥ १८६ ॥ ज्याप्रमाणे नूतन स्त्रीच्या प्रेमाच्या भरात कामी पुरुष आपल्या पहिल्या स्त्रीला विसरतो व आपल्या योग्यतेची आहे की नाही याचा विचार न करता भ्रमिष्टाप्रमाणे तिच्या नादी लागतो. ॥ १८७ ॥ किंवा तपश्चर्येमुळे ऋद्धी प्राप्त झाली असता बुद्धीला भ्रम होतो व मग पहिल्या विरक्त स्थितीची त्याला आठवणही राहत नाही. ॥ १८८ ॥ त्याप्रमाणेच अर्जुनाला त्या ठिकाणी झाले. अंत:करणात आप्तविषयी करुणवृत्ती उत्पन्न झाल्यामुळे अंगचा पराक्रम नाहीसा झाला ॥ १८९ ॥ मांत्रिकाकडून मंत्रोच्चार करताना जर मंत्र बरोबर म्हणता आला नाही, काही चूक झाली तर तोच जसा भूताने पछाडला जातो, त्याप्रमाणे अर्जुन स्वजनांच्या मोहाने पछाडला गेला. ॥ १९० ॥ म्हणूनच त्याचे ठिकाणचे धैर्य नाहीसे झाले व ज्याप्रमाणे चंद्राच्या कलेचा सोमकान्त मण्याला स्पर्श झाल्याबरोबर तो मणी पाझरू लागतो, त्याप्रमाणे अर्जुनाचे चित्त द्रवले. ॥ १९१ ॥ अर्जुन असा स्वजनांच्या प्रेमाने अति व्याकूळ झाला असता खिन्न अंत:करणाने भगवंताला बोलू लागला. ॥ १९२ ॥

*अर्जुन उवाच*

**दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥ २८ ॥**

**सीदन्ति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति। वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥ २९ ॥**

**गाण्डीवं स्रंसते हस्तात्त्वक्चैव परिदह्यते। न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मन: ॥ ३० ॥**

**अर्थ**—अर्जुन म्हणाला, हे कृष्णा! युद्धाला सज्ज झालेल्या या स्वजनांना पाहून माझे सर्व अवयव शिथिल झाले असून तोंडाला कोरड उत्पन्न झाली. माझे शरीराला कंप उत्पन्न होऊन सर्व शरीरांवर रोमांच उभे राहिले आहेत. ॥ २८-२९ ॥ हातातील गांडीव धनुष्य सुटले असून सर्व शरीराचा संताप झाला आहे. माझे मन भ्रमीष्ट झाल्यासारखे होत असून या युद्धात मी आता उभा राहू शकत नाही. ॥ ३० ॥

**तो म्हणे अवधारीं देवा। म्यां पाहिला हा मेळावा। तंव गोत्रवर्गु आघवा। देखिला एथ ॥ १९३ ॥**
**हे संग्रामीं अति उद्यत। जहाले असती कीर समस्त। पण आपणपेयां उचित। केवीं होय ॥ १९४ ॥**
**येणें नांवेंचि नेणों कायी। मज आपणपें सर्वथा नाहीं। मन बुद्धी ठायीं। स्थिर नोहे ॥ १९५ ॥**
**देखें देह कांपत। तोंड असे कोरडें होत। विकळता उपजत। गात्रांसी ॥ १९६ ॥**
**सर्वांगा कांटाळा आला। अति संतापु उपनला। तेथ बेंबळ हातु गेला। गांडिवाचा ॥ १९७ ॥**
**तें न धरतचि निष्टलें। परि नेणेंचि हातोनि पडिलें। ऐसें हृदय असे व्यापिलें। मोहें येणें ॥ १९८ ॥**
**जें वज्रापासोनि कठिण। दुर्धर अतिदारुण। तयाहून असाधारण। हें स्नेह नवल ॥ १९९ ॥**
**जेणें संग्रामीं हरु जिंतिला। निवातकवचांचा ठावो फेडिला। तो अर्जुन मोहें कवळिला। क्षणामाजीं ॥ २०० ॥**
**जैसा भ्रमर भेदी कोडें। भलतैसें काष्ठ कोरडें। परि कळिकेमाजीं सांपडे। कोंवळिये ॥ २०१ ॥**
**तेथ उत्तीर्ण होईल प्राणें। परी तें कमळदळ चिरूं नेणे। तैसें कठिण कोंवळेंपणें। स्नेह देखा ॥ २०२ ॥**
**हे आदिपुरुषाची माया। ब्रह्मेयाही नयेचि आया। म्हणवूनि भुलविला ऐके राया। संजयो म्हणे ॥ २०३ ॥**
**अवधारीं मग तो अर्जुनु। देखोनि सकळ स्वजनु। विसरला अभिमानु। संग्रामींचा ॥ २०४ ॥**
**कैसी नेणों सदयता। उपनली तेथें चित्ता। मग म्हणे कृष्णा आतां। नसिजे एथ ॥ २०५ ॥**
**माझें मन अतिशय व्याकुळ। होतसे वाचा बरळ। जे वधावे हे सकळ। येणें नांवें ॥ २०६ ॥**

**अर्थ**—अर्जुन म्हणतो देवा! पहा, मी युद्धास जमलेल्या सर्व लोकांना पाहिले परंतु हे सर्व आप्तजन आहेत असेच दिसून राहिले ॥ १९३ ॥ हे सर्वजण युद्धाला सज्ज झाले आहेत खरे, पण हे युद्ध करणे आपल्याला योग्य कसे होईल. ॥ १९४ ॥ आप्तांशी युद्ध हे शब्दच मनात आल्याबरोबर माझे मला भान राहत नाही व माझे मन व बुद्धि ही ठिकाणावर राहत नाहीत. ॥ १९५ ॥ देह थरथर कांपून राहिला, तोंडाला कोरड पडली, सर्व अवयव शिथिल झाले. ॥ १९६ ॥ सर्व शरीरावर काटा उभा राहिला, मला माझाच संताप येत आहे. गांडीव धनुष्य धरलेला हात ढिला पडला. ॥ १९७ ॥ म्हणून ते धरता येत नाही व हातातून निसटून खाली पडले. अशा रीतीने माझे मन स्वजनांच्या

प्रेमाने घेरले आहे. ॥ १९८ ॥ जे काही वज्रापेक्षाही फुटण्याला भयंकर कठीण असेल त्यापेक्षाही हा स्वजनांचा मोह निवृत्त होण्याला अत्यंत कठीण आहे हे आश्चर्य आहे ॥ १९९ ॥ ज्याने युद्धात शंकराला जिंकले, निवातकवच नावाच्या राक्षसांचा फडशा पाडला, त्या अशा पराक्रमी अर्जुनालाही क्षणामध्ये मोहाने ग्रासले. ॥ २०० ॥ ज्याप्रमाणे भुंगा कशाही प्रकारचे लाकूड सहज लीलेने कोरतो पण कमळाची कोवळी कळी मात्र तो कोरू शकत नाही व त्यात अडकून पडतो. ॥ २०१ ॥ त्या कळीचे प्रेमाने तो तिच्यावरून प्राणही ओवाळून टाकील, पण कळी चिरून बाहेर पडत नाही. असे हे प्रेम अत्यंत मृदू असल्यामुळे तोडण्यास कठीण आहे. ॥ २०२ ॥ संजय म्हणतो, राजा धृतराष्ट्रा! हे प्रेमच परमेश्वराची माया आहे. ही ब्रह्मदेवालाही आटोपत नाही. म्हणूनच अर्जुनालाही त्या प्रेमरूप मायेने घेरले. ॥ २०३ ॥ राजा धृतराष्ट्रा! मग तो अर्जुन आपल्या आप्तेष्टानां पाहून मी कौरवांसी युद्ध करीन असा जो अभिमान धरून आला होता तो अभिमानच विसरला. ॥ २०४ ॥ अर्जुनाचे मनात स्वजनाविषयी असे कसे प्रेम उत्पन्न झाले, समजत नाही. मग तो श्रीकृष्णाला म्हणाला, देवा! आता आपण येथे राहू नये असे वाटते. ॥ २०५ ॥ हे सर्व स्वजन मारावे असे मनात आले की माझे मन अत्यंत व्याकुळ होते व तोंडातून शब्दही फुटत नाही. ॥ २०६ ॥

**निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव। न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ॥ ३१ ॥**

**अर्थ**—येथे विपरीत लक्षणे दिसून येत असून युद्धात सज्जनांचा वध करण्याने हे केशवा! माझे परम कल्याण होईल, असे मला वाटत नाही. ॥ ३१ ॥

**या कौरवां जरी वधावें। तरी युधिष्ठिरादिक कां न वधावे। हे येरयेर आघवे। गोत्रज आमुचे ॥ २०७ ॥**
**म्हणोनि जळो हें झुंज। प्रत्यया न ये मज। येणे काय काज। महापापें ॥ २०८ ॥**
**देवा बहुतां परी पाहतां। एथ वोखटें होईल झुंजतां। वर कांही चुकवितां। लाभु आथी ॥ २०९ ॥**

**अर्थ**—या कौरवांना जर मारावे तर युधिष्ठिरादिकांना मारण्यास काय हरकत आहे? कारण दोघेही आमचे आप्तच आहेत. ॥ २०७ ॥ म्हणून आग लागो त्या युद्धाला! माझ्या मनाला ते पटत नाही. या महापापाने काय लाभ होणार! ॥ २०८ ॥ देवा! मी पुष्कळ विचार केला, मला वाटते युद्ध करण्यात आपले हित नाही. त्यापेक्षा युद्ध टाळण्यातच लाभ आहे. ॥ २०९ ॥

**न काङ्क्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च। किं नो राज्येन गोविन्द किं भोगैर्जीवितेन वा ॥ ३२ ॥**
**येषामर्थे काङ्क्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च। त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ॥ ३३ ॥**

**अर्थ**—मला जयाची इच्छा नाही, तशीच राज्य व राज्यसुखाची इच्छा नाही. हे गोविंदा! राज्य मिळवून काय करायचे किंवा भोग मिळवून काय करायचे? अथवा जगायचे तरी कशाला? कारण ज्याच्याकरिता आम्ही राज्य व सुखभोग मिळवू इच्छितो तेच प्राणावर व संपत्तीवर पाणी सोडून येथे युद्धाकरिता सज्ज झाले आहेत. ॥ ३२-३३ ॥

**तया विजयवृत्ती कांहीं। मज सर्वथा काज नाहीं। एथ राज्य तरी कायी। पावोनियां ॥ २१० ॥**
**यां सकळांतें वधावें। मग जे भोग भोगावे। ते जळोत आघवे। पार्थु म्हणे ॥ २११ ॥**
**तेणें सुखेंविण होईल। तें भलतेंही साहिजेल। वरी जीवितही वेंचिजेल। याचिलागी ॥ २१२ ॥**
**परी यांसी घातु कीजे। मग आपण राज्य भोगिजे। हें स्वप्नींही मन माझें। करूं न शके ॥ २१३ ॥**
**तरी आम्हीं कां जन्मावें। कवणालागीं जियावें। जें वडिलां यां चिंतावें। विरुद्ध मनें ॥ २१४ ॥**
**पुत्रातें इप्सी कुळ। तयाचें कायि हेंचि फळ। जे निर्दाळिजे केवळ। गोत्र आपुलें ॥ २१५ ॥**
**हें मनींचि केविं धरिजे। आपण वज्राचेयां होईजे। वरी घडे तरी कीजे। भलें इयां ॥ २१६ ॥**
**आम्हीं जें जें जोडावें। तें समस्तीं इहीं भोगावें। हें जीवितही उपकारावें। काजीं यांचा ॥ २१७ ॥**
**आम्ही दिगंतींचे भूपाळ। विभांडूनि सकळ। मग संतोषविजे कुळ। आपुलें जें ॥ २१८ ॥**
**तेचि हे समस्त। परी कैसें कर्म विपरीत। जे जाहले असती उद्यत। झुंजावया ॥ २१९ ॥**
**अंतौरियां कुमरें। सांडोनियां भांडारें। शस्त्राग्रीं जिव्हारें। आरोपुनी ॥ २२० ॥**

**ऐसियांतें कैसेनि मारूं। कवणावरी शस्त्र धरूं। निज हृदया करूं। घातु केवीं॥ २२१ ॥**

**अर्थ**—मी विजय मिळवला अशी वृत्ती मिरविण्याशी मला कर्तव्य नाही. अशा रीतीने राज्य मिळाले तरी काय उपयोग?॥ २१० ॥ अर्जुन म्हणतो, या सर्व स्वजनांना मारून जे राज्यभोग भोगायचे त्या राज्यभोगाला आग लागो!॥ २११ ॥ अशा प्रकारच्या सुखापेक्षा दुसरे कसेही सुख मिळाले किंवा न मिळाले तरी ते सहन करता येईल, येवढेच नाही तर यांच्याकरिता मी मरायला देखील तयार आहे. ॥ २१२ ॥ पण यांना मारून आपण राज्यसुख भोगावे हे स्वप्नातही माझे मनांत येणार नाही. ॥ २१३ ॥ आपल्या वाडवडिलांना मारण्याचे जर आम्ही मनात आणायचे तर आम्ही जन्मावे तरी कशाला? व जिवंत राहावे तरी कोणाकरिता?॥ २१४ ॥ कुळातील पुरुष, पुत्र व्हावा अशी इच्छा करतात, पुत्र झाल्यावर त्याने सर्व आपल्या गोत्रकुळाचा फडशा पाडावा हेच त्या इच्छेचे फळ काय?॥ २१५ ॥ हे मनातच कसे आणता येईल? व मन तरी वज्रासारखे कसे कठोर करता येईल? यापेक्षा आपल्याकडून होईल तितके त्यांचे कल्याण करावे हे बरे॥ २१६ ॥ आम्ही जे जे पराक्रम करून मिळवावे ते ते स्वजनांनी भोगायचे असते. एवढेच नाही तर यांच्या भल्याकरिता आपला जीव खर्ची पडला तरी हरकत नाही. ॥ २१७ ॥ आम्ही देशोदेशींचे राजांना जिंकून त्यांची संपत्ती लुटून आणावी व आपल्या कुळाला सुख द्यावे हे आमचे कर्तव्य होय. ॥ २१८ ॥ (ज्या कुळाला अशा रीतीने सुख द्यावयाचे) तेच हे सर्वजण होत; पण कसे हे विपरीत कर्म होत आहे की हे सर्व युद्ध करण्याला उद्युक्त झाले आहेत. ॥ २१९ ॥ बायका, मुले, राज्य, संपत्ती हे सर्व टाकून देऊन व आपले प्राण शस्त्रांवर ठेवून युद्धाला सज्ज आहेत. ॥ २२० ॥ अशांना कसे मारायचे व यांच्यावर शस्त्र तरी उचलता येईल का? आपण आपल्या हृदयावरच प्रहार कसा करायचा?॥ २२१ ॥

**आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः । मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः सम्बन्धिनस्तथा॥ ३४ ॥**
**एतान्न हन्तुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन । अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते॥ ३५ ॥**

**अर्थ**—गुरुजन, वडिल, पुत्र, त्याचप्रमाणे आजे, मामे, सासरे, नातू, मेव्हणे, तसेच सोयरे वगैरे येथे आले आहेत. पृथ्वीचेच राज्य काय पण त्रैलोक्याचे राज्य मिळाले व त्यांनी मला मारले तरी, हे मधुसूदना! मी त्यांना मारू इच्छित नाही. ॥ ३४-३५ ॥

**हे नेणसी तूं कवण। परी पैल भीष्म द्रोण। जयांचे उपकार असाधारण। आम्हां बहुत॥ २२२ ॥**
**एथ शालक सासरे मातुळ। आणि बंधु कीं हे सकळ। पुत्र नातू केवळ। इष्टही असती॥ २२३ ॥**
**अवधारीं अति जवळिकेचे। हे सकळही सोयरे आमुचे। म्हणोनि दोष आथि वाचे। बोलतांचि॥ २२४ ॥**
**हे वरी भलतें करितु। आतांचि एथें मारितु। परि आपण मनें घातु। न चिंतावा॥ २२५ ॥**
**त्रैलोक्यींचें अनकळित। जरी राज्य होईल प्राप्त। तरी हें अनुचित। नाचरें मी॥ २२६ ॥**
**जरी आजि एथ ऐसें कीजे। तरी कवणाच्या मनीं उरिजे। सांगें मुख केवीं पाहिजे। तुझें कृष्णा॥ २२७ ॥**

**अर्थ**—देवा युद्धाला सज्ज झालेले कोण आहेत इकडे तू लक्ष देत नाहीस, पण ज्यांचे आमच्यावर अत्यंत उपकार आहेत ते भीष्माचार्य व द्रोणाचार्य हे पलीकडे आहेत, पहा. ॥ २२२ ॥ या ठिकाणी शालक, सासरे, मामे, बंधू, पुत्र, नातू व इतर आप्त इष्ट हे सर्व आले आहेत. ॥ २२३ ॥ हे सर्व आमचे अत्यंत जवळचे नातलग आहेत, हे लक्षात घे. म्हणून यांना मारावे असे नुसते बोललो तरी दोष लागतो. ॥ २२४ ॥ हे कांहीही करोत, आताच येथे मला मारतील तरी हरकत नाही, पण आपण मात्र यांना मारण्याचा विचार मनात आणू नये. ॥ २२५ ॥ त्रैलोक्याचे अफाट राज्य जरी मिळत असले तरी मी हे अयोग्य कर्म करणार नाही. ॥ २२६ ॥ जर मी आज येथे असे करू लागलो तर आम्हां विषयी कोणाच्या मनात आदर राहील? व तुझे मुख तरी आम्हांला पाहायला मिळेल का?॥ २२७ ॥

**निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन। पापमेवाश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः॥ ३६ ॥**

**अर्थ**—हे जनार्दना! या कौरवांना मारून आम्हांला काय सुख होणार? उलट आततायी कौरवांना मारले तर आम्हांला त्यापासून पापच लागेल. ॥ ३६ ॥

**जरी वधु करूनि गोत्रजांचा। तरी वसौटा होऊनि दोषांचा। मज जोडिलासि तूं हातींचा। दूरी होसी॥ २२८॥**
**कुळहरणीं पातकें। तियें आंगीं जडती अशेखें। तये वेळीं तूं कवणें कें। देखावासी॥ २२९॥**
**जैसा उद्यानामाजीं अनळु। संचरला देखोनि प्रबळु। मग क्षणभरी कोकिळु। स्थिर नोहे॥ २३०॥**
**कां सकर्दम सरोवरु। अवलोकूनि चकोरु। न सेवितु अव्हेरु। करूनि निघे॥ २३१॥**
**तयापरी तूं देवा। मज झकों न येसी मावा। जरी पुण्याचा वोलावा। नाशिजैल॥ २३२॥**

**अर्थ**—जर् या गोत्रजांचा वध करीन तर सर्व दोषांचे वसतिस्थान मी होईन व माझ्या स्वाधीन झालेला तू अंतरशील.॥ २२८॥ कुळाच्या नाशामुळे संपूर्ण पातके जडतात मग तुला कोण कोठे पाहू शकेल?॥ २२९॥ ज्याप्रमाणे बगीच्याला भयंकर आग लागलेली पाहून कोकिळ क्षणभर देखील तेथे थांबत नाही.॥ २३०॥ किंवा सरोवरात सर्व चिखल झाला असे पाहून चकोरपक्षी ते सोडून निघून जातो.॥ २३१॥ त्याप्रमाणे (मी पापांचा आश्रय बनून) माझ्या ठिकाणी पुण्याचा ओलावा काहीच राहिला नाही म्हणजे मग तूही मला मायेने फसवून दूर होशील.॥ २३२॥

**गूढार्थदीपिका**—साधारणपणे कोणतेही शास्त्रविरुद्ध आचरण म्हणजे पाप होय. हे शास्त्रविरुद्ध आचरण परमेश्वरप्राप्तीला प्रतिबंधक होते असे शास्त्र आहे, तो शास्त्रसिद्धान्तच येथे अर्जुन देवापुढे मांडत आहे.

**तस्मान्नार्हा वयं हन्तुं धार्तराष्ट्रान्स्वबान्धवान्। स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव॥ ३७॥**

**अर्थ**—म्हणून आपल्या स्वजन असलेल्या कौरवांना आम्ही मारणेयोग्य नाही, स्वजनांना मारून हे माधवा! आम्ही सुखी कसे होणार?॥ ३७॥

**म्हणोनि मी हें न करीं। इये संग्रामीं शस्त्र न धरीं। हें किडाळ बहुतीं परी। दिसतसे॥ २३३॥**
**तुजसीं अंतराय होईल। मग सांगें आमचें काय उरेल। तेणें दुःखें हियें फुटेल। तुजवीण कृष्णा॥ २३४॥**
**म्हणऊनि कौरव हे वधिजती। मग आम्हीं भोग भोगिजती। हे असो मात अघडती। अर्जुन म्हणे॥ २३५॥**

**अर्थ**—म्हणून ते मी करणार नाही. या युद्धात मी शस्त्र हातात धरणार नाही. कारण युद्ध करणे पुष्कळ दृष्टीने अनर्थावह आहे.॥ २३३॥ तुझ्या प्राप्तीला प्रतिबंध झाला तर आम्ही सर्वस्व नागविलो. तुझ्या वियोगदुःखाने आमचे हृदय शतचूर्ण होईल.॥ २३४॥ म्हणून कौरवांना मारावे व मग राज्यभोग भोगावे ही गोष्ट शक्य नाही, असे अर्जुनाने सांगितले.॥ २३५॥

**यद्यप्येते न पश्यन्ति लोभोपहतचेतसः। कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम्॥ ३८॥**
**कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम्। कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन॥ ३९॥**

**अर्थ**—जरी राज्यलोभामुळे ज्यांचे चित्तात विवेक राहिला नाही अशा ह्या कौरवांना, हे स्वजनांमध्ये होणारे युद्ध, सर्व कुलांचा क्षय करणारे पापरूप आहे व यात मित्रद्रोहाचेही पातक आहे, असे कळत नसले, तरी हे युद्ध सर्व कुलांचा क्षय करणारे व पाप घडविणारे आहे असे प्रत्यक्ष जाणत असलेले आम्ही, त्या पापापासून दूर राहिले पाहिजे असे कसे जाणू नये?॥ ३८-३९॥

**हें अभिमानमदें भुलले। जऱ्हीं पां संग्रामा आले। तऱ्ही आम्हां हित आपुलें। जाणावें लागे॥ २३६॥**
**हें ऐसें कैसें करावें। जे आपुले आपण मारावे। जाणतजाणतांचि सेवावें। काळकूट॥ २३७॥**
**हां जी मार्गीं चालतां। पुढां सिंह जाहला अवचितां। तो तंव चुकवितां। लाभु आथी॥ २३८॥**
**असता प्रकाशु सांडावा। मग अंधकूप आश्रावा। तरी तेथ कवणु देवा। लाभु सांगें॥ २३९॥**
**कां समोर अग्नि देखोनी। जरी न वचिजे वोसंडोनी। तरी क्षणा एका कवळूनी। जाळूं सके॥ २४०॥**
**तैसे दोष हे मूर्त। अंगीं वाजों असती पहात। हें जाणतांही केवीं एथ। प्रवर्तावें॥ २४१॥**
**ऐसें पार्थ तिये अवसरीं। म्हणे देवा अवधारीं। या कल्मषाची थोरी। सांगेन तुज॥ २४२॥**

**अर्थ**—हे कौरव जरी पराक्रमाचा अभिमान धारण केल्यामुळे अविचारी होऊन युद्धास सज्ज झाले असले तरी आपण आपले हित कशात आहे हे जाणले पाहिजे.॥ २३६॥ हे कौरव सर्व आपलेच आहेत तेव्हा आपण आपल्याच

आप्तांना मारायचे हे कसे करावे? काळकूट आहे असे समजल्यावरही ते खावे काय?॥ २३७॥ अहो देवा! मार्गाने चालत असता समोरून अकस्मात सिंह आला तर त्याला चुकवून जाण्यातच आपले हित असते. ॥ २३८॥ चांगला प्रकाश असताना त्याचा उपभोग न करता त्याला टाकून गडद अंध:कार असलेल्या विहिरीचा आश्रय करण्यात काय लाभ होणार?॥ २३९॥ समोर अग्नी लागला आहे असे दिसत असता त्याला टाकून जर आपण निघून गेलो नाही तर तो एका क्षणामध्ये आपल्याला जाळील॥ २४०॥ त्याप्रमाणे युद्धात स्वजनांना मारण्यापासून होणारे पाप आपल्या अंगी जडणार हे प्रत्यक्ष दिसत असताना युद्धाला कसे प्रवृत्त व्हावे?॥ २४१॥ त्या प्रसंगी याप्रमाणे अर्जुन पुन: देवाला म्हणाला की देवा! या युद्धामुळे स्वजनांचा वध होणाऱ्या पापांचे कसे भयंकर परिणाम होतील, हे पहा. ॥ २४२॥

**कुलक्षये प्रणश्यन्ति कुलधर्मा: सनातना:। धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत॥ ४०॥**

**अर्थ**—कुलाचा नाश झाला असता अनादिकालापासून कुळात चालत आलेले कुलधर्म नाश पावतात. एकदा हा सनातन धर्म अशा रीतीने नष्ट झाला की सर्व कुळात अधर्मच माजतो. ॥ ४०॥

**जैसें काष्ठें काष्ठ मथिजे। तेथ वन्हि एक उपजे। तेणें काष्ठजात जाळिजे। प्रज्वळलेनि॥ २४३॥**
**तैसा गोत्रींची परस्परें। जरी वधु घडे मत्सरें। तरी तेणें महादोषें घोरें। कुळचि नाशे॥ ४४४॥**
**म्हणवूनि येणें पापें। वंशजधर्मु लोपे। मग अधर्मुचि आरोपे। कुळामाजी॥ २४५॥**

**अर्थ**—अरण्यात एका लाकडाशी दुसऱ्या लाकडाचे घर्षण झाले असता अग्नी उत्पन्न होतो व तो भडकला म्हणजे सर्व जंगलातील लाकडे जाळतो. ॥ २४३॥ त्याप्रमाणे स्वजनात परस्पर युद्ध होऊन मत्सराने परस्परांचा वध केला तर त्या घोर पापाने सर्व कुळाचाच नाश होतो. ॥ २४४॥ म्हणून पुढे अशा पापाने वंशात कोणीच जिवंत न राहिल्यामुळे कुळधर्माचा लोप होतो व कुळात अधर्मच प्रवृत्त होतो. ॥ २४५॥

**अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यन्ति कुलस्त्रिय:। स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसङ्कर:॥ ४१॥**

अर्थ—कुळांत अधर्म माजला की कुलस्त्रिया दूषित होतात आणि कुलस्त्रिया दूषित झाल्या म्हणजे हे अर्जुना! वर्णसंकर होतो. ॥ ४१॥

**एथ सारासार विचारावें। कवणें काय आचरावें। आणि विधिनिषेध आघवे। पारुषती॥ २४६॥**
**असता दीपु दवडिजे। मग अंधकारीं राहाटिजे। तरी उजूचि कां अडखुळिजे। जयापरी॥ २४७॥**
**तैसा कुळीं कुळक्षयो होय। तये वेळीं तो आद्यधर्मु जाय। मग आन कांहीं आहे। पापावांचुनी॥ २४८॥**
**जैं यमनियम ठाकती। तेथ इंद्रियें सैरा विचरती। म्हणऊनि व्यभिचार घडती। कुळस्त्रियांसी॥ २४९॥**
**उत्तम अधर्मी संचरती। ऐसे वर्णावर्ण मिसळती। तेथ समूळ उपडती। जातिधर्म॥ २५०॥**
**जैसी चोहटाचिये बळी। पाविजे सैरा काउळीं। तैसीं महापापें कुळीं। संचरती॥ २५१॥**

**अर्थ**—अशा स्थितीत बऱ्या वाईटाचा आपला धर्म काय याचा मग कोण विचार करतो? अशा रीतीने सर्व विधिनिषेध बंद पडतात. ॥ २४६॥ असलेला दिवा विझविला असता ज्याप्रमाणे अंधारात राहाट करावी लागते व सरळ जागेवरहि मनुष्य अडखळतो. ॥ २४७॥ त्याप्रमाणे कुळातील कुळक्षयामुळे मूळचा धर्म लोप पावतो. मग पापावाचून दुसरे काय असणार?॥ २४८॥ जेव्हा यमनियमरूप धर्माचे आचरण बंद पडते तेव्हा इन्द्रियांचे स्वैर वर्तन सुरू होते, म्हणून कुलीनस्त्रियात व्यभिचार सुरू होतो. ॥ २४९॥ उत्तम अधमात मिसळतात. मग वर्णावर्णाची भेसळ होते व जातिधर्माचा समूळ उच्छेद होतो. ॥ २५०॥ ज्याप्रमाणे चौरस्त्यावर ठेवलेल्या बळीवर चोहोकडून कावळे धावतात त्याप्रमाणे जातिधर्म लोपले असता कुलामध्येही चोहोकडून पापे शिरतात. ॥ २५१॥

**सङ्करो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च। पतन्ति पितरो ह्येषां लुप्तपिण्डोदकक्रिया:॥ ४२॥**

**अर्थ**—अशा वर्णसंकराने कुलाला व कुलांचा नाश करणाऱ्यांना नरकप्राप्ती होते व कुलातील पूर्वपुरुषांना पिंड व तिलोदक देण्यास कोणी न उरल्यामुळे पुढे ते पतन पावतात. ॥ ४२॥

**मग कुळा तया अशेखा। आणि कुळघातकां। येरयेरां नरका। जाणें आथी॥ २५२॥**

**देखें वंशवृद्धि समस्त। यापरी होय पतित। मग वोवांडिती स्वर्गस्थ। पूर्वपुरुष॥ २५३॥**
**जेथ नित्यादि क्रिया ठाके। आणि नैमित्तिक क्रिया पारुखे। तेथ कवणा तिळोदकें। कवण अर्पी॥ २५४॥**
**तरी पितर काय करिती। कैसेनि स्वर्गीं वसती। म्हणोनी तेही येती। कुळापासीं॥ २५५॥**
**जैसा नखाग्रीं व्याळु लागे। तो शिखांत व्यापी वेगें। तेवीं आब्रह्म कुळ अवघें। आप्लविजे॥ २५६॥**

**अर्थ—**मग संपूर्ण कुळ व कुळांचा नाश करणारा या दोघांना नरकातच पडावे लागते. ॥ २५२ ॥ पहा, याप्रमाणे सर्व वंशच पतीत होतो व मग पूर्वज स्वर्गात असले तरी तेही स्वर्गातून च्युत होऊन नरकात वंशापाशी येतात. ॥ २५३ ॥ कारण नित्यनैमित्तिक क्रिया बंद पडल्यावर श्राद्धादी कर्मे कशी होणार ?॥ २५४॥ श्राद्धादी कर्माचे द्वारा मिळणारे अन्नपाणी पितरांना मिळाले नाही म्हणजे पितर स्वर्गात काय खातील? व कसे राहतील? म्हणून तेही वंशजापाशी नरकात येतात. ॥ २५५ ॥ ज्याप्रमाणे पायाच्या बोटाच्या टोकाला जरी सर्प चावला तरी क्षणात त्याचे विष मस्तकापर्यन्त चढते त्याप्रमाणे कुळधर्माच्या लोपाचे पाप ब्रह्मलोकापर्यंत गेलेल्या पूर्वजांनाही बाधते॥ २५६ ॥

**दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसङ्करकारकैः। उत्साद्यन्ते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः॥ ४३॥**
**उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन। नरकेऽनियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम॥ ४४॥**
**अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम्। यद्राज्यसुखलोभेन हन्तुं स्वजनमुद्यताः॥ ४५॥**

**अर्थ—**कुलांचा नाश करणाऱ्यांच्या सर्व वर्णांचा संकर करणाऱ्या पापामुळे सनातन असे जातिधर्म व कुलधर्म नष्ट होतात. ॥ ४३ ॥ हे जनार्दना! ज्या मनुष्यांच्या कुळातील कुलधर्म व जातिधर्म वगैरे नष्ट झाले आहेत, अशा पुरुषांना निश्चित नरकात पडून राहावे लागते असे आम्ही पूर्वजांच्या तोंडून ऐकले आहे. ॥ ४४ ॥ अहो! आम्ही राज्यसुख प्राप्त व्हावे या लोभाने स्वजनांचा वध करणाऱ्या युद्धरूपी महत् पापकर्म करण्याला कसे प्रवृत्त झालो आहो, पहा!॥ ४५ ॥

**देवा अवधारीं आणिक एक। एथ घडे महापातक। जे संगदोषें हा लौकिक। भ्रंशु पावे॥ २५७॥**
**जैसा घरीं आपुलां। वानिवसें वन्ही लागला। तो आणिकांहीं प्रज्वळिला। जाळूनि घाली॥ २५८॥**
**तैसिया तया कुळसंगती। जे जे लोक वर्तती। तेही बाधूं पावती। निमित्तें येणें॥ २५९॥**
**तैसें नाना दोषें सकळ। अर्जुन म्हणे तें कुळ। मग महाघोर केवळ। निरय भोगी॥ २६०॥**
**पडिलिया तिये ठायीं। मग कल्पांतींही उकलु नाहीं। येसणें पतन कुळक्षयीं। अर्जुन म्हणे॥ २६१॥**
**देवा हें विविध कानीं ऐकिजे। परी अझुनिवरी त्रासु नुपजे। हृदय वज्राचें हें काय कीजे। अवधारीं पां॥ २६२॥**
**अपेक्षिजे राज्यसुख। जयालागीं तें तंव क्षणिक। ऐसें जाणतांही दोख। अव्हेरूं ना॥ २६३॥**
**जे हे वडिल सकळ आपुले। वधावया दिठी सूदले। सांग पां काय थेकुलें। घडलें आम्हां॥ २६४॥**

**अर्थ—**देवा! आणखी एक गोष्ट लक्षात घ्या. येथे महापाप आणखी असे होत असते की संसर्गामुळे इतर लोकांचेही जातिधर्म सुटू लागतात. ॥ २५७॥ ज्याप्रमाणे न कळत आपल्या घराला अग्नी लागला आणि तो जर भडकला तर शेजाऱ्याचेही घर जाळतो. ॥ २५८ ॥ त्याप्रमाणे ज्या कुळातील धर्माचरण बंद पडले त्या कुळाशी संबंध असलेले व त्याप्रमाणे वागू पाहणारे कुळही तसेच होते. ॥ २५९ ॥ त्याप्रमाणे नाना प्रकारचे पापांनी युक्त झालेले ते कुळ, अर्जुन म्हणतो देवा! घोर नरकात पडते. ॥ २६० ॥ त्या घोर नरकात पडल्यानंतर त्यातून कल्पान्तापर्यंत त्याची सुटका होत नाही कुलक्षय झाला असता सर्व कुळांचा एवढा अधःपात होतो, पहा. ॥ २६१ ॥ देवा! आम्ही हे असे शास्त्राचे म्हणणे पुष्कळ प्रकाराने ऐकतो पण अजूनही त्या तशा वागण्याचा वीट येत नाही, पण काय करावे! माझे हृदय वज्रासारखे अत्यंत कठोर आहे, पहा. ॥ २६२ ॥ ज्या देहाकरिता या राज्यसुखाची इच्छा करायची तो देह क्षणिक आहे हे जाणूनही आम्ही या युद्धरूपी पापाचा त्याग करीत नाही. ॥ २६३ ॥ हे सर्व भीष्म द्रोणादिक जे आमचे वडील पूज्य सोयरे आहेत, त्यांचा वध करण्याकरिता त्यांना आपल्या दृष्टीसमोर केलेले आहेत, हे काय थोडे पातक आहे ?॥ २६४॥

**यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः। धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत्॥ ४६॥**

**अर्थ**—शस्त्र धारण करणाऱ्या दुर्योधनादिक धृतराष्ट्राच्या पुत्रांनी जर निःशस्त्र म्हणून प्रतिकार न करणाऱ्या माझ्यावर शस्त्रवर्षाव केला तरी ते मला सुखकर होईल. ॥ ४६ ॥

**आतां यावरी जें जियावें। तयापासूनि हें बरवें। जे शस्त्रें सांडूनि साहावे। बाण यांचे॥ २६५॥**
**तयावरी होय जितुकें। तें मरणही वरी निकें। परी येणें कल्मषें। चाड नाहीं॥ २६६॥**
**ऐसें देखून सकळ। अर्जुनें आपुलें कुळ। मग म्हणे राज्य तें केवळ। निरयभोगु॥ २६७॥**

**अर्थ**—असे पाप करून आम्ही जे जिवंत राहायचे त्यापेक्षा आपण आपली शस्त्रे खाली ठेऊन यांचे बाणांचा मारा सहन करावा हे उत्तम. ॥ २६५ ॥ असे केल्याने जितके काही होईल त्यात मरण आले तरी चांगलेच आहे, पण गोत्रजवधाचे पातक करण्याची माझी इच्छा नाही. ॥ २६६ ॥ अशाप्रकारे युद्धास सज्ज झालेले सर्व कुल पाहून अर्जुन म्हणाला राज्यसुख म्हणजे केवळ नरकाचा भोग होय. ॥ २६७ ॥

*सञ्जय उवाच*

**एवमुक्त्वार्जुनः सङ्ख्ये रथोपस्थ उपाविशत्। विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः॥ ४७॥**

***ॐतत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादेऽर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः॥ १॥***

**अर्थ**—संजय म्हणतो—याप्रमाणे समरांगणात अर्जुन बोलून, हातातील धनुष्यबाण टाकून देऊन अत्यंत शोकाकुल झाला व रथातून खाली उतरून रथाजवळ बसला. ॥ ४७ ॥

**ऐसें तिये अवसरीं। अर्जुन बोलिला समरीं। संजयो म्हणे अवधारीं। धृतराष्ट्रातें॥ २६८॥**
**मग अत्यंत उद्वेगला। न धरत गहिंवरु आला। तेथ उडी घातली खालां। रथौनियां॥ २६९॥**
**जैसा राजकुमरु पदच्युतु। सर्वथा होय उपहतु। कां रवि राहुग्रस्तु। प्रभाहीनु॥ २७०॥**
**नातरी महासिद्धिसंभ्रमें। जिंतला तापसु भ्रमें। मग आकळूनि कामें। दीनु कीजे॥ २७१॥**
**तैसा तो धनुर्धरु। अत्यंत दुःखें जर्जरु। दिसे जेथ रहंवरु। त्यजिला तेणें॥ २७२॥**
**मग धनुष्यबाण सांडिले। न धरत अश्रुपात आले। ऐसें ऐकें राया वर्तलें। संजयो म्हणे॥ २७३॥**
**आतां यावरी तो वैकुंठनाथु। देखोनि सखेद पार्थु। कवणेपरी परमार्थु। निरूपील॥ २७४॥**
**ते सविस्तर पुढारी कथा। अति सकौतुक ऐकतां। ज्ञानदेव म्हणे आतां। निवृत्तिदासु॥ २७५॥**

**इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां प्रथमोऽध्यायः॥ १॥**

**अर्थ**—संजय म्हणतो—राजा धृतराष्ट्रा! याप्रमाणे त्या युद्धाचे ठिकाणी अर्जुन, भगवान् श्रीकृष्णाला म्हणाला, पहा. ॥ २६८ ॥ मग अत्यंत खिन्न झाला, धरू शकेना असा त्याचा कंठ दाटून आला. तेव्हा त्याने लगेच रथाखाली उडी घेतली. ॥ २६९ ॥ ज्याप्रमाणे राजपुत्र राज्यपदावरून काढला गेला असता सर्वस्वी निस्तेज दिसतो किंवा सूर्याला राहूने ग्रासले असता तो कळाहीन दिसतो. ॥ २७० ॥ किंवा एखाद्या तपस्व्याला महासिद्धी प्राप्त होऊन तो जसा तिच्या मोहात सापडून विवेकहीन बनतो व कामवासनेच्या तडाक्यात सापडून कामाधीन होतो. ॥ २७१ ॥ त्याप्रमाणे तो अर्जुन अत्यंत दुःखाने त्रस्त झाला व आपला रथ टाकून दिलेला दिसला. ॥ २७२ ॥ मग धनुष्यबाण टाकून दिले. धरवेना असे डोळ्यातून सारखे अश्रू सुरू झाले. संजय म्हणतो, राजा धृतराष्ट्रा! असा तेथे वृत्तांत झाला. ॥ २७३ ॥ आता पुढे भगवान् श्रीकृष्ण अर्जुनाला अशा अत्यंत खिन्न स्थितीत पाहून कशा रीतीने परमार्थाचा विवेक सांगणार. ॥ २७४ ॥ ती सविस्तर पुढील कथा, श्रीनिवृत्तिदासज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, ऐकिली असता भगवंताच्या भक्तवात्सल्याचे मोठे कौतुक वाटणार आहे. ॥ २७५ ॥

***श्रीसद्गुरुमाउलीच्या कृपेने श्रीज्ञानेश्वरीच्या पहिल्या अध्यायाचा अनुवाद गूढार्थदीपिकेसह पूर्ण झाला तो सद्गुरु चरणी समर्पण असो!***



# समारोप

सुईच्या अग्राइतकी भूमी पांडवांना द्यावयाची नाही असा दुर्योधनाने हट्ट धरल्यामुळे पांडवांना युद्ध करून राज्य मिळविल्यावाचून गत्यंतर नव्हते. पांडवांनी कौरवांशी युद्ध करण्याचे ठरविले व कौरव, पांडव या दोघांचीही सैन्ये कुरुक्षेत्रात युद्ध करण्याकरिता सज्ज झाली. अर्जुनाने दोन्ही सैन्ये न्याहाळून पाहिली व त्यात पूज्य गुरुजन, पुत्र, मामे, सखे, सोयरे हेच सर्व मिळाले असून, या युद्धात या सर्व स्वजनांचा वध होणार असे त्याला दिसून आले. तेव्हा यात स्वजनांचा वध होऊन कुळाचाच नाश होणार व त्या कुळाच्या नाशाने सर्व धर्माचाही नाश होणार धर्मनाशाने सर्व कुळ व कुळातील पूर्वज हे सर्व नरकात जातील असे हे युद्ध आम्हा क्षत्रियाना धर्मरूप असले तरी घोर पापरूप आहे व याने परमेश्वरप्राप्तिरूप परमकल्याण साधणार नाही. पापानेच परमेश्वर प्राप्तीला प्रतिबंध होतो. तेव्हा हे घोर पापरूपी युद्ध न करणे बरे; असे अर्जुनाला वाटून, त्या घोर पापरूपी युद्धापासून परावृत्त होण्याचे त्याने ठरविले व 'मी युद्ध करीत नाही' असे भगवान श्रीकृष्णाला सांगितले.

अर्जुनाच्या अशा या भूमिकेत सर्व अज्ञानी लोकांच्या मनोभूमिकेचेच चित्र रेखाटले आहे. अज्ञानी मनुष्याची बुद्धी धर्माधर्म जाणण्याकरिता जशी विरक्त व ज्ञानसंपन्न पाहिजे तशी मूळची नसते. देहादि विषय सत्य आहेत, असे दृढ समजून ती बुद्धी त्या विषयाच्या मोहाने अत्यंत अविवेकी बनते व ती ज्ञानाने संपन्न होऊन पूर्ण शुद्धब्रह्मस्वरूप व्हावी एवढ्याकरिता परमेश्वराने जे धर्माधर्म मनुष्याकरिता सांगून ठेविले आहेत, ते धर्माधर्म, त्या अविवेकी बुद्धीच्या मनुष्याला पटत नाहीत. तो धर्मालाच अधर्म समजू लागतो. अविवेकी पुरुषाला आपला स्वधर्म परमकल्याणाचा वाटत नाही. केव्हा केव्हा स्वधर्मापेक्षा सुटसुटित असा परधर्म बरा वाटतो. कर्मत्यागरूप संन्यास हा, अत्यन्त विरक्त व ज्यांचे शमदमादी हे स्वभावधर्म आहेत व सत्वगुणांच्या वृद्धीमुळे ज्यांच्या प्रकृतीतील कर्मप्रवृत्ती क्षीण झाली आहे, अशा ब्राह्मणाकरिताच सांगितला आहे. ज्यांची कर्मप्रवृत्ति क्षीण झाली नाही अशा ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य इत्यादिकांना कर्मत्यागरूपी संन्यास सांगितला नाही. म्हणून अशा लोकांनी कर्मसंन्यास करणे म्हणजे परधर्म स्वीकारणे होय. अर्जुन कर्मप्रवृत्ति क्षीण नसलेल्या क्षत्रिय जातीतला असून अत्यंत विरक्त ब्राह्मणाचा कर्मत्यागरूपी संन्यासधर्म स्वजनांच्या मोहाने स्वीकारू पाहात होता. म्हणून भगवंतांनी त्याला स्वधर्माचा त्याग न करताही प्रत्येक मनुष्याला आपल्या स्वधर्माप्रमाणे वागून आपले आत्यंतिक कल्याण म्हणजे भगवत्प्राप्ती कशी करून घेता येते या मुद्याचा पुढे सविस्तार उपदेश केला.

श्रीमद्‌सद्‌गुरू श्रीज्ञानेश्वर महाराजार्पणमस्तु!

॥ श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ॥

# अध्याय दुसरा

*सञ्जय उवाच*

**तं तथा कृपयाविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम् । विषीदन्तमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः॥ १॥**

**अर्थ—*संजय म्हणतो*—**आतापर्यंत सांगितल्याप्रमाणे स्वजनांच्या मोहाने अत्यंत व्याकुळ होऊन ज्याच्या डोळ्यातून अश्रू वाहत आहेत व जो अत्यंत विषण्ण झाला आहे, अशा अर्जुनाला पाहून भगवान् बोलू लागले. ॥ १॥

**मग संजयो म्हणे रायातें। आइकें तो पार्थु तेथें। शोकाकुळ रुदनातें। करीत असे॥ १॥**
**तें कुळ देखोनि समस्त। स्नेह उपनलें अद्भुत। तेणें द्रवलें असे चित्त। कवणे परि॥ २॥**
**जैसें लवण जळें झळंबलें। ना तरी अभ्र वातें हाले। तैसें सधीर परी विरमलें। हृदय तयाचें॥ ३॥**
**म्हणोनी कृपा आकळिला। दिसतसे अति कोमाइला। जैसा कर्दमीं रुपला। राजहंस॥ ४॥**
**तयापरी तो पंडुकुमरु। महामोहें अति जर्जरु। देखोनी श्री शार्ङ्गधरु। काय बोले॥ ५॥**

**अर्थ—**मग संजय धृतराष्ट्राला म्हणाला, राजा! तो अर्जुन युद्धात अत्यंत शोकाकुल होऊन रडू लागला, पहा. ॥ १॥ युद्धात सज्ज झालेले आपले कुळ पाहून अर्जुनाने मनात जे स्वजनांचे प्रेम उत्पन्न झाले व त्याचे चित्ताला पाझर फुटला तो कशा रीतीने, पहा. ॥ २॥ ज्याप्रमाणे मिठावर पाण्याचा लोट यावा किंवा वायूने अभ्र हालावे, त्याप्रमाणे अर्जुनाचे चित्त अढळ, पण त्यावेळी विरघळले. ॥ ३॥ म्हणून स्वजनांचे प्रेमाने त्याचे चित्त घेरले गेले. तो अती सुकून गेला व ज्याप्रमाणे चिखलात सापडलेला राजहंस अती दीन होतो. तसा तो दीन झाला. ॥ ४॥ याप्रमाणे तो पांडुकुमर अर्जुन मोहाने अती व्याकुळ झालेला पाहून भगवान काय म्हणाले ते ऐक. ॥ ५॥

*श्रीभगवानुवाच*

**कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम्। अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन ॥ २॥**

**अर्थ—*भगवान् म्हणतात*—**अर्जुना! युद्धाला सज्ज झाल्यावर अनार्याचे ठिकाणी असणारे, स्वर्गाचे द्वार बंद करणारे व अपकीर्ती करणारे असे हे युद्धापासून पराङ्मुख होण्याचे निंद्य पापरूप विचार कोठून सुचलेत? ॥ २॥

**म्हणे अर्जुना आदि पाहीं। हें उचित काय इये ठायीं। तूं कवण हें कायी। करीत आहासी॥ ६ ॥**
**तुज सांगें काय जाहलें। कवण उणें आलें। करितां काय ठेलें। खेदु कायिसा॥ ७ ॥**
**तूं अनुचिता चित्त नेदिसी। धीरु कंहींच न संडिसी। तुझेनि नामें अपयशीं। दिशा लंघिजे॥ ८ ॥**
**तूं शूरवृत्तीचा ठावो। क्षत्रियांमाजीं रावो। तुझिया लाठेपणाचा आवो। तिहीं लोकीं॥ ९ ॥**
**तुवां संग्रामीं हरु जिंतिला। निवातकवचांचा ठावो फेडिला। पवाडा तुवां केला। गंधर्वांसी॥ १०॥**
**पाहतां तुझेनि पाडें। दिसे त्रैलोक्यही थोकडें। ऐसें पुरुषत्व चोखडें। पार्था तुझें॥ ११॥**
**तो तूं कीं आजि येथें। सांडूनियां वीरवृत्तीतें। अधोमुख रुदनातें। करितु आहासी॥ १२॥**
**विचारीं तूं अर्जुनु। कीं कारुण्यें कीजसी दीनु। सांग पां अंधकारें भानु। ग्रासिला आथी॥ १३॥**
**ना तरी पवनु मेघासी बिहे। कीं अमृतासी मरण आहे। पाहें पां इंधनचि गिळोनि जाये। पावकातें॥ १४॥**
**कीं लवणेंचि जळ विरे। संसर्गें काळकूट मरे। सांग पा महाफणी दर्दुरें। गिळिजे कायी॥ १५॥**
**सिंहासी झोंबे कोल्हा। ऐसा अपाडु आथि कें जाहला। परी तो त्वां साच केला। आजि एथ॥ १६॥**
**म्हणोनि अझुनी अर्जुना। झणें चित्त देसी या हीना। वेगीं धीर करूनियां मना। सावधु होईं॥ १७॥**
**सांडीं हें मूर्खपण। उठीं घे धनुष्यबाण। संग्रामीं हें कवण। कारुण्य तुझें॥ १८॥**

**हां गा तूं जाणता। तरी न विचारिसी कां आतां। सांगें झुंजावेळे सदयता। उचित कायी॥ १९॥**
**हे असतिये कीर्तीसी नाशु। आणि पारत्रिकासि अपभ्रंशु। म्हणे जगन्निवासु। अर्जुनातें॥ २०॥**

**अर्थ**—*भगवान् म्हणतात*—अर्जुना! युद्धभूमीवर हे तुझे विचार योग्य आहेत काय? तू कोण व काय करीत आहेस याचा अगोदर विचार कर. ॥ ६ ॥ तुला झाले तरी काय? तुझ्या ठिकाणी कोणता उणेपणा आहे? काय करायचे राहिले? कशाचा तुला खेद होत आहे? सांग बरे॥ ७॥ तू कधी अयोग्य गोष्टीकडे लक्ष देत नाहीस, धैर्य कधी सोडत नाहीस, तुझे नाव घेतले की अपयश दशदिशेच्या पलीकडे जाते म्हणजे कोठे दिसतच नाही. ॥ ८॥ तू शौर्याचे वसतिस्थान आहेस, सर्व क्षत्रियांमध्ये श्रेष्ठ आहेस. तिन्ही लोकात तुझ्या शौर्याचा डंका वाजतो. ॥ ९ ॥ युद्धात तू प्रत्यक्ष शंकराला जिंकलेस, निवातकवच राक्षसाचे कोठे नाव निशाण ठेवले नाहीस. गंधर्वांना देखील पराक्रम करून जिंकलेस॥ १० ॥ तुझ्याशी तुलना करून पाहता त्रैलोक्यही कमीच वाटते. अशा प्रकारचा अर्जुना! तुझा उत्तम पराक्रम आहे. ॥ ११ ॥ आणि तो तू आज या युद्धात शौर्य गाजविण्याचे सोडून खाली मान घालून रडत बसला आहेस!॥ १२ ॥ अर्जुना तू विचार कर, तुझ्या सारख्या शूराला दयावृत्तीने दीन करून सोडावे काय? अंध:काराने सूर्य झाकला जाईल काय? सांग बरें!॥ १३॥ की वायूला मेघाची भीती वाटेल? की अमृताला मरण येईल? लाकडेच अग्नीला गिळतील?॥ १४॥ मीठच पाण्याला विरवून टाकील काय? की दुसऱ्याचा संसर्ग झाल्याबरोबर काळकूटाचा नाश होईल? बेडकी मोठ्या सर्पाला गिळील काय?॥ १५॥ सिंहाबरोबर कोल्हा झोंबी घेईल असे कधी तरी घडेल का? पण आज तू मात्र ह्या गोष्टी खऱ्या करून दाखविल्या॥ १६ ॥ म्हणून अजूनही अर्जुना, ह्या अयोग्य गोष्टीकडे तू लक्ष देशील काय? अरे! लवकर धैर्य धर व सावध हो. ॥ १७॥ हे मूर्खाचे विचार सोड; धनुष्य बाण हाती घे. अरे! युद्धाचे वेळी अशी दयावृत्ती काय कामाची?॥ १८॥ तू आपल्याला शहाणा म्हणवितोस मग विचार कां करीत नाहीस? लढाईच्या वेळी अशी दया दाखविणे योग्य आहे काय, हे तूच सांग. ॥ १९ ॥ युद्धाचे वेळी अशी दया दाखविणे आजपर्यंत मिळविलेल्या कीर्तीला धुळीला मिळविणारे आहे व मेल्यावर परलोकप्राप्तीला बाधक आहे, असे श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाले. ॥ २० ॥

**क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते। क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परन्तप॥ ३॥**

**अर्थ**—असा नपुंसकपणा धरू नकोस. ते तुला शोभत नाही. हे अर्जुना! चित्ताचा दुबळेपणा टाकून देऊन युद्धाला सज्ज हो. ॥ ३ ॥

**म्हणोनि शोकु न करीं। तूं पुरता धीरु धरीं। हे शोच्यता अव्हेरीं। पंडुकुमरा॥ २१॥**
**तुज नव्हे हें उचित। येणें नासेल जोडलें बहुत। तूं अझुनि तरी हित। विचारीं पां॥ २२॥**
**येणें संग्रामाचेनि अवसरें। एथ कृपाळुपण नुपकरे। हे आतांचि काय सोयरे। जाहले तुज॥ २३॥**
**तूं आधींचि काय नेणसी। कीं हे गोत्र नोळखसी। वायांचि काय करिसी। अतिशयो आतां॥ २४॥**
**आजिचें हें झुंज। काय जन्मा नवल तुज। हें परस्परें तुम्हां व्याज। सदाचि आथी॥ २५॥**
**तरी आतां काय जाहलें। कायि स्नेह उपनलें। हें नेणिजे परी कुडें केलें। अर्जुना तुवां॥ २६॥**
**मोह धरिलिया ऐसें होईल। जे असती प्रतिष्ठा जाईल। आणि परलोकही अंतरेल। ऐहिकेंसी॥ २७॥**
**हृदयाचें ढिलेपण। एथ निकयासि नव्हे कारण। हें संग्रामीं पतन जाण। क्षत्रियांसी॥ २८॥**
**ऐसेनि तो कृपावंतु। नानापरी असे शिकवतु। हें ऐकोनि पंडुसुतु। काय बोले॥ २९॥**

**अर्थ**—म्हणून अर्जुना! तू शोक करू नकोस. पूर्ण धैर्य धर. असे हे शोक करणे टाकून दे. ॥ २१ ॥ तुला असा शोक करणे योग्य नाही. आजपर्यंत मिळविलेल्या कीर्तीला ते नाहीसे करणारे आहे. अजून तरी तू आपले हित कशात आहे याचा विचार कर. ॥ २२ ॥ या युद्धाचे वेळी शत्रूची दया करणे हे काही हितकर नाही. अरे! हे कौरव आताच तुझे सोयरे झाले आहेत काय?॥ २३ ॥ तुला हे आपले स्वजन आहेत हे युद्धाचे पूर्वी माहित नव्हते काय? मग आताच काय सोयरेपणाचा बडेजाव करून राहिलास?॥ २४॥ जन्मामध्ये हे आजचे युद्ध नवलाचे वाटावे असे

पहिलेच आहे काय? अरे! तुम्हा परस्परांत युद्धाचे निमित्त नेहमीच उत्पन्न होत आले आहे. ॥ २५ ॥ मग आताच काय त्याचा मोठा बाऊ करीत बसलास? आताच कसा काय तुला त्यांच्याविषयी प्रेमाचा उमाळा आला हे मला समजत नाही. पण अर्जुना! हा जो तू शोक मांडला आहेस हे फार वाईट आहे. ॥ २६ ॥ अशी शत्रुवर दया दाखविली तर असे होईल की तुझी असलेली प्रतिष्ठा नाहीशी होईल व इहलोक व परलोक हे दोन्ही अंतरतील. ॥ २७ ॥ क्षत्रियाने युद्धाचे वेळी शत्रूविषयी कोवळे मन असू देणे हितकर नाही. उलट ते त्याचे पतन करणारे आहे. ॥ २८ ॥ संजय म्हणतो धृतराष्ट्रा! तो कृपाळू भगवान् श्रीकृष्ण नाना प्रकाराने उपदेश करीत असता अर्जुन देवाला म्हणाला. ॥ २९ ॥

*अर्जुन उवाच*

**कथं भीष्ममहं सङ्ख्ये द्रोणं च मधुसूदन। इषुभिः प्रति योत्स्यामि पूजार्हावरिसूदन॥ ४॥**

**अर्थ—**अर्जुन म्हणतो—शत्रूचा निःपात करणाऱ्या कृष्णा, या युद्धामध्ये पूज्य अशा भीष्मद्रोणांवर बाणांचा वर्षाव कसा करू?॥ ४॥

**देवा हें येतुलेवरी। बोलावें नलगे अवधारीं। आधीं तूंचि चित्तीं विचारीं। संग्रामु हा॥ ३०॥**
**हें झुंज नव्हे प्रमादु। एथ प्रवर्तलिया दिसतसे बाधु। हा उघडा लिंगभेदु। वोढवला आम्हां॥ ३१॥**
**देखें मातापितरें अर्चिजती। सर्वस्वें तोष पावविजती। तियें पाठीं केवीं वधिजती। आपुलियां हातीं॥ ३२॥**
**देवा संतवृंद नमस्कारिजे। कां घडे तरी पूजिजे। हें वांचूनि केवीं निंदिजे। स्वयें वाचा॥ ३३॥**
**तैसे गोत्रगुरु आमुचे। हे पूजनीय आम्हां नेमाचें। मज बहुत भीष्मद्रोणांचें। वर्ततसे॥ ३४॥**
**जयांलागीं मनें विरू। आम्ही स्वप्नींही न शकों धरूं। तयां प्रत्यक्ष केवीं करूं। घातु देवा॥ ३५॥**
**वरि जळो हें जियालें। एथ आघवेयांसि हेंचि काय जाहलें। जे यांचां वधीं अभ्यासिलें। मिरविजे आम्हीं॥ ३६॥**
**मी पार्थु द्रोणाचा केला। येणें धनुर्वेदु मज दिधला। तेणें उपकारें काय आभारैला। वधीं तयातें॥ ३७॥**
**जेथोंचिया कृपा लाभिजे वरु। तेथेंचि मनें व्यभिचारु। तरी काय मी भस्मासुरु। अर्जुन म्हणे॥ ३८॥**

**अर्थ—**देवा! हे इतके तुम्हाला म्हणावेच लागत नाही. तुम्हीच पहा आधी तूच या युद्धाचा विचार कर. ॥ ३० ॥ हे मला युद्धच वाटत नाही. ही केवळ जाणूनबुजून आपण चूक करीत आहो. म्हणून या युद्धाला प्रवृत्त होण्यात फार अहित आहे असे मला दिसून येते. या उघड उघड पूज्यांचा अपमान आम्ही आपल्यावर ओढवून घेत आहो. ॥ ३१ ॥ देवा! पहा, आईबापांचे अर्चन करावे व सर्व तऱ्हेने त्यांना संतुष्ट करावे ते सोडून आपल्या हाताने त्यांचा वध कसा करावा?॥ ३२ ॥ त्याप्रमाणे देवा! संतजनांना नमस्कार करावा किंवा आपल्याकडून होत असल्यास त्यांचे पूजन करावे. पण हे सोडून देऊन आपल्या वाणीने त्यांची निंदा कशी करावी?॥ ३३ ॥ त्याप्रमाणे भीष्माचार्य हे आमचे कुलातील श्रेष्ठ पुरुष व द्रोणाचार्य हे आमचे विद्यागुरु आहेत. हे दोघेही आम्हाला नित्य आदरणीय आहेत. या दोघांचाही माझ्या चित्तात तर अत्यंत आदर आहे. ॥ ३४ ॥ ज्याच्याविषयी स्वप्नात देखील मनात वैर उत्पन्न होणे शक्य नाही. त्यांना प्रत्यक्ष जागृतीत मी कसे मारू?॥ ३५ ॥ यापेक्षा आग लागो या माझ्या अशा जगण्याला! येथे सर्वांनाच काय झाले समजत नाही. आम्ही जेवढी विद्या अभ्यासाने संपादन केली त्या विद्येने यांचा वध करूनच आम्ही आपली बहादुरी मिरवायची की काय?॥ ३६ ॥ द्रोणाचार्यांनी मला धनुर्विद्या शिकवून एवढ्या कीर्तीस चढविले, त्यांच्या त्या उपकाराचे अत्यंत ऋण झाले, म्हणून त्यांचा वध करून ते ऋण फेडायचे की काय?॥ ३७ ॥ (शंकरानी भस्मासुराला ज्याच्या डोक्यावर हात ठेवशील तो तात्काळ भस्म होईल असा वर दिला व तो भस्मासुर शंकराच्या डोक्यावरच हात ठेवू पाहत होता) त्याप्रमाणे ज्या द्रोणाचार्यांनी कृपाळू होऊन संपूर्ण धनुर्विद्या शिकविली, त्या धनुर्विद्येचा प्रयोग त्यांच्यावरच करायला, देवा! मी काय भस्मासुर आहे? असे अर्जुन म्हणाला. ॥ ३८ ॥

**गुरूनहत्वा हि महानुभावान् श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके।**
**हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव भुञ्जीय भोगान् रुधिरप्रदिग्धान्॥ ५॥**

**अर्थ—**या महापराक्रमी व पूजनीय गुरुजनांना न मारता भिक्षान्न खाऊन जगणे श्रेयस्कर आहे. कारण

गुरुजनांना मारून त्यांच्या रक्ताने माखलेले अर्थ आणि काम मला भोगावे लागणार॥ ५ ॥

**देवा समुद्र गंभीर आइकिजे। वर तोहि आहाच देखिजे। परी क्षोभु मनीं नेणिजे। द्रोणाचिये॥ ३९ ॥**
**हें अपार जें गगन। वर तयाही होईल मान। परि अगाध भलें गहन। हृदय याचें॥ ४० ॥**
**वरी अमृतही विटे। कीं काळवशें वज्र फुटे। परी मनोधर्मु न लोटे। विकरविला हा॥ ४१ ॥**
**स्नेहालागीं माये। म्हणिपे तें कीरु होये। परी कृपा ते मूर्त आहे। द्रोणीं इये॥ ४२ ॥**
**हा कारुण्याची आदि। सकळ गुणांचा निधि। विद्यासिंधु निरवधि। अर्जुन म्हणे॥ ४३ ॥**
**हा येणें मानें महंतु। वरी आम्हांलागीं कृपावंतु। आतां सांग पां येथ घातु। चिंतूं येईल॥ ४४ ॥**
**ऐसे हे रणीं वधावे। मग आपण राज्यसुख भोगावें। तें मना नये आघवें। जीवितेंसीं॥ ४५ ॥**
**हें येणें मानें दुर्भर। जे याहीहुनि भोग सधर। ते असतु येथवर। भिक्षा मागतां भली॥ ४६ ॥**
**ना तरी देशत्यागें जाइजे। कां गिरिकंदर सेविजे। परी शस्त्र आतां न धरिजे। इयांवरी॥ ४७ ॥**
**देवा नवनिशतीं शरीं। वावरोनी यांचा जिव्हारीं। भोग गिंवसावे रुधिरीं। बुडाले जे॥ ४८ ॥**
**ते काढूनि काय कीजती। लिप्त केवीं सेविजती। मज नये हे उपपत्ति। याचिलागीं॥ ४९ ॥**
**ऐसें अर्जुन तिये अवसरीं। म्हणे श्रीकृष्णा अवधारीं। परि तें मना नयेचि मुरारी। आइकोनियां॥ ५० ॥**
**हें जाणोनि पार्थु बिहाला। मग पुनरपि बोलों लागला। म्हणे देवो कां चित्त या बोला। देतीचि ना॥ ५१ ॥**

**अर्थ**—देवा! समुद्र फार गंभीर असतो असे आपण ऐकतो. त्याचे ते गांभीर्य नावाचेच म्हणता येईल. पण या द्रोणाचार्यांचे चित्त कधी क्षुब्ध होतच नाही. ॥ ३९ ॥ या आकाशाला अफाट म्हणतात पण तेही मर्यादित होईल, पण द्रोणाचार्यांचे हृदय खरोखरच अगाध आहे. ॥ ४० ॥ अमृतही विटेल, काळाने वज्रही फुटेल, पण क्षुब्ध व्हावे म्हणून प्रयत्न केला तरी द्रोणाचार्यांचे चित्तात खळबळ होणार नाही. ॥ ४१ ॥ प्रेम खरे आईचे असे म्हणतात, ते खरे आहे, पण द्रोणाचार्य म्हणजे प्रेमाची साक्षात् मूर्ती आहेत. ॥ ४२ ॥ अर्जुन म्हणतो, द्रोणाचार्य म्हणजे करुणेचे उगमस्थान होय हे सर्व सद्गुणांचा साठा होत हे सर्व विद्यांचे अमर्याद समुद्र आहेत. ॥ ४३ ॥ ते, याप्रमाणे अत्यंत थोर पुरुष असून आमच्यावर त्यांचे अत्यंत प्रेम आहे आता देवा! तुम्हीच सांगा, अशा द्रोणाचार्यांचा घात करावा हे मनात तरी येणे शक्य आहे का?॥ ४४ ॥ अशा सत्पुरुषांना युद्धात मारून मग आपण आनंदाने राज्याचा उपभोग घ्यावा, असे हे जीवित जगणे मला मुळीच बरे वाटत नाही. ॥ ४५ ॥ याप्रमाणे असे राज्यभोग भोगणे मला फार कठीण आहे. एवढेच नाहीतर या राज्यभोगाहून श्रेष्ठ भोग अशा रीतीने जर प्राप्त होतील तर तेही मला नकोत, त्यापेक्षा भिक्षा मागून जगणे मला अधिक बरे वाटते. ॥ ४६ ॥ किंवा हा देश सोडून दुसऱ्या देशात जाणे बरे, किंवा एखाद्या पर्वताचे गुहेत जाऊन राहणे बरे. पण त्यांच्यावर शस्त्रवर्षाव करणे बरे नव्हे. ॥ ४७ ॥ आमच्या तीक्ष्ण परजलेल्या शरांनी यांच्या मर्माचे ठिकाणी राहावे आणि त्या मर्मातून निघणाऱ्या रक्तात बुडालेले हे भोग भोगण्याकरिता बाहेर काढावे. ॥ ४८ ॥ असे रुधिरात बुडालेले भोग काढून काय करायचे? रक्ताने माखलेले ते भोग कसे भोगावे? म्हणूनच देवा! आपले विचार मला पटत नाहीत. ॥ ४९ ॥ संजय म्हणतो, राजा धृतराष्ट्रा! तेव्हा तो अर्जुन याप्रमाणे श्रीकृष्णाला म्हणाला, कृष्णा! माझे बोलण्याकडे लक्ष दे, पण ते श्रीकृष्णाने ऐकिले तरी श्रीकृष्णाला ते मुळीच पटले नाही. ॥ ५० ॥ आपले बोलणे देवाला पटले नाही व देव आपले बोलण्याकडे लक्ष न देता उगे राहिले. ही देवाची उदासीनता पाहून अर्जुनाला भीती वाटली व देवा! माझ्या बोलण्याकडे आपण लक्ष कां देत नाही, असे तो देवाला म्हणू लागला. ॥ ५१ ॥

**गूढार्थदीपिका—हें जाणोनि पार्थ बिहाला।**

आपले हितकर्ते जे असतात ते प्रेमाने सांगोत किंवा रागावून सांगोत, ते त्यांचे सांगणे हिताकडे दृष्टी देऊनच असते. पण हितकर्ता उदासीन राहतो तेव्हा त्याला 'आपल्याला काय करावयाचे' असे वाटत असते. म्हणजे तो हिताकडे दुर्लक्ष करतो. म्हणून हितकर्त्याचा एकदाचा राग बरा, पण उदासीनता कल्याणाची नसते. म्हणून देवाच्या उदासीनवृत्तीची अर्जुनाला भीती वाटली.

**न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः।**
**यानेव हत्वा न जिजीविषाम स्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः॥ ६॥**

**अर्थ**—देवा युद्ध करणे बरे की न करणे बरे, आम्हाला जय येईल किंवा येणार नाही, हे काही आम्हांला समजत नाही परंतु ज्यांना मारून आम्ही जिवंत राहणे शक्य नाही ते कौरव मात्र युद्धाला समोर उभे आहेत.॥ ६॥

**येऱ्हवीं माझा चित्तीं जें होतें। तें मी विचारूनि बोलिलो येथें। परी निकें काय यापरौतें। तें तुम्ही जाणा॥ ५२॥**
**पैं विरु जयांसी ऐकिजे। आणि या बोलींचि प्राणु सांडिजे। ते एथ संग्रामव्याजें। उभे आहाती॥ ५३॥**
**आतां ऐसेयांतें वधावें। कीं अव्हेरूनिया निघावें। या दोहोंमाजीं काय करावें। तें नेणों आम्ही॥ ५४॥**

**अर्थ**—एरव्ही मला जे वाटत होते ते मी आपल्या समोर स्पष्टपणे मांडले आहे. परंतु यात हिताचे काय ते तुम्हाला माहित!॥ ५२॥ पण 'वैर आहे' असे शब्द ज्यांच्याविषयी म्हटल्याबरोबर आपण प्राण सोडला पाहिजे, तेच मात्र येथे युद्धाकरिता सज्ज आहेत.॥ ५३॥ आता युद्धात अशांचा वध करावा की युद्ध टाकून चालते व्हावे? या दोहोत योग्य काय हे काही मला समजत नाही.॥ ५४॥

**कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामि त्वां धर्मसम्मूढचेताः।**
**यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम्॥ ७॥**

**अर्थ**—देवा! स्वजनांच्या मोहाने मी दीन झाल्यामुळे माझा क्षात्रस्वभाव नाहीसा झाला व मला धर्माधर्म कळेनासे झाले आहेत. म्हणून मी तुला विचारतो की यात माझे कल्याणाचे काय हे निश्चित मला सांग मी तुझा शिष्य आहे व मी तुला शरण आलो आहे.॥ ७॥

**आम्हां काय उचित। तें पाहतां न स्फुरे येथ। जे मोहें येणें चित्त। व्याकुळ माझें॥ ५५॥**
**तिमिराविरुद्ध जैसें। दृष्टीचें तेज भ्रंशे। मग पासींच असतां न दिसे। वस्तुजात॥ ५६॥**
**देवा तैसें मज जाहलें। जे मन हें भ्रांती ग्रासिलें। आतां काय हित आपुलें। तेंही नेणें॥ ५७॥**
**तरी श्रीकृष्णा तुवां जाणावें। निकें तें आम्हां सांगावें। जे सखा सर्वस्व आघवें। आम्हांसि तूं॥ ५८॥**
**तूं गुरु बंधु पिता। तूं आमची इष्ट देवता। तूंचि सदा रक्षिता। आपदीं आमुतें॥ ५९॥**
**जैसा शिष्यांतें गुरु। सर्वथा नेणे अव्हेरू। कीं सरितांते सागरू। त्यजी केवीं॥ ६०॥**
**नातरी अपत्यातें माये। सांडूनि जरी जाये। तरी तें कैसेनि जिये। ऐकें कृष्णा॥ ६१॥**
**तैसा सर्वांपरी आम्हांसी। देवा तूंचि एक आहासि। आणि बोलिलें जरी न मानिसी। मागील माझें॥ ६२॥**
**तरी उचित काय आम्हां। जें व्यभिचरेना धर्मा। तें झडकरी पुरुषोत्तमा। सांगें आतां॥ ६३॥**

**अर्थ**—आम्ही काय करणे योग्य आहे हे मला काही सुचत नाही. कारण स्वजनांच्या प्रेमाने माझे चित्त व्याकुळ झाले आहे.॥ ५५॥ तिमिरदोषाने जसे डोळे असून आंधळे होतात व मग जवळची वस्तू देखील दिसत नाही.॥ ५६॥ देवा! त्याप्रमाणे मला झाले, माझे मन भ्रांतिष्ठ झाल्यामुळे आपले हित कशात आहे हे काही मला समजत नाही.॥ ५७॥ तरी श्रीकृष्णा! ही माझी मनःस्थिती जाणून योग्य ते काय हे तू सांग. कारण आम्हाला अगदी आमचे हिताचे सांगणारा तूच एक खरा मित्र आहेस.॥ ५८॥ तूच आमचा गुरु होय तूच आमचा बंधू, पिता आहेस. तूच इष्ट देवता होय. संकटकाळी तूच आमचे संरक्षण करणारा आहेस.॥ ५९॥ ज्याप्रमाणे प्रिय शिष्याला गुरु कधी सोडू इच्छित नाही किंवा समुद्र नदीची कशी उपेक्षा करील?॥ ६०॥ श्रीकृष्णा! ऐक, आई जर आपल्या बाळाची उपेक्षा करील तर ते कसे जिवंत राहील, सांग बरे.॥ ६१॥ त्याप्रमाणे सर्वतोपरी आम्हाला तूच एक आहेस, आणि मागील माझ्या बोलण्याकडे जर लक्ष न देशील॥ ६२॥ तर देवा! 'धर्माला सोडून नाही व आमच्या कल्याणाचे आहे' असे काय आहे ते लवकर सांग॥ ६३॥

**न हि प्रपश्यामि ममापनुद्याद् यच्छोकमुच्छोषणमिन्द्रियाणाम्।**
**अवाप्य भूमावसपत्नमृद्धं राज्यं सुराणामपि चाधिपत्यम्॥ ८॥**

**अर्थ**—या लोकातील शत्रुरहित पृथ्वीचे राज्य किंवा स्वर्गाचे राज्य मला मिळाले तरी त्याने माझ्या इंद्रियांचा शोष करणारा हा स्वजनविषयक शोक तुझ्यावाचून नाहीसा होणार नाही. ॥ ८ ॥

**हें सकळ कुळ देखोनि। जो शोकु उपजलासे मनीं। तो तुझिया वाक्यावांचुनि। न जाय आणिकें॥ ६४॥**
**एथ पृथ्वीतळ आपु होईल। हें महेंद्रपदही पाविजेल। परि मोह हा न फिटेल। मानसींचा॥ ६५॥**
**जैसीं बीजें सर्वथा आहाळलीं। तीं सुक्षेत्रीं जन्ही पेरिलीं। तरी न विरूढती सिंचलीं। आवडे तैसीं॥ ६६॥**
**ना तरी आयुष्य पुरलें आहे। तरी औषधें कांहीं नोहे। एथ एकचि उपेगा जाये। परमामृत॥ ६७॥**
**तैसें राज्यभोगसमृद्धि। उज्जीवन नोहे जीवबुद्धि। एथ जिव्हाळा कृपानिधि। कारुण्य तुझें॥ ६८॥**
**ऐसें अर्जुन तेथ बोलिला। जंव क्षणएक भ्रांती सांडिला। मग पुनरपि व्यापिला। उर्मी तेणें॥ ६९॥**
**कीं मज पाहतां उर्मी नोहे। हे अनारिसें गमत आहे। तो ग्रासिला महामोहें। काळसर्पें॥ ७०॥**
**सवर्म हृदयकल्हारीं। तेथ कारुण्यवेळेच्या भरीं। लागला म्हणोनि लहरी। भांजेचि ना॥ ७१॥**

**अर्थ**—अर्जुन म्हणतो देवा! हे युद्धास तयार झालेले आपलेच कुळातील सर्व स्वजन पाहून मला जो शोक होत आहे तो तुझ्या उपदेशावाचून नाहीसा होणे शक्य नाही. ॥ ६४ ॥ सर्व पृथ्वीचे राज्य प्राप्त झाले किंवा इंद्राचे राज्य जरी मिळाले तरी मनात वाटणारा स्वजनांविषयीचा मोह नाहीसा होणार नाही. ॥ ६५ ॥ ज्याप्रमाणे भाजलेले बीज चांगल्या तयार केलेल्या जमिनीत पेरले व पुरेसे पाणी दिले, तरी उगवणे शक्य नाही. ॥ ६६ ॥ किंवा आयुष्यच संपले असले तर औषधाने मनुष्य वाचू शकत नाही. अशावेळी एका अमृताचाच उपयोग होतो. ॥ ६७ ॥ त्याप्रमाणे केवढ्याही राज्यभोगाची प्राप्ती झाली तरी त्याच्या योगाने बुद्धीला विवेक उत्पन्न होईल अशी आशा नाही. येथे तुला जर करुणा येईल आणि कृपा करून जिव्हाळ्याने उपदेश करशील तरच हे शक्य आहे. ॥ ६८ ॥ अशा रीतीने अर्जुन तेथे थोडा वेळ विवेकपूर्वक जरी बोलला तरी पुन: लागलीच त्याला शोकाची उर्मी आली॥ ६९ ॥ मला तर असे दिसते की ती शोकाची उर्मी नव्हती. ते काही तरी निराळेच होते ते निराळे म्हणजे त्या अर्जुनाला स्वजनांच्या महामोहरूपी काळसर्पाने दंश केला होता. ॥ ७० ॥ आणि मर्मयुक्त अशा अति नाजूक हृदयकमळाचे ठिकाणी ममतारूपी संध्यासमयी त्या मोहसर्पाने दंश केल्यामुळे त्याच्या विषबाधेचे वेग थांबत नव्हते. ॥ ७१ ॥

**गूढार्थदीपिका—सवर्म हृदयकल्हारीं। कारुण्यवेळेच्या भरी।**

इतर स्थानांपेक्षा मर्मस्थानी झालेल्या रोगाची पीडा अधिक असते व कोणत्याही रोगाचा दिवसापेक्षा रात्री जास्त वेग असतो, हा लोकांत अनुभवाने असलेल्या समजुतीचा उल्लेख येथे माउलीने केला आहे.

**हें जाणोनि ऐसी प्रौढी। जो दृष्टिसवें विष फेडी। तो धावया श्रीहरी गारुडी। पातला कीं॥ ७२॥**
**तैसिया पंडुकुमरा व्याकुळा। मिरवतसे श्रीकृष्ण जवळा। तो कृपावशें अवलीळा। रक्षील आतां॥ ७३॥**
**म्हणोनि तो पार्थु। मोहफणिग्रस्तु। म्यां म्हणितला हा हेतु। जाणोनियां॥ ७४॥**
**मग देखा तेथ फाल्गुनु। घेतला असे भ्रांती कवळूनु। जैसा घनपडळीं भानु। आच्छादिजे॥ ७५॥**
**तयापरी तो धनुर्धरु। जाहलासे दुःखें जर्जरु। जैसा ग्रीष्मकाळीं गिरिवरु। वणवला कां॥ ७६॥**
**म्हणोनि सहजें सुनीळु। कृपामृतें सजळु। तो वोळलासे श्रीगोपाळु। महामेघु॥ ७७॥**
**तेथ सुदर्शनांची द्युति। तेचि विद्युल्लता झळकती। गंभीर वाचा ते आयती। गर्जनेची॥ ७८॥**
**आतां तो उदार कैसा वर्षेल। तेणें अर्जुनाचळु निवेल। मग नवी विरूढी फुटेल। उन्मेषाची॥ ७९॥**
**ते कथा आइका। मनाचिया आराणुका। ज्ञानदेवो म्हणे देखा। निवृत्तिदासु॥ ८०॥**

**अर्थ**—असा विशेषप्रसंग पाहून जो दृष्टीमात्रे करून विषाची बाधा नाहीशी करतो तो हाकेसरसा धावून येणारा मांत्रिक श्रीकृष्ण धावून आला. ॥ ७२ ॥ असो, असा तो अर्जुन स्वजनांच्या ममतेने व्याकुळ झाला असता श्रीकृष्ण जवळ होताच. तो आता आपल्या कृपेने अर्जुनाचा शोक सहज घालवील. ॥ ७३ ॥ म्हणूनच हा भावार्थ लक्षात घेऊन मी अर्जुनाला मोहरूपी सर्पराजाने दंश केला होता असे म्हटले. ॥ ७४ ॥ मग तेथे अर्जुन अशा रीतीने अविचाररूप

भ्रांतीने पछाडला असता मेघपटलाने आच्छादिलेल्या सूर्यासारखाच दिसत होता. ॥ ७५ ॥ तसा तो धनुर्धर अर्जुन उन्हाळ्यात पेटलेल्या पर्वताप्रमाणे दुःखाने होरपळून गेला. ॥ ७६ ॥ म्हणून स्वाभाविकच सुंदर नीलवर्ण असलेल्या कृपारूपी अमृतजलाने भरलेला थोर मेघ, भगवान् श्रीकृष्ण, तेथे वळून आला. ॥ ७७ ॥ भगवान् श्रीकृष्णाच्या हिऱ्यासारख्या दंतपंक्तीचे तेज हेच येथे चमकणाऱ्या विजा होत. भगवंताच्या मुखातून आपोआप निघणारी गंभीर वाणीच मेघांचा गडगडाट होय. ॥ ७८ ॥ मेघापेक्षाही कृपावर्षाव करण्यात अत्यंत उदार असलेला भगवान् श्रीकृष्ण आता कसा मुक्त कृपावर्षाव करील, त्या वर्षावाने पेटलेला अर्जुनरूपी पर्वत कसा शांत होईल आणि त्या अर्जुनरूपी पर्वतावर पुन: कसे विवेकज्ञानरूपी नवे अंकुर फुटतील. ॥ ७९ ॥ ही सर्व कथा, श्रीनिवृत्तिदास श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, मनाचे पूर्ण समाधान होईपर्यंत श्रवण करा. ॥ ८० ॥

**गूढार्थदीपिका—शिष्यस्तेऽहं शाधि मां**

**श्लोक ६-७—** व त्यावरील श्रीज्ञानेश्वरमहाराजांची भावार्थदीपिका पाहता असे दिसते की अर्जुन आपला शहाणपणा मिरवीत होता तोपर्यंत भगवान् श्रीकृष्णाचे म्हणणे त्याला पटले नाही. शेवटी भगवान् श्रीकृष्णांनी त्याचे विचार ऐकून 'परी ते मना, न येची मुरारी' त्या विचाराकडे मुळीच लक्ष दिले नाही. हे पाहून अर्जुनाला वाटले की आपण योग्य विचार मांडत असतानाही भगवंताला ते विचार योग्य वाटत नाहीत, तेव्हा आपण चुकत आहो. अर्जुनाने आपल्या शहाणपणाचा अभिमान सोडला व अत्यंत दीन होऊन भगवंताला म्हणाला की, 'देवा! मी अत्यंत मूर्ख आहे. मला माझे आत्यंतिक कल्याण कशात आहे हे समजत नाही. मोहाने माझे मन विवेक करण्यास समर्थ राहिले नाही. मी तुझा दास आहे. आता तूच माझे कल्याण कशात आहे सांग.'

या आत्यंतिक कल्याणाची मीमांसा करण्याकरिताच वेदान्तशास्त्र प्रवृत्त झाले आहे. वेदान्तशास्त्राने केलेली आत्यंतिक कल्याणाची मीमांसा व त्यातील विचार हेच खरोखर बुद्धीचे खरे शहाणपण होय. कारण पूर्वीच्या महानुभावांनी ईश्वराच्या कृपेने प्राप्त झालेल्या अत्यंत शुद्धबुद्धीने व श्रुती, युक्ती, अनुभव या तीन मुख्य प्रमाणांच्या साह्याने ती मीमांसा केली असल्यामुळे, अत्यंत प्रमाण आहे. पण हे खरे ज्ञान ज्यांना नाही असे अज्ञानी लोक आपल्या विपरीत बुद्धीने मानलेले ज्ञानच किंवा शहाणपणच बरोबर आहे असे समजतात. आपल्या अशा विपरीत शहाणपणाचा अभिमान जोपर्यंत असतो तोपर्यंत त्यांना खऱ्या विवेकज्ञानाचा कितीही उपदेश केला तरी शहाणपणाच्या अभिमानाने त्यांच्या बुद्धीचा दरवाजा बंद झालेला असल्यामुळे ते ज्ञान त्याना पटत नाही; म्हणून तोपर्यंत खरे सत्पुरुष त्यांना उपदेश करीत नाहीत. आपल्याला काही समजत नाही असे वाटू लागले व आपल्या जाणीवेचा अभिमान सोडून ते दीन झाले म्हणजे ज्ञानी पुरुष त्यांना उपदेश करतात. भगवान् श्रीकृष्णाने तसेच केले. अर्जुनाने आपण कोण व हे स्वजन कोण, यांचा संबंध काय याचा कधी. विचारच केला नव्हता. त्यामुळे स्वजनांचा, पुढे युद्धांत नाश होणार या कल्पनेने त्याला अत्यंत दुःख होत होते. खरा विचार झाल्यावर हे दुःखच होणे शक्य राहत नाही. अर्जुनाने आपल्या खोट्या समजुतीचे विचार देवासमोर मांडले. देवांनी त्याला मान दिला नाही. तेव्हा तो भ्याला व देवाला शरण गेला. देवांनी पुढे त्याला आत्मानात्मविवेकाचा उपदेश केला.

*सञ्जय उवाच*

**एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परन्तप । न योत्स्य इति गोविन्दमुक्त्वा तूष्णीं बभूव ह ॥ ९ ॥**

**अर्थ—**संजय म्हणतो—हे धृतराष्ट्रा याप्रमाणे अर्जुन भगवंताशी बोलून मी युद्ध करीत नाही असे त्याने श्रीकृष्णाला सांगितले व मौन धरून तो स्वस्थ राहिला. ॥ ९ ॥

**ऐसें संजयो सांगतु। म्हणे राया तो पार्थु। पुनरपि शोकाकुलितु। काय बोले॥ ८१ ॥**
**आइकें सखेदु बोले श्रीकृष्णातें। आतां नाळवावें तुम्हीं मातें। मी सर्वथा न झुंजे येथें। भरंवसेनि॥ ८२ ॥**
**ऐसें येकिहेळां बोलिला। मग मौन धरूनि ठेला। तेथ श्रीकृष्ण विस्मयो पावला। देखोनि तयातें॥ ८३ ॥**

**अर्थ—**संजय धृतराष्ट्राला सांगतो की राजा! पुनः अर्जुन शोकग्रस्त होऊन श्रीकृष्णाला काय म्हणाला ते

ऐक. ॥ ८१ ॥ अत्यंत खिन्न होऊन अर्जुन श्रीकृष्णाला म्हणतो, कृष्णा! माझी आता प्रशंसा करून मनधरणीही करू नकोस. मी खात्रीने येथे युद्ध करणार नाही. ॥ ८२ ॥ इतके एकदा बोलला व अर्जुनाने मौन धरिले त्याला तसे मौन धरलेले पाहून श्रीकृष्णाला आश्चर्य वाटले. ॥ ८३ ॥

**तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत । सेनयोरुभयोर्मध्ये विषीदन्तमिदं वचः ॥ १० ॥**

**अर्थ**—दोन्ही सैन्यांच्या मध्ये अत्यन्त व्याकुळ व खिन्न होऊन बसलेल्या अर्जुनाला पाहून व हासल्यासारखे करून त्याला पुढे भगवान असे वचन बोलले. ॥ १० ॥

**मग आपुलां चित्तीं म्हणे। एथ हें कायी आदरिलें येणें। अर्जुन सर्वथा कांहीं नेणे। काय कीजे ॥ ८४ ॥**
**हा उमजे आतां कवणेपरी। कैसेनि धीरू स्वीकारी। जैसा ग्रहातें पंचाक्षरी। अनुमानी कां ॥ ८५ ॥**
**ना तरी असाध्य देखोनि व्याधि। अमृतासम दिव्य ओषधी। वैद्य सूचि निरवधि। निदानींची ॥ ८६ ॥**
**तैसें विवरीतु असे श्रीअनंतु। तया दोहीं सैन्याआंतु। जयापरी पार्थु। भ्रांति सांडी ॥ ८७ ॥**
**तें कारण मनीं धरिलें। मग सरोष बोलों आदरिलें। जैसें मातेच्या कोपीं थोकलें। स्नेह आथी ॥ ८८ ॥**
**कीं औषधाचिया कडुवटपणीं। जैसी अमृताची पुरवणी। ते आहाच न दिसे परी गुणीं। प्रकट होय ॥ ८९ ॥**
**तैसीं वरिवरि पाहतां उदासें। आंत तरी अतिसुरसें। तियें वाक्यें हृषीकेशें। बोलों आदरिलीं ॥ ९० ॥**

**अर्थ**—तेव्हा भगवान श्रीकृष्ण आपल्या मनात म्हणाले, येथे हे अर्जुनाने काय मांडले आहे समजत नाही. अर्जुनाला काहीच मुळी समजत नाही, काय करावे ! ॥ ८४ ॥ जसा मांत्रिक भूतबाधा कशी नाहीशी होईल याचा विचार करतो, त्याप्रमाणे भगवान श्रीकृष्णही आता अर्जुनाला कसा विवेक उत्पन्न होईल व तो पुन: धैर्य धरून युद्धाला कसा उभा राहील याचा विचार करू लागले. ॥ ८५ ॥ किंवा व्याधी असाध्य आहे असे पाहून वैद्य जसा हटकून गुणकारी शेवटली मात्रा म्हणून अमृतासारख्या दिव्य ओषधाची योजना करितो. ॥ ८६ ॥ त्याप्रमाणे श्रीभगवान तेथे दोन्ही सैन्यांमध्ये असताना युद्ध करून स्वजनाना मारणे हे पातक आहे अशी जी अर्जुनाला भ्रांती झाली होती, ती त्याची भ्रांती कशी नाहिशी होईल याचा विचार करू लागले. ॥ ८७ ॥ मलाही धर्माधर्म समजतात, हा जो अर्जुनाला आपल्या शहाणपणाचा अभिमान होता, तो अर्जुनाला आपले म्हणणे न पटण्याचे कारण होय असे मनात आणून, जशी आई वरवर राग दाखवून, पण अंत:करणात पुत्रप्रेम ठेऊन, आपल्या मुलाला उपदेश करिते, त्याप्रमाणे श्रीकृष्ण भगवंतानेही वरवर राग दाखवून बोलण्याला सुरवात केली. ॥ ८८ ॥ किंवा औषध जितके कडू असते तितका त्यात अमृतासारखा गुण असतो; तो प्रथम दिसत नाही पण रोग निवृत्ती झाल्यावर दिसून येतो. ॥ ८९ ॥ त्याप्रमाणे श्रीकृष्णाने वरवर पाहता उदासीना प्रमाणे, पण आत अर्जुनाविषयीचे प्रेम भरले असल्यामुळे, अर्थाचे दृष्टीने गोड, अशी वाक्ये बोलण्यास सुरुवात केली. ॥ ९० ॥

*श्रीभगवानुवाच*

**अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे । गतासूनगतासूंश्च नानुशोचन्ति पण्डिताः ॥ ११ ॥**

**अर्थ**—भगवान म्हणतात, ज्यांचा शोक करू नये त्यांचा तू शोक करतोस व तूच शहाणपणाचा आव आणून गोष्टी सांगतोस. पण खरे शहाणे आहेत ते मात्र मेलेल्यांचा व आता जीवन्त असलेल्यांचा म्हणजेच पुढे. मरणाऱ्यांचा व दोघांबद्दलही शोक करीत नाहीत. ॥ ११ ॥

**मग अर्जुनातें म्हणितलें। आम्हीं आजि हें नवल देखिलें। जें तुवां एथ आदरिलें। माझारींचि ॥ ९१ ॥**
**तूं जाणता तरी म्हणविसी। परी नेणिवेतें न संडिसी। आणि शिकवूं म्हणों तरी बोलसी। बहुसाल नीति ॥ ९२ ॥**
**जात्यंधा लागे पिसें। मग तें सैरा धांवे जैसें। तुझें शहाणपण तैसें। दिसतसे ॥ ९३ ॥**
**तूं आपणपें तरी नेणसी। परी या कौरवांतें शोचूं पाहासी। हा बहु विस्मय आम्हांसी। पुढतपुढती ॥ ९४ ॥**
**तरी सांग पां मज अर्जुना। तुजपासूनि स्थिति या त्रिभुवना। हे अनादि विश्वरचना। तें लटकें कायी ॥ ९५ ॥**
**एथ समर्थु एक आथी। तयापासूनि भूतें होती। तरी हें वायांचि काय बोलती। जगामाजीं ॥ ९६ ॥**

**हो कां सांप्रत ऐसें जाहलें। जे हे जन्ममृत्यु तुवां सृजिले। आणि नाशु पावे नाशिलें। तुझेनि कायी॥ ९७ ॥**
**तूं भ्रमलेपणें अहंकृती। यांसि घातु न धरिसी चित्तीं। तरी सांगें कायि हे होती। चिरंतन॥ ९८ ॥**
**कीं तूं एक वधिता। आणि सकळ लोकु हा मरता। ऐसी भ्रांति झणें चित्ता। येवों देसी॥ ९९ ॥**
**अनादिसिद्ध हें आघवें। होत जात स्वभावें। तरी तुवां कां शोचावें। सांगें मज॥ १००॥**
**परी मूर्खपणें नेणसी। न चिंतावें तें चिंतिसी। आणि तूंचि नीति सांगसी। आम्हांप्रति॥ १०१॥**
**देखें विवेकी जे होती। ते दोहींतेंही न शोचिती। जे होय जाय हे भ्रांती। म्हणऊनियां॥ १०२॥**

**अर्थ**—मग अर्जुनाला श्रीकृष्ण म्हणाले, अर्जुना! आज युद्धाचे वेळी मध्येच जे तू शोक करणे आरंभिले आहेस ते एक आम्ही आश्चर्य पाहात आहो. ॥ ९१ ॥ अरे! तू आपल्याला मोठा जाणता समजतोस, पण अज्ञान मात्र तू सोडले नाहीस. बरे, तुला ज्ञान सांगावे तर, तूच धर्माच्या बाता मारतोस॥ ९२॥ जन्मांधाला वेड लागले असता तो जसा सैरावैरा धावतो, त्याप्रमाणे आम्हाला तुझे शहाणपण दिसत आहे. ॥ ९३ ॥ तू कोण हेच तुला नीट कळत नाही आणि या कौरवाबद्दल शोक करतोस, याचेच मला वारंवार आश्चर्य वाटते. ॥ ९४॥ पण अर्जुना, सांग बरे! हे सर्व त्रैलोक्य तुझ्यापासून उत्पन्न झाले आहे काय? ही जगाची उभारणी अनादी आहे हे खोटे मानायचे काय?॥ ९५ ॥ सर्व समर्थ एक परमात्मा आहे व त्याचे पासूनच सर्व ब्रह्मांडातील जीवाची उत्पत्ती होते असे जे सर्व लोक समजतात त्यात काही अर्थ नाही असे म्हणायचे काय?॥ ९६ ॥ असे असेल तर मग तूच हे जगामध्ये जन्ममृत्यू उत्पन्न केलेस आणि तू ज्याचा नाश करशील त्याचाच नाश होईल असे म्हणायचे काय?॥ ९७॥ कौरवांचा वध करणारा मी, असा व्यर्थ अभिमान धारण करून कौरवांना मारू इच्छित नाहीस, पण तू त्याना मारले नाहीस म्हणून ते कधी मरणार नाहीत काय?॥ ९८॥ किंवा तू एक मारणारा बाकीचे सर्व कौरव मरणारे असे तू आपले मनात भ्रांतीने समजशील. ॥ ९९॥ पण हे जन्ममृत्यु अनादी आहेत. जन्मला तो मरणार व मेलेला जन्मणार हे स्वभावसिद्ध आहे. मग याचे व्यर्थ कां दु:ख मानावे हे मला सांग बरे!॥ १०० ॥ पण मूर्खपणाने तू हे जाणत नाहीस आणि ज्याबद्दल चिंता करू नये त्याबद्दल चिंता करतोस आणि पुन: आम्हांलाच धर्म सांगतोस. ॥ १०१ ॥ अर्जुना! लक्षात ठेव. जे विवेकी पुरुष असतात, ते उत्पत्ती किंवा जन्म आणि नाश किंवा मरण हे दोन्ही भ्रांतीने भासतात म्हणून वस्तुत: उत्पत्तिनाश नाहीच, असे जाणून शोक करीत नाहीत. ॥ १०२ ॥

**गूढार्थदीपिका—**

मनुष्याला मी कोण हे पूर्णपणे कळून आल्याखेरीज जगाचे खरे स्वरूप काय हे कळत नाही. तोपर्यंत जगत सत्य आहे, आपण जे करू ते होईल, असे वाटत असते. एक सर्वज्ञ सर्वशक्तिमान परमात्मा जगाचा नियंता असून तो जीवाच्या कर्माप्रमाणे यशापयश, सुख-दु:खे, जन्म-मृत्यू जीवाकडून भोगवितो, हे सर्व सात्विकबुद्धीला पटणारे व संत-महंतांच्या अनुभवाचे विचार त्याच्या बुद्धीला पटत नाहीत. आणि आपल्या रजोगुणी तमोगुणी बुद्धीचे विपरीत विचार प्रगट करतो व त्याचीच सुविचार किंवा योग्यविचार अथवा बौद्धिक विचार म्हणून घमेंड मारतो. हेच भगवंतानी अर्जुनाचे विचार ऐकून सांगितले आहे.

**न त्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपा:। न चैव न भविष्याम: सर्वे वयमत: परम्॥ १२॥**

**अर्थ**—मी, तू व हे सर्व लोक व राजे हे सर्व पूर्वी नव्हते असे नाही. आता पुढे राहणार नाहीत असेही नाही हे सर्व आत्मस्वरूप दृष्टीने तीन्ही काली नित्यच आहेत. ॥ १२ ॥

**अर्जुना सांगेन आइक। एथ आम्ही तुम्ही देख। आणि हे भूपति अशेख। आदिकरुनी॥ १०३॥**
**नित्यता ऐसेचि असोनी। ना तरी निश्चित क्षया जाउनी। हे भ्रांति वेगळी करूनी। दोन्ही नाहीं॥ १०४॥**
**हें उपजे आणि नाशे। तें मायावशें दिसे। येऱ्हवीं तत्त्वता वस्तु जे असे। ते अविनाशचि॥ १०५॥**
**जैसें पवनें तोय हालविलें। आणि तरंगाकार जाहलें। तरी कवण कें जन्मलें। म्हणो ये तेथ॥ १०६॥**
**तेंचि वायूचें स्फुरण ठेलें। आणि उदक सहज सपाट जाहालें। तरी आतां काय निमालें। विचारीं पां॥ १०७॥**

**अर्थ**—अर्जुना! मी सांगतो ते ऐक. येथे आम्ही व तुम्ही, तसेच हे जमलेले सर्व राजे वगैरे. ॥ १०३ ॥ नित्य असेच असू असे नाही किंवा निश्चित क्षय पावू असेही नाही. असणे व जाणे ह्या दोन्ही भ्रांती आहेत. असणे, नसणे हे दोन्ही आपले ठिकाणी नाहीत. ॥ १०४ ॥ उत्पत्ति, नाश हे दोन्ही भ्रांतीने भासतात. वस्तुत: पाहिले असता जी मूळ वस्तू ती अविनाशी म्हणजे उत्पत्तिविनाशरहित आहे. ॥ १०५( ज्याप्रमाणे वाऱ्याने पाणी हालले असता ते पाणी तरंगाकार होते. तेव्हा येथे कोण जन्माला आले म्हणता येईल? ॥ १०६ ॥ आणि वारा वाहणे बंद झाले असता पाणी पुन: पूर्ववत सपाट होऊन जाते, तेव्हा कशाचा नाश म्हणता येईल याचा विचार कर. ॥ १०७ ॥

**गूढार्थदीपिका—हें उपजे आणि नाशे। ते मायावशे दिसे।**

ज्याप्रमाणे पाणी हीच एक वस्तू आहे व तरंग हा त्या पाणीवस्तूचे स्फुरण आहे, म्हणून तरंग ही पाणीच आहे. पाणी या वस्तूहून तरंग ही वस्तू निराळी नव्हे तरंग उठण्यापूर्वी पाणीच वस्तू आहे. तरंग उठल्यावरही तरंगात पाणी हीच वस्तू असते. तरंग नाहीसा झाल्यानंतर उर्वरित पाणीच वस्तू राहते. म्हणून तिन्हीकाळी असणाऱ्या पाणीवस्तूचे ठिकाणी उत्पत्तिनाश नाही. आणि तरंग ही पाण्याहून निराळी वस्तू सिद्ध होत नसल्यामुळे तरंगाचे ठिकाणी उत्पत्तिनाश मानता येत नाही सारांश, उत्पत्तिनाशाचे ज्ञान भ्रांती ठरते. त्याप्रमाणे देहाचे आत मुक्त असलेली चैतन्यात्मक वस्तू, ती देहादिक उपाधिहून अत्यंत निराळी आहे. म्हणून देहादिकांचे ठिकाणी दिसून येणारे उत्पत्तिनाश त्या आत्मवस्तूचे ठिकाणी मुळीच नाहीत. पण जीव हा आपले देहाहून निराळे असलेले चैतन्यात्मस्वरूप विसरून देहालाच मी म्हणतो व देहादिकांचे उत्पत्तिनाश माझे ठिकाणीच आहेत असे समजतो. वास्तविक चैतन्यात्मा सर्वकाळी असणारा आहे, म्हणून तो उत्पन्न होत नाही व नाशही पावत नाही. आणि तो अद्वैतस्वरूप असल्यामुळे—म्हणजे त्याच्यावाचून दुसरी कोणती खरी किंवा खोटी वस्तूच नसल्यामुळे—देहादी वस्तूची व त्यांच्या उत्पत्तिनाशाची जाणीव ही भ्रांतीच ठरते.

**देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा। तथा देहान्तरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति॥ १३॥**

**अर्थ**—जीवात्म्याचे ठिकाणी दिसणारा हा देह जसा बाल्य, तारुण्य व वार्धक्य या अवस्थेतून जातो, त्याप्रमाणे जीवात्माही एका देहातून दुसऱ्या देहात जातो, देहाबरोवर, नाश पावत नाही, हे जाणून देह पडल्याचे दु:ख करीत नाहीत. ॥ १३ ॥

**आइकें शरीर तरी एक। परी वयसा भेदे अनेक। हें प्रत्यक्षचि देख। प्रमाण तूं॥ १०८॥**
**एथ कौमारत्व दिसे। मग तारुण्यीं तें भ्रंशे। परी देहचि न नाशे। एकेकासवें॥ १०९॥**
**तैसीं चैतन्याचां ठायीं। इयें शरीरांतरें होती जाती पाहीं। ऐसें जाणे तया नाहीं। व्यामोहदु:ख॥ ११०॥**

**अर्थ**—पहा, अर्जुना! आपले शरीर एकच असते पण वयाच्या भेदाने तेही निरनिराळे वाटते. हे प्रत्यक्षच आपण पाहतो. ॥ १०८ ॥ पहिले बाळपण असते. ते बाळपण तारुण्य दशेत नाहीसे होते. पण या एका एका दशेबरोबर देह काही नाहीसा होत नाही. ॥ १०९ ॥ त्याप्रमाणे चैतन्याचे सत्तेवर हे नानाप्रकारचे देह होतात व जातात, असे ज्याला ज्ञान झाले त्याला असा संसाराचा मोह होत नाही व त्यामुळे त्या मायामोहामुळे होणारे दु:खही होत नाही. ॥ ११० ॥

**गूढार्थदीपिका—चैतन्याच्या ठायीं। इये शरीरांतरे होती जाती।**

याठिकाणी माऊलीनी शंकराचार्यांप्रमाणे विवर्तवादच मानला आहे. ब्रह्मसत्तेवर नामरूपांचा भास हेच जग होय असा अर्थ. म्हणजे परब्रह्माची अद्वितीय व्यापक सत्ता विसरून परब्रह्मावर भासणाऱ्या नामरूपाला ब्रह्माहून निराळी सत्ता मानली की, परब्रह्मावर नामरूपांचा पसाराच जगद्रूप भासू लागतो. किंवा नामरूपाने व्यक्त किंवा इंद्रियगोचर होणाऱ्या परब्रह्मालाच, परब्रह्म विसरून जीव जग म्हणतो.

**मात्रास्पर्शास्तु कौन्तेय शीतोष्णसुखदु:खदा:। आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत॥ १४॥**

**अर्थ**—इंद्रियांचे विषयाशी जे संयोग होतात ते शीतोष्णद्वारा सुखदु:खादी देणारे असून, प्राप्त होणारे व नाहीसे होणारे आहेत; म्हणून अर्जुना हे सहन केलेच पाहिजे. ॥ १४ ॥

**एथ नेणावया हेंचि कारण। जें इंद्रियां आधीनपण। तिंहीं आकळिजे अंत:करण। म्हणऊनि भ्रमे॥ १११॥**

**इंद्रियें विषय सेविती। तेथ हर्ष शोकु उपजती। ते अंतर आप्लविति। संगें येणें॥ ११२॥**
**जयां विषयांच्या ठायीं। एकनिष्ठता कहीं नाहीं। तेथ दुःख आणि कांहीं। सुखही दिसे॥ ११३॥**
**देखें हे शब्दाची व्याप्ति। निंदा आणि स्तुति। तेथ द्वेषाद्वेष उपजती। श्रवणद्वारें॥ ११४॥**
**मृदु आणि कठीण। हे स्पर्शाचे दोन्ही गुण। जे वपूचेनि संगें कारण। संतोषखेदां॥ ११५॥**
**भ्यासुर आणि सुरेख। हें रूपाचें स्वरूप देख। जें उपजवी सुखदुःख। नेत्रद्वारें॥ ११६॥**
**सुगंधु आणि दुर्गंधु। हा परिमळाचा भेदु। जो घ्राणसंगें विषादु। तोषु देता॥ ११७॥**
**तैसाचि द्विविध रसु। उपजवी प्रीतित्रासु। म्हणूनि हा अपभ्रंशु। विषयसंगु॥ ११८॥**
**देखें इंद्रियांआधीन होईजे। तैं शीतोष्णांतें पाविजे। आणि सुखदुःखीं आकळिजे। आपणपें॥ ११९॥**
**या विषयांवांचूनि कांहीं। आणीक सर्वथा रम्य नाहीं। ऐसा स्वभावोचि पाहीं। इंद्रियांचा॥ १२०॥**
**हे विषय तरी कैसे। रोहिणीचें जळ जैसें। कां स्वप्नींचा आभासे। भद्रजाति॥ १२१॥**
**देखें अनित्य तियापरी। म्हणउनि तूं अव्हेरीं। हा सर्वथा संगु न धरीं। धनुर्धरा॥ १२२॥**

**अर्थ**—हे तत्व न जाणले जाण्याचे कारण हे आहे की, आपले अंतःकरण सर्वस्वी इंद्रियांचे स्वाधीन होऊन गेले आहे म्हणून हा भ्रम होतो. ॥ १११ ॥ इंद्रिये आपापले विषय सेवन करतात तेव्हां इंद्रियांना कोठे सुख होते, त[illegible] कोठे दुःख होते आणि अंतःकरण इंद्रियाधीन असल्यामुळे इंद्रियांच्या संगाने अंतःकरणही सुखदुःखाने ग्रासिले जाते. ॥ ११२ ॥ या विषयांचे ठिकाणी एक सुखच मिळेल किंवा दुःखच मिळेल अशी एकनिष्ठ स्थिती नाही. केव्ह[illegible] सुख होते तर केव्हा दुःख होते. ॥ ११३ ॥ शब्दविषयाचे दोन भेद. शब्द निंदात्मक राहील किंवा स्तुतिबोधक त[illegible] राहील. तो शब्द ऐकल्याबरोबर द्वेष किंवा प्रेम उत्पन्न होते. ॥ ११४ ॥ स्पर्शविषयाचे मृदुत्व व कठिणत्व हे दोन गु[illegible] आहेत. ते शरीराचे द्वारा अंतःकरणात संतोष किंवा खेद उत्पन्न करतात. ॥ ११५ ॥ भयंकर आणि सुरेख असा दो[illegible] प्रकारचा रूपविषय आहे. तो नेत्रेंद्रियाचे द्वारा सुखदुःख भोगवितो. ॥ ११६ ॥ सुगंध व दुर्गंध असा दोन प्रकारच[illegible] परिमळ (गंध) आहे. तो घ्राणेंद्रियाचे द्वारा संतोष व विषाद उत्पन्न करतो. ॥ ११७ ॥ त्याचप्रमाणे गोड व कडू अ[illegible] दोन प्रकारचा रसविषय, प्रीती व कंटाळा उत्पन्न करतो. म्हणून विषयाचा संग आपल्याला आपल्या स्वरूपाचा विस[illegible] पाडणारा आहे. ॥ ११८ ॥ अर्जुना! पहा, अशा रीतीने जेव्हा आपण इंद्रियांच्या स्वाधीन होतो तेव्हा शीत व उ[illegible] इत्यादी द्वंद्वांचा अनुभव घेतो आणि त्यामुळे आपण सुखदुःख भोगतो. ॥ ११९ ॥ या विषयासारखे आपल्याला सु[illegible] देणारे या जगात काहीच नाही असे भासविणे हा या इंद्रियांचा स्वभावच आहे. ॥ १२० ॥ पण हे विषय तरी क[illegible] आहेत पहा, या विषयांना मृगजळापेक्षा अधिक सत्यता नाही. किंवा स्वप्नातला हत्ती जितका सत्य आहे तितके[illegible] हे विषय सत्य आहेत. ॥ १२१ ॥ अशा रीतीने हे विषय क्षणभर टिकणारे आहेत म्हणून त्यांचा त्याग कर व पु[illegible] संग धरू नकोस. ॥। १२२ ॥

**गूढार्थदीपिका—**

विषय म्हणजे जग, हे अनित्य आहे म्हणजे काल्पनिक आहे असा अर्थ. म्हणून ब्रह्मज्ञान होऊन जग मिथ्[illegible] आहे, हे ज्ञान दृढ होईपर्यंत प्रारब्धानुसार होणाऱ्या विषयसंगापासून होणारे सुखदुःख सहन केले पाहिजे, याला[illegible] तितिक्षा म्हणतात.

**यं हि न व्यथयन्त्येते पुरुषं पुरुषर्षभ। समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते॥ १५॥**

**अर्थ**—हे नरश्रेष्ठा अर्जुना! हा विषयाचा संयोग ज्याच्या चित्ताला दुःख देत नसेल व जो पुरुष सात्विक धैर्या[illegible] सुखदुःख सारखेच मानून राहतो, तो अविनाशी ब्रह्माला प्राप्त होतो. ॥ १५ ॥

**हे विषय जयातें नाकळिती। तया सुखदुःखें दोनी न पवती। आणि गर्भवास संगती। नाहीं तया॥ १२३॥**
**तो नित्यरूपु पार्था। वोळखावा सर्वथा। जो या इंद्रियार्थां। नागवेचि॥ १२४॥**

**अर्थ**—ज्याला विषयसुखात गोडी वाटत नाही त्याला विषयसंगापासून सुखदुःख होत नाहीत आणि त्याच[illegible]

जन्ममरणपरंपराही संपते. ॥ १२३ ॥ जो पुरुष या विषयाला भाळत नाही, तो नित्य अविनाशी स्वरूप होतो म्हणजे ब्रह्मस्वरूप होतो असे समज. ॥ १२४ ॥

**गूढार्थदीपिका—**

या विषयसुखाच्या वासनेनेच मनुष्याला जन्म घ्यावा लागतो व ब्रह्मज्ञान स्थिर होत नाही. ज्याचे चित्त निर्वासन झाले, त्यालाच मुक्त म्हणतात. ब्रह्मज्ञान होणे सोपे आहे, पण विषयवासना नाहीशी होणेच कठिण आहे, म्हणून मुक्ती दुर्लभ झाली आहे.

**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः। उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥ १६ ॥**

**अर्थ—**असत् म्हणजे खोट्या वस्तूचे मुळीच अस्तित्व नसते व सत्य वस्तूचे अस्तित्व नाहीसे होत नाही. असा खऱ्या खोट्या या दोन वस्तूविषयी ज्ञानी पुरुषांनी निष्कर्ष काढला आहे. ॥ १६ ॥

**आतां अर्जुना आणिक कांहीं एक। सांगेन मी आइक। जें विचारें पर लोक। वोळखिती ॥ १२५ ॥**
**या उपाधिमाजीं गुप्त। चैतन्य असे सर्वगत। तें तत्त्वज्ञ संत। स्वीकारिती ॥ १२६ ॥**
**सलिलीं पय जैसें। एक होऊनि मीनलें असे। परी निवडूनि राजहंसें। वेगळें कीजे ॥ १२७ ॥**
**कीं अग्निमुखें किडाळ। तोडोनियां चोखाळ। निवडिती केवळ। बुद्धिमंत ॥ १२८ ॥**
**ना तरी जाणिवेचिया आयणी। करितां दधिकडसणी। मग नवनीत निर्वाणीं। दिसे जैसें ॥ १२९ ॥**
**कीं भूस बीज एकवट। उपणितां राहे घनवट। तेथ उडे तें फलकट। जाणों आलें ॥ १३० ॥**
**तैसें विचारितां निरसलें। तें प्रपंचु सहजें सांडवलें। मग तत्त्वता तत्त्व उरलें। ज्ञानियांसी ॥ १३१ ॥**
**म्हणोनि अनित्याच्या ठायीं। तयां आस्तिक्यबुद्धि नाहीं। निष्कर्षु दोहींही। देखिला असे ॥ १३२ ॥**

**अर्थ—**अर्जुना आणखी एक गोष्ट सांगतो ती लक्षात ठेव. ही गोष्ट विचारी लोक जे आहेत त्यांनाच माहित असते. ॥ १२५ ॥ या नामरूपात्मक जगामध्ये एक चैतन्यवस्तू व्यापून आहे. पण ती गुप्त आहे. म्हणजे नामरूपाने झाकली गेल्यामुळे दिसत नाही. तत्त्वज्ञ पुरुष जे आहेत ते अखंड त्याकडेच दृष्टी देतात. ॥ १२६ ॥ पाण्यात दूध मिसळले असता जसे ते पाण्याशी मिळून राहते. पण हंसाला मात्र ते पाण्यातील दूध, पाणी टाकून देऊन निराळे वेचून घेता येते. ॥ १२७ ॥ किंवा बुद्धिमान लोक, अग्नीत तापवून तापवून सोन्यातील हीणकस नाहीसे करून शुद्ध सोने अलग करून घेतात. ॥ १२८ ॥ किंवा बुद्धीच्या साह्याने, दह्याचे घुसळण केले असता ज्याप्रमाणे लोणी बाहेर पडते. ॥ १२९ ॥ अथवा कोंडा व धान्य एकवटलेले असते पण तेच पाखडले असता, खाली साचते ते धान्य व उडून गेले तो भुसा, असे आपल्याला कळून येते. ॥ १३० ॥ त्याप्रमाणे विचार केला असता, प्रपंच म्हणून कोण्या वस्तूचे अस्तित्व सिद्ध होत नाही व त्याचे ज्ञानच होत नाही. मग प्रपंचाचा निरास होऊन शेष चैतन्यवस्तू हीच शिल्लक राहते व ज्ञानी पुरुष तीच घेतात. ॥ १३१ ॥ म्हणून अनित्य भासणारी वस्तू अस्तित्वात आहे असे त्यांना कधीच वाटत नाही, असा ज्ञानी पुरुषांनी नित्य आणि अनित्य वस्तूचा निर्णय केला आहे. ॥ १३२ ॥

**गूढार्थदीपिका—उपाधि माजी गुप्त। चैतन्य असे सर्वगत।**

या ठिकाणी माऊलीने नामरूपाला उपाधी म्हटले आहे. मूळच्या वस्तूला झाकून भलतीच वस्तू भासविणाऱ्या पदार्थाला उपाधी म्हणतात. नामरूपाला नामरूपाचे खाली गुप्त असलेल्या चैतन्याहून स्वतंत्र निराळे अस्तित्व दिले असता, नामरूपाने चैतन्यवस्तू झाकली जाऊन, नामरूप हीच प्रपंचरूप स्वतंत्र निराळी वस्तू मानली जाते व तेव्हा नामरूपे चैतन्याच्या उपाधी होतात. सर्व अज्ञानी पुरुष नामरूपाला स्वतंत्र अस्तित्व व वस्तुत्व मानतात. म्हणून अशा अज्ञानी लोकांना ब्रह्माचा बोध करून देण्याकरिता नामरूपांना दूर करून चैतन्य ओळखण्यास वेदान्तात प्रथम सांगितले जाते, तसेच भगवंतांनी अर्जुनाला येथे सांगितले आहे.

नित्य वस्तू म्हणजे जिचा कधी नाश होत नाही किंवा नाश मानता येत नाही, ती होय. ही नित्य वस्तू एक व अमर्यादच राहू शकते. दोन नित्य वस्तू राहणे अशक्य आहे. दोन नित्य वस्तू मानायच्या तर त्यांचे परस्पर स्वतंत्र

निरनिराळे अस्तित्व मानले पाहिजे आणि असे अस्तित्व मानण्यात त्या दोन्ही वस्तूचे अस्तित्व मर्यादित होते व त्या अंतवान किंवा नाशिवंत ठरतात. नाशिवंत ठरल्यावर वस्तूला नित्य कसे, म्हणावयाचे? म्हणून नित्यवस्तू एक व अमर्यादच असली पाहिजे. विचाराने चैतन्य हीच एक वस्तू नित्य ठरते व अमर्यादही ठरते.

अशा नित्य व अमर्याद चैतन्यवस्तूची मर्यादा संपतच नसल्यामुळे तिच्याबरोबर भासणारी अनित्यवस्तू स्वतंत्र अस्तित्वाची मानता येत नाही. त्या अनित्यवस्तूचा भास नित्यवस्तूच्या अस्तित्वावरच स्वीकारावा लागतो. म्हणजे त्याचा अर्थ असा होतो की नित्यवस्तूचीच आपण अनित्यवस्तुरूपाने कल्पना करतो. एरवी अनित्यवस्तू म्हणून काहीही वस्तू मुळीच अस्तित्वात नाही. म्हणूनच वेदान्तविचाराने अनित्य ठरणारा हा प्रपंच मुळीच अस्तित्वात नसून, आहे अशी त्याविषयी आपण कल्पना करतो व कल्पनेनुसार तो भासतो. चैतन्यरूप आत्म्याचा विचार करीत नाही तोपर्यंत अस्तित्वाविषयीची आपली कल्पना नाहीशी होत नाही, म्हणून तोपर्यंत प्रपंचाचा भासही नाहीसा होत नाही. अनित्यवस्तू म्हणजे कल्पित वस्तू. कल्पित वस्तूच अनित्य राहू शकते. किंवा जो जो पदार्थ अनित्य आहे, तो तो पदार्थ कल्पित आहे असे समीकरण मांडता येते. कल्पित व नित्य अशा दोनच सत्ता राहू शकतात. चैतन्यरूप आत्म्याची सत्ता नित्य असल्यामुळे तद्व्यतिरिक्त जगाची सत्ता अनित्य किंवा कल्पित ठरते. म्हणजे अज्ञान्याला जग सत्य आहे असे वाटत असले तरी, जग मुळीच नाही असा सिद्धान्त निघतो.

**अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम्। विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति॥ १७॥**

**अर्थ**—चैतन्यरूप आत्मतत्व सर्व जगात भरले असून ते सर्वांचे अविनाशी आत्मस्वरूप असल्यामुळे त्याचा नाश कोणी करू शकत नाही. ॥ १७ ॥

**देखें सारासार विचारितां। भ्रांति ते पाहीं असारता। तरी सार तें स्वभावता। नित्य जाणें॥ १३३॥**
**हा लोकत्रयाकारु। तो जयाचा विस्तारु। तेथ नाम वर्ण आकारु। चिन्ह नाहीं॥ १३४॥**
**जो सर्वदा सर्वगतु। जन्मक्षयातीतु। तया केलियाहि घातु। कदा नोहे॥ १३५॥**

**अर्थ**—अर्जुना पहा, सार काय व असार काय याचा विचार केला असता, अविचाराने किंवा कल्पनेमुळे जे भासते ते असार असते व जे कल्पनेपूर्वीच असते म्हणून नित्य असते ते सार म्हटले जाते. ॥ १३३ ॥ हे सर्व त्रैलोक्य त्या नित्य वस्तूचा खरोखर विस्तार होय. त्या वस्तूचे ठिकाणी नाम, वर्ण, आकार यापैकी काही एक त्याला जाणता येईल असे चिन्ह नाही. ॥ १३४ ॥ जो आत्मा सर्वदा राहणारा आहे, सर्व व्यापक आहे, ज्याला उत्पत्तिनाश नाहीत, म्हणून त्याचा नाश कधीच होऊ शकत नाही. ॥ १३५ ॥

**अन्तवन्त इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः। अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत॥ १८॥**
**य एनं वेत्ति हन्तारं यश्चैनं मन्यते हतम्। उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते॥ १९॥**

**अर्थ**—अविनाशी अशा जीवात्म्याचे हे देह नाशिवंत आहेत व तो (आत्मा) प्रमाणाने न कळणारा व अविनाशी आहे, म्हणून तू युद्ध कर. ॥ १८ ॥ जो पुरुष या चैतन्यरूप आत्म्याला मारणारा किंवा मरणारा समजतो ते दोघेही त्याच्या खऱ्या स्वरूपाला जाणत नाहीत कारण तो मारत नाही किंवा मरतही नाही. ॥ १९ ॥

**आणि शरीरजात आघवें। हें नाशवंत स्वभावें। म्हणोनि तुवां झुंजावें। पंडुकुमरा॥ १३६॥**
**तूं धरूनि देहाभिमानातें। दिठी सूनि या शरीरातें। मी मारिता हे मरते। म्हणत आहासी॥ १३७॥**
**तरी अर्जुना तूं हें नेणसी। जरी तत्त्वता विचारिसी। तरी वधिता तूं नव्हेसी। हे वध्य नव्हती॥ १३८॥**

**अर्थ**—आणि सर्व प्रकारची जीवशरीरे स्वभावतः नाशिवंत आहेत. म्हणूनच अर्जुना! युद्ध करणे हा स्वधर्म सोडू नको, युद्ध कर. ॥ १३६ ॥ शरीराचा तू अभिमान धरून किंवा मी म्हणजे शरीर असे समजून मी मारणारा व हे मरणारे असे तू म्हणत आहेस. ॥ १३७ ॥ पण अर्जुना! मी म्हणजे कोण याचा तात्त्विक विचार करून पाहता तू मारणारा ठरत नाहीस व ते मरणारे ठरत नाहीत हे मात्र तू जाणत नाहीस. ॥ १३८ ॥

**गूढार्थदीपिका—हे नाशवंत स्वभावे**

मरणे किंवा मारणे ही क्रिया आहे. एक मारणारा व त्याचेहून दुसरा मरणारा असे दोन निरनिराळे पदार्थ जेथे असतात, तेथेच ही मरण्याची—मारण्याची किंवा कोणतीही क्रिया संभवते. आत्मस्वरूपाचा विचार केला असता तो नित्य व अमर्याद असल्यामुळे त्याच्या ठिकाणी त्यावाचून दुसरा पदार्थ संभवत नाही. म्हणूनच मागे नामरूपात्मक जगत् असत् म्हणजे मुळीच अस्तित्वात नाही असे भगवंतानी सांगून एक चैतन्यरूप आत्माच सत्य असून, तद्व्यतिरिक्त सर्व मिथ्या आहे असे सांगितले आहे. अशा अद्वैत अमर्याद आत्मस्वरूपाच्या ठिकाणी दुसरा कोणीच नसल्यामुळे कोणतीच क्रिया संभवत नाही. चैतन्यरूप आत्मा सर्व कर्म व कर्तृत्वाहून निराळा आहे असा भाव.

**न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः।**
**अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे॥ २०॥**
**वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम्। कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हन्ति कम्॥ २१॥**
**वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि।**
**तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही॥ २२॥**

अर्थ—चैतन्यरूप आत्मा उत्पन्न होत नाही व कधीही मरत नाही; कारण तो अस्तित्वात येऊन पुनः नाहीसा होतो व पुनः जन्मतो असे नाही. जो जन्मरहित, अविनाशी, शाश्वत, सनातन असल्यामुळे शरीराचा नाश झाला म्हणून त्याचा नाश होत नाही. ॥ २० ॥ जो पुरुष चैतन्यरूप आत्म्याला अविनाशी, नित्य, जन्मरहित, कधीही न परिणाम न पावणारा असे जाणतो तो पुरुष (आत्मस्वरूपच होत असल्यामुळे) कोणास कसा मारील? ॥ २१ ॥ देहाचा अहंकार धरणारा जीवात्मा, ज्याप्रमाणे जुनी वस्त्रे टाकून देहावर नवी वस्त्रे धारण करतो, त्याप्रमाणे तोच जीवात्मा जुनी शरीरे टाकून नवीन शरीरे धारण करतो. ॥ २२ ॥

**जैसें स्वप्नामाजीं देखिजे। तें स्वप्नींचि साच आपजे। मग चेऊनियां पाहिजे। तवं कांहीं नाहीं॥ १३९॥**
**तैसी हे जाण माया। तूं भ्रमत आहासी वायां। शस्त्रें हाणितलिया छाया। जैसी आंगीं न रुपे॥ १४०॥**
**कां पूर्ण कुंभ उलंडला। तेथ बिंबाकारु दिसे भ्रंशला। परी भानु नाहीं नासला। तयासवें॥ १४१॥**
**ना तरी मठीं आकाश जैसें। मठाकृती अवतरलें असे। तो भंगलिया आपैसें। स्वरूपचि॥ १४२॥**
**तैसें शरीराचां लोपीं। सर्वथा नाशु नाहीं स्वरूपीं। म्हणऊनि तूं हें नारोपीं। भ्रांति बापा॥ १४३॥**
**जैसें जीर्ण वस्त्र सांडिजे। मग नूतन वेढिजे। तैसें देहांतरातें स्वीकारिजे। चैतन्यनाथें॥ १४४॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे स्वप्नात दिसणारा देखावा, स्वप्न आहे तोपर्यंत खरा वाटतो मग जाग आल्यावर ते काही एक खरे वाटत नाही. ॥ १३९ ॥ त्याप्रमाणे जागृतीतला हा जगत्पसारा तसाच, अर्जुना! खोटा आहे असे समज. तू व्यर्थच भ्रमाने त्याला खरे समजतोस. ज्याप्रमाणे शस्त्राने छायेवर वार केल्यास त्या छायेस काही तो प्रहार लागत नाही किंवा तो शस्त्राचा घाव आपल्या अंगाला लागत नाही. ॥ १४० ॥ ज्याप्रमाणे पाण्याने भरलेला घडा पालथा झाला असता त्यात पडलेले सूर्याचे प्रतिबिंब नाहीसे होते तरी, प्रतिबिंबाबरोबर बिंबरूप सूर्य नाहीसा होत नाही. ॥ १४१ ॥ किंवा घड्यात भरून असलेली पोकळी घड्याच्या आकाराची दिसते, पण घडा फुटला तरी ती पोकळी व बाहेरचे आकाश एकच राहते. ॥ १४२ ॥ त्याप्रमाणे शरीर नाहीसे झाले तरी देहातील चैतन्य नाहीसे होत नाही. म्हणून अर्जुना! उत्पत्तिनाशाची किंवा जन्म-मृत्यूची खोटी भ्रान्त कल्पना चैतन्याचे ठिकाणी मानू नकोस. ॥ १४३ ॥ ज्याप्रमाणे फाटकी जीर्ण झालेली वस्त्रे टाकून, आपण नवीन वस्त्रे धारण करतो, त्याप्रमाणे जीव हा एक देह टाकून दुसरा देह धारण करीत असतो. ॥ १४४ ॥

**गूढार्थदीपिका—शरीराच्या लोपीं। सर्वथा नाश नाही स्वरूपी**

आत्मा चेतनस्वरूप असून, तो अविनाशी आहे व नित्यआत्म्याहून जेवढे काही निराळे विनाशी भासते ते सर्व जीवात्म्याच्या कल्पनेने भासते. पण आपण नित्य आत्म्याचे व अनित्य अशा देहादिकांचे ऐक्य करतो; म्हणून अनित्याचे नाशाबरोबर आपलाच नाश होतो असे समजून, त्या नाशाबद्दल शोक करतो. या ठिकाणी कौरवादिक

बांधवाच्या युद्धात होणाऱ्या नाशाबद्दल जो शोक झाला होता, तो नाहीसा करण्याकरिता भगवान अर्जुनाला आत्मानात्मविवेकच सांगत आहेत. या आत्मानात्मविवेकाने चेतन नित्य असा आत्मा व जडनाशिवंत देहादी पदार्थाचे अविचाराने मानलेले ऐक्य नाहीसे होऊन, अनात्म अशा जड देहादिकांच्या नाशाच्या भीतीने होणारे दुःख नाहीसे होते. या आत्मानात्मविवेक ज्ञानावाचून शोकदुःख नाहीसे करणारे दुसरे साधन नाही. आत्मा व अनात्मा यांना एक समजणे हेच सर्व दुःखाचे कारण असून त्यांचे भिन्नत्व जाणणे हे सर्व दुःखाचे परिमार्जन करणारे आहे. या आत्मानात्मविवेकाला व्यतिरेक विचारही म्हणतात.

**नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः। न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः॥ २३॥**
**अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च। नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः॥ २४॥**
**अव्यक्तोऽयमचिन्त्योऽयमविकार्योऽयमुच्यते। तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि॥ २५॥**

**अर्थ**—कोणतेही शस्त्र चैतन्यरूप आत्म्याला तोडू शकत नाही, अग्नी त्याला जाळू शकत नाही, पाणी त्याला भिजवू शकत नाही व वायू त्याला सुकवू शकत नाही. ॥ २३ ॥ असा हा आत्मा तुटला जात नाही, जाळला जात नाही, भिजला जात नाही व सुकला जात नाही. तो नित्य, सर्वव्यापक, स्थाणुप्रमाणे अचल असून सनातन आहे. ॥ २४ ॥ हा अव्यक्त म्हणजे इंद्रियातीत, अचिन्त्य म्हणजे मनाने आकलन न होणारा व परिणाम पावून विकाररूप न होणारा किंवा न बदलणारा आहे, असे त्याविषयी म्हटले आहे म्हणून अशाप्रकारचा तो आहे असे जाणून अर्जुना! तू शोक करू नकोस. ॥ २५ ॥

**हा अनादि नित्यसिद्धु। निरुपाधि विशुद्धु। म्हणऊनि शस्त्रादिकीं छेदु। न घडे यया॥ १४५॥**
**हा प्रळयोदकें नाप्लवे। अग्निदाहो न संभवे। एथ महाशोषु न प्रभवे। मारुताचा॥ १४६॥**
**अर्जुना हा नित्यु। अचळु हा शाश्वतु। सर्वत्र सदोदितु। परिपूर्णु हा॥ १४७॥**
**हा तर्काचिये दिठी। गोचर नोहे किरीटी। ध्यान याचिये भेटी। उत्कंठा वाहे॥ १४८॥**
**हा सदा दुर्लभु मना। आपु नोहे साधना। निःसीमु हा अर्जुना। पुरुषोत्तमु॥ १४९॥**
**हा गुणत्रयारहितु। व्यक्तीसी अतीतु। अनादि अविकृतु। सर्वरूप॥ १५०॥**
**अर्जुना ऐसा जाणावा। हा सकळात्मकु देखावा। मग सहजें शोकु आघवा। हरेल तुझा॥ १५१॥**

**अर्थ**—अर्जुना! ज्याच्याविषयी तू शोक करतोस तो जीवात्मा अनादी म्हणजे उत्पत्तिरहित आहे. नित्य राहणारा आहे. त्याच्याशिवाय दुसरी वस्तूच नाही, म्हणून तो उपाधिरहितही आहे. त्रिगुणरहित शुद्ध आहे म्हणून शस्त्रादिकांनी तो तुटला जात नाही. ॥ १४५ ॥ या जीवात्म्याला प्रलयातले सर्व एक झालेले पाणी देखील बुडवू शकत नाही. अग्नीची उष्णता त्याला जाळू शकत नाही व वायुही त्याला शोषू शकत नाही. ॥ १४६ ॥ असा हा अर्जुना! नित्य अखंड एक चेतनरूपच असून कधीही परिणाम न पावणारा आहे. तो सर्वत्र अणुरेणूपासून भरलेला असून परिपूर्ण आहे, म्हणजे अपूर्ण कधी होतच नाही. ॥ १४७ ॥ अर्जुना! तर्काने याचे ग्रहण होत नाही किंवा कितीही तर्क केले तरी याचे स्वरूपाचे ज्ञान होणे शक्य नाही. याच्या प्राप्तीकरिता ध्यान करावे तर ध्यानाला लागलेली याच्या प्राप्तीची उत्कंठा कधी थांबतच नाही. ॥ १४८ ॥ हा आत्मा मनाला तर अत्यंत दुर्लभच आहे. तसाच कोणत्या साधनानेही त्याची प्राप्ती होत नाही; असा हा, अर्जुना! अमर्याद पुरुषोत्तम आहे. ॥ १४९ ॥ हा त्रिगुणरहित आहे व अनादी म्हणजे उत्पत्तिरहित व कधी बदलणारा नव्हे किंवा कार्यदशेला न येणारा अथवा ज्याच्यापासून काही कार्य उत्पन्न होत नाही. त्याचप्रमाणे कोण्या एका व्यक्तीतच आहे असे नसून सर्व तोच झाला आहे. ॥ १५० ॥ अर्जुना! असे हे आत्म्याचे स्वरूप ओळखिले पाहिजे. सर्व नामरूपाने तोच नटला आहे, असे जाणले पाहिजे; तरच आत्म्याचे खरे स्वरूप कळले असे म्हणता येते. हे आत्म्याचे स्वरूप कळून आल्यानंतर तुझ्या ठिकाणी शोकच राहणार नाही. ॥ १५१ ॥

**गूढार्थदीपिका—**

आत्म्याचे स्वरूप विसरणे व भलत्याच वस्तूला आत्मा मानणे यालाच वेदान्तात अनुक्रमे आवरण व

विक्षेप म्हणतात. सर्व जीव असे आपले खरे आत्मस्वरूप विसरले आहेत व भलत्याच देहादिक पदार्थाला मी म्हणून म्हणतात. मूळची वस्तू विसरल्यावाचून दुसऱ्या निराळ्या वस्तूचा भास व तीच मी आहे असे समजणे शक्य नाही. येथपर्यंत भगवंतांनी अर्जुनाला ज्ञान्याच्या तात्त्विक दृष्टीनुसार बोध करून, आत्मा सर्व कर्मकर्तृत्वरहित आहे हेच पुन: सांगितले.

**अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम्। तथापि त्वं महाबाहो नैवं शोचितुमर्हसि॥ २६॥**

**जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च। तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि॥ २७॥**

**अर्थ**—किंवा हा आत्मा नित्य जन्मतो व नित्य मरतो असे समजत असशील तरी हे, महाबाहो! तुला शोक करण्याचे कारण नाही.॥ २६॥ कारण जन्मलेला प्राणी मरणारच व मेलेला प्राणी पुन: उत्पन्न होणारच. असे हे जन्ममृत्यु कोणालाही चुकत नसल्यामुळे त्याबद्दल शोक करणे तुला उचित नाही.॥ २७॥

**अथवा ऐसा नेणसी। तूं अंतवंतचि हें मानिसी। तऱ्ही शोचूं न पवसी। पंडुकुमरा॥ १५२॥**
**जे आदि स्थिति अंतु। हा निरंतर असे नित्यु। जैसा प्रवाहो अनुस्यूतु। गंगाजळाचा॥ १५३॥**
**तें आदि नाहीं खंडलें। समुद्रीं तरी असे मिनलें। आणि जातचि मध्यें उरलें। दिसे जैसें॥ १५४॥**
**इयें तिन्ही तयापरी। सरसींच सदा अवधारीं। भूतांसि कवणीं अवसरीं। ठाकती ना॥ १५५॥**
**म्हणोनि हें आघवें। एथ तुज नलगे शोचावें। जे स्थितीचि हें स्वभावें। अनादि ऐसी॥ १५६॥**
**ना तरी हें अर्जुना। नयेचि तुझिया मना। जे देखोनि लोकु अधीना। जन्मक्षया॥ १५७॥**
**तरी येथ कांहीं। तुज शोकासि कारण नाहीं। जे जन्ममृत्यु हे पाहीं। अपरिहर॥ १५८॥**
**उपजे तें नाशे। नाशलें पुनरपि दिसे। हें घटिकायंत्र तैसें। परिभ्रमे गा॥ १५९॥**
**ना तरी उदो अस्तु आपैसें। अखंडित होत जात जैसें। हें जन्ममरण तैसें। अनिवार जगीं॥ १६०॥**
**महाप्रळयअवसरें। हें त्रैलोक्यही संहरे। म्हणोनि हा न परिहरे। आदि अंतु॥ १६१॥**
**तूं जरी हें ऐसें मानसी। तरी खेदु कां करिसी। काय जाणतचि नेणसी। धनुर्धरा॥ १६२॥**
**एथ आणीकही एक पार्था। तुज बहुतीं परी पाहातां। दु:ख करावया सर्वथा। विषो नाहीं॥ १६३॥**

**अर्थ**—अथवा हा आत्मानात्मविवेक तुला कळत नसेल व तू सर्व नाशिवंत मानीत असशील तरी अर्जुना! तुला शोक करण्याला कारण नाही.॥ १५२॥ कारण उत्पत्ती, स्थिती व नाश हे तिन्ही धर्म वाहत्या गंगोदकाप्रमाणे सर्व पदार्थाचे ठिकाणी सारखे नित्य दिसूनच येतात.॥ १५३॥ गंगोदकाकडे पाहिले तर उगमाचे ठिकाणी ते आहेच व शेवटी समुद्रात मिळते आणि वाहत असताना मध्ये ओघात दिसतेच.॥ १५४॥ त्याप्रमाणे आदी, मध्य व अंत या तिघांचा प्रवाह प्रत्येक भूताचे ठिकाणी अव्याहत चालू आहे.॥ १५५॥ असे जर प्रत्येक पदार्थात आदी, मध्य, अंत दिसतात, तर प्रत्येक पदार्थाची ही अनादी स्वाभाविक स्थितीच असल्यामुळे त्याबद्दल शोक करण्याचे तुला कारणच नाही.॥ १५६॥ आणि अर्जुना! सर्व लोक उत्पत्ती व मरण यांचे अधीन आहेत असे पाहून जर माझे हे म्हणणे पटत नसेल.॥ १५७॥ तरी तुला शोक करण्याचे कारण नाही; कारण प्रत्येक भूताचे मागे लागलेल्या जन्ममृत्यूपासून त्याची सुटका होणे शक्य नाही, मग त्यांच्या उत्पत्तिनाशाबद्दल शोक कसा करता येईल?॥ १५८॥ उत्पन्न झालेली वस्तू नाश पावणारच आणि नाश पावली तरी ती पुन: उत्पन्न होणारच, असे हे राहाटगाडगे सारखे फिरत असते.॥ १५९॥ किंवा सूर्याचे उगवणे व मावळणे जसे सारखे चालूच असते, त्याप्रमाणे जन्ममृत्यू हेही जगात सारखे होत असतात. ते जगातून नाहीसे होणे शक्य नाही किंवा कोणाला टाळता येणे शक्य नाही.॥ १६०॥ जेव्हा महाप्रलय होतो तेव्हा सर्व त्रैलोक्याचा संहार होतो, म्हणून हे उत्पत्तिनाश कोणालाच सुटत नाहीत.॥ १६१॥ तुला हे जर माहित आहे तर शोक कां करतोस? अर्जुना! जाणून मूर्खाप्रमाणे शोक करतोस की काय?॥ १६२॥ आणखी पुष्कळ प्रकाराने येथे शोक करण्याला कारण नाही हे अर्जुना! मी सांगतो पहा.॥ १६३॥

**गूढार्थदीपिका—दु:ख करावया सर्वथा। विषो नाही.**

आता येथून अज्ञान्याच्या व्यावहारिक दृष्टीने भगवंतांनी अर्जुनास बोध करण्यास सुरुवात केली आहे. भगवान म्हणतात, अर्जुना! आत्मानात्मविवेकरूप तात्विक दृष्टी सोडली व व्यावहारिक दृष्टीने विचार केला तरी कोणत्याही वस्तूच्या नाशाविषयी दु:ख करण्याचे कारण दिसत नाही. एखाद्या गृहस्थाने आपल्यापाशी अनामत रक्कम ठेविली, ती तो वाटेल तेव्हा मागणारच. तो रक्कम मागावयास आला असता आपण काय म्हणून दु:ख करावे? येथे दु:ख करण्यात रक्कम दडपण्याची इच्छा दिसून पडते. पण अनामत रकमेचा आपल्यापासून परत जाण्याचा स्वभावच असतो. वस्तूच्या स्वभावाविरुद्ध इच्छा धरून काय उपयोग? त्याप्रमाणे प्रत्येक वस्तू उत्पन्न होते व नाश पावते. हा तिचा स्वभाव आहे. येथे त्या वस्तूच्या स्वभावाविरुद्ध ही उत्पन्न होऊ नये व नाश पावू नये अशी इच्छा धरून त्या वस्तूच्या होणाऱ्या नाशाबद्दल दु:ख करू लागलो तर ते शोभेल काय? ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणी तात्विक आत्मानात्मविवेक बाणतो, म्हणून ते आत्मानात्मविवेकाच्या बळावर जगातल्या कोणत्याही घडामोडीविषयी दु:ख करीत नाहीत आणि आत्मज्ञान नसूनही व्यावहारिक धीर पुरुष देखील, वर भगवंतांनी सांगितलेल्या उपदेशानुसार विचार करतात व कोणताही दु:खद प्रसंग ओढवला तरी मोठ्या धैर्याने त्या प्रसंगाला तोंड देतात. दु:ख करीत बसत नाहीत असा अर्थ.

ज्ञानी स्थितप्रज्ञ असतो व ज्ञानरहित व्यावहारिक धीर पुरुष स्थितप्रज्ञासारखा अचल चित्तवृत्तीचा दिसला तरी त्याला स्थितप्रज्ञ म्हणता येत नाही. कारण ज्ञानी स्थितप्रज्ञाची चित्तवृत्ती अविचल नित्य अशा परमेश्वराच्या ठिकाणी किंवा आत्म्याच्या ठिकाणी स्थित असते, पर व्यावहारिक धीर पुरुषाची चित्तवृत्ती नाशीवंत जगाचे ठिकाणी स्थित असते म्हणून ज्ञानी स्थितप्रज्ञाला मुक्ती मिळते व व्यावहारिक स्थिरचित्त पुरुषाला संसारच मिळतो. म्हणून केवळ धैर्यावरून ज्ञानी पुरुषाची ओळख होऊ शकत नाही.

**अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत। अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना॥ २८॥**

**अर्थ**—अर्जुना! सर्व भूतसृष्टी प्रथम अव्यक्त म्हणजे लीनदशेत असते, नंतर मध्ये ती व्यक्त होते, शेवटी पुन: अव्यक्त म्हणजे लीन होते, असा शिष्टस्वभाव असल्यामुळे येथे शोक करण्याचे कारण काय?॥ २८॥

**जें समस्तें इयें भूतें। जन्माआदि अमूर्तें। मग पातलीं व्यक्तीतें। जन्मलेया॥ १६४॥**
**तियें क्षयासि जेथ जाती। तेथ निभ्रांत आनें नव्हती। देखें पूर्व स्थितीच येती। आपुलिये॥ १६५॥**
**येर मध्यें जें प्रतिभासे। तें निद्रिता स्वप्न जैसें। तैसा आकारु हा मायावशें। सत्स्वरूपीं॥ १६६॥**
**नातरी पवनें स्पर्शिलें नीर। पढियासे तरंगाकार। कां परापेक्षा अळंकार-। व्यक्ती कनकीं॥ १६७॥**
**तैसें सकळ हें मूर्त। जाण पां मायाकारित। जैसें आकाशीं बिंबत। अभ्रपटळ॥ १६८॥**
**तैसें आदीचि जें नाहीं। तयालागीं तूं रुदसी कायी। तूं अवीट तें पाहीं। चैतन्य एक॥ १६९॥**
**जयाची आर्तीचि भोगित। विषयीं त्यजिले संत। जयालागीं विरक्त। वनवासिये॥ १७०॥**
**दिठी सूनि जयातें। ब्रह्मचर्यादि व्रतें। मुनीश्वर तपातें। आचरताती॥ १७१॥**

अर्थ—अर्जुना! ही जी सर्व प्राणिसृष्टी दिसते ती उत्पत्तीपूर्वी आकाररहित होती आणि मग उत्पत्ती झाली तेव्हा आकाराला आली.॥ १६४॥ पुढे या सृष्टीतील प्राण्यांचा जेव्हा नाश होईल तेव्हा त्यांची दुसरी कोणती स्थिती होत नाही. ते आपल्या पूर्व निराकार स्थितीलाच येतात हे निश्चित समज.॥ १६५॥ बाकी उत्पत्ती व नाश यांच्यामध्ये जो वस्तूचा मर्यादित भास होतो तो निजलेल्या माणसाला जसे भ्रमाने स्वप्न दिसते, त्याप्रमाणे सद्रूप आत्मस्वरूपाचे ठिकाणी भ्रमानेच प्राणिमात्रांचे आकार भासतात.॥ १६६॥ नाही तरी वाऱ्याचा पाण्याला स्पर्श झाल्याबरोबर ते पाणी तरंगाकार दिसायला लागते. किंवा सोन्याहून निराळा जो पुरुष त्यालाच सोने अलंकाररूप व्यक्तित्वाला आले असे दिसते.॥ १६७॥ त्याप्रमाणे ही सर्व साकार सृष्टी, आकाशात अभ्रे दिसावी, त्या प्रमाणे मायाभ्रमाने भासते.॥ १६८॥ अर्जुना! जे मुळी अस्तित्वातच नाही त्यासाठी तू शोक करीत आहेस. वास्तविक एक अत्यंत आत्मस्वरुप चैतन्यच आहे, दुसरे काही नाही.॥ १६९॥ ज्या आत्मस्वरुपाच्या प्राप्तीची उत्कंठा व आशा वाहत, संत विषयसुखाचा त्याग

करतात आणि विरक्त पुरुष अत्यंत वैराग्य धारण करून वनात राहतात. ॥ १७० ॥ तसेच मोठमोठे मुनी ज्याचे प्राप्तीच्या इच्छेने आजन्म ब्रह्मचर्यादी व्रते व नानाप्रकारची उग्रतपे यांचे अनुष्ठान करतात. ॥ १७१ ॥

**गूढार्थदीपिका—आकार हा मायावशे। सत्स्वरूपी**

या भासत असलेल्या सर्व भूतसृष्टीला एक अविनाशी आत्मस्वरूपच आधार असून, त्या आत्मस्वरूपावर भ्रांतीने भूतसृष्टी भासते. म्हणून तुला शोक करण्याचे कारण नाही. मुळात आत्मस्वरूप निराकार आहे. हे निराकार आत्मस्वरूप जेव्हा आत्मप्रेमानेच स्फुरण पावते, तेव्हा ते बहूरूप होते. बहूरूप झाले तरी आत्मस्वरूपाची एकात्मता मोडत नाही. कारण आत्मस्वरूपाच्या बाहेर आत्मसत्ता सोडून काही ते बहूरूप होत नाही. ज्याप्रमाणे पाण्यावर उठणारी लाट पाण्याचा पृष्ठभाग सोडून जमिनीवर काही जात नाही व तिचा पाण्याचा संबंध सुटत नाही, त्याप्रमाणे बहुरूपताही आत्मसत्तेवरच स्फुरते. या अनुभवात जरी आकार भासतात, तरी ते निरनिराळ्या वस्तूंच्या मर्यादा म्हणून जोपर्यंत वाटत नाहीं, तोपर्यंत त्या सर्व निरनिराळ्या आकारात एक मूळची आत्मवस्तूच प्रत्ययाला येते; म्हणून आत्मवस्तूच्या अद्वैताला बाध येत नाही. म्हणून या बहुपणाच्या प्रत्ययाला भ्रम म्हणता येत नाही. बहुरूपातील आत्मवस्तूची एकात्मता विसरून जेव्हा बहुरूपता बहुवस्तुरूपाने प्रत्ययाला येते तेव्हा तो भ्रम म्हटला जातो. अशा भूतसृष्टीची अव्यक्तदशा ही व्यक्तदशा मानली जाते.

अर्जुनाला भूतसृष्टीरूप बहुभावनाचा प्रत्यय अनेक वस्तुरूप वाटत होता व त्या बहुभावनात आपण निराळे आहो व कौरवादी दोन्ही सैन्यातील योद्धे वगैरे निरनिराळे स्वतंत्र सत्ता असलेले पदार्थ आहेत असे तो मानत होता. म्हणूनच तो त्यांच्या होणाऱ्या नाशाबद्दल दु:ख करीत होता. भगवान् म्हणतात, अर्जुना! एका आत्मसत्तेवरच हा सर्व बहुत्वाचा देखावा आहे, बहु निरनिराळे पदार्थ नाहीत आणि आत्मा अविनाशी असल्यामुळे येथे दुसरे आत्म्यावाचून काही उत्पन्न होत नाही व नाशही पावत नाही. किंबहुना द्वैतातच संभवणारी मारणे—मरणे, तोडणे-बुडणे अशी क्रिया अद्वैतवस्तूत संभवणेच शक्य नाही; म्हणून तुझा शोक व्यर्थ आहे. सर्वत्र एक आत्मवस्तूच असताना ती विसरून तू अनेक निरनिराळ्या वस्तूंचे स्वतंत्र अस्तित्व मानतोस. हा तुझा भ्रमच तुझ्या दु:खाला कारणीभूत आहे.

**आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद्वदति तथैव चान्य:।**
**आश्चर्यवच्चैनमन्य: शृणोति श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित्॥ २९॥**

**अर्थ**—कोणी आश्चर्याने थक्क व्हावे त्याप्रमाणे आत्मस्वरूपाला पाहतात व त्यात निमग्न होतात. कोणी आत्मस्वरूपाचे गुणानुवाद गाता गाता आश्चर्याने थक्क झाल्याप्रमाणे आत्मस्वरूपात तल्लीन होऊन जातात. कोणी आत्मस्वरूपाचे श्रवण करता करता आश्चर्याने चकित झाल्याप्रमाणे त्यात रंगून जातात. कोणी आत्मस्वरूपाचे श्रवण करून जाणीव न ठेवता निर्विकल्प स्थितीला प्राप्त होतात. ॥ २९ ॥

**एक अंतरीं निश्चळ। जें निहाळितां केवळ। विसरले सकळ। संसारजात॥ १७२॥**
**एकां गुणानुवादु करितां। उपरति होऊनि चित्ता। निरवधि तल्लीनता। निरंतर॥ १७३॥**
**एक ऐकतांचि निवाले। ते देहभावीं सांडिले। एक अनुभवें पातले। तद्रूपता॥ १७४॥**
**जैसे सरिता ओघ समस्त। समुद्रामाजि मिळत। परी माघौते न समात। परतले नाहीं॥ १७५॥**
**तैसिया योगीश्वरांचिया मती। मिळणींसवें एकवटती। परी जे विचारूनि पुनरावृत्ति। भजतीचिना॥ १७६॥**

**अर्थ**—या आत्मस्वरूपाला पाहून तेथेच अंत:करण स्थिर झाल्यामुळे कित्येकजण संसाराचे भानच विसरतात. ॥ १७२ ॥ कित्येकजण या आत्मस्वरूपाचे वर्णन करता करता चित्त संसारापासून पूर्ण विरक्त झाल्यामुळे अखंड आत्मस्वरूपाचे ठिकाणी तल्लीन होऊन राहतात. ॥ १७३ ॥ कित्येक लोक आत्मस्वरूपाची स्वरूपस्थिती गुरुमुखाने ऐकून अत्यंत समाधान पावले व त्यांचा देहभावच नाहीसा झाला. कित्येक आत्मस्वरूपाचा अनुभव घेऊन तद्रूप होऊन राहिले. ॥ १७४ ॥ ज्याप्रमाणे सर्व नद्या वाहत वाहत शेवटी समुद्राला मिळतात व समुद्रातच सामावून राहतात. मग पुन: परत फिरून येत नाहीत. ॥ १७५ ॥ त्याप्रमाणे परमेश्वराला जाणणारे योगीदेखील परमेश्वराला जाणून परमेश्वराशी एकरूप होतात व पुन: परमेश्वरापासून अलग होऊन जन्ममरणपरंपरा भोगीत नाहीत. ॥ १७६ ॥

**गूढार्थदीपिका—विचारूनि पुनरावृत्ती। भजतीचिना**

जीवाला भासणारे जडविनाशी धर्माचे जगत् भ्रांतीने भासते असे कां म्हणावयाचे, याचा उलगडा माऊलींनी येथे केला आहे. सत्य म्हणजे सदासर्वदा असणारे व भ्रांती म्हणजे "**आदावंते च यन्नास्ति वर्तमानेऽपि तत्तया**" अगोदरही ज्यांचे अस्तित्व सिद्ध होत नाही व नंतरही ज्यांचे अस्तित्व राहत नाही, पण मध्येच भासते, असा पदार्थ भ्रांतीने भासला म्हणावा लागतो. एक तर पदार्थ सत्य म्हणजे सदासर्वदा राहणारा असे सिद्ध झाले पाहिजे. तसा सिद्ध न होता भासत असेल तर भ्रांतीने भासतो असे म्हणावे लागेल सत्य अस्तित्व किंवा भ्रांतिजन्य खोटे, क्षणभराचे अस्तित्व या दोन अस्तित्वावाचून तिसऱ्या प्रकारच्या अस्तित्वाची कल्पनाच करता येत नाही. आत्मा अविनाशी म्हणजे सदासर्वदा सत्य आहे. तसे जडविनाशी जगही सदासर्वदा राहणारे सत्य असते तर, ते आत्म्याच्या अनुभवाबरोबर अनुभवाला आले असते. पण कोणत्याही रीतीने आत्मानुभव घेणाऱ्या पुरुषाला आत्म्याबरोबर जडविनाशी जगाचा अनुभव येत नाही.

कोणी अशी शंका घेतील की एका वस्तूकडे लक्ष लागले असता दुसरी वस्तू असून दिसत नाही. या नियमाप्रमाणे आत्म्याकडे लक्ष लावणाऱ्या पुरुषांना जग असून दिसत नाही. पण हे म्हणणे चूक आहे. दोन भिन्न स्वतंत्र अस्तित्व असलेल्या पदार्थांच्या ज्ञानाविषयीच हा आक्षेप लागू होतो. जडविनाशी जगाचे व आत्म्याचे भिन्न निरनिराळे अस्तित्व घेतल्यास दोघांची स्वतंत्र निरनिराळी अस्तित्वमर्यादा मानावी लागते व अस्तित्व मर्यादा मानली की जगाबरोबर आत्माही विनाशी मानावा लागतो. असे मानणे त्याच्या अविनाशी धर्माशी विरुद्ध होते आत्म्याचे अस्तित्व मर्यादित केले नाही. तर, जडविनाशी जगाचा भास आत्मसत्तेवरच मानावा लागतो. अमर्याद सच्चिदानंदरूप आत्मसत्तेवर जगाचाही सच्चिदानंदरूपाने भास झाला असता तर ते जगत सत्य झाले असते; पण जीवाला जगाचा तसा प्रत्यय नाही. त्याला जगाचा जडविनाशी प्रत्यय आहे; म्हणून अशा विनाशी जड प्रत्ययाचे जगत जीवाला भ्रांतीने भासते. असे विचारी पुरुषांनी निश्चित केले आहे.

**देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत । तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि॥ ३०॥**

**अर्थ**—अर्जुना! सर्व प्राण्यांच्या देहामध्ये देहाचा अहंकार धारण करणारा जो जीवात्मा आहे, त्याचा कधीच नाश होत नाही. म्हणून कोण्याही प्राण्याविषयी तुला शोक करणे उचित नाही. ॥ ३० ॥

**जें सर्वत्र सर्वही देहीं। जया करितांही घातु नाहीं। तें विश्वात्मक तूं पाहीं। चैतन्य एक॥ १७७॥**
**इयाचेनि स्वभावें। हें होत जात आघवें। तरी सांग काय शोचावें। एथ तुवां॥ १७८॥**
**एऱ्हवीं तरी पार्था। तुज कां नेणों न मने चित्ता। परी किडाळ हें शोचितां। बहुतीं परी॥ १७९॥**

अर्थ—अर्जुना, जे सर्वत्र व्यापून सर्व देहामध्ये आहे व ज्याचा घात केला असतानाही घात होऊ शकत नाही, ते एक चैतन्यच सर्व नामरूपाने प्रकट झाले आहे. ॥ १७७ ॥ या चैतन्याच्या स्वभावानेच हे विश्व उत्पन्न होते व नाश पावते. मग तू शोक कशाचा करतोस सांग ?॥ १७८ ॥ एऱ्हवी अर्जुना, हे तुझ्या मनाला कसे पटत नाही हे मला समजत नाही. पण पुष्कळ दृष्टिनें पाहिले तरी, तुला शोक करणे योग्य दिसत नाही. ॥ १७९ ॥

**गूढार्थदीपिका—इयाचेनि स्वभावें। हें होत जात आघवें**

या ओव्यात श्रीज्ञानेश्वर माऊलींनी संसारचित्र कसे भासते याचा उलगडा केला आहे. "इयाचेनि स्वभावे" म्हणजे चैतन्याचे स्वभावाने "हें होत जात आघवें" सम्पूर्ण जगत होते व जाते असे माऊली म्हणते. पण याचा अर्थ असा नव्हे की 'जगत उत्पन्न करणे व त्याचा नाश करणे हा चैतन्याचा स्वभावच आहे. किंवा चैतन्य स्वभावतः जडविनाशी जगत उत्पन्न करिते. जडविनाशी जगताच्या उत्पत्तिकरिता माया मानण्याचे कारण नाही' असा अर्थ केल्यास जगत सत्य ठरते व त्याचे उत्पत्तिनाश हे धर्मही स्वाभाविक ठरतात व "**हे उपजे आणि नाशे। ते मायावशें दिसें**" (ज्ञाने० अ० २ ओ० १०५)

त्या त्यांच्याच वचनाशी विरोध येतो. म्हणून या ओवीचा अर्थ असा आहे की, स्फुरणे हा चैतन्याचा स्वभाव

आहे. ते 'मी' या वृत्तिरूपाने स्फुरत असते. या चैतन्यसमुद्रावर ''मी'' या वृत्तिरूपाने अनंत स्फुरणे होतात. त्या स्फुरणांकडे लक्ष देऊन मूळची चैतन्यवस्तू विसरली गेली की, 'मी' वृत्तीचे अनंत स्फुरणच निरनिराळ्या भूतांच्या रूपाने प्रत्ययाला येते व त्या स्फुरणाचे ठिकाणी उत्पत्तिनाश दिसू लागतात. यालाच जीव, जगत म्हणतो. याप्रमाणे चैतन्याचे स्वाभाविक स्फुरणाचे ठिकाणी जीव भ्रमाने जगाची कल्पना करतो, असा या ओवीचा अर्थ करावा लागतो.

**स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकम्पितुमर्हसि। धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते॥ ३१॥**

**अर्थ**—युद्ध हे घोर कर्म असले तरी ते (युद्ध) स्वधर्म असल्यामुळे युद्ध करताना त्यापासून पराङ्मुख होऊ नये. कारण धार्मिक युद्धावाचून क्षत्रियांना दुसरा मार्ग नाही. ॥ ३१ ॥

**तूं अझुनि कां न विचारिसी। काय हें चिंतितु आहासी। स्वधर्मु तो विसरलासी। तरावें जेणें॥ १८०॥**
**या कौरवां भलतें जाहलें। अथवा तुजचि कांहीं पातलें। कीं युगचि हें बुडालें। जऱ्ही एथ॥ १८१॥**
**तरी स्वधर्मु एक आहे। तो सर्वथा त्याज्य नोहे। मग तरिजेल काय पाहें। कृपाळूपणें॥ १८२॥**
**अर्जुना तुझें चित्त। जऱ्ही जाहलें द्रवीभूत। तऱ्ही हें अनुचित। संग्रामसमयीं॥ १८३॥**
**अगा गोक्षीर जरी जाहलें। तरी पथ्यासि नाहीं म्हणितलें। ऐसेनिहि विष होय सुदलें। नवज्वरीं देतां॥ १८४॥**
**तैसें आनीं आन करितां। नाशु होईल स्वहिता। म्हणऊनि तूं आतां। सावध होईं॥ १८५॥**
**वायांचि व्याकुळ कायी। आपुला निजधर्म पाहीं। जो आचरितां बाधु नाहीं। कवणे काळीं॥ १८६॥**
**जैसें मार्गेचि चालतां। अपावो न पवे सर्वथा। कां दीपाधारें वर्ततां। नाडळिजे॥ १८७॥**
**तयापरी पार्था। स्वधर्में राहाटतां। सकळ कामपूर्णता। सहजें होय॥ १८८॥**
**म्हणोनि यालागीं पाहीं। तुम्हां क्षत्रियां आणीक कांहीं। संग्रामावांचूनि नाहीं। उचित जाणें॥ १८९॥**
**निष्कपटा होआवें। उसिणा घाई जुंझावें। हें असो काय सांगावें। प्रत्यक्षावरी॥ १९०॥**

**अर्थ**—अर्जुना! या युद्धाचे समयी मी काय शोक करीत बसलो, युद्ध न करण्याचे भलतेच विचार मनात काय मी आणीत आहे असे अजूनही तुला वाटत नाही. अरे! युद्ध करणे हा क्षत्रियाचा स्वधर्म आहे. तो स्वधर्म तारणारा आहे, बुडविणारा नाही. ॥ १८० ॥ या कौरवांचे काही जरी झाले किंवा तुझाच घात होणाचा संभव असला अथवा सर्व सृष्टीचा प्रलय होण्याचा प्रसंग आला. ॥ १८१ ॥ तरी हा स्वधर्म जो आहे तो केव्हाही व कसल्याही प्रसंगी सोडता येत नाही. युद्ध करणे हा धर्म सोडून आपण शत्रूवर दया दाखविली व दया दाखविणे हा धर्म स्वीकारला तर या धर्माने तू तरणार काय?॥ १८२ ॥ अर्जुना! या युद्धात स्वजनांचा नाश होतो हे पाहून तुझे चित्ताला प्रेमाचा पाझर फुटला तरी युद्धरूपी स्वधर्माचे अनुष्ठान करीत असताना ते काय उपयोगाचे?॥ १८३ ॥ गायीचे दूध झाले म्हणून काही ज्वरात देणे पथ्यकर नसते. इतकेही करून दिलेच तर ते नवज्वरात विषाप्रमाणे मारक होते. ॥ १८४ ॥ त्याप्रमाणे आपला स्वधर्म सोडून परधर्माचे अनुष्ठान करणे आपल्या कल्याणाचे होत नाही. म्हणून तू सावध हो. अविचार करू नकोस. ॥ १८५ ॥ विनाकारण तू स्वजनांचे नाशामुळे व्याकुळ होऊन दु:ख करतोस. आपल्या स्वधर्माकडे लक्ष दे. या स्वधर्माचे अनुष्ठान केले असता केव्हाही अहित होत नाही. ॥ १८६ ॥ ज्याप्रमाणे सरळ मार्गाने चालणाऱ्याला कधीही अपाय होत नाही किंवा दिव्याच्या उजेडाने व्यवहार करीत असता मनुष्य कधी अडखळत नाही. ॥ १८७ ॥ त्याप्रमाणे अर्जुना! आपल्या स्वधर्माप्रमाणे वागणाऱ्याचे सर्व मनोरथ अनायासे पूर्ण होतात. ॥ १८८ ॥ म्हणून तुम्हा क्षत्रियांना युद्धावाचून दुसरा धर्म उचित सांगितलेला नाही. ॥ १८९ ॥ शत्रूने आपल्यावर मारा केल्यास निष्कपट अंत:करणाने उलट शत्रूवर मारा करीत लढावे. प्रत्यक्ष समोर युद्धाचा प्रसंग आहे, तेव्हा हे सांगण्याची जरूरी नाही. ॥ १९० ॥

**गूढार्थदीपिका—तैसें आनीं आन करितां। नाशु होईल स्वहिता.**

येथे श्रीकृष्ण भगवंतांनी अर्जुनाला व श्रीज्ञानेश्वर माऊलींनी जगाला जो उपदेश केला आहे तो अत्यंत लक्षात ठेवण्याजोगा आहे. धर्म हा जो प्रवृत्त झाला आहे, तो जीवाच्या आध्यात्मिक कल्याणाकरिताच प्रवृत्त झाला आहे.

त्या धर्माने आपले आत्यंतिक कल्याण होणार नाही असे वाटणे ही सर्वस्वी विपरीत समजूत आहे. त्याचप्रमाणे स्वजनांचा नाश होणार म्हणून अर्जुन 'युद्ध करणे' या स्वधर्मापासून परावृत होऊ पाहत होता; पण भगवान म्हणतात अर्जुना! "**स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकंपितुमर्हसि**" स्वधर्माचे अनुष्ठान करताना चलितचित्त होऊ नये. याचे स्पष्टीकरण करताना माउली म्हणते की.

"**या कौरवा भलते जाहले। अथवां तुजचि कांहीं पातलें। कीं युगचि हें बुडालें। जऱ्ही येथ॥**"

"**तरी स्वधर्म जो आहे। तो सर्वथा त्याज्य नोहे॥**"

काही झाले तरी स्वधर्म सोडता येत नाही. याचा अर्थ असा की जीवाच्या मरणानंतर होणाऱ्या त्याच्या गतीशी व आत्यंतिक कल्याणाशीही धर्माचा संबंध असल्यामुळे समाजाकरिता धर्म नसून धर्माकरिता समाज आहे. धर्माकरिता समाज सोडता येतो, पण समाजाकरिता धर्म सोडता येत नाही. कारण तो समाजाचे कल्याणाचा मार्ग म्हणूनच भगवंतांनी प्रकट केला आहे. भगवंताने जो धर्म प्रकट केला आहे तो समाजाचे धारण करणाराच आहे. म्हणूनच त्याला भगवंतांनी धर्म हे नाव दिले. त्या धर्मावाचून दुसरा कोणता धर्म समाजाचे धारण करणारा होऊ शकत नाही.

"**धारणाद्धर्म इत्याहुः**"

ज्याचे योगाने समाजाचे धारण होईल तो धर्म असा अर्थ कित्येक करतात. पण असा अर्थ केल्यास, ज्याला ज्या प्रकाराने वागले असता माझे हित आहे असे वाटेल तसे वागणे हा त्याचा धर्म होईल व धर्माची सामान्य पणे रूपरेषा काहीच करता येणार नाही. अर्जुनाला युद्ध न करणे हे हिताचे वाटत होते. पण त्याच्या उलट युद्ध करणे हा तुम्हा क्षत्रियांचा धर्म होय असे भगवंतांनी सांगितले. म्हणजे धर्माधर्माची ओळख भगवंतानी शास्त्रावरून ठरविली. स्वतः मनुष्याच्या बुद्धीवर अवलंबून ठरविली नाही. कारण भगवान व ज्ञानी भक्त ह्या दोन अत्यंत शुद्धबुद्धीच्या व्यक्तीवाचून इतर विषयात सुख मानणाऱ्या मनुष्याला, तो केवढाही व्यावहारिक दृष्ट्या थोर व बुद्धिमान असला तरी, निर्हेतुक असा निर्विकार चित्ताने विचार करताच येत नाही, म्हणून धर्माधर्माचा निर्णय करता येत नाही. प्राकृत मनुष्याची बुद्धी त्याच्या त्रिगुणात्मक प्रकृतीच्या कार्यात किंवा जगाच्या घडामोडीत गुंतलेली असते, म्हणून ती प्रकृतीच्या किंवा स्वभावाच्या स्वाधीन असते व ज्ञानी भक्ताची बुद्धी प्रकृतीच्या स्वाधीन नसते. ती परमेश्वराचे ठिकाणी स्थित असते. म्हणून शास्त्राने सांगितलेल्या स्वधर्मानुसार वागण्यात जीवाचे कल्याणच आहे, व तसे न वागण्यात जीवाचे अकल्याणच आहे.

**यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम् । सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभन्ते युद्धमीदृशम्॥ ३२॥**

**अर्थ**—अर्जुना! अनायासे प्राप्त झालेले व स्वर्गाचे द्वारच खुले झाले, असे हे प्रस्तुतसारखे युद्ध पुण्यशील व भाग्यवान क्षत्रियांनाच प्राप्त होते.॥ ३२॥

**अर्जुना झुंज देखें आतांचें। हें हो कां दैव तुमचें। कीं निधान सकळ धर्माचें। प्रगटलें असे॥ १९१॥**

**हा संग्रामु काय म्हणिपे। कीं स्वर्गुचि येणें रूपें। मूर्त कां प्रतापें। उदय केला॥ १९२॥**

**ना तरी गुणाचेनि पतिकरें। आर्तीचेनि पडिभरें। हें कीर्तीचि स्वयंवरें। आली तुज॥ १९३॥**

**क्षत्रियें बहुत पुण्य कीजे। तैं झुंज ऐसें हे लाहिजे। जैसें मार्गे जातां आडळिजे। चिंतामणीसी॥ १९४॥**

**ना तरी जांभया पसरे मुख। तेथ अवचटें पडे पीयूख। तैसा संग्रामु हा देख। पातला असे॥ १९५॥**

**अर्थ**—अर्जुना! प्रस्तुत प्राप्त झालेला युद्धाचा प्रसंग तुमचे सुदैवच होय. किंवा सर्व क्षात्रधर्माचा ठेवाच तुझ्यापुढे प्रकट झाला असे समज.॥ १९१॥ किंवा हे युद्ध म्हणजे या रूपाने प्रत्यक्ष स्वर्गच मूर्तरूप धारण करून तुझ्यापुढे उभा आहे. अथवा तुझ्या पराक्रमाने मूर्तरूप धारण केले आहे.॥ १९२॥ किंवा तुझे क्षात्रगुण पाहून अत्यंत आवडीने तुला स्वयंवरात वरण्याकरिता ही कीर्ती अत्यंत आतुर झाली आहे असे समज.॥ १९३॥ खरोखर क्षत्रियाने पुष्कळ पुण्य करावे तेव्हाच असा युद्धाचा प्रसंग त्याला येतो. हे युद्ध म्हणजे वाटेने जात असता अनायसे चिंतामणी सापडावा असे आहे.॥ १९४॥ किंवा जांभई देण्याकरिता पसरलेल्या मुखात अकस्मात अमृत पडावे तसा हा युद्धप्रसंग आला आहे.॥ १९५॥

**गूढार्थदीपिका—तैसा संग्रामु हा देख। पातला असे**

युद्धाची इच्छा नसताना आपल्या हक्काची न्याय मागणी प्राप्त करून घेण्याकरिता, जर क्षत्रियाला युद्ध करण्याचा प्रसंग आला तर त्या युद्धात होणाऱ्या प्राणहानीचा दोष त्याला लागत नाही. तो प्रसंग भगवत्इच्छेनेच आला आहे असे समजावे.

**अथ चेत्त्वमिमं धर्म्यं सङ्ग्रामं न करिष्यसि। ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि॥ ३३॥**

**अर्थ—**जर कदाचित् धर्माने प्राप्त झालेले युद्ध तू करणार नाहीस तर स्वधर्माचा व कीर्तीचा नाश होऊन तुला त्यायोगे पाप लागेल.॥ ३३॥

**आतां हा ऐसा अव्हेरिजे। मग नाथिलें शोचूं बैसिजे। तरी आपण आहाणा होईजे। आपणपेयां॥ १९६॥**
**पूर्वजांचें जोडलें। आपणचि होय धाडिलें। जरी आजि शस्त्र सांडिलें। रणीं इये॥ १९७॥**
**तरी असती कीर्ति जाईल। जगचि अभिशापु देईल। आणि गिंवसित पावतील। महादोष॥ १९८॥**
**जैसी भतरिहीन वनिता। उपहति पावे सर्वथा। मग तैसी दशा जीविता। स्वधर्मेंवीण॥ १९९॥**
**ना तरी रणीं शव सांडिजे। तें चौमेरीं गिधीं विदारिजे। तैसें स्वधर्महीना अभिभाविजे। महादोषीं॥ २००॥**

**अर्थ—**आता हे स्वधर्मरूप युद्ध सोडून खोट्या अशा स्वजनांबद्दल शोक करीत बसायचे! या अशा करण्यात अर्जुना! आपणच आपले अकल्याण करून घेतो.॥ १९६॥ जर युद्ध केले नाही व मागे फिरलो तर मोठे पराक्रम करून पूर्वजांनी आपल्या कुळाची जी कीर्ती वाढविली ती आपण धुळीस मिळवू॥ १९७॥ मिळविलेली कीर्ती जाईल व जग तुला शाप देईल. त्या बरोबरच स्वधर्माचा त्याग केल्यामुळे होणारे पुष्कळसे पाप तुला लागेल.॥ १९८॥ पतिहीन विधवा स्त्रीचा जसा पदोपदी पाणउतारा होतो, त्याप्रमाणे स्वधर्मरूप युद्धापासून परावृत होणाऱ्या क्षत्रियाची गती होते.॥ १९९॥ किंवा रणामध्ये पडलेल्या प्रेताला ज्याप्रमाणे चोहोकडून आलेली गिधाडे फाडून खातात, त्याप्रमाणे स्वधर्माचा त्याग करणाऱ्या पुरुषाला मोठमोठे दोष घेरतात.॥ २००॥

**गूढार्थदीपिका—स्वधर्महीना अभिभाविजे। महादोषीं**

जन्मलेल्या प्राण्याला मरेपर्यंत आत्मकल्याण साधण्याचा जो मार्ग भगवंतांनी मोठमोठ्या आधिकारिक ऋषींच्या द्वारा आखून दिला त्याला धर्म म्हणतात. त्या धर्ममार्गानेच प्रत्येकाला जायचे असते. त्या धर्माचा त्याग केला व त्याला जसे वागायला सांगितले नाही तसे वागायला लागला की त्याचे ते सर्व वागणे पापरूपच असते.

**अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यन्ति तेऽव्ययाम्। सम्भावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते॥ ३४॥**

**अर्थ—**सर्व मनुष्यप्राणी अखंड तुझी अपकीर्ती गातील. सज्जनांना अपकीर्ती ही मरणाच्या दु:खापेक्षाही अधिक दु:ख देणारी होते.॥ ३४॥

**म्हणोनि स्वधर्म हा सांडसील। तरी पापा वरपडा होसील। आणि अपेश तें न वचेल। कल्पांतवरी॥ २०१॥**
**जाणतेनि तंवचि जियावें। जंव अपकीर्ति अंगा न पवे। आणि सांग पां केवीं निगावें। एथोनियां॥ २०२॥**
**तूं निर्मत्सरु सदयता। येथूनि निघसी कीर माघौता। परी ते गति समस्तां। न मनेल ययां॥ २०३॥**
**हे चहूंकडूनि वेढितील। बाणवरी घेतील। तेथ पार्था न सुटिजेल। कृपाळुपणें॥ २०४॥**
**ऐसेनिहि प्राणसंकटें। जरी विपायें पां निघणें घटे। तरी तें जियालेंही वोखटें। मरणाहुनी॥ २०५॥**

**अर्थ—**अर्जुना! हा युद्धरूपी स्वधर्म जो आहे तो टाकून देशील तर पापालाच बळी पडशील व कल्पपर्यंत तुझ्या अपयशाचा कलंक दूर होणार नाही.॥ २०१॥ शहाण्याने जोपर्यंत अपकीर्ती होत नाही तोपर्यंतच जिवंत राहावे. मग सांग तुला या युद्धातून पाय मागे घेणे कसे योग्य होईल?॥ २०२॥ तू जरी या युद्धातून कौरवांविषयी मत्सर टाकून व त्यांची दया येऊन माघारा निघालास तरी या सर्वांना तू त्यांच्यावर दया करून युद्धातून परत फिरत आहेस असे वाटणार नाही.॥ २०३॥ युद्धांतून परत फिरलास की हे सर्वजण लगेच तुला घेरतील व बाणांचा तुझ्यावर वर्षाव करतील. दयाळुपणा दाखविलास म्हणून काही त्यातून तू सुटणार नाहीस.॥ २०४॥ अशाही प्राणसंकटातून कदाचित जरी वाचलास तरी तशा प्रकारचे वाचणे हे मरणाहूनही वाईट होय.॥ २०५॥

गूढार्थदीपिका—

येथून काही श्लोकांपर्यंत भगवंतांनी लोकरीत्या अर्जुनाला उपदेश करून स्वधर्माचरणाचीच मनुष्याने कास धरावी असे सांगितले आहे.

**भयाद्रणादुपरतं मंस्यन्ते त्वां महारथाः । येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम् ॥ ३५ ॥**
**अवाच्यवादांश्च बहून्वदिष्यन्ति तवाहिताः । निन्दन्तस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम् ॥ ३६ ॥**

**अर्थ**—मोठमोठे महारथी, तू भीतीने रणातून पाय काढलास, असेच समजतील. आज ज्यांच्या मनात तुझ्याविषयी आदर आहे त्यांच्या मनात तू युद्ध सोडून निघाल्यास तुझ्याविषयी अत्यंत अनादर उत्पन्न होईल. ॥ ३५ ॥ तुझे शत्रू तुझ्या सामर्थ्याची निंदा करून बोलू नये ते किंवा वाटेल तसे बोलतील मग त्यापेक्षा अधिक दुःख कोणते ? ॥ ३६ ॥

**तूं आणिकही एक न विचारिसी। एथ संभ्रमें झुंजों आलासी। आणि सकणवपणें निघालासी। मागुता जरी॥ २०६ ॥**
**तरी तुझें तें अर्जुना। या वैरियां दुर्जनां। कां प्रत्यया येईल मना। सांगें मज॥ २०७॥**
**हे म्हणतील गेला रे गेला। अर्जुन आम्हां बिहाला। हा सांगें बोलु उरला। निका कायी॥ २०८॥**
**लोक सायासें करुनि बहुतें। कां वेंचिती आपुलीं जीवितें। परी वाढविती कीर्तीतें। धनुर्धरा॥ २०९॥**
**ते तुज अनायासें। अनकळित जोडिली असे। हें अद्वितीय जैसें। गगन आहे॥ २१०॥**
**तैसी कीर्ति निःसीम। तुझां ठायीं निरुपम। तुझे गुण उत्तम। तिहीं लोकीं॥ २११॥**
**दिगंतींचे भूपति। भाट होऊनि वाखाणिती। जे ऐकिलिया दचकती। कृतांतादिक॥ २१२॥**
**ऐसा महिमा घनवट। गंगा तैसी चोखट। जया देखी जगीं सुभट। वांठ जाहाली॥ २१३॥**
**तें पौरुष तुझें अद्भुत। आइकोनियां हे समस्त। जाहले आथि विरक्त। जीवितेंसीं॥ २१४॥**
**जैसा सिंहाचिया हांका। युगांतु होय मदमुखा। तैसा कौरवां अशेखां। धाकु तुझा॥ २१५॥**
**जैसे पर्वत वज्रातें। ना तरी सर्प गरुडातें। तैसे अर्जुना हे तूंतें। मानिती सदा॥ २१६॥**
**तें अगाधपण जाईल। मग हिणावो अंगा येईल। जरी मागुता निघसील। न झुंजतचि॥ २१७॥**
**आणि हे पळतां पळों नेदिती। धरूनि अवकळा करिती। न गणित कुटी बोलती। आइकतां तुज॥ २१८॥**
**मग ते वेळीं हियें फुटावें। आतां लाठेपणें कां न झुंजावें। हें जिंतलें तरी भोगावें। महीतळ॥ २१९॥**

**अर्थ**—अर्जुना! आणखी एक गोष्ट आहे. तू तिचा विचार करीत नाहीस. येथे मोठ्या उत्साहाने तू युद्ध करायला आलास. आता जर का येथून तू कौरवांवर दया करून माघारा गेलास. ॥ २०६ ॥ तर या दुर्जन अशा कौरवांना खरे वाटेल काय? आमची दया येऊनच अर्जुनाने युद्धातून पाय मागे घेतला असा त्यांना तुझ्या मनातील भावाचा अनुभव येईल काय, हे मला सांग. ॥ २०७ ॥ ते म्हणतील अरे! हा अर्जुन आम्हाला पाहून भ्याला व त्याने पळ काढला, हाच सर्वांचा बोल राहील. असा बोल उरलेला बरा काय? ॥ २०८ ॥ चांगले लोक, होईल ते प्रयास करून व प्रसंग पडल्यास आपले प्राण खर्ची घालून, अर्जुना! कीर्ती संपादन करतात. ॥ २०९ ॥ ती कीर्ती तुला न कळत अनायासे प्राप्त व्हावी तशी प्राप्त झाली आहे. जसे या आकाशाच्या बरोबरीचे दुसरे काही नाही, त्याप्रमाणे तुझ्या कीर्तीच्या तोडीची दुसऱ्या कोणाची कीर्ती नाही. ॥ २१० ॥ याप्रमाणे तुझी कीर्ती अपार व अनुपम आहे. तुझे गुणही त्रैलोक्यात वाखाणण्याजोगे आहेत. ॥ २११ ॥ देशोदेशींचे राजे भाट होऊन तुझे गुणांचे वर्णन करतात व ते गुण ऐकून यमासारख्यांनाही तुझा धाक वाटतो. ॥ २१२ ॥ अर्जुना! गंगा जशी अती पवित्र तशी तुझी कीर्तीही शुद्ध व दाट पसरलेली आहे; म्हणूनच अशी तुझी निष्कलंक कीर्ती पाहून उत्तम योद्धे भाटाप्रमाणे तुझी स्तुती करतात. ॥ २१३ ॥ तुझे विलक्षण शौर्य पाहून व ऐकून हे सर्व कौरवादिक आपल्याला अशा थोर अर्जुनाशी युद्ध करण्याचे भाग्य लाभणार आहे असे वाटून जीवावर उदार झाले आहेत. ॥ २१४ ॥ ज्याप्रमाणे सिंहाची गर्जना ऐकून मदोन्मत्त हत्तीला देखील प्रलयाप्रमाणे भीती उत्पन्न होते, त्याप्रमाणे या सर्व कौरवांना तुझा धाक वाटतो. ॥ २१५ ॥ ज्याप्रमाणे पर्वतांना वज्राची

भीती वाटते किंवा गरुडाला सर्प भितात, तसे अर्जुना! हे तुला भितात. ॥ २१६ ॥ तू हे युद्ध न करताच जर माघारा फिरलास तर हे तुझे थोरपण सर्व लयाला जाईल. ॥ २१७ ॥ आणि तू पळालास तरी हे तुला पळू देणार नाहीत. तुला धरून तुझी विटंवना करतील. तुझ्या तोंडावर ऐकवणार नाही अशी तुझी निंदा करतील. ॥ २१८ ॥ त्यावेळी ती निंदा ऐकून तुझे हृदय फुटेल म्हणजे अत्यंत दुःख होईल. त्यापेक्षा आताच शूराप्रमाणे कां लढू नये? या युद्धात जय मिळविला तर आनंदाने पृथ्वीचे राज्य कां भोगू नये?॥ २१९ ॥

**हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम्। तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय युद्धाय कृतनिश्चयः ॥ ३७ ॥**

अर्थ—युद्धात तुला मरण आल्यास तुला स्वर्गप्राप्ती होईल व तुला जय प्राप्त झाला तर या पृथ्वीचे राज्य तुला भोगता येईल; म्हणून अर्जुना! युद्ध करण्याचा निश्चय करून युद्धाला सज्ज हो. ॥ ३७ ॥

**ना तरी रणीं एथ। झुंजतां वेंचलें जीवित। तरी स्वर्गसुख अनकळित। पावसील॥ २२० ॥**
**म्हणोनि ये गोठी। विचारु न करीं किरीटी। आतां धनुष्य घेऊनि उठीं। झुंजे वेगीं॥ २२१ ॥**
**देखें स्वधर्मु हा आचरतां। दोषु नाशे असता। तुज भ्रांति हे कवण चित्ता। एथ काची॥ २२२ ॥**
**सांगें प्लवेंचि काय बुडिजे। कां मार्गी जातां आडळिजे। परी विपायें चालों नेणिजे। तरी तेंही घडे॥ २२३ ॥**
**अमृतें तरीचि मरिजे। जरी विखेंसीं सेविजे। तैसा स्वधर्मे दोषु पाविजे। हेतुकपणें॥ २२४ ॥**
**म्हणोनि तुज पार्था। हेतु सांडोनि सर्वथा। क्षात्रवृत्ति झुंजतां। पाप नाहीं॥ २२५ ॥**

**अर्थ**—किंवा अर्जुना! युद्ध करता करता जर मरण आले तर तेवढ्यानेच अनायासे स्वर्गसुखाची प्राप्ती होईल. ॥ २२० ॥ म्हणूनच जयापजयाची चिंता करू नकोस. धनुष्य घेऊन युद्धाला उभा राहा. ॥ २२१ ॥ युद्ध हा क्षत्रियांचा स्वधर्म आहे. तो स्वधर्म आचरित असताना असलेले पाप नाहीसे होते. तेथे स्वधर्माच्या आचरणाने पाप लागेल अशी शंका तुला कशी येते?॥ २२२ ॥ सांग बरे, पाण्यातून तारणारी नाव ही कधी बुडविते का? किंवा मार्गानेच चालू लागलेला अडखळून पडतो का? पण कदाचित सरळ मार्गाने चालता येणार नाही तर मात्र तेही होईल. ॥ २२३ ॥ विष मिळवून अमृत प्याले असता अमृतानेही मनुष्य मरेल, त्याप्रमाणे विषयसुखाच्या प्राप्तीचा हेतू मनात धरून कर्म केल्यास मात्र पापही होईल. ॥ २२४ ॥ म्हणून अर्जुना! विषयसुखाच्या प्राप्तीकरिता स्वधर्म पाळायचा अशी कामना मनात न धरता क्षत्रियाचा धर्म समजून तू युद्ध केलेस तर तुला पाप लागणार नाही. ॥ २२५ ॥

**गूढार्थदीपिका—स्वधर्मे दोषु पाविजे। हेतुकपणें**

याचा भावार्थ असा की "**धर्मस्य ह्यापवर्ग्यस्य**" या भागवत वचनाप्रमाणे मुख्यतः हा प्रवृत्तिधर्मही परमेश्वराच्या प्राप्तीकरिताच निर्माण झाला आहे. परमेश्वरप्राप्तीकरिता जी चित्ताची शुद्धी पाहिजे ती या धर्माचरणाने होते. पण धर्माचरण करीत असताना त्या धर्माने विषयसुख प्राप्त व्हावे अशी कामना धरली तर किंवा संकल्प केला तर मात्र त्या कामनेनुसारच विषयसुखाची प्राप्ती हेच फळ मिळते व परमेश्वर अंतरतो. ज्याने ज्याने परमेश्वर अंतरेल ते ते पापच समजले पाहिजे. असे सकाम धर्माचे अनुष्ठान.—

**"धर्मोऽपि मुमुक्षूणां पापमेवोच्यते"**

परमेश्वरप्राप्तीची इच्छा करणाऱ्याला पापरूप आहे, असे आचार्यही म्हणतात.

ज्ञानेश्वर माऊलींनी पुढे नवव्या अध्यायात या अर्थाचे विधान केले आहे. कामनारहित धर्मानुष्ठानाने होणारी चित्तशुद्धी ही काही अदृष्टफल म्हणजे मेल्यानंतर मिळणारे फळ नव्हे, हे दृष्टफळ आहे. म्हणजे येथेच धर्मानुष्ठान [illegible] करता ते फळ मिळते व अनुभविता येते. विषयसुखाच्या प्राप्तीची कामना सोडून स्वधर्म हा परमेश्वराची [illegible] आहे, ती पाळायची म्हणून केलेल्या स्वधर्माचरणाने विषयवैराग्य आंगी बाणते व भगवंताकडे चित्ताचा [illegible] लागून चित्त अध्यात्माचा विचार करू लागते. विषयवैराग्य उत्पन्न होणे व अध्यात्मप्रवण मन होणे यालाच [illegible] चित्तशुद्धी असे नाव दिले आहे. विषयाविषयी उत्पन्न होणारे रागद्वेष ही चित्तातील अशुद्धी आहे. ते गेले [illegible] चित्त शुद्ध झाले व केवळ परमेश्वराची आज्ञा समजून सात्त्विक धर्माचरण केले असता रागद्वेष चित्तातून

जातात, नाही तर जात नाहीत; उलट चित्त अधिक रागद्वेषयुक्त होते व असे विषयासक्त चित्तच संसारदु:खाचे मूळ आहे. म्हणून येथे भगवंतांनी हेतुरहित म्हणजे विषयसुखाची कामना न धरता केवळ भगवदाज्ञा समजून स्वधर्माचे अनुष्ठान करण्यास सांगितले आहे.

**सुखदु:खे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ। ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि॥ ३८॥**

**अर्थ**—सुखदु:ख, लाभालाभ, जयापजय हे सारखे समजून म्हणजे सुख, जय, लाभ हे प्राप्त व्हावेत असा राग किंवा आसक्ती व दु:ख, पराजय व हानी प्राप्त होऊ नये असा द्वेष चित्तात न ठेवता युद्ध कर म्हणजे तुला युद्धाचे पाप लागणार नाही. ॥ ३८ ॥

**सुखीं संतोषा न यावें। दु:खीं विषादा न भजावें। आणि लाभालाभ न धरावे। मनामाजीं॥ २२६ ॥**
**एथ विजयपण होईल। कां सर्वथा देह जाईल। हें आधींचि कांहीं पुढील। चिंतावेना॥ २२७॥**
**आपणयां उचिता। स्वधर्मातेंचि रहाटतां। जें पावे तें निवांता। साहोनि जावें॥ २२८॥**
**ऐसेया मनें होआवें। तरी दोषु न घडे स्वभावें। म्हणोनि आतां झुंजावें। निभ्रांत तुवां॥ २२९॥**

**अर्थ**—अर्जुना आपल्या मनाप्रमाणे झाले असता नेहमी सुख होते, पण असे मनाप्रमाणे झाले तरी त्याचा आपण संतोष मानू नये. किंवा मनाच्या विरुद्ध झाले तरी त्याचे दु:ख मानू नये. तसेच लाभ झाला पाहिजे, हानी होऊ नये हेही काही मनात धरू नये. ॥ २२६ ॥ युद्धात माझा जय होईल किंवा माझा देह धारातीर्थी पडेल याची आधीपासूनच चिंता करीत बसू नये. ॥ २२७ ॥ आपल्याला उचित म्हणून सांगितलेला स्वधर्मच आचरत असता जे सुखदु:ख येईल ते निवांत अंत:करणाने सहन करावे. ॥ २२८ ॥ असे आपले मन ठेवून धर्माचे आचरण केले असता काही दोष लागत नाही, म्हणून अशा मनाने आता नि:संशय युद्ध कर॥ २२९ ॥

**गूढार्थदीपिका—सुखदु:खे समे कृत्वा**

या श्लोकात भगवंतांनी व श्रीज्ञानेश्वरमाऊलींनी मोठा एक गूढार्थ सांगितला आहे. ज्याप्रमाणे पाण्यावर ज्या लहरी उठतात, त्यांचे ठिकाणी मूळ पाण्याहून, काही स्फुरणरूप विशेषभाव आपण समजतो. सर्व लहरींच्या स्फुरणरूप विशेषभावांचे अपेक्षेने त्या लहरींना आधार असणारे जे पाणी त्याचे ठिकाणी सामान्य भाव असतो. त्याप्रमाणेच आपल्या आत्मचैतन्यावर उठणाऱ्या मनोवृत्तिरूप लहरी नेहमी विशेषरूपाने प्रत्ययाला येतात. सुखदु:ख, लाभालाभ, जयापजय वगैरे सर्व त्या मनोवृत्तिरूप विशेषभावाचेच प्रकार आहेत. या मनोवृत्तिरूप विशेषभावाशी जीव आपले नेहमी ऐक्य करीत व मी सुखी, मी दु:खी, माझा लाभ, माझी हानी, माझा जय, माझा पराजय असे म्हणत 'मी मी' म्हणून स्फुरत असतो. किंवा अशा विशेषभावाने आपली कांही कल्पना करीत 'मी' म्हणून स्फुरणे हेच जीवदशेचे स्वरूप आहे. पण पाण्याच्या लहरीचे खाली जसे आधारभूत सामान्य पाणी असते व लहरीचा विशेषभाव सुटला की ती सामान्यरूप पाण्याशी मिळून तीही सामान्यरूप पाणीच होऊन जाते, त्याप्रमाणेच जीवाने सुखदु:ख, लाभालाभ इत्यादी विशेषभावांशी ऐक्य करणे सोडून दिले की त्याची विशेषभावरूप जीवदशा नाहीशी होऊन, तो जीव आपल्या सामान्य आत्मदशेशी किंवा ब्रह्मरूपाशी ऐक्य पावतो व मग त्याला कर्माचा स्पर्श होत नाही. येथे भगवंतांनी सांगितलेली सुखदु:खसमता, लाभालाभसमता दिसते तितकी सोपी नाही. ती विषयवैराग्य, आत्मज्ञान, भक्ती इत्यादी साधनानेच साधणारी आहे. येथे पाप केव्हा लागत नाही हे सांगण्यापुरताच त्या समतेचा भगवंतांनी उल्लेख केला आहे व सर्व प्रसंगी सम म्हणजे ब्रह्म, या ठिकाणी चित्त ठेवून तेथे स्थिर करीत गेल्यासच ही समता साधते असे ध्वनित केले आहे.

मनाला जे अनुकूल वाटते त्यापासून मनाला सुख होते व जे मनाला प्रतिकूल वाटते त्यापासून दु:ख होते. सुखदु:ख याप्रमाणे मनाच्या अनुकूल व प्रतिकूल वाटण्यावर अवलंबून असते. विषयाच्या या अशा सुखदु:खकाली मन विषम होते, म्हणून जेव्हा मनात सुखदु:ख हे विषमभाव उत्पन्न होत नाहीत किंवा मनावर येत नाहीत, तेव्हाच मन सम होते. आत्मज्ञान होऊन सुखदु:ख मिथ्या आहे किंवा मन:कल्पित आहे असे वाटल्यावाचून सुखदु:खाचे

प्रसंगी मन सम राहू शकत नाही. म्हणून आत्मविचाराने सर्व खोटे समजून घेऊन व सर्वांची उपेक्षा करून, साक्षी होऊन राहिल्यासच सुखदु:ख सम होते, असा या श्लोकाचा भावार्थ आहे.

आत्मज्ञान नसून अत्यंत धैर्याने एखादा पुरुष दु:ख सहन करतो हे आपण पाहतो खरे, पण तेथेही मनाला दु:ख प्रतिकूल वाटतच असते; पण तो ते धैर्याने सहन करतो व प्रतिकूल वाटत असते म्हणून दु:खभोगही होतो. नाहीतर सुखभोगाचे वेळी जसे मनाला धैर्य धरावे लागत नाही, तसे दु:खभोगाचे वेळीही धैर्य धरण्याची आवश्यकता पडू नये. धैर्यामुळे दु:खाची उपेक्षा होते. कर्तव्याच्या प्रेमाने दु:ख सहन करता येते, पण त्याचा अर्थ वरप्रमाणेच आहे. म्हणजे दु:ख सहन करता येते या म्हणण्यातच दु:खाविषयी मनाची प्रतिकूलता कायम राहते.

सारांश, सम अशा ब्रह्मवस्तूचे ठिकाणी मन स्थिर करून व तद्व्यतिरिक्त मिथ्या मानूनच सुखदु:ख सम पाहता येते हेच येथे भगवंतांनी सांगितले आहे.

**एषा तेऽभिहिता साङ्ख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु। बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्मबन्धं प्रहास्यसि॥ ३९॥**

**नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते। स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात्॥ ४०॥**

**अर्थ**—अर्जुना! ज्ञानयोगात केवळ ज्ञानरूप निर्गुण अशा सम ब्रह्मस्वरूपाचे ठिकाणी बुद्धी स्थिर कशी ठेवायची हे तुला सांगितले, आता सगुण भगवत्स्वरूपाचे ठिकाणी बुद्धी स्थिर कशी करायची हे तुला सांगतो ऐक. या बुद्धीने युक्त झाले असता कर्माचा बंध लागत नाही.॥ ३९॥ या कर्मयोगबुद्धीने आरंभिलेल्या कर्माचा नाश होत नाही व त्यात दोषही उत्पन्न होत नाहीत. आणि कर्मयोगाचे अल्पदेखील आचरण जन्ममरणरूपी महाभयापासून मनुष्याला मुक्त करते.॥ ४०॥

**हे सांख्यस्थिति मुकुलित। सांगितली तुज एथ। आतां बुद्धियोगु निश्चित। अवधारीं पां॥ २३०॥**
**जया बुद्धियुक्ता। जाहालिया पार्था। कर्मबंधु सर्वथा। बाधूं न पवे॥ २३१॥**
**जैसें वज्रकवच लेइजे। मग शस्त्रांचा वर्षावो साहिजे। परी जैतेंसीं उरिजे। अचुंबिता॥ २३२॥**
**तैसें ऐहिक तरी न नशे। आणि मोक्षु तो उरला असे। जेथ पुर्वानुक्रमु दिसे। चोखाळत॥ २३३॥**
**कर्माधारें राहाटिजे। परी कर्मफळ न निरीक्षिजे। जैसा मंत्रज्ञु न बधिजे। भूतबाधा॥ २३४॥**
**तियापरी जे सुबुद्धि। आपु जालिया निरवधि। हा असतांचि उपाधि। आकळूं न सके॥ २३५॥**
**जेथ न संचरे पुण्यपाप। जें सुक्ष्म अति निष्कंप। गुणत्रयादि लेप। न लगती जेथ॥ २३६॥**
**अर्जुना ते पुण्यवशें। जरी अल्पचि हृदयीं बुद्धि प्रकाशे। तरी अशेषही नाशे। संसारभय॥ २३७॥**

**अर्थ**—अर्जुना! मी तुला हा ज्ञानमार्ग संक्षिप्तरूपाने सांगितला आहे. आता बुद्धियोग म्हणजे कर्मयोग सांगतो, इकडे लक्ष दे.॥ २३०॥ ज्या बुद्धियोगाने युक्त होऊन कर्म केले असता अर्जुना! कर्म मुळीच बंधनकारक होत नाही.॥ २३१॥ ज्याप्रमाणे अभेद्य कवच अंगावर घालून युद्धामध्ये होणारा शस्त्रांचा वर्षाव सहन करता येतो व हटकून जय प्राप्त होतो.॥ २३२॥ त्याप्रमाणे ऐहिक राज्यादी सुखाची हानी न होता व शेवटी मोक्ष किंवा भगवत्प्राप्तीही होते. कारण या बुद्धियोगात ज्ञानयोगाने प्राप्त होणारी स्थितीही कायम राहते.॥ २३३॥ स्वधर्माप्रमाणे आचरण करावे, पण धर्माप्रमाणे वागले असता जे फळ प्राप्त होते म्हणून सांगितले असेल, त्या फळाची प्राप्ती व्हावी अशी इच्छा मात्र धरू नये. ज्याप्रमाणे मांत्रिकाला भूताची बाधा होत नाही.॥ २३४॥ त्याप्रमाणे बुद्धियोगरूपी सद्‌बुद्धी पूर्ण प्राप्त झाली असता ही असलेली कर्मबंधरूपी उपाधी बाधू शकत नाही.॥ २३५॥ या सद्‌बुद्धीचे ठिकाणी पुण्यपापाचा प्रवेश होत नाही. ही सद्‌बुद्धी सूक्ष्म असून अत्यंत निश्चल असते, म्हणजे कधी ढळत नाही. सत्वादी त्रिगुणांचा तेथे स्पर्श होत नाही.॥ २३६॥ अर्जुना! पूर्वपुण्याने ती थोडीशी जरी हृदयात प्रगट झाली तरी नि:शेष संसाराची म्हणजे जन्ममृत्यूची भीती नाहीशी होते.॥ २३७॥

**गूढार्थदीपिका—सांख्ययोग व बुद्धीयोग**

ज्ञानयोगातील बुद्धीच्या समस्थितीलाच साक्षी म्हणतात. साक्षी हा उदासीन व अकर्ता असल्यामुळे निर्गुणनिष्ठ

राहून किंवा साक्षी होऊन व सुखदु:ख सम मानून कर्म करणे शक्य नसते; म्हणून निर्गुण स्वरूपाची प्राप्ती करून घेणाऱ्या अतीविरक्त व ज्याची कर्मप्रवृत्ती अती क्षीण आहे अशा ब्राह्मणाकरिता सांख्ययोग सांगितला आहे.

ज्यांच्या ठिकाणी कर्मप्रवृत्ती प्रबळ आहे अशा ब्राह्मणादिक जातीकरिता कर्मयोग सांगतात. या बुद्धियोगाने (कर्मयोगाने) कर्म केले असता कर्माचा बंध उत्पन्न होत नाही, पाप उत्पन्न होत नाही, व कर्म उणेपुरे कसेही झाले तरी व्यर्थ जात नाही. कारण बुद्धियोगाने केलेले कर्म ईश्वराप्रीत्यर्थच होत असते.

**व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनन्दन। बहुशाखा ह्यनन्ताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम्॥ ४१॥**

**अर्थ**—हे कुरुपुत्रा अर्जुना! ज्या बुद्धीने सत्याचा निश्चय होतो ती बुद्धी एकच आहे, पण बदलणाऱ्या व खोट्या वस्तूंचा निश्चय करणाऱ्यांची बुद्धी मात्र पुष्कळ प्रकारची असते. ॥ ४१ ॥

**जैसी दीपकळिका धाकुटी। परी बहु तेजातें प्रगटी। तैसी सद्बुद्धि हे थेकुटी। म्हणों नये॥ २३८॥**
**पार्था बहुतीं परी। हे अपेक्षिजे विचारशूरीं। जे दुर्लभ चराचरीं। सद्वासना॥ २३९॥**
**आणिकासारिखा बहुवसु। जैसा न जोडे परिसु। कां अमृताचा लेशु। दैवगुणें॥ २४०॥**
**तैसी दुर्लभ जे सद्बुद्धि। जिये परमात्माचि अवधि। जैसा गंगेसी उदधि। निरंतर॥ २४१॥**
**तैसा ईश्वरावांचूनि कांहीं। जिये आणीक लाहाणें नाहीं। ते एकचि बुद्धि पाहीं। अर्जुना जगीं॥ २४२॥**
**येरी ते दुर्मति। जे बहुधा असे विकरती। तेथ निरंतर रमती। अविवेकिये॥ २४३॥**
**म्हणोनि तयां पार्था। स्वर्ग संसार नरकावस्था। आत्मसुख सर्वथा। दृष्ट नाहीं॥ २४४॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे दिव्याची ज्योती लहान असली तरी बराच प्रकाश देते. त्याप्रमाणेच ही सद्बुद्धी आत्मप्रकाश देणारी असल्यामुळे अल्प म्हणता येत नाही. ॥ २३८ ॥ अर्जुना! श्रेष्ठ विचारी पुरुषांनी हिची प्राप्ती करून घेण्याची आवश्यकता आहे, असे अनेक कारणास्तव म्हणता येईल; कारण ही सद्बुद्धी जगात दुर्लभ आहे. ॥ २३९ ॥ ज्याप्रमाणे इतर दगडाप्रमाणे कोठेही परीस सांपडणे शक्य नाही किंवा अमृताचा एक थेंब प्राप्त होणे देखील दैवाधीनच असते. ॥ २४० ॥ त्याप्रमाणे ही सद्बुद्धी दुर्लभ आहे. या सद्बुद्धीचा प्रवाह परमात्म्याकडे असून तो परमात्म्यातच मिळतो. ज्याप्रमाणे गंगा समुद्राकडे वाहते व समुद्रातच मिळते. ॥ २४१ ॥ त्याप्रमाणे या सद्बुद्धीला परमेश्वरावाचून दुसरे काहीही आवडत नाही. ही सद्बुद्धि ज्यांना प्राप्त होते त्या सर्वांचे ठिकाणी अर्जुना! अशी ती एक प्रकारचीच असते. ॥ २४२ ॥ बाकीच्या ज्या दुर्मती किंवा परमेश्वराचा लाहो न करता विषयसुखाचा लाहो किंवा सोस वाहणाऱ्या अनेक प्रकारांनी विकारवश झालेल्या वाईट बुद्ध्या आहेत, त्यांचे ठिकाणी अविचारी लोकच रमतात. ॥ २४३ ॥ म्हणून अर्जुना! त्या विषयासक्त बुद्धिमुळे त्या अविचारी लोकांना स्वर्ग, संसार किंवा नरक या तीन गतीच मिळतात. मोक्षसुख त्यांना भोगण्यास कधी मिळत नाही. ॥ २४४ ॥

**गूढार्थदीपिका—व्यवसायात्मिका व अव्यवसायात्मिका बुद्धि**

बुद्धिही सत्पक्षपाती आहे, असे शास्त्रात म्हटले आहे. सत्पक्षपाती म्हणजे सत्याचा पक्ष धरणारी, आणि सत्य म्हणजे त्रिकालाबाधित किंवा ज्याचा कधी नाशच होत नाही ते. असे सत्य एक ब्रह्मच आहे. म्हणूनच त्या परब्रह्माला सत्य म्हणतात. सत्य एकच असू शकते. अनेक सत्य असू शकत नाहीत. म्हणून परब्रह्मावाचून दुसरे कांहीही सत्य राहू शकत नाही. व्यवसाय म्हणजे खरा निश्चय किंवा कधी न बदलणारा निश्चय होय. असा निश्चय अद्वितीय परब्रह्माचाच होऊ शकतो, म्हणून एक परब्रह्मच सत्य आहे व दुसरे सर्व खोटे, असा निश्चय करणाऱ्या बुद्धीलाच व्यवसायात्मिका बुद्धि म्हणतात. ती परमेश्वराचे ठिकाणीच स्थिर असते. अर्थात् जिचा निश्चय क्षणोक्षणी बदलतो ती बुद्धि अव्यवसायात्मिका म्हटली जाते. ब्रह्मविषयक व्यवसायात्मिका बुद्धि एका प्रकारचीच असते, म्हणजे ती ज्यांना ज्यांना प्राप्त होते त्यांचा अनुभव एकच असतो.

**यामिमां पुष्पितां वाचं प्रवदन्त्यविपश्चितः। वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः॥ ४२॥**
**कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम्। क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति॥ ४३॥**

**भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम् । व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ॥ ४४ ॥**

**अर्थ**—वेदाचा अर्थ करण्यात पटू असणारे जे लोक वेदात सांगितलेल्या कर्माच्या विषयसुखरूप गोड दिसणाऱ्या फळावर लक्ष ठेऊन हेच कर्माचे फळ होय, दूसरे कोणते नाही असे म्हणतात, ते लोक अविवेकी मूर्ख होत. ॥ ४२ ॥ ते लोक अखंड विषयसुखाची वासना करीत, स्वर्गादिक सुखाच्या प्राप्तीची इच्छा करीत राहतात व पुन: पुन: जन्मकर्म हेच फळ देणाऱ्या अशा नानाप्रकारची क्रिया-कर्मे, भोग व ऐश्वर्य गती प्राप्त होण्याकरिता करीत असतात. ॥ ४३ ॥ भोग व ऐश्वर्य यांच्यात ज्यांचे चित्त आसक्त झाले आहे व त्यामुळे विवेक नाहीसा होऊन जे अविवेकी झाले आहेत, त्यांची निश्चयात्मिका बुद्धी परमेश्वराचे ठिकाणी स्थिर होत नाही. ॥ ४४ ॥

**वेदाधारें बोलती। केवळ कर्म प्रतिष्ठिती। परी कर्मफळीं आसक्ती। धरूनियां ॥ २४५ ॥**
**म्हणती संसारीं जन्मिजे। यज्ञादि कर्म कीजे। मग स्वर्गसुख भोगिजे। मनोहर ॥ २४६ ॥**
**एथ हें वांचूनि कांहीं। आणिक सर्वथा सुखचि नाहीं। ऐसें अर्जुना बोलती पाहीं। दुर्बुद्धि ते ॥ २४७ ॥**
**देखें कामना अभिभूत। होऊनि कर्मे आचरत। ते केवळ भोगीं चित्त। देऊनियां ॥ २४८ ॥**
**क्रियाविशेषें बहुतें। न लोपितीं विधीतें। निपुण होऊनि धर्मातें। अनुष्ठिती ॥ २४९ ॥**
**परी एकचि कुडें करिती। जे स्वर्गकामु मनीं धरिती। यज्ञपुरुषा चुकती। भोक्ता जो ॥ २५० ॥**
**जैसा कर्पूराचा राशि कीजे। मग अग्नि लाऊनि दीजे। कां मिष्टान्नीं संचरविजे। काळकूट ॥ २५१ ॥**
**दैवें अमृतकुंभ जोडला। तो पायें हाणोनि उलंडिला। तैसा नासिती धर्मु निपजला। हेतुकपणें ॥ २५२ ॥**
**सायासें पुण्य अर्जिजे। मग संसारु कां अपेक्षिजे। परी नेणती ते काय कीजे। अप्राप्त देखें ॥ २५३ ॥**
**जैसी रांधवणी रससोय निकी। करूनियां मोलें विकी। तैसा भोगासाठीं अविवेकी। धाडिती धर्मु ॥ २५४ ॥**
**म्हणोनि हे पार्था। दुर्बुद्धि देख सर्वथा। तयां वेदवादरतां। मनीं वसे ॥ २५५ ॥**

**अर्थ**—हे लोक वेदाचा आधार घेऊन बोलतात व केवळ कर्माचे प्रतिपादन करतात. म्हणजे वेदाने कर्मच करायला सांगितले आहे असे प्रतिपादतात. पण हे सर्व त्यांचे प्रतिपादन कर्माच्या फळाशी आसक्ती मनात धरून असते. ॥ २४५ ॥ संसारी जन्मावे व यज्ञादिक कर्मे करून स्वर्गातील सुंदर सुख भोगावे असे त्यांचे म्हणणे असते. ॥ २४६ ॥ अर्जुना! यावाचून दुसरे सुखच नाही असे हे दुर्बुद्धी लोक म्हणत असतात. ॥ २४७ ॥ याप्रमाणे विषयसुखभोगाच्या तावडीत गेलेले हे लोक केवळ विषयसुख भोगण्याच्या इच्छेनेच कर्मे करतात. ॥ २४८ ॥ ते स्वर्गसुख मिळावे म्हणून यत्किंचित विधीचा लोप न होऊ देता निष्णात होऊन नानाप्रकारची कर्मे करतात. ॥ २४९ ॥ पण सर्व कर्मांचा फळ भोक्ता जो यज्ञपुरुष त्याच्या प्राप्तीची इच्छा न धरता स्वर्गसुखाची इच्छा मनात धरतात हेच एक वाईट करतात. ॥ २५० ॥ ज्याप्रमाणे कापुराचा ढीग करून त्याला अग्नी लावावा अथवा मिष्टान्नात विष कालवावे. ॥ २५१ ॥ किंवा दैवाने अमृताचा घडा सापडला असता तो पायाने उलंडून द्यावा. त्याप्रमाणे क्षुल्लक विषयसुखाची कामना मनात धरून धर्माचरण करतात. ॥ २५२ ॥ श्रम करून पुण्य जोडावे, मग त्यापासून संसाराची इच्छा कां करावी? पण काय करावे? या अज्ञानी लोकांना विचारच नसतो. ॥ २५३ ॥ जसे चांगले उत्तम प्रकारचे अन्न शिजवावयाचे व शेवटी ते द्रव्य घेऊन विकायचे, तसे अविचारी लोक केवळ विषयसुख मिळविण्याकरिताच धर्मानुष्ठानाचा उपयोग करतात. ॥ २५४ ॥ म्हणून अर्जुना! वेदाचा कर्मपर अर्थ लावणारे जे पुरुष असतात त्यांच्या ठिकाणी अशी दुर्बुद्धी असते, पहा. ॥ २५५ ॥

**गूढार्थदीपिका—भोगासाठीं अविवेकी। धाडिती धर्मु**

भगवंताची वेदाज्ञा निष्काम चित्ताने पाळून व फळासह ते कर्म भगवंतालाच अर्पण करून, भगवंताला संतुष्ट करावे, हा धर्माचा मुख्य हेतू आहे. निष्काम आज्ञा पालन करणे हेच प्रथम प्रेमाचे लक्षण होय. भगवंताची धर्माज्ञा निष्काम चित्ताने पाळण्यातही असेच भगवंताचे प्रेम जोडले जाते. तेव्हा ज्या निष्काम धर्माचरणाने अविनाशी सुखस्वरूप परमात्म्याची प्राप्ती होते, तो सोडून क्षणिक विषयसुखाच्या प्राप्तीची इच्छा करणे करंटेपणच

म्हटले पाहिजे. पण असा सद्विचार करणारी ही व्यवसायात्मिका म्हणजे सद्बुद्धि, कर्मासक्त व विषयासक्त पुरुषांचे ठिकाणी कर्मासक्ती व विषयासक्तीमुळे अत्यंत झाकली गेलेली असते व क्षणोक्षणी जिचा निश्चय बदलतो अशी अव्यवसायात्मिका बुद्धिच त्यांचे ठिकाणी राहते; म्हणून त्यांची व्यवसायात्मिका बुद्धि प्रकट होऊन परमेश्वराचे ठिकाणी स्थिर होऊ शकत नाही.

**त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन। निर्द्वन्द्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान्॥ ४५॥**

**अर्थ**—अर्जुना! वेद हे तीन गुणांच्या विषयांचे वर्णन करणारे आहेत. तू तीन गुण रहित हो व सुखदु:खादि द्वंद्वरहित नित्यसत्वस्थ, अप्राप्त वस्तूची प्राप्ती व प्राप्त वस्तूंचे रक्षण यांची चिंता सोडून आत्मवस्तूचे ठिकाणी चित्त स्थिर ठेवून राहा.॥ ४५॥

**तिहीं गुणीं आवृत। हे वेद जाणे निभ्रांत। म्हणोनि उपनिषदादि समस्त। सात्त्विक ते॥ २५६॥**
**येर रजतमात्मक। जेथ निरूपिजे कर्मादिक। जे केवळ स्वर्गसूचक। धनुर्धरा॥ २५७॥**
**म्हणोनि तूं जाण। हे सुखदु:खांसीच कारण। एथ झणें अंत:करण। रिगों देसी॥ २५८॥**
**तूं गुणत्रयातें अव्हेरीं। मी माझें हें न करीं। एक आत्मसुख अंतरीं। विसंब झणीं॥ २५९॥**

**अर्थ**—सर्व वेद त्रिगुणात्मक आहेत असे नि:संशय समज. त्यात उपनिषदादी भाग हा सात्विक आहे.॥ २५६॥ आणि बाकीचा वेदभाग, अर्जुना! रजतमात्मक आहे. कारण त्यात कर्मादिकांचे निरूपण असून, त्या कर्माने स्वर्गादी विषयसुख मिळते हे सांगितले आहे.॥ २५७॥ म्हणून कर्मप्रतिपादक वेदाचा रजतमात्मक जो भाग आहे तो सुखदु:ख प्राप्त करून देणाराच आहे. तेथे आपले अंत:करण जाऊ देऊ नकोस.॥ २५८॥ तू तिन्ही गुणाचा अव्हेर कर व हा मी व हे माझे असे चित्तात ठेऊ नकोस व अंतरात एक आत्मसुख ठेव ते मात्र सोडू नको.॥ २५९॥

**यावानर्थ उदपाने सर्वत: सम्प्लुतोदके। तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानत:॥ ४६॥**

अर्थ—सर्वत्र जलमय झाले असताही पाणी पिणे वगैरेकरिता जितके पाणी लागते तितक्याच पाण्याचा ज्याप्रमाणे आपण उपयोग करून घेतो, त्याप्रमाणे जाणत्या ब्राह्मणाला सर्व वेदांमध्ये त्याच्या उपयोगाचा मार्गच काढून घेणे योग्य असते.॥ ४६॥

**जरी वेदें बहुत बोलिलें। विविध भेद सूचिले। तऱ्ही आपण हित आपुलें। तेंचि घेपें॥ २६०॥**
**जैसा प्रगटलिया गभस्ती। अशेषही मार्ग दिसती। तरी तेतुलेही काय चालिजती। सांगें मज॥ २६१॥**
**कां उदकमय सकळ। जऱ्ही जाहलें असे महीतळ। तरी आपण घेपें केवळ। आर्तीचजोगें॥ २६२॥**
**तैसे ज्ञानिये जे होती। ते वेदार्थातें विवरिती। मग अपेक्षित तें स्वीकारिती। शाश्वत जें॥ २६३॥**

**अर्थ**—वेदाने पुष्कळ बोलणे करून विविध मार्ग सुचविले असले तरी आपण आपल्याला जे हितकर असेल तेच त्यातून घेतले पाहिजे.॥ २६०॥ ज्याप्रमाणे सूर्योदय झाला म्हणजे जेवढे मार्ग असतील तेवढेही प्रकाशित होतात, पण प्रकाशित झालेल्या सर्वच मार्गाने आपण जातो काय? सांग बरे, अर्जुना!॥ २६१॥ किंवा सर्व पृथ्वी जलमय झाली असली तरी आपण आपल्या गरजे पुरतेच पाणी घेतो, नाही काय?॥ २६२॥ त्याप्रमाणे ज्ञानी जे असतात ते वेदाच्या उपदेशाचा विचार करतात आणि आपल्याला जे शाश्वत आहे, ते अपेक्षित आहे असे जाणून तेच शाश्वत किंवा अविनाशी तत्त्व स्वीकारतात.॥ २६३॥

**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन। मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते सङ्गोऽस्त्वकर्मणि॥ ४७॥**

**अर्थ**—तू कर्माचाच अधिकारी आहेस. फलाच्या ठिकाणी कधी अधिकार बाळगू नकोस. तू कर्मफलाचे निमित्त कधी होऊ नयेस आणि अकर्माचे ठिकाणी तुझी आसक्ती नसावी.॥ ४७॥

**म्हणोनि आइकें पार्था। याचिपरी पाहातां। तुज उचित होय आतां। स्वकर्म हें॥ २६४॥**
**आम्हीं समस्तही विचारिलें। तंव ऐसेंचि हें मना आलें। जे न संडिजे तुवां आपुलें। विहित कर्म॥ २६५॥**
**परी कर्मफळीं आस न करावी। आणि कुकर्मी संगति न व्हावी। हे सत्क्रियाचि आचरावी। हेतूविण॥ २६६॥**

**अर्थ**—म्हणून अर्जुना! मी काय सांगतो ते ऐक. याप्रमाणे विचार केल्यास तुला स्वधर्मरूपी युद्ध करणेच योग्य आहे. ॥ २६४ ॥ आम्ही सर्व तऱ्हेने विचार केला असता असेच आमच्या मनाला वाटते की तू आपले विहित कर्म सोडू नयेस. ॥ २६५ ॥ परंतु कर्म करीत असताना कर्मापासून मला इच्छित फळ प्राप्त झाले पाहिजे असे मात्र मनात धरू नये आणि कर्माचा त्यागही करू नये. फळाविषयीची इच्छा मनात न ठेवता ही स्वधर्मरूपी सत्क्रियाच आचरणे योग्य होय. ॥ २६६ ॥

**गूढार्थदीपिका—तुज उचित होय.........स्वकर्म हें**

प्रबल कर्मप्रवृत्ती असलेल्या ब्राह्मणाला देखील संन्यासाधिकार नाही. अर्जुन हा प्रबल कर्मप्रवृत्ती असलेल्या क्षत्रियजातीतला होता आणि त्याला संन्यासाधिकार नव्हता, हे शास्त्रात स्पष्ट आहे.

**नहि क्षत्रियवैश्ययोः पारिव्राज्यप्रतिपत्तिरस्ति।** वृह० शां० भा० (४। ५। १५)

क्षत्रिय वैश्यांना कर्मसंन्यासाचा अधिकार नाही, म्हणून भगवान् येथे "**कर्मण्येवाधिकारस्ते**" कर्माचाच तू अधिकारी आहेस असे निक्षून सांगतात.

**योगस्थः कुरु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा धनञ्जय। सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते॥ ४८ ॥**

**अर्थ**—अर्जुना! कर्म सिद्धीला जावो वा न जावो, या दोन्ही ठिकाणी चित्त सम ठेवणे किंवा हे दोन्ही सम लेखणे याला योग म्हणतात. असे सम चित्त ठेवून व कर्मफलाची आसक्ती सोडून कर्मे कर. ॥ ४८ ॥

**तूं योगयुक्त होउनी। फळाचा संग सांडुनी। मग अर्जुना चित्त देऊनी। करीं कर्मे॥ २६७ ॥**
**परी आदरिलें कर्म दैवें। जरी समाप्तीतें पावे। तरी विशेषें तेथ तोषावें। हेंहि नको॥ २६८ ॥**
**कां निमित्तें कोणें एकें। तें सिद्धी न वचतांचि ठाके। तरी तेथिंचेनि अपरितोखें। क्षोभावें ना॥ २६९ ॥**
**आचरतां सिद्धी गेलें। तरी काजाचि कीर आलें। परी ठेलियाही सगुण जाहालें। ऐसेंचि मानीं॥ २७० ॥**
**देखें जेतुलालें कर्म निपजे। तेतुलें आदिपुरुषीं जरी अर्पिजे। तरी परिपूर्ण सहजें। जाहालें जाणें॥ २७१ ॥**
**देखें सतासत् कर्मीं। हें जें सरिसेपण मनोधर्मीं। तेचि योगस्थिति उत्तमीं। प्रशंसिजे॥ २७२ ॥**

**अर्थ**—अर्जुना! तू योगयुक्त हो व फळाची आसक्ती सोडून कर्माकडे चित्त देऊन कर्मे कर. ॥ २६७ ॥ परन्तु करायचे कर्म जर सुदैवाने पूर्ण झाले तर त्यायोगे आनंद मानण्याची गरज नाही. ॥ २६८ ॥ किंवा काही कारणामुळे ते कर्म सिद्धीस न जाता अपूर्ण राहिले तर त्यामुळे असंतोष मानण्याचे किंवा मन:क्षोभ होऊ देण्याचे कारण नाही. ॥ २६९ ॥ कर्म केले व सिद्धी झाली तर बरेच झाले किंवा कर्म सिद्धीस गेले नाही तरी ते सफल झाले असेच मानावे. ॥ २७० ॥ अर्जुना! पहा, जेवढे काही आपल्याकडून कर्म होते तेवढेही परमेश्वराला समर्पण करावे. कर्म परमेश्वराला समर्पण केले की परिपूर्ण होतेच. ॥ २७१ ॥ पहा, अशा रीतीने होणाऱ्या बरे वाईट कर्माचे ठिकाणी जी चित्ताची समता याचीच सज्जन लोक योगस्थिती म्हणून प्रशंसा करतात. ॥ २७२ ॥

**गूढार्थदीपिका—योगयुक्त होउनी......करीं कर्मे**

येथे भगवंतानी अर्जुनाला योगस्थ राहून कर्म करण्याचा उपदेश केला आहे. "योग" या शब्दाचा ऐक्य असा अर्थ आहे. बुद्धीचे परमेश्वराशी ऐक्य करून कर्मे कर असे भगवान येथे सांगत आहेत जीवदशेत बुद्धीचे देहादिकांशी ऐक्य झालेले असते. त्या देहादिकांकरिता कर्म केले तर ते बंधनकारक होते. पण परमेश्वराशी बुद्धीचे ऐक्य ठेवून किंवा परमेश्वराच्या आसक्तीने कर्म केल्यास ते बंधनकारक होत नाही.

'योग' या शब्दाचा अनासक्ती असा कित्येक अर्थ करतात. पण असा अर्थ केला तरी जी वस्तू बुद्धीला सत्य वाटते तेथेच ती आसक्त होते, असा बुद्धीचा स्वभाव आहे. बुद्धीचा स्वभाव निश्चय करणे असला तरी तिला जी वस्तू खरी वाटते तिचाच ती निश्चय करते व ती ज्या वस्तूचा निश्चय करते ती वस्तू खरी वाटल्यावाचून बुद्धी निश्चयच करीत नाही.

विषय व परमात्मा किंवा आत्मा व अनात्मा असे दोनच पदार्थ आहेत. त्यांपैकी योग्य विचार न करता देहादी

अनात्म पदार्थांच्या सत्यत्वाचा निश्चय करून बुद्धी तेथे आसक्त झाली व त्यांच्या ठिकाणी स्थित होऊन कर्मे झाल्यास ती कर्मे बंधनकारक होतात हे भगवंतांनी सांगीतले आहे. अर्थात् येथे देहादिकांची आसक्ती न ठेविता, कर्मे करायला भगवान सांगतात असे म्हटले तरी देहादिकांचे ठिकाणी अनासक्त असलेली बुद्धी परमेश्वराच्या सत्यत्वाचा व देहादिकांच्या मिथ्यत्वाचा निश्चय करून, ती बुद्धी देहादिकांची आसक्ती सोडू शकते व देहादिकांची आसक्ती सोडणारी बुद्धी परमेश्वराचे ठिकाणी स्थिर होते. एवंच कोणत्याही रीतीने पाहिले तरी ''योग'' या शब्दाचा अर्थ 'परमेश्वराचे ठिकाणी बुद्धीची स्थिती' असाच होतो.

कर्मयोगाचे अनुष्ठानात ''योगस्थः कुरु कर्माणि'' असे म्हटले आहे. ''योग'' या शब्दाचा अर्थ कर्माचरण करणे एवढाच जर घेतला तर ''योगस्थः कुरु कर्माणि'' या पदाचा अर्थ कर्माचे ठिकाणी स्थिर राहून कर्म कर, असा होतो. पण कर्मस्थ राहून कर्म कर या म्हणण्यात नुसती पुनरुक्ती होते व ''दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगात् धनंजय'' ह्या पुढील श्लोकात कर्मयोगापेक्षा नुसते कर्म करणे अत्यंत कनिष्ठ आहे, म्हणजे तसे कर्माचरण कर्मयोगाचे आचरण नव्हे. असे स्पष्ट सांगितले आहे. परमेश्वराचे ठिकाणी बुद्धी स्थिर न करता नुसते कर्म करणारा कर्मयोगी होऊ शकत नाही. कारण कर्मयोगाचेही मोक्ष हेच फळ आहे व ते मोक्षफळ केवळ कर्माने मिळत नाही. उलट तसे कर्माचरण बंधनकारक म्हणजे संसार देणारे होते, असे भगवंतांनीच स्पष्ट केले आहे.

**दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनञ्जय। बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः॥ ४९॥**
**बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते। तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम्॥ ५०॥**

**अर्थ**—बुद्धियुक्त होऊन केलेल्या कर्मापेक्षा बुद्धियोगावाचून केलेले कर्म फार कनिष्ठ आहे. कर्मफलाचे निमित्त होणारे पुरुष दरिद्री होत. म्हणून अर्जुना! तू बुद्धियुक्त होऊन कर्म कर.॥ ४९॥ बुद्धियुक्त झालेला पुरुष पापपुण्याने लिप्त होत नाही. म्हणून समचित्त होऊन राहा, किंवा परमेश्वराचे ठिकाणी चित्त ठेवून रहा. बरे किंवा वाईट कोणतेही कर्म होत असताना समचित्त असणे हेच कर्म बंधनकारक होऊ न देण्यातील कौशल्य आहे.॥ ५०॥

**अर्जुना समत्व चित्ताचें। तेंचि सार जाण योगाचें। जेथ मना आणि बुद्धीचें। ऐक्य आथी॥ २७३॥**
**तो बुद्धियोग विवरितां। बहुतें पाडें पार्था। दिसे हा अरुता। कर्मयोगु॥ २७४॥**
**परी तेंचि कर्म आचरिजे। तरीच हा योगु पाविजे। जें कर्मशेष सहजें। योगस्थिति॥ २७५॥**
**म्हणोनि बुद्धियोगु सधरु। तेथ अर्जुना होईं स्थिरु। मनें करीं अव्हेरु। फळहेतूचा॥ २७६॥**
**जे बुद्धियोगा योजिले। तेचि पारंगत जाहले। इहीं उभय संबंधीं सांडिले। पापपुण्यीं॥ २७७॥**

**अर्थ**—अर्जुना! पापपुण्य, सुखदुःख इत्यादि द्वंद्वात न सापडता चित्त त्याविरहित राहणे याला चित्ताचे समत्व म्हणतात व हे चित्ताचे समत्वच योगबुद्धीचे मर्म आहे. कारण या योगाने मन व बुद्धीचे ऐक्य होते.॥ २७३॥ या बुद्धियोगाचा विचार जर केला तर अर्जुना! नुसते कर्म करणे हे त्याच्याशी तुलनेत फार कमी दर्जाचे आहे असे दिसून येते.॥ २७४॥ पण बुद्धियोग कर्माचरणानेच प्राप्त होतो कारण योग हा कर्माचेच अंग आहे.॥ २७५॥ म्हणून नुसते कर्म करण्यापेक्षा बुद्धियोगस्थ राहून कर्म करणे श्रेष्ठ असल्यामुळे तेथे स्थिर राहून व कर्मफळाची इच्छा सोडून कर्मे कर.॥ २७६॥ बुद्धियोगाचे ठिकाणी जे स्थिर झाले तेच संसारसमुद्राच्या पार झाले, असे समज. कारण इहलोक व परलोक या दोहोंची प्राप्ती करून देणारे जे पापपुण्य त्याचा संबंधच या बुद्धियोगाने सुटतो.॥ २७७॥

**गूढार्थदीपिका—सार जाण योगाचें**

सुखदुःख, लाभालाभ यांना सोडून चित्त राहिले म्हणजे ते सम होते. पण हे समत्वच ब्रह्म असल्यामुळे, चित्ताचे समत्व म्हणजे चित्ताने ब्रह्मस्वरूपाचे ठिकाणी स्थिर होणेच होय. हे वर सांगितलेच आहे. आणि पुढे ५ व्या अध्यायामध्ये ''**निर्दोषं हि समं ब्रह्म**'' (अ० ५ श्लो० १९) सम म्हणजे ब्रह्म असा भगवंतांनीच स्पष्टार्थ केला आहे. असे चित्त ब्रह्माचे ठिकाणी स्थिर झाले असता त्यालाच समाधी म्हणतात. या समाधिस्थितीत जीवाची वृत्तिरूपता सुटून जाते व वृत्तिरूपता सुटली की पापपुण्याची जाणीव व त्याचे कर्तृत्वही राहत नाही, असा

जीव अनायासे मुक्त होतो. बुद्धियोगात सगुण भगवंताचे ठिकाणी कर्मसमर्पणद्वारा भगवंताचे ध्यान घडून बुद्धी स्थिर होत जाते. निर्गुण स्वरूपाप्रमाणे भगवंताचे सगुण स्वरूपही सम व व्यापकच असल्यामुळे, समत्वरूपी योग सगुणाचे ठिकाणीही साधतो.

''**योगः कर्मसु कौशलम्**'' ही योगाची व्याख्या नसून योगात कर्मांचे बंधकत्व नाहीसे करण्याचे कौशल्य आहे एवढेच दाखविले आहे.

**कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः। जन्मबन्धविनिर्मुक्ताः पदं गच्छन्त्यनामयम्॥ ५१॥**
**यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति। तदा गन्तासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च॥ ५२॥**
**श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला। समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि॥ ५३॥**

**अर्थ**—बुद्धियुक्त झालेले ज्ञानी पुरुष कर्मापासून उत्पन्न होणारे फल टाकून देऊन जन्ममरणापासून सुटतात व अखंड दुःखरहित अशा परमपदाला प्राप्त होतात. ॥ ५१ ॥ अर्जुना! मोहाने व्याप्त झालेली तुझी बुद्धी मोहरहित किंवा अविवेकरहित होईल तेव्हा आतापर्यंत ऐकलेले व ऐकण्याचे राहिलेले या सर्वांचाच तुला वीट येईल. ॥ ५२ ॥ श्रुतीतील अनेक साधने व त्यांची फळे यांची वर्णने ऐकून गांगरलेली तुझी बुद्धी जेव्हा समाधीचे ठिकाणी स्थिर होईल तेव्हाच तुला योगाची प्राप्ती होईल. ॥ ५३ ॥

**ते कर्मीं तरी वर्तती। परी कर्मफळा नातळती। आणि यातायाती लोपती। अर्जुना तयां॥ २७८॥**
**मग निरामयभरित। पावती पद अच्युत। ते बुद्धियोगयुक्त। धनुर्धरा॥ २७९॥**
**तूं ऐसा तैं होसी। जैं मोहातें यया सांडिसी। आणि वैराग्य मानसीं। संचरेल॥ २८०॥**
**मग निष्कळंक गहन। उपजेल आत्मज्ञान। तेणें निचाडें होईल मन। अपैसें तुझें॥ २८१॥**
**तेथ आणिक कांहीं जाणावें। कां मागिलातें स्मरावें। हें अर्जुना आघवें। पारुषेल॥ २८२॥**
**इंद्रियांचिया संगती। जियें पसरु होतसे मती। ते स्थिर होईल मागुती। आत्मस्वरूपीं॥ २८३॥**
**समाधिसुखीं केवळ। जैं बुद्धि होईल निश्चळ। तैं पावसी तूं सकळ। योगस्थिति॥ २८४॥**

**अर्थ**—जे पुरुष योगयुक्त असतात ते कर्म करतात, पण कर्मांचे फळाची इच्छा मात्र करीत नाहीत, म्हणून त्यांचे संसारात येणे जाणे नाहीसे होते. ॥ २७८ ॥ आणि ते अर्जुना! अत्यंत दुःखरहित व पतनरहित अशा परमपदाला प्राप्त होतात. ॥ २७९ ॥ जेव्हा तू या शोकापासून मुक्त होशील तेव्हा तूही तसा योगयुक्त होशील, मग तुझे मन विषयवैराग्याने संपन्न होईल. ॥ २८० ॥ मग त्या वैराग्याने अत्यंत शुद्ध व तर्कातीत असे आत्मज्ञान प्राप्त होईल व त्या आत्मज्ञानाने विषयसुखाची इच्छा निःशेष नाहीशी होईल. ॥ २८१ ॥ त्याचप्रमाणे अर्जुना! मग काही जाणण्याची इच्छा किंवा काही स्मरण्याची इच्छाही नाहीशी होईल. ॥ २८२ ॥ इंद्रियांचे संगतीमुळे जी आपली मती नाना विषयांकडे बहुरूप होऊन धावते ती आत्मस्वरूपाचे ठिकाणी स्थिर होईल. ॥ २८३ ॥ अशा रीतीने केवळ समाधीतच जेव्हा बुद्धी स्थिर होईल तेव्हा तुला पूर्ण योगस्थिती प्राप्त होईल. ॥ २८४ ॥

**गूढार्थदीपिका—पावसी तूं सकळ। योगस्थिति**

**मागे ''योगस्थः कुरु कर्माणि'' योगस्थ राहून कर्म कर व**

**सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते।**

सिद्धी व असिद्धी यांचे ठिकाणी सम होऊन म्हणजे आपला जयच झाला पाहिजे किंवा पराजय होऊ नये अशी कोणतीही इच्छा न धरता जय पराजय हे दोन्ही सारखेच मानून कर्म करणे या समबुद्धीला योग म्हणतात असे भगवंतांनी सांगितले. आता अशी समबुद्धी कोणत्या दशेत राहते हे आम्ही वर भगवंताचे वचन संगतीने स्पष्ट केले आहे. भगवानही पुनः येथे स्पष्ट करतात. समाधी म्हणजे सम अशा आत्मस्वरूपाचे ठिकाणी बुद्धी निश्चल झाली की योग म्हणजे आत्मैक्य प्राप्त होते व अखंड निश्चल अशा आत्मतत्वाचे ठिकाणी बुद्धी स्थिर करून कर्म केले असता बुद्धीही सम होते आणि सिद्धी असिद्धी यांचेकडे ती लक्षच देत नाही. सम अशा आत्मस्वरूपाचे ठिकाणी बुद्धी निश्चल झाल्याखेरीज सुखदुःख, लाभालाभ सम होत नाहीत.

*अर्जुन उवाच*

**स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव। स्थितधी: किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम्॥ ५४॥**

**अर्थ**—अर्जुन म्हणाला, ज्याचे चित्त परमेश्वराचे ठिकाणीच राहते अशा स्थिरचित्त किंवा समाधिस्थ पुरुषाची भाषा कोणती असते? असा स्थिरचित्त पुरुष काय बोलतो? कसा बसतो? व कसा चालतो?॥ ५४॥

**तेथ अर्जुन म्हणे देवा। हाचि अभिप्रावो आघवा। मी पुसेन आतां सांगावा। कृपानिधी॥ २८५॥**
**मग अच्युत म्हणे सुखें। जें किरीटी तुज निकें। तें पूस पां उन्मेखें। मनाचेनि॥ २८६॥**
**या बोला पार्थें। म्हणितलें सांग पां श्रीकृष्णातें। काय म्हणिपे स्थितप्रज्ञातें। वोळखों केवीं॥ २८७॥**
**आणि स्थिरबुद्धि जो म्हणिजे। तो कैसिया चिन्हीं जाणिजे। जो समाधिसुख भुंजे। अखंडित २८८॥**
**तो कवणें स्थिती असे। कैसेनि रूपीं विलसे। देवा सांगावें हें ऐसें। लक्ष्मीपती॥ २८९॥**
**तंव परब्रह्म अवतरणु। जो षड्गुणाधिकरणु। तो काय तेथ नारायणु। बोलतु असे॥ २९०॥**

**अर्थ**—तेव्हा अर्जुन देवाला म्हणाला हे कृपानिधे देवा! आता आपल्या म्हणण्याचा जो अभिप्रेत अर्थ असेल तो स्पष्ट होण्याकरिता जे काही मी विचारणार आहे ते आपण स्पष्ट करून सांगावे.॥ २८५॥ भगवान श्रीकृष्ण म्हणतात, अर्जुना! जे काय तुला विचारावेसे वाटेल ते खुशाल आनंदाने विचार.॥ २८६॥ भगवान् श्रीकृष्णाचे हे बोलणे ऐकून अर्जुन म्हणतो, देवा! स्थितप्रज्ञ पुरुष जो आपण म्हणता तो कसा ओळखावा हे सांगा॥ २८७॥ आणि ज्याची बुद्धी स्थिर झाली व जो अखंड समाधिसुख भोगतो तो कोणत्या चिन्हावरून तसा ओळखता येतो?॥ २८८॥ तो कोणत्या स्थितीत असतो, त्याचे रूप कसे असते? हे सर्व भगवंता! स्पष्ट सांगावे.॥ २८९॥ हे अर्जुनाचे म्हणणे ऐकून षड्गुणैश्वर्यसम्पन्न व साकार परब्रह्म भगवान् श्रीकृष्ण काय बोलता झाला ते ऐक.॥ २९०॥

**गूढार्थदीपिका—परब्रह्म अवतरणु........षड्गुणाधिकरणु**

"परब्रह्म अवतरण व षड्गुणाधिकरण" या दोन पदांनी श्रीज्ञानेश्वर महाराजांनी श्रीकृष्ण अवतार म्हणजे पूर्ण ब्रह्माचा यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य या सहा प्रकारच्या पूर्ण ऐश्वर्याला आधार होऊन झालेला पूर्ण अवतार होय असे स्पष्ट केले आहे. श्रीज्ञानेश्वर महाराज श्रीकृष्णस्वरूपाला कसे मानतात हे यावरून दिसून येण्याजोगे आहे.

*श्रीभगवानुवाच*

**प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान्। आत्मन्येवात्मना तुष्ट: स्थितप्रज्ञस्तदोच्यते॥ ५५॥**

**अर्थ**—जेव्हा पुरुष आपल्या अंत:करणातील संपूर्ण विषयसुखाची वासना सोडून देतो व आपल्या आत्मस्वरूपाचे ठिकाणी चित्त स्थिर करण्यात आनंद मानतो तेव्हा त्याला स्थितप्रज्ञ म्हणतात.॥ ५५॥

**म्हणे अर्जुना परियेसीं। जो हा अभिलाषु प्रौढ मानसीं। तो अंतराय स्वसुखेंसी। करीत असे॥ २९१॥**
**जो सर्वदा नित्यतृप्तु। अंत:करण भरितु। परी विषयामाजीं पतितु। जेणें संगें कीजे॥ २९२॥**
**तो कामु सर्वथा जाये। जयाचें आत्मतोषीं मन राहे। तोचि स्थितप्रज्ञु होये। पुरुष जाणें॥ २९३॥**

**अर्थ—भगवान् म्हणतात**—अर्जुना! ऐक. आपल्या अंत:करणात विषयाचे सुख भोगण्याची जी दृढ इच्छा असते, तीच आपल्या आत्मसुख भोगण्याच्या आड येते.॥ २९१॥ वास्तविक पाहता जीवात्मा नित्य सुखस्वरूप असल्यामुळे तो नित्यतृप्तच आहे, कारण ते आत्मसुख त्याच्या अंत:करणातही भरून आहे. पण या विषयसुखाचे वासनेमुळे विषयात आसक्त होतो.॥ २९२॥ ही विषयसुखाची वासना नि:शेष नाहीशी होऊन ज्या पुरुषाचे मन आत्मसुखातच तल्लीन राहते, तो पुरुष स्थितप्रज्ञ होय, असे जाण.॥ २९३॥

**गूढार्थदीपिका—तोचि स्थितप्रज्ञु होय। पुरुष जाणें**

या श्लोकात स्थितप्रज्ञ किंवा ज्ञानी पुरुषाचे एक लक्षण सांगितले आहे. ते लक्षण म्हणजे ज्याचे चित्तातून विषयसुखाची वासना नि:शेष नाहीशी झाली, तो स्थितप्रज्ञ होय. 'वासना' शब्द क्षणिक विषयसुखाचे इच्छेसच बहुधा लावला जातो. क्षणिक सुखाची वासना नाहीशी झाली की आत्मसुख प्रगट होते व स्थितप्रज्ञ पुरुष आत्मसुखानेच

सदा संतुष्ट असतो. अज्ञानी लोकांचे दृष्टीने स्थितप्रज्ञ पुरुष प्रारब्धानुसार विषय भोगताना दिसले तरी अज्ञानी पुरुषाचे चित्त जसे विषयभोगाचे वेळी विषयाकार होते, तसे स्थितप्रज्ञपुरुषांचे चित्त विषयभोगतानाही विषयाकार होत नाही. त्यांचे चित्त भगवदाकारच राहते व ते भगवत्सुखच भोगतात. कारण कर्मयोगाने अखंड भगवंताचे ठिकाणीच त्याचे चित्त जडत जाते व म्हणूनच ते क्रमाक्रमाने स्थितप्रज्ञ होतात.

**तुकाराम महाराज म्हणतात.**

**''विषय तो त्यांचा झाला नारायण''**

त्यांच्या सर्व इंद्रियांचा व मनाचा विषय नारायणच झालेला असतो, श्रीएकनाथ महाराज म्हणतात.

**''मुक्तींमाजी विशेषु कायी। वृत्ति निर्विषय असे पाही। भक्तांसी सर्व कर्माचे ठायीं। स्फुरण नाही विषयांचे॥ ६६२॥**
**भक्तांचे विषयीं नाहीं चित्त। त्यांचा विषय मी भगवंत। ते सदा मजमाजीं लोलुप्त। नित्यमुक्त या लागीं''॥ ६६३॥**

(ए० भा० अ० ११)

सारांश ज्ञानी भगवद्भक्ताला अखंड सगुण भगवंताचीच स्फूर्ती असते. म्हणून त्याचे मन विषयाकार होतच नाही व विषयसुखाची वासनाही होत नाही. ते अखंड आत्मसुखातच तल्लीन असतात.

**दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः । वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते॥ ५६॥**

**अर्थ**—दुःख प्राप्त झाले असता ज्यांचे चित्त खिन्न होत नाही, ज्यांना सुख प्राप्त व्हावे अशी इच्छा नसते व ज्यांच्या चित्तातून विषयसुखाची इच्छा, भय, क्रोध हे विकार नाहीसे झाले असून, ज्यांचे चित्त परमेश्वराचे ठिकाणी स्थिर झाले आहे त्यांना मुनी म्हणतात. ॥ ५६ ॥

**नाना दुःखीं प्राप्तीं। जयासी उद्वेगु नाहीं चित्तीं। आणि सुखाचिया आर्ती। अडपैजेना॥ २९४॥**
**अर्जुना तयाच्या ठायीं। कामक्रोधु सहजें नाहीं। आणि भयातें नेणें कंहीं। परिपूर्णु तो॥ २९५॥**
**ऐसा जो निरवधि। तो जाण पां स्थिरबुद्धि। जो निरसूनि उपाधि। भेदरहितु॥ २९६॥**

**अर्थ**—अर्जुना! नाना प्रकारची दुःखे प्राप्त झाली असता ज्याच्या मनात खिन्नता उत्पन्न होत नाही आणि जो सुख प्राप्त व्हावे अशा आशेत अडकून पडत नाही. ॥ २९४ ॥ अर्जुना! त्या स्थितप्रज्ञ पुरुषाचे ठिकाणी स्वाभाविकच काम क्रोध म्हणजे विषयाची इच्छा नसते व विषयाची इच्छा विफल झाली तरी त्याला क्रोधही येत नाही, असा तो स्थितप्रज्ञ पुरुष भयरहित परिपूर्ण आत्मस्वरूप होऊन राहतो. ॥ २९५ ॥ अशी ही ज्याची स्थिती अविनाशी असते व जो उपाधिरहित झाल्यामुळे ज्याला भेद मुळीच दिसत नाही, तो स्थितप्रज्ञ होय असे जाण. ॥ २९६ ॥

**यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् । नाभिनन्दति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता॥ ५७॥**
**यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः। इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता॥ ५८॥**

**अर्थ**—ज्याचे कोठेही प्रेम नसते आणि प्रारब्धबलाने जे जे सुखदुःख प्राप्त होईल त्याचा आनंद किंवा द्वेषही करीत नाही, अशा पुरुषाची प्रज्ञा म्हणजे बुद्धी स्थिर झाली असे समज. ॥ ५७ ॥ ज्याप्रमाणे कासव आपले हातापायादि अंगे सहजच आवरून घेतो, त्याप्रमाणे ज्या पुरुषाची इंद्रिये आपआपल्या विषयापासून सहज परावृत्त होतात. त्याचे चित्त स्थिर झाले असे समज. ॥ ५८ ॥

**जो सर्वत्र सदा सरिसा। परिपूर्ण चंद्रु कां जैसा। अधमोत्तम प्रकाशा-। माजीं न म्हणे॥ २९७॥**
**ऐसी अनवच्छिन्न समता। भूतमात्रीं सदयता। आणि पालटु नाहीं चित्ता। कवणे वेळे॥ २९८॥**
**गोमटें कांहीं पावे। तरी संतोषें तेणें नाभिभवे। जो ओखटेनि नागवे। विषादासी॥ २९९॥**
**ऐसा हरिखशोकरहितु। जो आत्मबोधभरितु। तो जाण पां प्रज्ञायुक्तु। धनुर्धरा॥ ३००॥**
**कां कूर्म जियापरी। उवाइला अवेव पसरी। ना इच्छावशें आवरी। आपुले आपण॥ ३०१॥**
**तैसीं इंद्रियें आपैतीं होती। जयाचें म्हणितलें करिती। तयाची प्रज्ञा जाण स्थिती। पातली असे॥ ३०२॥**

**अर्थ**—पौर्णिमेच्या पूर्ण चंद्राचा प्रकाश जसा प्राणिमात्राला मिळतो. तो आपला प्रकाश देताना अधम किंवा

उत्तम असा प्राण्यात भेद करीत नाही, त्याप्रमाणे सर्व भूतमात्रांशी जो सारखा वागतो. ॥ २९७ ॥ ज्याची समदृष्टी काही जीवापुरतीच मर्यादित नसून अमर्याद आहे. यच्चयावत् प्राणिमात्रांचे ठिकाणी जो दयार्द्र असतो व अशा प्रकारचे असलेले ज्यांचे चित्त कधीच विषम होत नाही. ॥ २९८ ॥ मनाजोगे झाले नाही अथवा मनाच्या विरुद्ध झाले म्हणून ज्याचे चित्तात खेद होत नाही. ॥ २९९ ॥ पूर्ण ब्रह्मबोध झाल्यामुळे जो असा हर्ष शोक रहित असतो, तो स्थितप्रज्ञ होय असे अर्जुना! तू जाण ॥ ३०० ॥ कासव ज्याप्रमाणे वाटेल तेव्हा आपले लपविलेले अवयव बाहेर पसरतो व पुनः इच्छेने पोटात लपवितो. ॥ ३०१ ॥ त्याप्रमाणे ज्याची इंद्रिये स्वाधीन असून त्याच्या इच्छेप्रमाणे वागतात, त्याची बुद्धी स्थिर झाली, असे समज. ॥ ३०२ ॥

**गूढार्थदीपिका—**

"**यः सर्वत्रानभिस्नेहः**" स्थितप्रज्ञपुरुषाचे कोठेही प्रेम नसते या वचनाने भगवंताने संपूर्ण विषयप्रेमाचाच निषेध केला आहे. आत्मप्रेमाचा निषेध केला नाही. विषय कितीही श्रेष्ठ असला तरी खोटा व तुच्छ असल्यामुळे ज्ञान्याला त्याचे प्रेम वाटत नाही. पण आत्मा परमप्रेमरूप असल्यामुळे आत्मप्रेम जसे नाहीसे होत नाही, तसेच सगुण भगवंताचे प्रेमही सगुण भगवान आत्मरूपच असल्यामुळे त्याचे प्रेम ज्ञान्याला असतेच. ज्याला सगुण परमात्म्याचे प्रेम राहणार नाही तो पूर्ण ज्ञानीच नव्हे.

**विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः। रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते॥ ५९ ॥**

**अर्थ—**अन्नादि आहार न घेणाऱ्या पुरुषांची इंद्रिये विषयापासून परावृत्त होतात, पण विषयवासना निवृत्त होत नाही. ही विषयवासना ब्रह्मसाक्षात्कारानंतर निवृत्त होते. ॥ ५९ ॥

**आतां अर्जुना आणिकही एक। सांगेन ऐकें कवतिक। या विषयांते साधक। त्यजिती नियमें॥ ३०३ ॥**
**श्रोत्रादि इंद्रियें आवरिती। परि रसने नियमु न करिती। ते सहस्रधा कवळिजती। विषयीं इंहीं॥ ३०४ ॥**
**जैसी वरिवरि पालवी खुडिजे। आणि मुळीं उदक घालिजे। तरी कैसेनि नाशु निपजे। तया वृक्षा॥ ३०५ ॥**
**तो उदकाचेनि बळें अधिकें। जैसा आडवेनि अंगें फांके। तैसा मानसीं विषो पोखे। रसनाद्वारें॥ ३०६ ॥**
**येरां इंद्रियां विषय तुटे। तैसा नियमूं न ये रस हटें। जें जीवन हें न घटे। येणेंविण॥ ३०७ ॥**
**मग अर्जुना स्वभावें। ऐसियाही नियमातें पावे। जैं परब्रह्म अनुभवें। होऊनि जाइजे॥ ३०८ ॥**
**तैं शरीरभाव नासती। इंद्रियें विषय विसरती। जैं सोहंभाव प्रतीति। प्रगट होय॥ ३०९ ॥**

**अर्थ—**अर्जुना! आणखी एक गंमत सांगतो ऐक. जे साधकपुरुष इंद्रिये आवरून विषयांचा त्याग करतात. ॥ ३०३ ॥ श्रोत्रादी इंद्रिये आवरतात व त्यांना विषयाकडे धावू देत नाहीत. पण रसनेन्द्रिय जी जिह्वा तिचे मात्र नियमन करीत नाहीत, ते हजारो प्रकारांनी इंद्रियांच्या व विषयांच्या तडाक्यात जातात. त्यांच्याने विषय जिंकवले जात नाहीत. ॥ ३०४ ॥ ज्याप्रमाणे झाडाची वरवर छाटणी करून त्यांच्या मुळाशी पाणी घातले असता ते कसे नाश पावेल बरे? ॥ ३०५ ॥ त्याला जसजसे पाणी मिळते तसतसे ते आणखी चौफेर पाने फुटून वाढते. त्याप्रमाणे रसनेंद्रियाचे द्वारा मनाला पुष्टी मिळून मनात सतत विषयाचे ध्यान बळावते. ॥ ३०६ ॥ असे असले तरी इतर इंद्रियांचे विषयसेवन जसे तोडता येते, तसे रसनेंद्रियाचा विषय सर्वथा तोडू नये. कारण त्यावाचून जिवंतच राहता येणार नाही. (जिवंत राहिल्यासच ज्ञानप्राप्ती होऊ शकते असा भाव) ॥ ३०७ ॥ अर्जुना! जेव्हा साधक अनुभवाने परब्रह्मस्वरूप होऊन जातो तेव्हा रसनेंद्रियाच्या विषयाचेही नियमन होत असते. ॥ ३०८ ॥ जेव्हा मी ब्रह्म आहे अशी प्रतीती मनात ठसते, तेव्हा मग शरीरभाव किंवा मी म्हणजे देह, हा बुद्धीचा शरीरभाव नाहीसा होतो व ही देहबुद्धी नाहीशी झाली की इंद्रियांना विषयांचा विसरच पडतो. ॥ ३०९ ॥

**यततो ह्यपि कौन्तेय पुरुषस्य विपश्चितः। इन्द्रियाणि प्रमाथीनि हरन्ति प्रसभं मनः॥ ६० ॥**

**अर्थ—**हे अर्जुना! इंद्रिये फार बलवान आहेत; कारण मन आवरण्याचा प्रयत्न करणाऱ्या ज्ञानी पुरुषाचे मन देखील ही इंद्रिये बलात्काराने आपल्या स्वाधीन करतात. ॥ ६० ॥

**येऱ्हवीं तरी अर्जुना। हें आया नये साधना। जे जे राहाटताती जतना। निरंतर॥ ३१०॥**
**जयातें अभ्यासाची घरटी। यमनियमांची ताटी। जे मनातें सदा मुठी। धरूनि आहाती॥ ३११॥**
**तेही किजती कासाविसी। या इंद्रियांची प्रौढी ऐसी। जैसी मंत्रज्ञातें विवसी। भुलवी कां॥ ३१२॥**
**देखें विषय हे तैसे। पावती ऋद्धिसिद्धीचेनि मिषें। मग आकळिती स्पर्शें। इंद्रियांचेनी॥ ३१३॥**
**तिये संधीं मन जाये। मग अभ्यासीं ठोठावलें ठाये। ऐसें बळकटपण आहे। इंद्रियांचें॥ ३१४॥**

**अर्थ**—अर्जुना! आपण पाहू गेलो तर हा इंद्रियांचा निग्रह कोणत्याही साधनाने साधत नाही. जे साधक इंद्रियांच्या निग्रहाचे जतन करण्याकरिता सारखा अहर्निश प्रयत्न करतात.॥ ३१०॥ ज्यांच्या ठिकाणी इंद्रियांच्या निग्रहाचा अभ्यास सारखा गस्त घालीत असतो, ज्यांनी आपल्या सभोवार यमनियमांचे कुंपण घातले आहे आणि अशा रीतीने मनाला आपल्या मुठीत धरून ठेवण्याचा जे प्रयत्न करतात, असे पुरुष देखील, ज्याप्रमाणे धनावर असलेले पिशाच्च मांत्रिकालाही भ्रम उत्पन्न करिते, त्याप्रमाणे इंद्रियांकडून व्याकुळ केले जातात. अशी ही इंद्रिये बलवान आहेत॥ ३११-३१२॥ पहा! ऋद्धिसिद्धीच्या योगाने विषय प्राप्त होतात व अशा रीतीने प्राप्त झालेल्या त्या विषयांचा व इंद्रियांचा संबंध झाला की, मन त्या विषयाकरिता व्याकुळ होते.॥ ३१३॥ अशा रीतीने इंद्रिये व विषय यांच्या संधीत मन सापडते व मग त्या मनाकडून अभ्यास होत नाही, ते अडून बसते. असा हा मनावर इंद्रियांचा जबरदस्त पगडा आहे.॥ ३१४॥

**तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः। वशे हि यस्येन्द्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता॥ ६१॥**

**अर्थ**—जो सर्व इंद्रियांना विषयांपासून आवरून माझे ठिकाणी मन एकाग्र करतो व मीच पूर्ण परमात्मा आहे असे जाणून हृदयात माझे ध्यान करतो, अशा रीतीने ज्यांनी आपली इंद्रिये आपल्या स्वाधीन करून ठेविली त्यांची बुद्धी स्थिर झाली असे जाणावे.॥ ६१॥

**म्हणोनि आइकें पार्था। यांतें निर्दळी जो सर्वथा। सर्व विषयीं आस्था। सांडूनियां॥ ३१५॥**
**तोचि तूं जाण। योगनिष्ठेसि कारण। जयाचें विषयसुखें अंतःकरण। झकवेना॥ ३१६॥**
**जो आत्मबोधयुक्तु। होऊनि असे सततु। जो मातें हृदयाआंतु। विसंबेना॥ ३१७॥**
**एऱ्हवीं बाह्य विषय तरी नाहीं। परी मानसीं होईल जरी कांहीं। तरी साद्यंतुचि हा पाहीं। संसारु असे॥ ३१८॥**
**जैसा कां विषाचा लेशु। घेतलियां होय बहुवसु। मग निभ्रांत करी नाशु। जीवितासि॥ ३१९॥**
**तैसी या विषयांची शंका। मनीं वसती देखा। घातु करी अशेखा। विवेकजाता॥ ३२०॥**

**अर्थ**—म्हणून अर्जुना! ऐक, सर्व विषयांच्या सुखाची इच्छा सोडून देऊन किंवा विषयात सुख आहे ही खोटी बुद्धी सोडून देऊन, जो कोणी या इंद्रियांच्या विषयप्रवृत्तीचा नाश करून इंद्रियांचाच नाश करतो.॥ ३१५॥ अर्जुना! ज्याचे चित्त विषयसुखाने मोह पावत नाही, असा पुरुष योगनिष्ठेला योग्य असतो, असे तू जाण.॥ ३१६॥ जो पुरुष योगयुक्त असतो, तो अखंड आत्मबोधयुक्त असतो आणि आपल्या हृदयामध्ये मी जो परमेश्वर, त्या मला कधी विसरत नाही.॥ ३१७॥ एऱ्हवी बाहेर विषयांचा संबंध सुटला असला, पण अंतःकरणात जर का थोडी तरी विषयसुखाची इच्छा असली, तर मात्र संपूर्ण संसारच त्याच्या ठिकाणी आहे, असे समज. (काही एक त्याचे सुटले नाही असा भाव)॥ ३१८॥ ज्याप्रमाणे विषाचा एक थेंब जरी पोटात गेला तरी तो सर्व शरीरभर पसरतो व निश्चित मृत्यू येतो.॥ ३१९॥ त्याप्रमाणेच विषयात सुख असावे अशी शंका जरी मनात राहिली तरी देखील संपूर्ण विवेक नाहीसा होतो.॥ ३२०॥

**गूढार्थदीपिका—**

या सर्व श्लोकातून व ओव्यांतून भगवंतांनी व श्रीज्ञानेश्वर माऊलींनी ज्यांची विषयसुखाची वासना निःशेष सुटली व ज्याची इंद्रिये सर्वस्वी स्वाधीन झाली किंवा जो इंद्रियांच्या कधीच स्वाधीन होऊन वागत नाही, तोच पुरुष स्थितप्रज्ञ होय हेच सांगितले आहे. पुढे थोडी देखील विषयसुखाची वासना राहिल्यास पुरुष परमार्थप्राप्तीस कसा दुरावतो हे सांगितले आहे.

**ध्यायतो विषयान्पुंसः सङ्गस्तेषूपजायते । सङ्गात्सञ्जायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते॥ ६२ ॥**
**क्रोधाद्भवति सम्मोहः सम्मोहात्स्मृतिविभ्रमः । स्मृतिभ्रंशाद् बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति॥ ६३ ॥**

**अर्थ**—विषयात सुख आहे असे मनाला जोपर्यंत वाटते तोपर्यंत विषयाचे ध्यान असते. विषयाचे ध्यानाने विषयाशी संबंध येतो. विषयसंगाने विषयभोगाची वासना उत्पन्न होते. त्या वासनेपासून क्रोध उत्पन्न होतो. ॥ ६२ ॥ क्रोधाने मनाचा विवेक नाहीसा होतो. विवेक नाहीसा झाला की माझी स्मृती राहत नाही किंवा परमेश्वराचा विसर पडतो, परमेश्वराचा विसर पडला की बुद्धीचाच नाश होतो व बुद्धिनाशापासून मरण येते. ॥ ६३ ॥

**जरी हृदयीं विषय स्मरती। तरी निसंगाही आपजे संगती। संगें प्रगटे मूर्ति। अभिलाषाची॥ ३२१ ॥**
**जेथ कामु उपजला। तेथ क्रोधु आधींचि आला। क्रोधीं असे ठेविला। संमोह जाणें॥ ३२२॥**
**संमोहा जालिया व्यक्ति। तरी नाशु पावे स्मृति। चंडवातें ज्योति। आहत जैसी॥ ३२३ ॥**
**कां अस्तमानीं निशी। जैसी सूर्यतेजातें ग्रासी। तैसी दशा स्मृतिभ्रंशीं। प्राणियांसी॥ ३२४॥**
**मग अज्ञानांध केवळ। तेणें आप्लविजे सकळ। तेथ बुद्धि होय व्याकुळ। हृदयामाजीं॥ ३२५ ॥**
**जैसें जात्यंधा पळणी पावे। मग ते काकुळती सैरा धांवे। तैसें बुद्धीसि होती भंवे। धनुर्धरा॥ ३२६ ॥**
**ऐसा स्मृतिभ्रंशु घडे। मग सर्वथा बुद्धि अवघडे। तेथ समूळ हें उपडे। ज्ञानजात॥ ३२७॥**
**चैतन्याच्या भ्रंशीं। शरीरा दशा जैशी। तैशी पुरुषा बुद्धिनाशीं। होय देखें॥ ३२८॥**
**म्हणोनि आइकें अर्जुना। जैसा विस्फुलिंग लागे इंधना। मग तो प्रौढ जालिया त्रिभुवना। पुरों शके॥ ३२९ ॥**
**तैसें विषयांचें ध्यान। जरी विपायें वाहे मन। तरी येसणें हें पतन। गिंवसीत पावे॥ ३३० ॥**

**अर्थ**—अर्जुना! विषयाचे स्मरण मनात जरी राहिले तरी देखील निःसंग झालेल्या पुरुषालाही विषयाचा संग होतो आणि विषयाचा संग झाला की तो विषय भोगण्याची इच्छा उत्पन्न होतेच. ॥ ३२१ ॥ ज्याठिकाणी विषयाची वासना उत्पन्न झाली तेथे क्रोधही असतोच आणि क्रोधामुळे बुद्धी अविवेकसंपन्न होते. ॥ ३२२ ॥ बुद्धी अविवेकी झाली की ज्याप्रमाणे सोसाट्याच्या वाऱ्यात दिवा राहत नाही, त्याप्रमाणे आत्मस्मृती राहत नाही. ॥ ३२३ ॥ ज्याप्रमाणे सूर्यास्त होऊन अंधकार झाला असता सूर्याचे तेज लोपले जाते त्याप्रमाणे विवेक—स्मृती नाहीशी झालेल्या प्राण्याची केवळ अविवेकसंपन्न स्थिती होते. ॥ ३२४ ॥ मग केवळ गडद अंधःकारच असतो. त्यामुळे प्राण्याला काहीच कळत नाही. त्याचे सर्व ज्ञान नष्ट होते व आत हृदयामध्ये बुद्धि ही व्याकुळ म्हणजे सारासार विचाररहित होऊन भ्रमिष्ट व विषय सुखाकरिता कासावीस होते. ॥ ३२५ ॥ ज्याप्रमाणे जन्मांधाला प्राण घेऊन पळण्याचा प्रसंग आला असता तो दीन होऊन सैरावैरा धावतो त्याप्रमाणे अर्जुना! बुद्धिही भ्रमिष्ट होऊन सैरावैरा धावते. ॥ ३२६ ॥ याप्रमाणे बुद्धिभ्रंश झाला असता बुद्धीला काहीच सुचत नाही व सर्व ज्ञान नष्ट होते. ॥ ३२७ ॥ जीवचैतन्य, शरीराला सोडून गेल्यावर जशी देहाची स्थिती होते, तशीच दशा, पुरुषाच्या बुद्धीचा नाश झाला असता होते. ॥ ३२८ ॥ म्हणून अर्जुना! ऐक. जशी विस्तवाची ठिणगी लाकडाला लागली व तो अग्नी जर धडाडून पेटला, तर त्रिभुवनालाही व्यापतो॥ ३२९ ॥ तसेच मनात विषयाचे क्वचित सूक्ष्म ध्यान जरी असले तरी पुरुषाचे एवढे पतन होते. ॥ ३३० ॥

**गूढार्थदीपिका—**

या श्लोकांनी व ओव्यांनी श्रीकृष्ण भगवंतांनी व श्रीज्ञानेश्वर माऊलींनी जे सांगितले त्याचे सार हे आहे की मनात विषयसुखाची गोडी यत्किंचित् जरी असली तरी मनुष्याचा आत्मविवेक टिकत नाही विषयसुखाची गोडी हे जोपर्यंत, विषय खरे वाटतात तो पर्यंत नाहीशी होणे शक्य नाही व पतनही चुकत नाही. म्हणून आत्मविवेकाने विषयांचे अस्तित्व खरे नसून काल्पनिक आहे, हेच अंतःकरणात बाणले पाहिजे. तेव्हाच पुरुष स्थितप्रज्ञ होऊ शकतो.

**रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिन्द्रियैश्चरन् । आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति॥ ६४॥**

**अर्थ**—जो मनुष्य रागद्वेषरहित व स्वाधीन असलेल्या इंद्रियांनी विषय भोगतो व ज्याचे अंतःकरण त्याचे इच्छेप्रमाणेच वागते तो सदा सुखी असतो. ॥ ६४ ॥

**म्हणोनि विषय हे आघवे। सर्वथा मनौनि सांडावे। मग रागद्वेष स्वभावें। नाशतील॥ ३३१॥**
**पार्था आणिकही एक। जरी नाशले रागद्वेष। तरी इंद्रियां विषयीं बाधक। रमतां नाहीं॥ ३३२॥**
**जैसा सूर्य आकाशगतु। रश्मिकरीं जगातें स्पर्शतु। तरी संगदोषें काय लिंपतु। तेथिंचेनि॥ ३३३॥**
**तैसा इंद्रियार्थी उदासीन। आत्मरसेंचि निर्भिन्न। जो कामक्रोधविहीन। होऊनि असे॥ ३३४॥**
**तरी विषयांतुही कांहीं। आपणपेंवांचुनि नाहीं। मग विषय कवण कायी। बाधितील कवणा॥ ३३५॥**
**जरी उदकें उदकीं बुडिजे। कां अग्नि आगी पोळिजे। तरी विषयसंगें आप्लविजे। परिपूर्णु तो॥ ३३६॥**
**ऐसा आपणचि केवळ। होऊनि असे निखळ। तयाची प्रज्ञा अचल। निभ्रांत मानीं॥ ३३७॥**

**अर्थ**—म्हणून अर्जुना! आपल्या मनातून विषयांचे अस्तित्व नि:शेष नाहीसे झाले पाहिजे. विषयाचे मनाने मानलेले काल्पनिक अस्तित्व चित्तातून नाहीसे झाले की विषयाविषयीची आवडनावड किंवा रागद्वेष स्वभावत:च नाहीसे होतात. ॥ ३३१ ॥ अर्जुना! येथे आणिक एक गोष्ट सांगण्याजोगी आहे. हे रागद्वेष जर नाहीसे झाले तर विषयामध्ये राहून विषयाशी केलेली क्रीडा, पुरुषाला बाधक होत नाही. ॥ ३३२ ॥ ज्याप्रमाणे आकाशात सूर्य असतो व आपल्या किरणरूपी हाताने सर्व जगातील पदार्थमात्रास स्पर्श करतो तरी त्याला पदार्थाचा संग होतो काय? ॥ ३३३ ॥ त्याप्रमाणे आत्मसुखाशी एकरूप होऊन इद्रियांच्या विषयाचे ठिकाणी जो उदासीन असतो व कामक्रोधविरहित होऊन असतो. ॥ ३३४ ॥ त्याला विषयातही आपल्यावाचून काही दुसरी वस्तु दिसत नसते. विषयातही तो आपल्यालाच पाहतो मग तेथे विषय कुठले आले व ते बाधतील तरी कोणाला? ॥ ३३५ ॥ जर पाण्यातच पाणी बुडेल किंवा अग्नीने अग्नी पोळेल तरच सर्वत्र आत्मस्वरूप पाहणारा पूर्णज्ञानीपुरुष विषयांच्या संगाने बुडविला जाईल. ॥ ३३६ ॥ याप्रमाणे जो सर्वत्र आपणच होऊन राहतो किंवा आपल्यालाच पाहतो त्याची बुद्धी स्थिर झाली हे पक्के समज. ॥ ३३७ ॥

**प्रसादे सर्वदु:खानां हानिरस्योपजायते। प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते॥ ६५॥**

**अर्थ**—चित्त सदा प्रसन्न असले म्हणजे सर्व दु:खांचा नाश होतो. ज्याचे चित्त सदा प्रसन्न आहे, त्याची बुद्धी एका आत्मस्वरूपाचे ठिकाणीच तात्काळ स्थिर होते. ॥ ६५ ॥

**देखें अखंडित प्रसन्नता। आथी जेथ चित्ता। तेथ रिगणें नाहीं समस्तां। संसारदु:खां॥ ३३८॥**
**जैसा अमृताचा निर्झरु। प्रसवे जयाचा जठरु। तया क्षुधेतृषेचा अडदरु। कहींचि नाहीं॥ ३३९॥**
**तैसें हृदय प्रसन्न होये। तरी दु:ख कैचें कें आहे। तेथ आपैसी बुद्धि राहे। परमात्मरूपीं॥ ३४०॥**
**जैसा निर्वातीचा दीपु। सर्वथा नेणे कंपु। तैसा स्थिरबुद्धि स्वस्वरूपु। योगयुक्तु॥ ३४१॥**

**अर्थ**—आत्मसुखातच अखंड चित्त राहिल्यामुळे नेहमी चित्ताला सुखाचाच अनुभव आल्यास तेथे दु:खाचा प्रवेशच होणे शक्य नाही, म्हणून अशा पुरुषाला कोणतेही संसारदु:ख भासत नाही. ॥ ३३८ ॥ ज्याच्या पोटात अमृताचा झरा आहे किंवा ज्याच्या पोटात अमृत स्रवते त्याला जसे भूक तहान यांचे दु:ख कधीच होणे शक्य नाही. ॥ ३३९ ॥ त्याप्रमाणे ज्याचे चित्त आत्मसुखात तल्लीन आहे अशाला दु:ख कोठे व कसे भासणार? त्याची बुद्धी आपोआपच आत्मस्वरूपाचे ठिकाणीच असते. ॥ ३४० ॥ ज्याप्रमाणे निवाऱ्यात ठेवलेल्या दिव्याची ज्योत हालत नाही, एकसारखी तेवत राहते, त्याप्रमाणे जो योगयुक्त असतो, त्याची बुद्धी आत्मस्वरूपाचे ठिकाणी स्थिर असते. ॥ ३४१ ॥

**नास्ति बुद्धिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना। न चाभावयत: शान्तिरशान्तस्य कुत: सुखम्॥ ६६॥**

**अर्थ**—ज्याचे मन व इंद्रिये स्वाधीन नाहीत, त्याची बुद्धी आत्माकार होत नाही व मी पूर्णब्रह्म आहे अशीही त्याची भावना होत नाही मी पूर्ण आहे अशी भावना झाल्याखेरीज चित्ताला शांती मिळत नाही. अशा अशान्त चित्ताला कसे सुख मिळणार? ॥ ६६ ॥

**ये युक्तीची कडसणी। नाहीं जयाच्या अंत:करणीं। तो आकळिला जाण गुणीं। विषयादिकीं॥ ३४२॥**
**तया स्थिरबुद्धि पार्था। कहीं नाहीं सर्वथा। आणि स्थैर्याची आस्था। तेही नुपजे॥ ३४३॥**

**निश्चळत्वाची भावना। जरी नव्हेचि देखें मना। तरी शांति केवीं अर्जुना। आपु होय॥ ३४४॥**
**आणि जेथ शांतीचा जिव्हाळा नाहीं। तेथ सुख विसरोनी न रिगे कहीं। जैसा पापियाचां ठायीं। मोक्षु न वसे॥ ३४५ ॥**
**देखें अग्निमाजीं घापती। तियें बीजें जरी विरूढती। तरी अशांता सुखप्राप्ती। घडों शके॥ ३४६॥**
**म्हणोनि अयुक्तपण मनाचें। तेंचि सर्वस्व दुःखाचें। या कारणें इंद्रियांचें। दमन निकें॥ ३४७॥**

**अर्थ**—परमेश्वरस्वरूपाचे ठिकाणी बुद्धी स्थिर करणे हा जो योग किंवा युक्ती आहे, त्या युक्तीचा अभ्यास ज्याच्या चित्ताला नाही तोच विषयसुखाच्या पाशात सापडतो. ॥ ३४२ ॥ अशा पुरुषाचे चित्त कधी स्थिर होत नाही आणि पुढे कधी स्थिर होईल याचीही आशा नसते. ॥ ३४३ ॥ चित्त स्थिर झाले नाही तर शांती तरी कशी प्राप्त होणार ?॥ ३४४॥ ज्याप्रमाणे पापी पुरुषाला मोक्ष कधी मिळत नाही, त्याप्रमाणे ज्याठिकाणी शांतीचा जिव्हाळा नाही तेथे सुखही विसरून देखील राहत नाही. ॥ ३४५ ॥ अर्जुना! अग्नीत टाकलेले बी जर उगवेल तर अशान्त चित्ताला सुख प्राप्त होईल असे समज. ॥ ३४६ ॥ म्हणून सुखस्वरूप आत्म्याचे ठिकाणी चित्त स्थिर न होणे यातच सर्व दुःखाचे बीज आहे. याकरिताच इंद्रियांना विषयापासून आवरून आपल्या स्वाधीन केले पाहिजे. ॥ ३४७ ॥

**इन्द्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते । तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवाम्भसि॥ ६७॥**

**अर्थ**—पाण्यावर असलेल्या नावेला जसा वायू ओढून नेतो, त्याप्रमाणे विषयाकडे धावणाऱ्या इंद्रियाबरोबर धावणारे मनही बुद्धीला आपल्याबरोबर ओढून नेते. ॥ ६७ ॥

**इंद्रियें जें जें म्हणती। तें तेंचि जे पुरुष करिती। ते तरलेंचि न तरती। विषयसिंधु॥ ३४८॥**
**जैसी नाव थडिये ठाकितां। जरी वरपडी होय दुर्वाता। तरी चुकलाही मागौता। अपावो पावे॥ ३४९॥**
**तैसीं प्राप्तेंही पुरुषें। इंद्रियें लाळिलीं जरी कौतुकें। तरी आक्रमिला जाण दुःखें। सांसारिकें॥ ३५०॥**

**अर्थ**—इंद्रियांना जे जे बरे वाटते तसे तसेच जे पुरुष करतात ते ज्ञानाने आम्ही संसारसमुद्रातून पार झालो असे त्यांना वाटले तरी ते खरोखर संसारसमुद्राचे पार होत नाहीत. ॥ ३४८ ॥ ज्याप्रमाणे तीराला लागू पाहणारी नाव जर वादळात सापडली, तर बुडण्यापासून वांचलेलीही ती पुनः बुडू पाहते. ॥ ३४९ ॥ त्याप्रमाणे प्राप्तपुरुषाने जर आपली इंद्रिये लाडविली व तो त्यांच्याप्रमाणे वागू लागला तर पुनः संसारदुःखांनी दुःखी होतो. ॥ ३५० ॥

**तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः । इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता॥ ६८॥**

**अर्थ**—म्हणून हे महाबाहो अर्जुना! ज्यांनी आपली इंद्रिये विषयापासून पूर्णपणे आवरून आपल्या स्वाधीन केली, त्यांची बुद्धी स्थिर झाली असे समज. ॥ ६८ ॥

**म्हणोनि आपुलीं आपणपेयां। जरी ये इंद्रियें येती आया। तरी अधिक कांहीं धनंजया। सार्थक असे॥ ३५१॥**
**देखें कूर्म जियापरी। उवाइला अवयव पसरी। ना तरी इच्छावशें आवरी। आपणपेंचि॥ ३५२॥**
**तैसीं इंद्रियें आपैतीं होती। जयाचें म्हणितलें करिती। तयाची प्रज्ञा जाण स्थिती। पातली असे॥ ३५३॥**
**आतां आणिक एक गहन। पूर्णाचें चिन्ह। अर्जुना तुज सांगेन। परिस पां॥ ३५४॥**

**अर्थ**—म्हणून अर्जुना! आपली इंद्रिये जर आपल्या स्वाधीन झाली तर इंद्रिये स्वाधीन होणे यापेक्षा दुसरे सार्थक काय ?॥ ३५१ ॥ हे पहा, अर्जुना! ज्याप्रमाणे कासव लपविलेले अवयव इच्छेस वाटेल तेव्हा पसरतो आणि वाटेल तेव्हा लपवितो. ॥ ३५२ ॥ त्याप्रमाणे ज्याची इंद्रिये इतकी स्वाधीन झाली की त्याच्या सर्वस्वी हुकूमात आहेत व त्याला जे वाटेल तेच ती करतात, अशा पुरुषाची बुद्धी स्थिर झाली असे समज. ॥ ३५३ ॥ अर्जुना! आणखी एक पूर्ण झालेल्या पुरुषाचे मुख्य व सर्वात श्रेष्ठ चिन्ह सांगतो ते ऐक. ॥ ३५४ ॥

**या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी। यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः॥ ६९॥**

**अर्थ**—जी स्थिती सर्व प्राण्यांना रात्रीप्रमाणे आहे म्हणजे जी स्थिती सर्व प्राणी विसरले आहेत, त्या स्थितीचे ठिकाणी मन व इंद्रियांचे निग्रह करणारा पुरुष जागा असतो आणि ज्या स्थितीचे ठिकाणी सर्व प्राणी जागे असतात, ती स्थिती मन व इंद्रिये यांचा निग्रह करणाऱ्या पुरुषाची रात्र असते. म्हणजे तो ती स्थिती निःशेष विसरतो॥ ६९ ॥

**देखें भूतजात निदेलें। तेथेंचि जया पाहलें। आणि जीव जेथ चेइले। तेथ निद्रितु जो॥ ३५५॥**
**तोचि तो निरुपाधि। अर्जुना तो स्थिरबुद्धि। तोचि जाणें निरवधि। मुनीश्वर॥ ३५६॥**

**अर्थ—**जेथे सर्व जीव निजलेले आहेत तेथे तो जागा असतो आणि जेथे सर्व जीव जागे आहेत तेथे तो निजलेला असतो. ॥ ३५५ ॥ असा पुरुष सर्व उपाधिरहित झाला, त्याचीच बुद्धी परमात्मस्वरूपी स्थिर झाली आणि तोच एक अविनाशीस्वरूप मुनीश्वर होय. ॥ ३५६ ॥

**गूढार्थदीपिका—या निशा सर्व भूतानाम्**

सर्व जीव जगाला जाणतात. ते जगाचे ठिकाणी जागे आहेत, पण सर्व जगाला अधिष्ठानभूत जे परब्रह्म ते त्यांना दिसत नाही. वास्तविक पाहता मुळात एक सच्चिदानंद परब्रह्मच आहे. दुसरे यत्किंचित् काही नाही. असे असताना सच्चिदानंद परब्रह्माच्या शक्तिस्फुरणाला कर्म किंवा व्यापार आणि शक्तीच्या नामरूपात्मक आविष्काराला जग असे समजून सर्व जीव सच्चिदानंद परब्रह्माला विसरले आहेत आणि नामरूप जगताला परब्रह्माहून निराळी सत्य वस्तू समजून त्याचेच अहोरात्र स्मरण ठेवतात. पण ज्यांनी आपली इंद्रिये व मन स्वाधीन करून, बुद्धीने परब्रह्म जाणले, त्या पुरुषाला परब्रह्माची शक्ती व तिचा नामरूपकर्म या रूपाने झालेला आविष्कार हे सर्व पूर्ण ब्रह्मस्वरूपच आहे असा अनुभव येतो. व त्याचे चित्त येथे स्थिर होऊन पूर्वी नामरूपकर्म ही जगद्वस्तू आहे असे जे वाटत होते त्याचा पूर्ण विसर पडतो. परमेश्वरस्वरूपी ज्याची बुद्धी स्थिर झाली, त्याला सच्चिदानंद परमेश्वरावाचून दुसरी जड विनाशी दु:खरूप अशी वस्तुच दिसत नाही व ज्याला हे परमेश्वर स्वरूपाचे ज्ञान नाही तोच असलेल्या सच्चिदानंद परमेश्वराला विसरून जड, विनाशी, दु:खरूप अशी निराळी जगवस्तू पाहतो असा भाव.

**शंका—**कोणी या श्लोकाचा असा अर्थ करितात की अज्ञानी लोकांना जे नकोसे वाटते म्हणजे त्यांना जो अंध:कार, ते ज्ञान्याला हवे असते व अज्ञानी लोक ज्यात गुंतलेले असतात-त्यांना जेथे उजेड-तेथे ज्ञान्याला अंध:कार म्हणजे ते ज्ञान्याला नको असते. उदाहरणार्थ-ज्ञानी पुरुष काम्य कर्मे तुच्छ मानतो, तर त्यातच सामान्य लोक राबत असतात आणि ज्ञानी पुरुषाला जे निष्काम कर्म पाहिजे ते इतरास नको असते.

**उत्तर—**पण आचार्यादिकांनी केलेला अर्थ प्रथम मान्य केल्याशिवाय असा अर्थ करता येत नाही. कारण बुद्धीला जी वस्तू सत्य वाटते तेथे ती जागी राहते किंवा स्थिर होते व तिच्याप्रीत्यर्थच बुद्धी, मन, इंद्रियें वगैरेंचे व्यापार होतात. बुद्धीला जे खोटे वाटते तेथे ती बुद्धी आसक्त न होता तो पदार्थ विसरते. अर्थातच तिच्याप्रीत्यर्थ बुद्धी, मन, इंद्रिये व्यापार करू शकत नाहीत.

मुळात एक अद्वैत परब्रह्मच आहे. अशा परब्रह्माला विसरल्यावाचून व विषय व विषयातील सुख खरे आहे असे समजल्यावाचून विषयसुखाच्या प्राप्तीकरिता कराव्या लागणाऱ्या काम्य कर्मांचे आचरण होणे शक्य नाही. म्हणजे सामान्य अज्ञानी पुरुष प्रथम आत्मस्वरूपाचे ठिकाणी निजलेले म्हणजे आत्मस्वरूपाला विसरलेले व जगाचे ठिकाणी जागे असतात म्हणजे जगाला सत्य समजत असतात, असाच त्याचा अर्थ होतो.

परब्रह्मच सत्य आहे व जगत् खोटे आहे असा ज्याच्या बुद्धीचा निश्चय झाला त्याची बुद्धी परमेश्वराचे ठिकाणी स्थिर होते, किंवा जागी असते व ती जगताचे अस्तित्व ग्रहण करीत नाही. असा पुरुष प्रारब्धानुसार होणारी आपली कर्मे निष्काम चित्ताने परमेश्वरप्रीत्यर्थ करू शकतो. अर्थात निष्कामकर्माचरण करणारे पुरुष प्रथम परब्रह्माचे ठिकाणी जागे असतात व जगाचे ठिकाणी निजलेले असतात, म्हणूनच ते निष्काम कर्माचरण करू शकतात. एऱ्हवी जगताचे अस्तित्व ग्रहण करणाऱ्या बुद्धीकडून निष्काम कर्माचरण घडणे शक्य नाही हे बुद्धीच्या वर दिलेल्या स्वभावावरून सर्वांना अनुभूत आहे.

**आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशन्ति यद्वत्।**
**तद्वत्कामा यं प्रविशन्ति सर्वे स शान्तिमाप्नोति न कामकामी॥ ७०॥**

**अर्थ—**ज्याप्रमाणे पृथ्वीवरील पाण्यांचे समस्त ओघ समुद्रालाच मिळतात, त्याप्रमाणे ज्या पुरुषांच्या

निरनिराळ्या सुखाच्या वासना त्यांच्या आत्मस्वरूपाच्या ठिकाणी मिळाल्या, त्याला परमशांती प्राप्त होते. निरनिराळ्या विषयसुखाची वासना करणाऱ्याला परमशांती प्राप्त होत नाही. ॥ ७० ॥

**पार्थां आणीकही परी। तो जाणों येईल अवधारीं। जैसी अक्षोभता सागरीं। अखंडित॥ ३५७॥**
**जरी सरिताओघ समस्त। परिपूर्ण होऊनि मिळत। तरी अधिक नोहे ईषत्। मर्यादा न संडी॥ ३५८॥**
**ना तरी ग्रीष्मकाळीं सरिता। शोषूनि जाती समस्ता। परी न्यून नव्हे पार्था। समुद्रु जैसा॥ ३५९॥**
**तैसा प्राप्तीं ऋद्धिसिद्धी। तयासि क्षोभु नाहीं बुद्धि। आणि न पवतां न बाधी। अधृति तयातें॥ ३६०॥**
**सांगें सूर्याच्या घरीं। प्रकाशु काय वातीवेरी। कीं न लविजे तरी अंधारीं। कोंडेल तो॥ ३६१॥**
**देखे ऋद्धिसिद्धि तयापरी। आली गेली से न करी। तो विगुंतला असे अंतरीं। महासुखीं॥ ३६२॥**
**जो आपुलेंनि नागरपणें। इंद्रभुवनातें पाबळें म्हणे। तो केवीं रंजे पालिवणें। भिल्लांचेनि॥ ३६३॥**
**जो अमृतासि ठी ठेवी। तो जैसा कांजी न सेवी। तैसा स्वसुखानुभवी। न भोगी ऋद्धि॥ ३६४॥**
**पार्था नवल हें पाहीं। जेथ स्वर्गसुख लेखनीय नाहीं। तेथ ऋद्धिसिद्धि कायी। प्राकृता होती॥ ३६५॥**

**अर्थ**—अर्जुना! आणखी एका चिन्हावरून स्थितप्रज्ञ पुरुषाला ओळखता येईल पहा. जसा समुद्र नेहमी अक्षुब्ध म्हणजे शांतच असतो, तसा स्थितप्रज्ञ पुरुषही शान्त असतो. ॥ ३५७ ॥ संपूर्ण नद्यांचे पाणी मोठ्या पुराने वाहत जाऊन समुद्रात मिळाले तरी समुद्र यत्किंचित् मर्यादा सोडत नाही व मोठा होत नाही. ॥ ३५८ ॥ किंवा अर्जुना! उन्हाळ्यात नद्यांचे पाणी आटते व पावसाळ्याप्रमाणे समुद्राला नद्यांचे पाणी मिळत नाही तरी त्याची मर्यादा कमी होत नाही. तो सदासर्वदा सारखाच दिसतो. ॥ ३५९ ॥ त्याप्रमाणे ऋद्धिसिद्धी प्राप्त झाल्या असताही ज्याच्या बुद्धीत काही फरक पडत नाही आणि ऋद्धिसिद्धी प्राप्त झाल्या नाहीत म्हणून त्याचे धैर्यही खचत नाही. ॥ ३६० ॥ अर्जुना! सूर्याचे घरी काय वाती लावून प्रकाश करावा लागतो? आणि वाती लावून प्रकाश केला नाही तर तो अंधारात राहील काय? सांग बरे?॥ ३६१ ॥ पहा, अशाच रीतीने जो स्थितप्रज्ञ पुरुषही ऋद्धिसिद्धी प्राप्त झाल्या किंवा नाहीशा झाल्या इकडे लक्षच देत नाही, तो आत्म्याच्या महासुखात तल्लीन असतो. ॥ ३६२ ॥ जो आपल्या आत्मसंपन्न स्थितीपुढे इंद्राचे स्वर्गसुखही तुच्छ समजतो, त्याला भिल्लाची पर्णकुटी कशी श्रेष्ठ वाटणार?॥ ३६३ ॥ जो पुरुष अमृत पिण्याकडे दृष्टी ठेवतो, तो ज्याप्रमाणे कांजी पिण्याची इच्छा करीत नाही, त्याप्रमाणे ज्याला आत्मसुखाचा अनुभव आला तो ऋद्धिसिद्धी भोगण्याची कधी इच्छा करीत नाही. ॥ ३६४ ॥ अर्जुना! स्थितप्रज्ञ पुरुषाचे ठिकाणी हे एक नवल असते की, तो आत्मसुखापुढे स्वर्गसुख काही समजत नाही तेथे ऋद्धिसिद्धीला काय किंमत राहणार?॥ ३६५ ॥

**विहाय कामान्यः सर्वान्पुमांश्चरति निःस्पृहः। निर्ममो निरहङ्कारः स शान्तिमधिगच्छति॥ ७१॥**

**अर्थ**—जो पुरुष सर्व विषयकामना निःशेष सोडून देऊन विषयसुखाची कधी इच्छाच करीत नाही व ममता व अहंता यानी रहित होऊन राहतो त्याला परमशांती प्राप्त होते. ॥ ७१ ॥

**ऐसा आत्मबोधें तोषला। जो परमानंदें पोखला। तोचि स्थिरप्रज्ञु भला। वोळख तूं॥ ३६६॥**
**तो अहंकारातें दंडुनी। सकळ कामु सांडोनी। विचरे विश्व होऊनि। विश्वाचिमाजीं॥ ३६७॥**

**अर्थ**—याप्रमाणे आत्मज्ञानाने समाधान पावलेला व आत्मसुखाने जो पुष्ट झाला आहे. असा पुरुष स्थितप्रज्ञ होय, हे जाण. ॥ ३६६ ॥ या स्थितप्रज्ञ पुरुषाने अहंकार निःशेष नाहीसा केलेला असतो, त्याची विषयसुखाची इच्छा निःशेष नाहीशी झालेली असते व तो सर्व जगच आपण होऊन जगातच असतो. ॥ ३६७ ॥

**एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति। स्थित्वास्यामन्तकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति॥ ७२॥**

*ॐतत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे साङ्ख्ययोगो नाम द्वितीयोऽध्यायः॥ २॥*

**अर्थ**—अर्जुना! या स्थितीला ब्रह्मस्थिती म्हणतात. ती प्राप्त झाली असता कधीही मोह उत्पन्न होत नाही. या ब्रह्मस्थितीत राहिलेला पुरुष मरणाच्या भयंकर दुःखकाली देखील ब्रह्मस्वरूपच राहतो. ॥ ७२ ॥

**हे ब्रह्मस्थिति निःसीम। जे अनुभवितां निष्काम। पातले परब्रह्म। अनायासे॥ ३६८॥**
**जे चिद्रूपीं मिळतां। देहांतीची व्याकुळता। आड ठाकों न शके चित्ता। प्राज्ञा जया॥ ३६९॥**
**तेचि हे स्थिति। स्वमुखें श्रीपती। सांगत अर्जुनाप्रती। संजयो म्हणे॥ ३७०॥**
**ऐसें कृष्णवाक्य ऐकिले। तेथ अर्जुनें मनीं म्हणितलें। आतां आमुचियाचि काजा आलें। उपपत्ती इया॥ ३७१॥**
**जें कर्मजात आघवें। एथ निराकरिलें देवें। तरी पारुषलें म्यां झुंजावें। म्हणूनियां॥ ३७२॥**
**ऐसा श्रीअच्युताचिया बोला। चित्तीं धनुर्धरु उवायिला। आतां प्रश्नु करील भला। आशंकोनियां॥ ३७३॥**
**तो प्रसंगु असे नागरु। जो सकळ धर्मासि आगरु। कीं विवेकामृतसागरु। प्रांतहीनु॥ ३७४॥**
**जो आपण सर्वज्ञनाथु। निरूपिता होईल श्रीअनंतु। ते ज्ञानदेवो सांगेल मातु। निवृत्तिदासु॥ ३७५॥**

**इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां द्वितीयोऽध्यायः॥ २॥**

**अर्थ**—या निःसीम ब्रह्मस्थितीचा पूर्ण विषयवासनारहित होऊन ज्यांनी अनुभव घेतला ते अनायासे ब्रह्मस्वरूप होऊन राहतात.॥ ३६८॥ ब्रह्मज्ञान प्राप्त करून घेऊन सच्चिदानंदरूप ब्रह्माशी ऐक्य पावताना, देह सोडतेवेळी चित्ताची जी व्याकुळता होते ती चित्ताची व्याकुळता ज्यांना काही एक आड येत नाही. (मरणसमयी स्थितप्रज्ञ पुरुषाचे चित्त व्याकुळ होत नाही व त्याचा ब्रह्मभाव अंतरत नाही असा भाव).॥ ३६९॥ ही ब्रह्मस्थिती भगवान् श्रीकृष्ण आपल्या मुखाने अर्जुनाला सांगत आहेत असे संजय धृतराष्ट्राला म्हणाला.॥ ३७०॥ हे भगवान श्रीकृष्णाचे वाक्य ऐकल्याबरोबर अर्जुन आपल्या मनात म्हणतो. हे सर्व देवाने केलेले ब्रह्मस्थितीचे निरूपण माझ्या पथ्यावर पडले.॥ ३७१॥ कारण या ब्रह्मस्थितीचे निरूपण करताना ब्रह्मस्थितीचे ठिकाणी कर्म मुळीच नाही किंवा ती कर्मकर्ता-विरहित आहे, असे प्रतिपादून देवाने कर्मांचेच खंडन केले आहे, अर्थात् ब्रह्मस्थिती प्राप्त होण्याकरिता युद्धादि कर्म करणे योग्य नाही किंवा युद्ध करू नये असेच सिद्ध होते.॥ ३७२॥ याप्रमाणे श्रीकृष्णाचे बोलणे ऐकून अर्जुनाला संतोष झाला आता पुढे त्याला उत्पन्न झालेल्या शंकेला धरून तो प्रश्न करील.॥ ३७३॥ तो प्रसंग फार बहारीचा आहे व त्यात सर्व धर्मांचे कोठार भरलेले आहे; किंवा तो विवेकरूपी अमृताचा अमर्याद सागरच आहे असे म्हटले तरी चालेल.॥ ३७४॥ हा जो प्रसंग सर्वज्ञांचा स्वामी जो भगवान श्रीकृष्ण सांगणार आहेत तो श्रीनिवृत्तिदास श्रीज्ञानेश्वर महाराज पुढे सांगतील.॥ ३७५॥

**गूढार्थदीपिका—सर्वज्ञनाथ**

**'तत्र हि निरतिशयं सार्वज्ञं बीजम्'** या योगसूत्रात व वेदान्तसूत्रातील **'जगद्व्यापारवर्जाधिकरणात'** (सूघ० ४-४-१७) सांगितल्याप्रमाणे परमेश्वर व परमेश्वराचे अवतार यांचे ठिकाणी सर्वज्ञत्वादिक गुण जसे अमर्याद असतात, तसे योगीपुरुष अमर्याद सर्वज्ञ होत नाहीत. त्यांची सर्वज्ञता मर्यादित असते; म्हणून येथे भगवान श्रीकृष्णाला 'सर्वज्ञनाथ' हे विशेषण दिले आहे.

श्रीसद्गुरुमाऊलीच्या कृपेने श्रीज्ञानेश्वरीच्या दुसऱ्या अध्यायाचा अनुवाद गूढार्थदीपिकेसह पूर्ण झाला तो सद्गुरुचरणी समर्पण असो.



# समारोप

युद्ध झाल्यास त्यात पुढे स्वजनांचा नाश होणार, या दु:खाने व्याकुळ झालेल्या अर्जुनाला श्रीभगवंतांनी या अध्यायापासून तात्विक उपदेश करण्याला सुरुवात केली आहे. स्वकुळात परंपरागत चालत आलेल्या सर्व धर्मांचा स्वजनांच्या वधाने उच्छेद होऊन सर्व कुळाला नरकप्राप्ती होईल व भगवंताची प्राप्तीही अंतरेल, हा युक्तिवाद पुढे मांडून, युद्धापासून परावृत्त होण्यातच लाभ आहे, असे मानणाऱ्या अर्जुनाला भगवान उपदेश करतात. 'अर्जुना! युद्धाला सज्ज हो. तुझ्यासारख्या शूर पुरुषाने युद्धापासून परावृत्त होण्याचा असा भ्याड विचार करणे योग्य नाही युद्धाचे वेळी शत्रूंची दया काय कामाची?' अशा व्यावहारिक दृष्टीने भगवंताने अर्जुनाला समजावून पाहिले. पण ज्या गुरुजनांपासून आपण विद्या संपादन केली व जे आपल्या कुळातील अत्यंत पूज्य पुरुष समजले गेले, अशा भीष्मद्रोणादिकांवरच शस्त्रांचा वर्षाव करण्याचा हा प्रसंग आहे. व्यावहारिक दृष्टीने हे योग्य होणार नाही, असे अर्जुनाने जेव्हा भगवंताला म्हटले, तेव्हा 'हे तुझे सर्व बोलणे मूर्खपणाचे आहे' असे तिरस्काराने अर्जुनाला बोलून भगवान गप्प बसले.

भगवतांचे हे मौन पाहून अर्जुन भ्याला व दीनपणाने भगवंताला म्हणू लागला की 'भगवंता! मी सर्वस्वी मूढ व त्यातच स्वजनांच्या मोहाने माझे चित्त गांगरून गेले आहे. माझे हित कशात आहे हे समजेनासे झाले आहे. मी तुला शरण आलो आहे. मी तुझा शिष्य आहे. तूच आता माझ्या कल्याणाचे काय आहे ते सांग.' श्रीभगवान् म्हणतात, 'अर्जुना! ज्या गोष्टीचा तू शोक करू नये त्याबद्दल तू शोक करतोस आणि तूच शहाणपणाच्या गोष्टी सांगतोस. शहाणे पुरुष जन्म व मरण किंवा उत्पत्ती व नाश हे दोन्ही भ्रांतीने भासतात असे समजून त्याचा शोक करीत नाहीत ज्याप्रमाणे बाल्य, तारुण्य व जरा ह्या अवस्था शरीराला होतात, पण प्रत्येक अवस्थेतून जाताना शरीराचा नाश होत नाही, त्याप्रमाणे चैतन्याच्या सत्तेवर नानाप्रकारचे देह होतात, जातात असे जाणणाऱ्यास संसाराचा मोह होत नाही. इंद्रियांचे विषयाशी जे संयोग होतात तेच सुखदु:ख देणारे आहेत. विषय हे क्षणभर टिकणारे आहेत, म्हणून त्यांचा त्याग कर व पुन: संग धरू नकोस हा विषयांचा संयोग ज्याच्या चित्ताला दु:ख देत नाही तो अविनाशी ब्रह्माला प्राप्त होतो.'

## खऱ्या खोट्याचा निर्णय

खरी वस्तू कोणती व खोटी वस्तू कोणती याचा निर्णय तत्त्व जाणणाऱ्यांनी केला आहे. सत् म्हणजे खरी वस्तू ही अविनाशी असते, म्हणून तिचा अभाव कधी सिद्ध होत नाही. असत् म्हणजे खोटी वस्तू ही विनाशी असते म्हणजे तिचा भाव किंवा अस्तित्व कधी सिद्ध होत नाही. या लक्षणाप्रमाणे सतासताचा विचार केला असता आत्मा व देहादिक जड पदार्थ या दोहोंमध्ये चेतनरूप जीवात्म्याचा अभाव सिद्ध होत नाही, म्हणून तो सत्य आहे व जड देहादिक पदार्थांचा अभाव अनुभवाला येतो, म्हणून ते असत् आहेत. अर्थात् आत्मा व देहादिक जड पदार्थ या दोहोंमध्ये देहादिकांचे जे अस्तित्व भासते किंवा ते आहेत असे जे वाटते ते भ्रातीने किंवा अविचाराने वाटते. अर्थात् जीवात्मा व देहादिक पदार्थ यांचा कांही संबंध नाही. पण जीवात्मा आपले अविनाशी स्वरूप विसरून देहाशी ऐक्य करतो व देहाचे उत्पत्ती-नाश आपले ठिकाणी मानून दु:खी होतो.

## व्यावहारिक दृष्टीने विचार

भगवान म्हणतात, अर्जुना! हा ज्ञानदृष्टीचा विचार तुला पटत नसेल तर राहू दे. व्यावहारिक दृष्टीने विचार केला असताही तुला शोक करण्याचे कारण नाही. कारण सर्व सृष्टीतील पदार्थांचे ठिकाणीं उत्पत्ती-नाश यांचा प्रवाह सारखा चालू आहे. उत्पन्न झालेला पदार्थ नाश पावणारच व नाश पावलेला पदार्थ पुन: उत्पन्न होणारच. हे उत्पत्तिनाश कोणालाच चुकत नाहीत. असा जर पदार्थाचा स्वभावच दिसून पडतो, तर त्याबद्दल शोक करणे योग्य होईल काय?

## समाजापेक्षा धर्म श्रेष्ठ

बरे, धर्माचे दृष्टीने विचार केला तरी तुला शोक करण्याचे कारण नाही अन्यायाचा प्रतिकार करण्याकरिता किंवा प्रजेला सुखी करण्याकरिता व दुष्ट राजांचा नाश करण्याकरिता युद्ध करणे हा क्षत्रियांचा धर्मच आहे आणि नि:श्रेयस साधण्याकरिताच धर्माची योजना आहे. मग त्या युद्धरूपी धर्माने माझे नि:श्रेयस अंतरेल अशी भीती तुला कां वाटावी?

धर्म हा समाजापेक्षा श्रेष्ठ असल्यामुळे सर्व जगाचा नाश होत असला तरी स्वधर्म सोडता येत नाही; कारण

समाजाचा संबंध इहलोकापुरताच असतो, पण धर्माचा संबंध इहलोक, परलोक व पुनर्जन्म या तिघांशी असून भगवत्प्राप्तीशीही त्याचा संबंध आहे. पुन: विहित धर्म हा समाजाचे धारण करणारा आहे, समाजाचा नाश करणारा नाही.

### धर्माचरण नि:श्रेयसाला साधक केव्हा होते?

आपल्या देहाच्या सुखाकरिता ज्या धर्माचे आपण आचरण करितो, त्या धर्माचरणापासून पापपुण्य उत्पन्न होते. व ते भोगण्याकरिता जन्माला यावे लागते. अशाप्रकारे धर्माचरण बंधनकारक होते. पण हे धर्माचरण देहसुखाकरिता न करता केवळ परमेश्वरप्रीत्यर्थ झाले असता त्यापासून पापपुण्य उत्पन्न होत नाहीत व ते भोगण्याकरिता जन्माला यावे लागत नाही.

### सांख्यबुद्धी व योगबुद्धी

भगवंतानी अर्जुनाला सांख्यबुद्धी व योगबुद्धी असे बुद्धीचे दोन प्रकार सांगितले आहेत.

१—सांख्यबुद्धी म्हणजे आत्मज्ञान. विचाराने परमेश्वराच्या निर्गुण स्वरूपाचे ठिकाणी बुद्धी स्थिर करणे होय या बुद्धीत मनुष्य सुखदु:खादी कोणत्याही वृत्तीवर आरूढ न होता किंवा त्यांच्याशी ऐक्य न पावता साक्षी होऊन राहतो; म्हणून त्याच्या ठिकाणी प्रारब्धानुसार होणाऱ्या कोणत्याही कर्माचा लेप लागत नाही.

२—योगबुद्धी म्हणजे सगुण परमेश्वराचे ठिकाणी बुद्धी स्थिर करणे होय. सगुण परमात्माही कर्म व कर्तृत्व या विरहित असल्यामुळे त्याचे ठिकाणी स्थिर झालेली बुद्धी ही कर्म व कर्तृत्व यांचा आपल्याशी संबंध वागवीत नाही, म्हणून कर्माचा लेप लागत नाही.

### बुद्धियोगाचा अधिकारी

सत्वगुणाचे उत्कर्षाने ज्यांचीं कर्मप्रवृत्ती क्षीण झाली आहे व ज्यांची इंद्रिये वैराग्यामुळे कर्माकडे प्रवृत्त होत नाहीत व जो कर्म व कर्तृत्व यांच्याहून मी निराळा आहे असे आपल्याला जाणतो, अशा ब्राह्मणालाच निर्गुणस्वरूपाच्या प्राप्तीकरिता कर्मसंन्यासनिष्ठा सांगितली आहे.

अर्जुन हा क्षत्रिय होता व क्षत्रियांचे ठिकाणी कर्मप्रवृत्ति अधिक राहते. ज्यांचे ठिकाणी कर्मप्रवृत्ती अधिक आहे, अशा सर्व ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्रादिकांकरिता भगवंतांनी अर्जुनाला निमित्त करून कर्मयोगाचा मार्ग गीतेत सांगितला आहे.

### व्यवसायात्मिका व अव्यवसायात्मिका बुद्धि

व्यवसायात्मिका बुद्धि म्हणजे सत्य वस्तूचा निश्चय करणारी बुद्धि होय. एक परमेश्वरच सत्य आहे, म्हणून परमेश्वराचा निश्चय करून तेथे स्थिर होणारी व परमेश्वरप्रीत्यर्थच मन, इंद्रियांदिकांचे व्यापार, करणारी बुद्धिच व्यवसायात्मिका म्हटली जाते.

परमेश्वराला विसरून देहादी असत् वस्तूंचा सत्य म्हणून निश्चय करणारी व तिच्या प्रित्यर्थ इंद्रियादिकांचा व्यापार करणारी बुद्धी अव्यवसायात्मिका. व्यवसायात्मिका बुद्धीच परमेश्वरप्राप्तीला कारणीभूत होते. या व्यवसायात्मिका बुद्धीने कर्म करणे यालाच कर्मयोग म्हणतात. ज्यांची व्यवसायात्मिका-बुद्धी परमेश्वरस्वरूपाचे ठिकाणी अढळ झाली त्याला स्थितप्रज्ञ म्हणतात.

### स्थितप्रज्ञाचे लक्षण

भगवंतांनी अर्जुनाला जी स्थितप्रज्ञाची लक्षणे सांगितली त्यांचे संकलन लक्षण असे करतां येईल की नारळ. सुकला असता त्याच्या कवटीवर घातलेले घाव आतील नारळाला जसे लागत नाहीत तसेच व्यवसायात्मिकाबुद्धीने देहाहून निराळा होऊन परमेश्वराचे ठिकाणी स्थिर झालेल्या स्थितप्रज्ञाच्या बुद्धीच्या ठिकाणीही सुखदु:खादी कोणत्याही विकाराचा परिणाम होत नाही व तो परमेश्वरापासून ढळत नाही. ज्ञानी व अज्ञानी यांच्यांत इतकाच भेद आहे की ज्ञानी जगाला विसरतो पण परमेश्वराला कधी विसरत नाही व अज्ञानी परमेश्वराला विसरतो व जगाला कधी विसरत नाही. ही स्थितप्रज्ञस्थिती प्राप्त झाली असता मरणकाली देखील बुद्धी मोह न पावता ब्रह्माशीच ऐक्य पावते.

**श्रीमद्सद्गुरू श्रीज्ञानेश्वर महाराजार्पणमस्तु।**



॥ श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ ॥

# अध्याय तिसरा

*अर्जुन उवाच*

**ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन। तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव॥ १॥**

**अर्थ**—अर्जुन म्हणतो, भगवंता! नुसते कर्म करण्यापेक्षा जर बुद्धियोग श्रेष्ठ आहे असे तुझे मत आहे तर मला युद्धरूपी घोर कर्म करण्याला कां प्रवृत्त करण्याचा प्रयत्न करतोस?

**मग आइका अर्जुनें म्हणितलें। देवा तुम्हीं जें वाक्य बोलिलें। तें निकें म्यां परिसलें। कमळापती॥ १॥**
**तेथ कर्म आणि कर्ता। उरेचिना पाहतां। ऐसें मत तुझें अनंता। निश्चित जरी॥ २॥**
**तरी मातें केवीं श्रीहरी। म्हणसी पार्था संग्रामु करीं। इये लाजसीना महाघोरीं। कर्मी सुतां॥ ३॥**
**हां गा कर्म तूंचि अशेष। निराकारिसी निःशेष। तरी मजकरवीं हें हिंसक। कां करविसी तूं॥ ४॥**
**तरी हेंचि विचारीं श्रीहृषीकेशा। तूं मानु न देसी कर्मलेशा। आणि येसणी हे हिंसा। करवीत आहासी॥ ५॥**

**अर्थ**—श्रोतृजन ऐका, मग देवाला अर्जुन म्हणाला, हे कृपानिधी देवा! तुम्ही जे बोलला ते मी नीट ऐकले॥ १॥ ब्रह्मस्थितीत कर्म आणि कर्ता हे काही उरतच नाही असे जर तुमचे निश्चित मत आहे.॥ २॥ तर मग देवा! 'अर्जुना युद्ध कर' असे मलां कां म्हणता? हे युद्धरूपी भयंकर कर्म मजकडून करविताना तुम्हाला कसा संकोच वाटत नाही.॥ ३॥ तुम्हींच ब्रह्मस्थितीचे ठिकाणी कर्माचा निःशेष निरास आहे असे जर म्हणता तर हे हिंसात्मक कर्म मजकडून कां करविता?॥ ४॥ भगवंता! तेव्हा याचाच विचार कर, तू आत्म्याचे ठिकाणी कर्माचा लेशही नाही म्हणतोस आणि अशा प्रकारची हिंसा मजकडून करविण्याचा प्रयत्न करतोस.॥ ५॥

**गूढार्थदीपिका—**

अर्जुनाचे प्रश्नाचा हेतु असा आहे की समबुद्धी किंवा समाधी यांत बुद्धी स्थिर करून कर्म केले असता कर्माचा बंध उत्पन्न होत नाही असे भगवंताने म्हटल्यावर अर्जुनाला शंका आली की, समबुद्धी किंवा समाधिस्थ बुद्धी झाल्यावर कर्म, कर्त्ता, क्रिया हा विषम प्रकारच राहत नाही. समत्व ही कर्मरहित स्थिती आहे व हीच कर्मरहित स्थिती जर जीवाला प्राप्त करून घ्यावयाची आहे, तर मी युद्ध सोडून आताच कर्मरहित होण्याचा प्रयत्न करीत असताना देव मला युद्धरूपी भयंकर कर्माला कां प्रवृत्त करीत आहेत? असे मनात येऊन अर्जुनाने देवाला प्रश्न केला.

**व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे। तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम्॥ २॥**

**अर्थ**—भगवंता! जे भाषण ऐकून एक निश्चय होत नाही अशा तुमच्या दुटप्पी भाषणाने मला आपण अधिकच मोह उत्पन्न करीत आहा या दोहोतून ज्याने माझे निश्चित कल्याण होईल असे एक सांगावे.॥ २॥

**देवा तुवांचि ऐसें बोलावे। तरी आम्हीं नेणतीं काय करावें। आतां संपलें म्हण पां आघवें। विवेकाचें॥ ६॥**
**हां गा उपदेश जरी ऐसा। तरी अपभ्रंशु तो कैसा। आतां पुरला आम्हां धिंवसा। आत्मबोधाचा॥ ७॥**
**वैद्यु पथ्य वारूनि जाये। मग जरी आपणचि विष सुये। तरी रोगिया कैसेनि जिये। सांगें मज॥ ८॥**
**जैसें आंधळें सुईजे आव्हांटा। कां माजवण दीजे मर्कटा। तैसा उपदेशु हा गोमटा। वोढवला आम्हां॥ ९॥**
**मी आधींचि कांहीं नेणे। वरी कवळिलों मोहें येणें। कृष्णा विवेकु या कारणें। पुसिला तुज॥ १०॥**
**तंव तुझी एकेकी नवाई। एथ उपदेशामाजि गोवाई। तरी अनुसरलिया काई। ऐसें कीजे॥ ११॥**
**आम्हीं तनुमनुजीवें। तुझिया बोला वोटंगावें। आणि तुवांचि ऐसें करावें। तरी सरलें म्हणें॥ १२॥**

**आतां ऐसियापरी बोधिसी। तरी निकें आम्हां करिसी। एथ ज्ञानाची आस कायसी। अर्जुन म्हणे॥ १३॥**
**तरी ये जाणिवेचें कीर सरलें। परी आणीक एक असे जाहलें। जे थितें हें डहुळलें। मानस माझें॥ १४॥**
**तेवींचि श्रीकृष्णा हें तुझें। चरित्र कांहीं नेणिजे। जरी चित्त पाहसी माझें। येणे मिषें॥ १५॥**
**ना तरी झकवीतु आहासी मातें। कीं तत्त्वचि कथिसी ध्वनितें। हें अवगमितां निरुतें। जाणवेना॥ १६॥**
**म्हणोनि आइकें देवा। हा भावार्थु आतां न बोलावा। मज विवेकु सांगावा। मऱ्हाटा जी॥ १७॥**
**मी अत्यंत जड असें। परी ऐसाही निकें परियसें। श्रीकृष्णा बोलावें तुवां तैसें। एकनिष्ठ॥ १८॥**
**देखें रोगातें जिणावें। औषध तरी देयावें। परी तें अतिरुच्य व्हावें। मधुर जैसें॥ १९॥**
**तैसें सकळार्थभरित। तत्त्व तरी सांगावें उचित। परी बोधे माझें चित्त। जयापरी॥ २०॥**
**देवा तुजऐसा निजगुरु। आजि आर्तीधणी कां न करूं। एथ भीड कवणाची धरूं। तूं माय आमुची॥ २१॥**
**हां गा कामधेनूचें दुभतें। दैवें जाहलें जरी आपैतें। तरी कामनेची कां तेथें। वानी कीजे॥ २२॥**
**जरी चिंतामणी हातां चढे। तरी वांछेचें कवण सांकडें। कां आपुलेनि सुरवाडें। इच्छावें ना॥ २३॥**
**देखा अमृतसिंधूतें ठाकावें। मग ताहाना जरी फुटावें। तरी सायासु कां करावे। मागील ते॥ २४॥**
**तैसा जन्मांतरी बहुतीं। उपासितां श्रीलक्ष्मीपती। तूं दैवें आजि हातीं। जाहलासि जरी॥ २५॥**
**तरी आपुलिया सवेसा। कां न मागावासि परेशा। देवा सुकाळु हा मानसा। पाहला असे॥ २६॥**
**देखें सकळार्तीचें जियालें। आजि पुण्य यशासि आलें। हे मनोरथ जहाले। विजयी माझे॥ २७॥**
**जी जी परममंगळधामा। सकळ देवदेवोत्तमा। तूं स्वाधीन आजि आम्हां। म्हणऊनियां॥ २८॥**
**जैसें मातेच्या ठायीं। अपत्या अनवसरू नाहीं। स्तन्यालागूनि पाहीं। जियापरी॥ २९॥**
**तैसें देवा तूतें। पुसिजतसे आवडे तें। आपुलेनि आर्तें। कृपानिधि॥ ३०॥**
**तरी पारत्रिकीं हित। आणि आचरितां तरी उचित। तें सांगें एक निश्चित। पार्थु म्हणे॥ ३१॥**

**अर्थ**—तुझ्यासारख्यानेच जर देवा, असे संदिग्ध बोलावे तर आम्ही अज्ञान्यांनी काय करावे? असे वाटते की, आता माझ्या ठिकाणी विवेक उत्पन्न होण्याची आशाच नाही. ॥ ६ ॥ अशा संदिग्ध बोलण्याला जर उपदेश हे नाव द्यावे तर भ्रम उत्पन्न करणारे दुसरे बोलणे कोणते राहू शकेल? अशा उपदेशाने आत्मबोध होईल असा भरवसा कधीच बाळगता येणार नाही. ॥ ७ ॥ वैद्य पथ्य सांगून जाऊन पुन: आपणच जर विष देईल तर रोगी कसा जीवंत राहणार हे मला सांग ॥ ८ ॥ ज्याप्रमाणे आंधळ्याने आडमार्गाने जावें किंवा वानराला दारू पाजावी त्याप्रमाणे या तुझ्या उपदेशाने माझ्या ठिकाणी विपरीत झाले आहे. ॥ ९ ॥ पहिलेच मी अत्यंत अज्ञानी आहे. त्यात पुन: स्वजनांच्या मोहाने ग्रस्त झालो, म्हणून तू मला योग्य विचार सांगशील असे वाटून तुला मी या प्रसंगी योग्य काय होईल हे विचारले. ॥ १० ॥ पण तुझे एकेक आश्चर्यच, तुझ्या उपदेशामध्ये गुंतागुंतच (गोंवाई) दिसून येते. तूं (अनुसरलिया) सांगशील तसे करावे असे ठरविणाऱ्या आमच्याशी तू असे करावे काय? ॥ ११ ॥ आम्ही कायावाचा मनाने तुझे वचन प्रमाण मानावे आणि तूच असे करावे म्हणजे सर्व कारभार आटोपला ॥ १२ ॥ अर्जुन म्हणतो देवा! आता अशाच अनिश्चितपणे बोध करून आम्हाला कल्याणाचा मार्ग दाखववायाचा असेल तर येथे विवेक ज्ञानाची काय आशा राहील? ॥ १३ ॥ अशा उपदेशात निश्चित मार्ग कळण्याची आशा तर राहिलीच नाही. उलट तुमच्या उपदेशाने माझे मनाचा आणखी जास्त गोंधळ उडाला हे एक अधिक झाले. ॥ १४ ॥ त्याचप्रमाणे देवा! तुझी लीलाही मला काही समजत नाही. तू या निमित्ताने माझे चित्त पाहतोस की काय? ॥ १५ ॥ किंवा थापा मारून टाळाटाळी करतोस अथवा गुप्तरीतीने तात्विक विचारच मला सांगतोस हे खरोखर काही मला कळत नाही. ॥ १६ ॥ म्हणून देवा, ऐक. असे गुप्त भावार्थाचे बोलणे पुरे करा आणि मला समजेल अशा प्राकृत भाषेत योग्य विचार सांगा ॥ १७ ॥ देवा! मी अत्यंत मूढमती आहे. पण अशाही मंदमती मला समजू शकेल अशा रीतीने निश्चित एक विचार सांगा. ॥ १८ ॥ रोग जिंकला जाईल असे औषध द्यायचे असले तरी ते गोड लागेल व अतिरुचकर राहील असे असावे. ॥ १९ ॥ ज्यायोगे माझ्या

चित्ताला बोध होईल व समाधान पावेल असा सर्व अर्थाने पूर्ण भरलेला योग्य विचार मला सांगा. ॥ २० ॥ देवा! तुझ्या सारखा सर्वज्ञ श्रीगुरु मला प्राप्त असताना मी आपली इच्छा पूर्ण कां करून घेऊ नये? तू आमची प्रेमळ आई आहेस मग येथे संकोच करण्याचे कारण काय?॥ २१ ॥ सुदैवाने आपल्या घरी कामधेनूचे सर्व इच्छा पुरविणारे दुभते जर प्राप्त झाले तर इच्छा करण्यास कां संकोच करावा?॥ २२ ॥ जर कदाचित आपल्या हाती चिंतामणी लागला तर मनोरथ पूर्ण होण्याला काय अडचण पडेल? मग आपले इच्छेप्रमाणे कां मागू नये?॥ २३ ॥ हे पहा देवा! आपण प्रयत्न करून अमृताच्या समुद्रावर गेलो आणि तेथेही जर यथेच्छ अमृत प्राशन करून तहान भागविली नाही व तहानेचे दु:ख भोगीत राहिलो तर अमृताच्या सागरावर येण्याचे कष्ट कशाला केले?॥ २४ ॥ त्याप्रमाणे हे श्रीकृष्णा, मागील अनेक जन्मात केलेल्या तुझ्या उपासनेने तू आज आमच्या सुदैवाने आम्हाला जर प्राप्त झाला आहेस. ॥ २५ तर मग आपल्या इच्छेप्रमाणे तुझ्यापाशीं कां मागू नये? देवा! तुझी प्राप्ती म्हणजे माझ्या मनाला अत्यंत सुकाळ वाटतो. ॥ २६ ॥ तुझ्या प्राप्तीमुळे माझ्या सर्व इच्छांना चेतना लाभली, माझे अनेक जन्मांचे पुण्य सफल झाले आणि माझे सर्व मनोरथ पूर्ण यशस्वी झाले. ॥ २७ ॥ या सर्वांचे कारण एकच आहे. सर्व मंगलाचे माहेरघर, सर्व देवांचा देव असा जो तुझा महिमा आहे, तो तू आमच्या स्वाधीन आहेस. ॥ २८ ॥ ज्याप्रमाणे स्तनपान करणाऱ्या मुलाला स्तनपान करण्याकरिता काळवेळाचे बंधन आई ठेवीत नाही. ॥ २९ ॥ त्याप्रमाणे, देवा! तू कृपानिधी आहेस म्हणून माझ्या मनाला जे जे पुसावेसे वाटेल ते ते मी इच्छेप्रमाणे तुला विचारतो. ॥ ३० ॥ तरी मेल्यावर सदगती देणारे व इहलोकातही आचरण्याला योग्य जे असेल ते एक निश्चित सांग असे अर्जुन म्हणाला. ॥ ३१ ॥

*श्रीभगवानुवाच*

**लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयानघ । ज्ञानयोगेन साङ्ख्यानां कर्मयोगेन योगिनाम् ॥ ३ ॥**

**अर्थ**—भगवान म्हणतात हे निष्पाप अर्जुना! पूर्वी सर्गाचे आरंभीच या लोकामध्ये दोन प्रकारच्या निष्ठा मी सांगून ठेविल्या आहेत. चोवीस तत्वाहून आपल्याला निराळे पहावे अशी ज्ञानयोगनिष्ठा विचारवंताकरिता सांगितली असून क्रियावानांकरिता कर्मयोगनिष्ठा सांगतली आहे. ॥ ३ ॥

**या बोला श्रीअच्युतु। म्हणतसे विस्मितु। अर्जुना हा ध्वनितु। अभिप्रावो ॥ ३२ ॥**
**जे बुद्धियोगु सांगतां। सांख्यमतसंस्था। प्रगटिली स्वभावता। प्रसंगें आम्हीं ॥ ३३ ॥**
**तो उद्देशु तूं नेणसीचि। म्हणोनि क्षोभलासि वायांचि। तरी आतां जाण म्यांचि। उक्त दोन्हीं ॥ ३४ ॥**
**अवधारीं वीरश्रेष्ठा। ये लोकीं या दोन्ही निष्ठा। मजचिपासूनि प्रगटा। अनादिसिद्ध ॥ ३५ ॥**
**एकु ज्ञानयोगु म्हणिजे। जो सांख्यीं अनुष्ठिजे। जेथ ओळखीसवें पाविजे। तद्रूपता ॥ ३६ ॥**
**एकु कर्मयोगु जाण। जेथ साधकजन निपुण। होवूनिया निर्वाण। पावती वेळे ॥ ३७ ॥**
**हे मार्गु तरी दोनी। परि एकवटती निदानीं। जैसी सिद्धसाध्यभोजनीं। तृप्ती एकी ॥ ३८ ॥**
**कां पूर्वापर सरिता। भिन्न दिसती पाहतां। मग सिंधुमिळणीं ऐक्यता। पावती शेखीं ॥ ३९ ॥**
**तैसीं दोनी ही मतें। सूचिती एका कारणातें। परी उपास्ति ते योग्यते। आधीन असे ॥ ४० ॥**
**देखें उत्प्लवनासरिसा। पक्षी फळासि झोंबे जैसा। सांगें नरु केवीं तैसा। पावे वेगां ॥ ४१ ॥**
**तो हळूहळू ढाळेंढाळें। केतुलेनि एके वेळे। तया मार्गाचेनि बळें। निश्चित ठाकी ॥ ४२ ॥**
**तैसें देख पां विहंगममतें। अधिष्ठूनि ज्ञानातें। सांख्य सद्य मोक्षातें। आकळिती ॥ ४३ ॥**
**येर योगिये कर्माधारें। विहितेंचि निजाचारें। पूर्णता अवसरें। पावते होती ॥ ४४ ॥**

**अर्थ**—असे अर्जुनाचे भाषण ऐकून भगवान श्रीकृष्ण आश्चर्ययुक्त हसून म्हणाले, अर्जुना! माझ्या बोलण्यात हे इंगित होते किंवा हा गुप्त अभिप्राय होता. ॥ ३२ ॥ तुला मी बुद्धियोगच सांगत होतो; पण त्या प्रसंगाने स्वभावत:च सांख्यमत-निष्ठाही सांगण्यात आली. ॥ ३३ ॥ हा माझा उद्देश तू न जाणल्यामुळे तुझ्या मनात गोंधळ उत्पन्न होवून व्यर्थच तुला त्रास झाला. पण हे दोन्ही मार्ग मीच सांगितले आहेत एवढे आता लक्षात असू दे. ॥ ३४ ॥ हे वीरांमध्ये

श्रेष्ठ असलेल्या अर्जुना! या लोकांमध्ये ज्ञाननिष्ठा व कर्मयोगनिष्ठा अशा ज्या दोन निष्ठा दिसतात त्या अनादिकाळापासून चालत आलेल्या आहेत हे पक्के ध्यानांत ठेव॥ ३५॥ एक ज्ञानयोग जो आहे तो सांख्य म्हणजे आत्मानात्मविचार करणारे जे आहेत त्यांनी आचरावयाचा असून या ज्ञानमार्गाने आत्मस्वरूपाची ओळख होते व पुरुष आत्मरूप होतो. ॥ ३६ ॥ आणि दुसरा एक जो कर्मयोग आहे त्या मार्गाने जाणारे साधक पुरुष त्या मार्गात निष्णात होऊन काही काळाने पूर्णावस्थेला पोहचतात॥ ३७॥ ज्याप्रमाणें आयता स्वयंपाक तयार झाला असता जेवण केले किंवा स्वत: स्वयंपाक करून जेवण केले तरी दोहोनीही होणारी तृप्ती एकच असते; त्याप्रमाणे ज्ञानयोग व कर्मयोग हे दोन मार्ग असले तरी शेवटी एकाच ठिकाणी मिळतात॥ ३८॥ किंवा पूर्ववाहिनी व पश्चिम वाहिनी अशा दोन नद्या वाहताना भिन्न दिसल्या तरी समुद्रास मिळाल्यावर एकरूपच होतात. ॥ ३९ ॥ त्याप्रमाणे कर्मयोग व ज्ञानयोग ही दोन्ही मतें, सर्वांचे कारण जे परब्रह्म त्या कारणालाच शेवटी सूचित करितात. पण त्यांचे आचरण मात्र योग्यतेवर अवलंबून आहे. ॥ ४० ॥ अर्जुना! असे पहा की पक्षी हा उडून एकदम फळाला झोंबतो तसे त्या वेगाने एकदम मनुष्याला फळ हस्तगत करता येईल का?॥ ४१ ॥ तो हळूहळू एका फांदीवरून दुसऱ्या फांदीवर अशा क्रमाक्रमाने जात जातच, पण निश्चित फळाला प्राप्त होतो. ॥ ४२ ॥ त्याप्रमाणे पक्षाच्या मार्गाप्रमाणे ज्ञानयोगी ज्ञानमार्गाचे अनुष्ठान करून तात्काळ मोक्षाला गाठतात. ॥ ४३ ॥ आणि बाकीचे साधक कर्ममार्गानुसार आपला जो विहित आचार असेल त्याचे आचरण करून काही काळाने पूर्णतेला म्हणजे परब्रह्मस्वरूपाला पावतात. ॥ ४४ ॥

**गूढार्थदीपिका—परी उपास्ति ते योग्यते। आधीन असे.**

ज्ञानयोगनिष्ठा व कर्मयोगनिष्ठा ह्या दोन्ही निष्ठा मीच सांगितल्या असून ज्ञानयोगनिष्ठा विचारप्रधान पुरुषाकरिता व कर्मयोगनिष्ठा कर्मप्रवृत्ती प्रबल असलेल्या पुरुषाकरिता सांगितली आहे असे भगवान म्हणतात. यावरून या पृथक दोन निष्ठांचे पृथक अधिकारी आहेत हे सिद्ध आहे. सर्व पुरुषांकरिता एक कर्मयोग निष्ठाच काही भगवंतांनी सांगितली नाही; किंवा प्रत्येक पुरुषासमोर ह्या दोन निष्ठा ठेविल्या नाहीत. अधिकारानुसारच भगवंतांनी मार्ग प्रवृत्त केले आहेत.

एखादे वेळी कर्मयोगनिष्ठेचा अधिकारी असलेला पुरुष अविवेकाने कर्मसंन्यास करू पाहतो. अर्जुनाचा प्रकार तसाच होता तो जातीचा क्षत्रिय होता व क्षत्रियाची प्रकृती कर्मप्रधान असल्यामुळे तो कर्मयोगनिष्ठेचाच अधिकारी होता पण स्वजनांच्या मोहाने कर्मसंन्यास करू पाहत होता. वास्तविक कर्मसंन्यास हा त्याचा धर्म नव्हता. म्हणूनच 'अर्जुना! तू कर्मयोगनिष्ठेचा अधिकारी आहेस. तुझ्या प्रकृतीनुसार पाहता तू कर्मसंन्यासाचा अधिकारी नाहीस' हे सांगण्याकरिता भगवंतांनी कर्मनिष्ठेचा अधिकारी व कर्मसंन्यासनिष्ठेचा अधिकारी एक नाही, भिन्न आहेत हे येथे सांगितले आहे. नाहीतर भिन्न मार्ग किंवा भिन्न निष्ठा सांगण्याचे काही कारणच नव्हते. ज्ञानयोगाचा अधिकारी कर्मयोगाचे अनुष्ठान करू शकत नसला पाहिजे व कर्मयोगाचा अधिकारी ज्ञाननिष्ठा सांभाळू शकत नसला पाहिजे तरच या दोन निष्ठांची उपयुक्तता सिद्ध होऊ शकते व तसे आहेही.

ज्याप्रमाणे लहान मुले असलेल्या व नवरा सरकारी नोकर असलेल्या एकट्या बाईला मुले सांभाळणे व स्वयंपाकादी कामे करून वेळेवर नवऱ्याला जेऊ घालून कामावर पाठविणे अशक्य होते, त्याप्रमाणे ज्यांच्या ठिकाणी प्रकृतिधर्मानुसार कर्मप्रवृत्ति विशेष आहे अशा क्षत्रियादि जातीतील पुरुषांना साक्षीत्व सांभाळण्याकरिता 'मी अकर्ता असंग आहे' अशी बुद्धी सारखी वागवावी लागते. पण कर्मप्रवृत्तीत कर्तृत्व उत्पन्न होते, म्हणून परस्पराविरुद्ध अशी कर्मप्रवृत्ती व साक्षित्व एके ठिकाणी राहू शकत नाहीत. आपले साक्षित्व जाणल्या बरोबरच साक्षीत्व बाणते असा अर्थ नाही. ते बाणण्याकरिता सारखा अभ्यासच करावा लागतो. एकदा साक्षीत्व आंगी बाणल्यावर मग साक्षीत्व व कर्म प्रवृत्ती यांचा विरोध राहत नाही हे खरे, पण कर्मप्रवृत्ती प्रबल असताना, साक्षीत्व बाणण्याचा अभ्यास करताना मात्र अंतर कर्मप्रवृत्ती व साक्षीत्वाचा अभ्यास यांचा विरोध येतो. ज्याप्रमाणे परीक्षेकरिता अभ्यास करण्यात गुंतलेल्या विद्यार्थ्याला घरची कामे करणे जमत नाही, त्याप्रमाणेच साक्षीत्वाचा अभ्यास व कर्मप्रवृत्ती यांचा मेळ बसत नाही.

ज्यांच्या प्रकृतीत सत्वगुणाच्या उत्कर्षामुळे कर्म करण्याची प्रवृत्ती अत्यंत क्षीण आहे अशा लोकांनाच, संन्यासपूर्वक साक्षीत्वाचा अभ्यास करता येतो व अशा लोकांकरिताच संन्यासाचे विधान आहे.

**न कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते। न च सन्न्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति॥ ४॥**

**अर्थ**—नुसता उचित कर्माचा त्याग केला की मनुष्य सिद्धाप्रमाणे कर्मरहित होऊ शकत नाही आणि नुसता कर्मसंन्यास केला तर तो ब्रह्मस्वरूप होतो असे नाही. ॥ ४॥

**वांचोनि कर्मारंभ उचित। न करितांचि कां सिद्धवत। कर्महीना निश्चित। होईजेना॥ ४५॥**
**कां प्राप्तकर्म सांडिजे। येतुलेनि नैष्कर्म्या होईजे। हें अर्जुना वायां बोलिजे। मूर्खपणें॥ ४६॥**
**सांगे पैलतीरा जावें। ऐसें व्यसन कां जेथ पावे। तेथ नावेतें त्यजावें। घडे केवीं॥ ४७॥**
**ना तरी तृप्ति इच्छिजे। तरी कैसेनि पाकु न कीजे। कीं सिद्धुही न सेविजे। केवीं सांगें॥ ४८॥**
**जंव निरार्तता नाहीं। तंव व्यापारु असे पाहीं। मग संतुष्टीच्या ठायीं। कुंठे सहजें॥ ४९॥**
**म्हणोनि आइकें पार्था। जया नैष्कर्म्यपदीं आस्था। तया उचित कर्म सर्वथा। त्याज्य नोहे॥ ५०॥**
**आणि आपुलालिये चाडे। आपादिलें हें मांडे। कीं त्यजिलें कर्म सांडे। ऐसें आहे॥ ५१॥**
**हें वायांचि सैरा बोलिजे। उकलु तरी देखोनि पाहिजे। परी त्यजितां कर्म न त्यजे। निभ्रांत मानीं॥ ५२॥**

**अर्थ**—सिद्ध म्हणजे स्थितप्रज्ञ पुरुष जसा कर्मरहित ब्रह्मस्वरूप होऊन राहतो तसा उचित कर्माचा आरंभ न करणारा असा कर्महीन पुरुष उचित कर्माचे अनुष्ठान केल्यावाचून सिद्ध म्हणजे स्थितप्रज्ञ पुरुषाप्रमाणे कर्मरहित ब्रह्मस्वरूप होऊ शकत नाही. ॥ ४५॥ किंवा विहित कर्म सोडल्यानेच केवळ पुरुष कर्मरहित होतो असे म्हणणे, अर्जुना मूर्खपणाचे आहे म्हणून व्यर्थ आहे. ॥ ४६॥ अर्जुना! सांग बरे, नदीच्या परतीराला जायचे आहे असे जर संकट प्राप्त झाले तर नावेचा त्याग करिता येईल का?॥ ४७॥ किंवा क्षुधाशांती व्हावी अशी इच्छा असल्यास स्वयंपाक न करता कसे भागेल किंवा आयते शिजविलेले अन्नही घेतले नाही तर क्षुधाशांती होईल का?॥ ४८॥ जोपर्यंत विषयसुखाची वासना नाहीशी होत नाही तोपर्यंत प्रयत्न लागतोच. विषयावाचून मन सदा संतुष्ट राहू लागले की प्रयत्न आपोआप थांबतो. ॥ ४९॥ म्हणून अर्जुना! ऐक, ज्याला कर्मरहित अशा आपल्या आत्मस्वरूपाचे ठिकाणी स्थिर राहावयाचे असेल त्याचे आपले विहित कर्माचरण सोडू नये. ॥ ५०॥ आणि आपल्या इच्छेप्रमाणे जे कर्म करू तेच होते व जे कर्म टाकू किंवा करणार नाही ते होंतच नाही असे आहे काय?॥ ५१॥ हे व्यर्थच काहीतरी बडबडणे आहे. विचार करून जर आपण पाहू लागलो तर असे दिसते की केवळ विहित कर्म टाकल्यानेच कर्म टाकले जाते किंवा आपण कर्मरहित होतो असे नाही, हे पक्के समज. ॥ ५२॥

**गूढार्थदीपिका—त्यजिता कर्म न त्यजे**

'**न कर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते**' या श्लोकाने भगवंतानीच विहित कर्म करता करताच नैष्कर्म्य स्थिती किंवा कर्मरहित स्थिती प्राप्त होते असे स्वतःच सांगून, कर्मयोग हा नैष्कर्म्याचे साधन आहे, असे दाखविले आहे. नैष्कर्म्य म्हणजे आपण मूळचे कर्मरहित केवळ सच्चिदानंदस्वरूप आहो असे जाणणे होय कर्मयोगाचे अनुष्ठानाने असा आपल्या स्वरूपाचा अनुभव येतो. मनुष्याने सर्वकर्माहून आपल्याला निराळे किंवा कर्मरहित पाहणे यालाच सर्वकर्मसंन्यास म्हणतात.

असा हा कर्मसंन्यास कर्म टाकल्याने प्राप्त होऊ शकत नाही, कारण कर्माचा त्याग करण्यात 'मी कर्माचा त्याग केला' असे त्यागरूप कर्म व त्याचे कर्तृत्व मनात उठत राहते.

**न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत्। कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः॥ ५॥**

**अर्थ**—कोणीही पुरुष क्षणभर देखील कर्मरहित राहू शकत नाही आपल्या प्रकृतीमध्ये जे गुण असतील किंवा ज्या गुणांचा प्रकृतिस्वभाव बनला असतो त्या प्रकृतिगुणानुसार प्रत्येक मनुष्य प्रकृतीच्या स्वाधीन असल्यामुळे कर्म करीतच असतो किंवा त्याच्याकडून गुणानुसार कर्म घडतच असते. ॥ ५॥

**जंव प्रकृतीचें अधिष्ठान। तंव सांडी मांडी हें अज्ञान। जे चेष्टा ते गुणाधीन। आपैसी असे॥ ५३॥**
**देखें विहित कर्म जेतुलें। तें सळे जरी वोसंडिलें। तरी स्वभाव काय निमाले। इंद्रियांचे॥ ५४॥**
**सांगें श्रवणीं ऐकावें ठेलें। कीं नेत्रींचे तेज गेलें। हें नासारंध्र बुझालें। परिमळु नेघे॥ ५५॥**
**ना तरी प्राणापानगति। कीं निर्विकल्प जाहली मति। कीं क्षुधातृषादि आर्ति। खुंटलिया॥ ५६॥**
**हे स्वप्नावबोधु ठेले। कीं चरण चालों विसरले। हें असो काय निमाले। जन्ममृत्य॥ ५७॥**
**हें न ठकेचि जरी कांहीं। तरी सांडिलें तें कायी। म्हणोनि कर्मत्यागु नाहीं। प्रकृतिमंतां॥ ५८॥**
**कर्म पराधीनपणें। निपजतसे प्रकृतिगुणें। येरी धरीं मोकलीं अंतःकरणें। वाहिजे वायां॥ ५९॥**
**देखें रथीं आरूढिजे। मग जरी निश्चळा बैसिजे। तरी चळा होऊनि हिंडिजे। परतंत्रा॥ ६०॥**
**कां उचलिलें वायुवशें। चळे शुष्क पत्र जैसें। निचेष्ट आकाशें। परिभ्रमे॥ ६१॥**
**तैसें प्रकृतिआधारें। कर्मेंद्रियविकारें। निष्कर्म्युही व्यापारे। निरंतर॥ ६२॥**
**म्हणऊनि संगु जंव प्रकृतीचा। तंव त्यागु न घडे कर्माचा। ऐसियाहि करूं म्हणती तयांचा। आग्रहोचि उरे॥ ६३॥**

**अर्थ**—जीवाचा जोपर्यंत प्रकृतीशी संबंध आहे तोपर्यंत मी कर्मत्याग करतो किंवा कर्म करतो असे म्हणणे हे अज्ञानच म्हटले पाहिजे. कारण आत्मा कर्ता नसून कर्म करण्याचा किंवा न करण्याचा व्यापार सर्व आपोआप गुणानुसार होत जातो. ॥ ५३ ॥ हे पहा, अर्जुना! जेवढे काही विहित कर्म असेल ते सर्व जरी केले नाही, टाकून दिले तरी इंद्रियांचे स्वभावभूत व्यापार काय नाहीसे होतात?॥ ५४॥ अर्जुना सांग बरे! कानाचा ऐकण्याचा व्यापार बंद पडला काय? किंवा डोळ्याचे तेज जाऊन त्याचे पाहण्याचे कर्म होत नसते की नाक बुजून गेले आणि वास घेण्याचे काम ते करीत नाही?॥ ५५ ॥ किंवा प्राणाची-अपानाची वर व खाली वाहण्याची गती बंद पडली की आपले मन निर्विकल्प होऊन ते संकल्प विकल्प करेनासे झाले? तहान भूक हे व्यापार तरी बंद पडतात का?॥ ५६ ॥ त्याचप्रमाणे निजणे व जागणे हे व्यापार तरी थांबलेत का? का पायांचा चालण्याचा व्यापार तरी बंद पडला? हे राहो, पण जन्ममृत्यु तरी नाहीसे झाले का?॥ ५७॥ हे सर्व व्यापार होतातच व यांपैकी काही एक कर्म जर बंद पडत नाही तर कोणते कर्म आपण सोडले असे म्हणता येते? म्हणून प्रकृतीच्या स्वाधीन असणाऱ्याला कर्म सुटत नाही हे पक्के समज. ॥ ५८ ॥ आपण प्रकृतीच्या स्वाधीन झाल्यामुळे प्रकृतीच्या गुणानुसार कर्म होतच असते, पण 'धरी' म्हणजे मी कर्म केले व माझे हे कर्म, तसेच 'मोकळी' म्हणजे मी हे कर्म सोडतो किंवा करीत नाही असे व्यर्थच आपण आपल्या अंतःकरणात कर्माचा संबंध वागवीत असतो. ॥ ५९ ॥ हे पहा अर्जुना! आपण रथावर बसलो व निश्चळ जरी राहिलो तरी रथाच्या परतंत्र झाल्यामुळे आपण चालतो व हिंडतोच. ॥ ६० ॥ झाडाचे वाळलेले पान ज्याप्रमाणे वायूने उडविले असता ते जसे निःचेष्ट म्हणजे स्वतः काही चेष्टा न करता आकाशात परिभ्रमण करिते. ॥ ६१ ॥ जोपर्यंत आत्मा प्रकृतीला आधार आहे तोपर्यंत कार्यरूप कर्मेन्द्रियांचे, निष्कर्म म्हणजे कर्मरहित अशा आत्म्याचे ठिकाणीही, सदा कर्म होतच राहते. ॥ ६२ ॥ म्हणून जोपर्यंत प्रकृतीचा संबंध वागविला जातो तोपर्यंत कर्माचा त्याग होऊ शकत नाही. असे असूनही जर कोणी कर्मत्याग करतो असे म्हणू लागला तर तो त्याचा दुराग्रहच म्हणावा लागेल. ॥ ६३ ॥

**गूढार्थदीपिका विवरण**—येथे श्रीज्ञानेश्वर माऊली असें सांगत आहे की कर्म तेवढें तें प्रकृतीचें कार्य किंवा स्वरूप होय. कर्म म्हणजेच प्रकृति होय. असें पुढे तेराव्या अध्यायांत ''प्रकृतीतें समस्तां। क्रियां नाम''॥ ९६६ ॥ या ओवीने सांगितलेही आहे कर्म हें प्रकृतीचें असतांना तें कर्म माझें, मी तें केलें असे जो अंतःकरणांत समजतो, त्याने प्रकृतीचा आश्रय केला असें समजावें, येथे अज्ञानी असो कीं ज्ञानी असो प्रत्येक पुरुष कर्म करीतच असतो. तो क्षणभरही कर्मरहित राहूं शकत नाहीं असें सांगितलें नसून प्रकृतीच्या स्वाधीन असलेला म्हणजे मी प्रकृतीहून निराळा आहे असें आपल्याला न जाणणारा असा अज्ञानी पुरुषच क्षणभर देखील कर्मरहित राहूं शकत नाही असें सांगितलें आहे. ज्ञानी पुरुष आपल्याला जड प्रकृतीहून व कर्माहून निराळें पाहातो, म्हणून तो (ज्ञानी पुरुष)

आपल्याला मी ज्ञानस्वरूप असून जड अशा प्रकृतीहून व कर्माहून निराळा आहे असे साक्षात् जाणत असल्यामुळे त्याच्या ठिकाणी प्रकृतीनुसार कर्म होत असलें तरी तो त्या कर्माशीं व त्या कर्माच्या कर्तृत्वाशीं मुळीच संबंध वागवत नाही. म्हणून दुसरा पुरुष त्याचें ठिकाणी कर्म पाहत असला व तो कर्म करितो असें म्हणत असला तरी ज्ञानी पुरुषाचे ठिकाणी कर्म आहे किंवा मी तें केलें अशी कर्मबुद्धि व कर्तृत्वबुद्धि कधीच उत्पन्न होत नाही. म्हणून तो कर्म करणे किंवा त्यागणे या दोन्हीहि कर्माच्या विरहित असतो. ॥ ५ ॥

**कर्मेन्द्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन्। इन्द्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते॥ ६ ॥**

**अर्थ**—कर्मेंद्रियांना विषयांपासून आवरून जो मनाने विषयाचें चिंतन करतो, तो मूर्ख जाणावा व तो दंभाचारी समजावा. ॥ ६ ॥

**जे उचित कर्म सांडिती। मग नैष्कर्म्य होऊं पाहती। परी कर्मेन्द्रियप्रवृत्ती। निरोधुनी॥ ६४॥**
**तयां कर्मत्यागु न घडे। जे कर्तव्य मनीं सांपडे। वरी नटती तें फुडें। दरिद्र जाण॥ ६५॥**
**ऐसे ते पार्था। विषयासक्त सर्वथा। ओळखावे तत्त्वता। येथ भ्रांति नाहीं॥ ६६॥**
**आतां देईं अवधान। प्रसंगें तुज सांगेन। या नैराश्याचें चिन्ह। धनुर्धरा॥ ६७॥**

**अर्थ**—जे पुरुष कर्मेंद्रियांचा निरोध करून म्हणजे कर्मेंद्रियांची आपआपल्या विषयांकडे जाण्याची जी प्रवृत्ति तिचा निरोध करून आपलें विहित कर्म सोडून देतात व नैष्कर्म्य होऊ पाहतात. ॥ ६४ ॥ त्यांना कर्मत्याग घडत नाही. कारण त्यांच्या ठिकाणीं अंत:करणांत प्रवृत्तीचा निरोध करण्याचें कर्म व त्यांचें कर्तृत्व उत्पन्न होतेच, असें असूनहि जे कर्मेंद्रियप्रवृत्तीचा निरोध करतात त्यांचें तें करणें म्हणजे दारिद्र्य भोगणेंच होय, कारण अशा करण्याने विषयसुखहि मिळत नाही व आत्मसुखहि मिळत नाही. ॥ ६५ ॥ अशा पुरुषांच्या अंत:करणांत विषयासक्ति राहते हें नि:संशय लक्षांत घे. ॥ ६६ ॥ अर्जुना! आतां लक्ष दे. या प्रसंगानेच मी तुला नैराश्याचें म्हणजें विषयसुखाची आशा ज्याचे ठिकाणी मुळीच नाही अशा पुरुषाचे लक्षण सांगतों. ॥ ६७ ॥

**गूढार्थदीपिका विवरण**—श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या गीतेंतील १४ व्या. अध्यायाच्या ''नाइकणें ते कानचि वाळी। न पाहणें तें दिठीचि गाळी। अवाच्य तें टाळी। जिभचि गा. ॥ २०९ ॥'' या ओवीतील स्वानुभूतिप्रमाणे सत्वगुणाच्या उत्कर्षामुळे तीव्र वैराग्य उत्पन्न होऊन ज्यांची इंद्रिये आपआपले विषयाकडे आपण होऊनच प्रवृत्त होत नाही. अशा पुरुषाच्या कर्मराहित्याला येथे मिथ्याचार म्हटलें नसून, मनांत व इंद्रियांच्या ठिकाणी विषयासक्तीमुळे कर्म करण्याची प्रवृत्ति कायम असून जे कोणी जबरदस्तीने इंद्रियांना आपआपले व्यवहार करूं देत नाहीत व अशा रीतीने कर्मरहित होऊं पाहतात, त्यांच्या त्या अकर्म स्थितीला येथे मिथ्याचार म्हटलें आहे असे ''**कर्मेंद्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन्**'' या वचनावरून स्पष्ट आहे. अर्थात् ज्यांची कर्मप्रवृत्तिरूप प्रकृति क्षीण झाली त्यांचा येथे निषेध नसून ज्यांची कर्मप्रवृत्ति क्षीण झाली नाही व बळेच इंद्रियांचा रोध करून कर्माचा त्याग करूं पाहतात अशांची येथे निंदा केली आहे.

**यस्त्विन्द्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन। कर्मेन्द्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते॥ ७॥**

**अर्थ**—मनांतून विषयसुखाची इच्छा सोडून जो पुरुष आपल्या मनाने कर्मेंद्रियाचें नियमन करतो व निष्काम चित्त होऊन किंवा विषयसुखाची इच्छा न करता कर्मयोगाचें अनुष्ठान करितो तो श्रेष्ठ समजावा. ॥ ७ ॥

**जो अंतरीं दृढु। परमात्मरूपीं गूढु। बाह्य तरी रूढु। लौकिकु जैसा॥ ६८॥**
**तो इंद्रियां आज्ञा न करी। विषयांचें भय न धरी। प्राप्त कर्म न अव्हेरी। उचित जें जें॥ ६९॥**
**तो कर्मेन्द्रियें कर्मीं। राहटतां तरी न नियमी। परी तेथिचेनि उर्मीं। झांकोळेना॥ ७०॥**
**तो कामनामात्रें न घेपे। मोहमळें न लिंपे। जैसें जळीं जळें न शिंपे। पद्मपत्र॥ ७१॥**
**तैसा संसर्गामाजि असे। सकळांसारिखा दिसे। जैसें तोयसंगें आभासे। भानुबिंब॥ ७२॥**
**तैसा सामान्यत्वें पाहिजे। तरी साधारणुचि देखिजे। येरवीं निर्धारितां नेणिजे। सोय जयाची॥ ७३॥**

**ऐशा चिन्हीं चिन्हितु। देखसी तोचि मुक्तु। आशापाशरहितु। वोळख पां॥ ७४॥**
**अर्जुना तोचि योगी। विशेषिजे जो जगीं। म्हणोनि ऐसा होय यालागीं। म्हणिपें तूतें॥ ७५॥**
**तूं मानसा नियमु करीं। निश्चळु होयें अंतरीं। मग कर्मेन्द्रियें हीं व्यापारी। वर्ततु सुखें॥ ७६॥**

अर्थ—जो पुरुष अंत:करणांत गुप्त असलेल्या परमेश्वर स्वरूपाचे ठिकाणीं अचल स्थिर झाला व बाहेर लोकांत इतर सामान्य लोकांप्रमाणे कार्य करीत राहतो. ॥ ६८ ॥ जो पुरुष इंद्रियांना आज्ञा करीत नाही, जो विषयाची भीति बाळगीत नाही म्हणजे विषय मिथ्या वाटल्यामुळे ज्या मला हे विषय गोंवतील अशी भीति वाटत नाही आणि जें जें वेळोवेळी कराव्या लागणाऱ्या उचित कर्माचा जो त्याग करीत नाही. ॥ ६९ ॥ त्यांची कर्मेंद्रियें कर्मांमध्ये वावरीत असतांना त्यांना आवरत नाही, पण त्या कर्मेंद्रियांच्या व्यापाराने अपल्या कर्मरहित स्थितीला विसरत नाही. ॥ ७० ॥ तो कोणत्याहि प्रकारची विषयवासना करीत नाही, त्याला अविवेकरूपी मळाचा कधी स्पर्श होत नाही, ज्याप्रमाणे पाण्यांतील कमळाचें पानाला पाणी लागत नाही त्याप्रमाणे तो कर्मांत अलिप्त असतो. ॥ ७१ ॥ सर्व लोकांच्या व सर्व कर्मांच्या संसर्गांत किंवा समागमांत तो वावरतो व सर्वसामान्य माणसाप्रमाणेच दिसतो; पण ज्याप्रमाणे पाण्यांत सूर्याचें प्रतिबिंब पडलें तरी सूर्य पाण्याहून अत्यंत निराळा असतो, त्याप्रमाणे तो सर्व संसर्गाहून निराळा असतो. ॥ ७२ ॥ त्याप्रमाणे सामान्य दृष्टीने त्याच्याकडे पाहिलें असतां तो साधारण माणसाप्रमाणे भासतो, पण खरोखर त्यांच्या स्थितीचा निश्चय करूं असे म्हणून पाहूं लागलों तर त्याच्या स्थितीची कल्पनाच करिता येत नाही. ॥ ७३ ॥ अशा लक्षणाने युक्त असलेला पुरुष तो मुक्तच असतो आणि त्याला कांही मिळविण्याची आशा नसते व तो कोणत्या मोहपाशांत गुंतलेलाहि नसतो. ॥ ७४ ॥ अर्जुना! अशा विशेषणांनी विशिष्ट जो पुरुष आहे तोच कर्मयोगी होय असें जाण. म्हणूनच मी तुला असा योगी हो असें म्हणत असतो. ॥ ७५ ॥ तूं आपल्या मनाला आवर व अंत:करण परमेश्वरस्वरूपाचें ठिकाणी निश्चळ कर. असें झालें असतां हीं तुझीं कर्मेंद्रियें आपआपली कर्मे खुशाल करोत. ॥ ७६ ॥

**गूढार्थदीपिका विवरण**—या ओव्यांचा भावार्थ असा आहे की मनुष्याचें अंत:करण परमेश्वराचे ठिकाणी निश्चल झालें असतां जेवढें कांही कर्म होतें तेवढें सर्व कर्म प्रकृतिमुळे होतें व माझ्या आत्मस्वरूपाचा येथे कांही संबंध नाही असें तो जाणतो, म्हणून त्याचा सर्व कर्माशीं संबंध सुटतो. जसें जसें कर्म अशा रीतीने होत जाते तसें तसें अंत:करण परमेश्वराचे ठिकाणीं दृढ होत जातें व अंत:करणांतून विषयसुखाची वासना नाहीशी होत जाऊन जीव हा पूर्ण निष्काम होतो व ईश्वराशीं ऐक्य पावतो. कोणत्याहि कर्माचा लेप त्याला मग लागत नाही. असा पुरुष वरवर पाहतां सामान्य पुरुषाप्रमाणे कर्म करतो असें दिसत असलें तरी तो पूर्ण कर्मरहित ब्रह्मस्वरूप असतो. कर्माचा त्याग करून मी कर्माचा त्याग केला अशी कर्म व कर्तृत्वाची बुद्धि वागविणारा कर्मरहित न होतां कर्म करणाराच होतों आणि कर्मफळाची इच्छा सोडून भगवंतांनी निर्माण केलेल्या धर्मानुसार वागण्याचा इंद्रियांना अभ्यास लावतो, त्यांचें चित्त परमेश्वराचे ठिकाणीं स्थिर होऊन मी कर्म व कर्तृत्व यांच्याहून अत्यंत निराळा, केवळ सच्चिदानंद आत्मस्वरूप आहे, असां अनुभव येत असल्यामुळे तो पहिल्यापेक्षा श्रेष्ठ असून तोच खरा ज्ञानीपुरुष होय. कारण त्याचेच ठिकाणीं प्रवृत्तिनिवृत्तिरहित खरी साक्षीदशा किंवा समता बाणली असते.

येथे मनाचें नियमन कर असें जें सांगितलें आहे. त्याचा अर्थ असा आहे की मनाची वाटेल तसें वागण्याची प्रवृत्ति सोडून भगवंतांनी निर्माण केलेल्या केवळ धर्माप्रमाणेच वागण्याची मनाला संवय लावावी.

**नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मण:। शरीरयात्रापि च ते न प्रसिद्ध्येदकर्मण:॥ ८॥**

**अर्थ**—अर्जुना! तू आपलें विहित कर्म कर. कर्म न करण्यापेक्षा कर्म करणें चांगले आहे. कर्मच केलें नाही, तर कर्म न करण्याने शरीर ही जिवंत राहणार नाही. ॥ ८ ॥

**म्हणशी नैष्कर्म्य होआवें। तरी एथ तें न संभवें। आणि निषिद्ध केवीं राहाटावें। विचारीं पां॥ ७७॥**
**म्हणोनि जें जें उचित। आणि अवसरेंकरूनि प्राप्त। तें कर्म हेतुरहित। आचरे तूं॥ ७८॥**
**पार्था आणीकही एक। नेणसी तूं हें कवतिक। जे ऐसें कर्म मोचक। आपैसें असे॥ ७९॥**

**देखें अनुक्रमाधारें। स्वधर्मु जो आचरे। तो मोक्षु तेणें व्यापारें। निश्चित पावे॥ ८०॥**

**अर्थ**—म्हणून नैष्कर्म्य म्हणजे कर्मरहित असें आत्मरूप व्हायचें असल्यास कर्मत्याग करून तें साधणें शक्य नाही बरें, वेदाने जें करूं नये म्हणून सांगितलें आहे असें निषिद्ध कर्म करण्याला कसें प्रवृत्त होणें योग्य आहे याचा, अर्जुना! विचार कर॥ ७७॥ म्हणून आपल्याला विहित असेल तें उचित कर्म व प्रसंगोपात्त जें नैमित्तिक कर्म, अशीं दोन नित्य व नैमित्तिक कर्में विषयासुखाच्या प्राप्तीचा उद्देश सोडून केवळ भगवंताने लावून दिलेलें आपलें कर्तव्य आहे असें समजून कर. ॥ ७८ ॥ अर्जुना! अशा रीतीने निष्काम कर्म करण्यांत एक जी मौज आहे ती तुला माहित नाही. अशा रीतीने केलेलें कर्म अनायासें कर्मबंधनापासून सोडविणारें होते. ॥ ७९ ॥ अर्जुना! हें एक लक्षांत ठेव की नित्यकर्म दररोज करायचें असतें व नैमित्तिक कर्म त्यांचें निमित्त प्राप्त झाले असतां करायचें असतें. हा जो नित्यनैमित्तिक कर्म करण्याचा क्रम आहे त्या कर्माला अनुसरून जो आपल्या नित्यनैमित्तिक कर्मरूपी स्वधर्माचें आचरण करितो तो त्या निष्काम करण्याने निश्चित मोक्षाला प्राप्त होतो. ॥ ८० ॥

**यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबन्धनः। तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसङ्गः समाचर॥ ९॥**

**अर्थ**—अर्जुना! हा मृत्युलोक (कर्मांने बांधला आहे म्हणजे) कर्मांने प्राप्त होतो, यज्ञाप्रीत्यर्थ म्हणजे केवळ भगवत्प्रीत्यर्थ कर्म न करता किंवा भगवंताची निष्काम आज्ञा पाळणें माझें कर्तव्य आहे असे समजून स्वधर्माचें अनुष्ठान न करतां विषयसुखाचे प्राप्तीकरिता जें कर्म केलें जातें त्या कर्मांने हा लोक बांधला गेला आहे; म्हणून फळाची इच्छा सोडून केवळ स्वधर्म म्हणून निष्काम चित्ताने भगवत्प्रीत्यर्थ कर्म कर. ॥ ९ ॥

**स्वधर्मु जो बापा। तोचि नित्ययज्ञु जाण पां। म्हणोनि वर्ततां तेथ पापा। संचारु नाहीं॥ ८१॥**
**हा निजधर्मु जैं सांडे। आणि कुकर्मीं रति घडे। तैंचि बंधु पडे। संसारिकु॥ ८२॥**
**म्हणोनि स्वधर्मानुष्ठान। तें अखंड यज्ञयाजन। जो करी तया बंधन। कहींच न घडे॥ ८३॥**
**हा लोकु कर्में बांधिला। जो परतंत्रा भूलला। तो नित्ययज्ञातें चुकला। म्हणोनियां॥ ८४॥**

**अर्थ**—अर्जुना! मनुष्याला जो स्वधर्म म्हणून सांगितला तोच नित्ययज्ञ होय हें जाण. म्हणूनच स्वधर्माचें अनुष्ठान करण्यांत पाप होत नाही. ॥ ८१ ॥ हा स्वधर्म जेव्हा टाकला जातो तेव्हा शास्त्रविरुद्ध कर्म करण्यांतच मनाची आवडी होते व तेव्हाच संसाराचें बंधन उत्पन्न होतें. ॥ ८२ ॥ म्हणून स्वधर्माचें अनुष्ठान करणें हेंच अखंड यज्ञाचें अनुष्ठान होय हें स्वधर्मरूप अखंड यज्ञाचें अनुष्ठान जो करतो त्याला कधीच कर्माचें बंधन होत नाही. ॥ ८३ ॥ नित्य यज्ञरूप परमेश्वराला सोडून विषयांत गोडी मानणाऱ्या इंद्रियांचे स्वाधीन होऊन कर्म करतो म्हणून तो मनुष्य कर्मांने बांधला जाते. ॥ ८४ ॥

**सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः। अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक्॥ १०॥**

**अर्थ**—पूर्वी स्वधर्मरूप यज्ञासह ब्रह्मदेवाने सर्व सृष्टि निर्माण केली तेव्हा ब्रह्मदेव सर्व निर्माण केलेल्या प्रजेला म्हणाले की, या स्वधर्मरूप यज्ञाने तुम्ही आपली वृद्धि करून घ्या व हा धर्मरूप यज्ञच तुमच्या सर्व इच्छित कामना पुरविणारा होवो!॥ १० ॥

**आतां येचिविशीं पार्था। तुज सांगेन एकी मी कथा। जैं सृष्ट्यादि संस्था। ब्रह्मेने केली॥ ८५॥**
**तैं नित्ययागसहितें। सृजिलीं भूतें समस्तें। परी नेणतीचि तियें यज्ञातें। सूक्ष्म म्हणउनी॥ ८६॥**
**ते वेळीं प्रजीं विनविला ब्रह्मा। देवा काय आश्रयो एथ आम्हां। तंव म्हणे तो कमळजन्मा। भूतांप्रति॥ ८७॥**
**तुम्हां वर्णविशेषवशें। आम्हीं हा स्वधर्मुचि विहिला असे। यातें उपासा मग आपैसे। पुरतीकाम॥ ८८॥**
**तुम्हीं व्रतें नियमु न करावे। शरीरातें न पीडावें। दुरी केंही न वचावें। तीर्थासी गा॥ ८९॥**
**योगादिकें साधनें। साकांक्ष आराधनें। मंत्रयंत्रविधानें। झणीं करा॥ ९०॥**
**देवतांतरा न भजावें। हें सर्वथा कांहीं न करावें। तुम्ही स्वधर्मयज्ञीं यजावें। अनायासें॥ ९१॥**

**अहेतुकें चित्तें। अनुष्ठा पां ययातें। पतिव्रता पतीतें। जियापरी॥ ९२॥**
**तैसा स्वधर्मरूप मखु। हाचि सेव्यु तुम्हां एकु। ऐसें सत्यलोकनायकु। बोलता जाहला॥ ९३॥**
**देखा स्वधर्मातें भजाल। तरी कामधेनु हा होईल। मग प्रजा हो न संडील। तुमतें कदा॥ ९४॥**

**अर्थ—**नित्य यज्ञरूप परमेश्वराला सोडून विषयांत गोडी मानणाऱ्या इंद्रियांचे स्वाधीन होऊन कर्म करतो म्हणून तो मनुष्य कर्माने बांधला जातो. ॥ ८४॥ आता याचविषयी अर्जुना! तुला एक मी कथा सांगतों, ऐक. जेव्हा ब्रह्मदेवाने सृष्टि निर्माण केली. ॥ ८५॥ तेव्हा सर्व प्रजारूप सृष्टि निर्माण केली व त्याबरोबरच स्वधर्मरूप यज्ञहि उत्पन्न केले. पण हे धर्मरूप यज्ञ अत्यंत सूक्ष्म असल्यामुळे त्या यज्ञांना प्रजा जाणू शकली नाही. ॥ ८६॥ तेव्हा सर्व प्रजेने ब्रह्मदेवाची प्रार्थना केली की देवा! येथे उत्पन्न झाल्यानंतर आम्हा सर्व प्रजेला जीवंत राहण्याचें साधन काय? तेव्हा ब्रह्मदेव सर्व प्रजेला म्हणालें. ॥ ८७॥ आपआपल्या वर्णाप्रमाणे तुम्हाला हा धर्म सांगितला आहे. तुम्ही त्याचेंच अनुष्ठान करा म्हणजे अनायासें तुमच्या सर्व इच्छा पूर्ण होतील. ॥ ८८॥ तुमच्या मनोकामना पूर्ण होण्याकरिता तुम्हाला व्रतादि नियम करण्याची आवश्यकता नाही, तपादिकाने शरीराला दु:ख देण्याचें कारण नाही, दूरदूरच्या तीर्थयात्रेला जाणेंहि आवश्यक नाही. ॥ ८९॥ योगादिकांसारखी साधनें किंवा निरनिराळ्या देवतांची कामनिक आराधना अथवा मंत्र तंत्रादि विधानें करायला कदाचित् तुम्ही प्रवृत्त व्हाल. ॥ ९०॥ पण एका स्वधर्मरूप परमेश्वराला सोडून दुसऱ्या देवतेची उपासना वगैरे कांही करू नका. सायासरहित आपल्या स्वधर्मरूप यज्ञाने परमेश्वराचें यजन करा म्हणजे झालें. ॥ ९१॥ ज्याप्रमाणे पतिव्रता स्त्री आपल्या पतीची निष्काम चित्ताने सेवा करिते त्याप्रमाणे तुम्हीहि तशाच निष्काम चित्ताने या स्वधर्मरूप यज्ञाचें अनुष्ठान करा. ॥ ९२॥ तसेंच हा स्वधर्मरूप यज्ञ तुम्हाला सर्वस्वीं सेव्य आहे असें सत्यलोकाधिपति ब्रह्मदेव बोललें. ॥ ९३॥ हें पहा, या स्वधर्माचें जर अनुष्ठान कराल तर हा कामधेनूप्रमाणे तुमची मनोकामना पूर्ण करील. प्रजाजनहो, तो स्वधर्म तुमची कधीहि उपेक्षा करणार नाही. ॥ ९४॥

**गूढार्थदीपिका विवरण—**"मानव समाज केव्हा प्रथम रानटी अवस्थेंत म्हणजे धर्मनिर्बंधरहित अवस्थेंत असतो व पुढे तसे धर्मबंधनरहित राहणें हिताचें नाही असें समजून मानव समाजच धर्ममर्यादा निर्माण करतो." हें मत गीतेला मान्य नाही असें "सहयज्ञा: प्रजा: सृष्ट्वा" या श्लोकावरून स्पष्ट दिसतें.

पूर्वी कांही एक तिचें अस्तित्व नसतां प्रथमच केव्हा तरी सृष्टि उत्पन्न झाली व त्यावेळीं मानव समाज रानटी अवस्थेंत होता असें कोणत्याही प्राचीन आर्षग्रंथांत मानलें नाही. सर्व गोष्टीचा तात्त्विक विचार करण्याऱ्या वेदान्तशास्त्राने जगत् हें अनादि मानलें आहे व प्रत्येक सृष्टीच्या आरंभी असणारे जे कृतयुग ते युग सात्विक असल्यामुळे त्या युगांतील मानवसमाज कोणत्याहि नियंत्रणावांचून स्वभावत: धर्मपरायण असतो व ही धर्मपरायणता पुढे युगपरत्वें जशी जशी क्षीण होत जाते तसे तसे परमेश्वराचे ठिकाणीं लीन किंवा अव्यक्त असलेले निर्बंध परमेश्वरच, परमेश्वरास प्राप्त झालेल्या आपल्या आधिकारिक महात्म्यांच्या द्वारा प्रकट करतो, असें "**युगान्तेऽन्तर्हितान्वेदान्सेतिहासान्महर्षय:। लेभिरे तपसा पूर्वमनुज्ञाता: स्वयंभुवा**" या श्लोकांत सांगितलें असून "**स्थितामेव वाचमनुविन्नां दर्शयति**" (ब्र०सू०शां०भा० १-३-२९) या वाक्यात सांगितल्याप्रमाणे पूर्वी लीन असलेलेच वेदादिग्रंथ व धर्मनिर्बंध प्रगट होत असतात. असे सर्व वेदाला प्रमाण मानणारे शिष्ट समजत आले आहेत व गीतेलाहि तेच मान्य आहे.

**देवान्भावयतानेन ते देवा भावयन्तु व:। परस्परं भावयन्त: श्रेय: परमवाप्स्यथ॥ ११॥**

**अर्थ—**या धर्मानुष्ठानाने तुम्ही देवांना संतुष्ट केलें असतां उलट देवहि तुम्हाला संतुष्ट करतील. अशा रीतीने परस्परांनी परस्परांना संतुष्ट केलें असतां सहजच तुमचें परम कल्याण होईल. ॥ ११॥

**जें येणेंकरूनि समस्तां। परितोषु होईल देवतां। मग ते तुम्हां ईप्सिता। अर्थातें देती॥ ९५॥**
**या स्वधर्मपूजा पूजितां। देवतागणां समस्तां। योगक्षेमु निश्चिता। करिती तुमचा॥ ९६॥**
**तुम्हीं देवतांतें भजाल। देव तुम्हां तुष्टतील। ऐसी परस्परें घडेल। प्रीति जेथ॥ ९७॥**

**तेथ तुम्ही जें करूं म्हणाल। तें आपैसें सिद्धी जाईल। वांछितही पुरेल। मानसींचें॥ ९८ ॥**
**वाचासिद्धि पावाल। आज्ञापक होआल। म्हणियें तुमतें मागतील। महात्रृद्धि॥ ९९ ॥**
**जैसें ऋतुपतीचें द्वार। वनश्री निरंतर। वोळगे फळभार। लावण्येंसीं॥ १००॥**

**अर्थ**—जेव्हा या स्वधर्मरूप यज्ञाच्या अनुष्ठानाने सर्व देवतांना संतोष होईल तेव्हा ते तुम्हाला, तुमच्या इच्छेप्रमाणे भोग देतील. ॥ ९५ ॥ या स्वधर्मयज्ञाने सर्व देवतांचें तुम्ही पूजन केलें असतां ते देव तुमचा योगक्षेम खात्रीने चालवितील. ॥ ९६ ॥ तुम्ही अशा रीतीने देवांचें भजन कराल तर देवहि तुम्हांला संतुष्ट करतील. अशा रीतीने देवांचें व तुमचें परस्पर प्रेम जुळेल. ॥ ९७ ॥ असें तुमचें प्रेम जुळल्यास तुम्ही जें करूं म्हणाल तें अवश्य सिद्धीस जाईल आणि मनांत ज्या कांही इच्छा उत्पन्न होतील त्यांहि पूर्ण होतील. ॥ ९८ ॥ देवांच्या प्रसादाने तुम्हाला वाचासिद्धी (म्हणजे-बोललें तसें सत्य होणें) प्राप्त होईल. तुम्ही आज्ञा करणारे व्हाल म्हणजे तुमचें म्हणणें कोणी मोडणार नाही व मोठमोठ्या सिद्धि तुम्हाला "आज्ञा करा" असें मागणें मागतील. ॥ ९९ ॥ ज्याप्रमाणे वसंत ऋतु लागल्याबरोबर वनांतील झाडांना फळाफुलांचा बहर येऊन एकंदर वनाचें सौंदर्य नेहमी प्रगट होते. ॥ १०० ॥

**गूढार्थदीपिका विवरण**—मनुष्यांनी ऐहिक किंवा पारमार्थिक सुखाकरिता जो प्रयत्न करावयाचा तो म्हणजे आपल्या स्वधर्माचरणाने परमेश्वराने सृष्टिकार्यार्थ नेमलेल्या आधिकारिक देवतादिकांचे यजनद्वारा परमेश्वराचें यजन करणें हे होय; असा या श्लोकाचा भाव आहे. दुसऱ्या अध्यायांत भगवंतांनी कर्मयोगाचा तूं अधिकारी आहेस असा प्रस्ताव मांडून या तिसऱ्या अध्यायांत कर्मयोगाचें स्वरूप सांगितलें आहे. भगवान श्रीकृष्णांनी अर्जुनाला ज्या कर्मयोगाचा उपदेश केला, त्या कर्मयोगाचें स्वरूप काय, याचें महाभारतांतील शांतिपर्वांतर्गत नारदनारायण संवादात्मक नारायणीय धर्मांत पूर्ण स्पष्टीकरण आलें असल्यामुळे, नारायणीय धर्माचा विचार केला पाहिजे. '**मुक्तानां तूं गतिर्ब्रह्मन क्षेत्रज्ञ इति कल्पिता। सहि सर्व गुणश्चैवनिर्गुणश्चैव कथ्यते॥**' (म० भा० शां० प० अ० ३३५ श्लो० ४१) शुद्ध क्षेत्रज्ञ आत्मा कर्मकर्तृत्वरहित केवळ सच्चिदानंदस्वरूप आहे. आपल्याला कर्मकर्ता व कर्मफलभोक्ता समजणाऱ्या जीवात्म्याने कर्मकर्तृत्वरहित होऊन शुद्ध क्षेत्रज्ञाशीं आपलें ऐक्य पाहणें याला मुक्ति म्हणतात. अशा रीतीने जीवात्मा मुक्त होऊन ज्या क्षेत्रज्ञाशीं ऐक्य पावतो तो क्षेत्रज्ञ परमात्मा सगुण निर्गुण अशा दोन प्रकारचा आहे. सर्व गुण वेगळे करून क्षेत्रज्ञाला पाहिलें असतां तो निर्गुण भासतो व सर्वगुणसहित पाहिलें असतां तो सगुण भासतो निर्गुण क्षेत्रज्ञ असंग असल्यामुळे त्याला उद्देशून कर्मयोगाचें अनुष्ठान होऊ शकत नाही. म्हणजे त्याचे ठिकाणी कर्म समर्पण करतां येत नाही; म्हणून निष्काम कर्म समर्पणरूप कर्मयोगांचें अनुष्ठान सगुणाला धरून करतां येते. परमेश्वराचें हें सगुण स्वरूपहि दोन प्रकारचें आहे. मायागुणाच्या स्वाधीन न होतां मायागुणाला आपल्या स्वाधीन ठेवून सृष्टिकार्यार्थ मायागुणाला आश्रय झालेलें हें एक स्वरूप असून, भक्तांना भक्तिप्रेम देऊन त्या प्रेमाची वृद्धि करण्याकरिता सच्चिदानंदधर्माने व षड्गुणैश्वर्याने सगुण झालेंले रामकृष्णादि सगुण स्वरूप हें दुसरें स्वरूप होय. याच दोन्ही सगुण स्वरूपांचे प्रीत्यर्थ निष्काम कर्मयोगाचें अनुष्ठान करतां येतें. भगवंताचीं स्वरूपें दोन असल्यामुळे त्यांचे प्रीत्यर्थ केला जाणारा निष्काम कर्मयोगहि दोन प्रकारचा सांगितला आहे. "**तेनैषा प्रथिता ब्रह्मन् मर्यादा लोकभाविनी, दैवं पित्र्यं च कर्तव्यमिति तस्यानुशासनम्॥ ३४॥**" दैवकर्माने म्हणजे इंद्रादिक देवतांच्या प्रीत्यर्थ कराव्या लागणाऱ्या यज्ञादिकर्माने व पैत्रकर्माने म्हणजे पितराप्रीत्यर्थ कराव्या लागणाऱ्या श्राद्धादि कर्माने माझें यजन करावें, अशी सृष्टीचें उत्पत्त्यादि कार्य करण्याकरिता मायेचा आश्रय करुन सगुण झालेल्या क्षेत्रज्ञ परमेश्वराने लोक कल्याणकारक मर्यादा घालून दिली आहे. हा पहिल्या प्रकारचा कर्मयोग आहे. या कर्मयोगांत नित्य, नैमित्तिक, काम्य व निषिद्ध या चार कर्मांपैकी केवळ नित्य व नैमित्तिक अशीं दोनच कर्मे परमेश्वराप्रीत्यर्थ केलीं जातात. काम्य म्हणजे विषयसुखाच्या आशेने होणारें कर्म व निषिद्ध म्हणजे शास्त्राने करूं नये म्हणून सांगितलेलें कर्म, ही दोन्ही कर्मे सोडावीं लागतात, म्हणून हा पहिल्या प्रकारचा कर्मयोग नित्यनैमित्तिक कर्माच्या अनुष्ठानापुरताच मर्यादित आहे व तो या तिसऱ्या अध्यायांत ९, १० व ११ व्या श्लोकांत सांगितला आहे.

सच्चिदानंदस्वरूप षड्गुणैश्वर्यसंपन्न अशा लीलाविग्रही रामकृष्णादि सगुण स्वरूपाचे ठिकाणीं होणारा व ज्याला नारायणीयधर्मात एकान्त धर्म किंवा भक्तियोग म्हटलें आहे व ज्यां त्या सगुणस्वरूपाचें अखंड ध्यान ठेवून साक्षात् त्याच्याच प्रीत्यर्थं सर्व कर्मे केलीं जातात असा हा दुसरा कर्मयोग आहे त्याचे भगवंतांनी पुढे नवव्या अध्यायात सविस्तर निरूपण केलें आहे व तोच दुसरा कर्मयोग भगवंतांनी अर्जुनाला मुख्यत: उपदेशिला आहे.

**इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यन्ते यज्ञभाविता:। तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुङ्क्ते स्तेन एव स:॥ १२॥**

***अर्थ***—यज्ञामध्ये देवांना हविर्भाग देऊन तुष्ट केलें असतां ते मनुष्याला त्याच्या इच्छेप्रमाणे भोग देतात. देवांनी दिलेले भोग पुन: देवांना न देतां जो मनुष्य त्यांचा आपणच उपभोग घेतो तो चोर होतो. ॥ १२ ॥

**तैसें सर्व सुखेंसहित। दैवचि मूर्तिमंत। येईल देखा काढत। तुम्हांपाठीं॥ १०१॥**
**ऐसें समस्त भोगभरित। होआल तुम्ही अनार्त। जरी स्वधर्मैकनिरत। वर्ताल बापा॥ १०२॥**
**कां जालिया सकल संपदा। जो अनुसरेल इंद्रियमदा। लुब्ध होऊनियां स्वादा। विषयांचिया॥ १०३॥**
**तिहीं यज्ञभाविकीं सुरीं। जे हे संपत्ति दिधली पुरी। तयां स्वधर्मी सर्वेश्वरीं। न भजेल जो॥ १०४॥**
**अग्निमुखीं हवन। न करील देवतापूजन। प्राप्तवेळे भोजन। ब्राह्मणाचें॥ १०५॥**
**विमुखु होईल गुरुभक्ती। आदरु न करील अतिथी। संतोषु नेदील ज्ञाती। आपुलिये॥ १०६॥**
**ऐसा स्वधर्मुक्रियारहितु। आथिलेपणें प्रमत्तु। केवळ भोगासक्तु। होईल जो॥ १०७॥**
**तया मग अपावो थोरु आहे। जेणें तें हातींचें सकळ जाये। देखा प्राप्तही न लाहे। भोग भोगूं॥ १०८॥**
**जैसें गतायुषीं शरीरीं। चैतन्य वासु न करी। कां निदैवाचां घरीं। न राहे लक्ष्मी॥ १०९॥**
**तैसा स्वधर्मु जरी लोपला। तरी सर्व सुखांचा थारा मोडला। जैसा दीपासवें हरपला। प्रकाशु जाय॥ ११०॥**
**तैसी निजवृत्ति जेथ सांडे। तेथ स्वतंत्रते वस्ती न घडे। आइका प्रजाहो हें फुडें। विरंचि म्हणे॥ १११॥**
**म्हणऊनि स्वधर्मु जो सांडील। तयातें काळु दंडील। चोरु म्हणूनि हरील। सर्वस्व तयाचें॥ ११२॥**
**मग सकळ दोष भंवते। गिंवसोनि घेती तयातें। रात्रिसमयीं स्मशानातें। भूतें जैशीं॥ ११३॥**
**तैशीं त्रिभुवनींचीं दु:खें। आणि नानाविधें पातकें। दैन्यजात तितुकें। तेथेंचि वसे॥ ११४॥**
**ऐसें होय तया उन्मत्ता। मग न सुटे बापा रुदतां। कल्पांतींही सर्वथा। प्राणिगण हो॥ ११५॥**
**म्हणऊनि निजवृत्ति हे न संडावी। इंद्रियें बरळों नेदावीं। ऐसें प्रजांतें शिकवी। चतुराननु॥ ११६॥**
**जैसें जळचरा जळ सांडे। आणि तत्क्षणीं मरण मांडे। हा स्वधर्मु तेणें पाडे। विसंबों नये॥ ११७॥**
**म्हणोनि तुम्ही समस्तीं। आपुलालिया कर्मी उचितीं। निरत व्हावें पुढतपुढती। म्हणिपत असें॥ ११८॥**

***अर्थ***—त्याप्रमाणे देवांना हविर्भागाने संतुष्ट केलें असतां तुमचा शोध करीत, सर्व सुखाने भरलेलें तुमचें सुदैवच, तुमच्या पाठीमागे येईल. ॥ १०१ ॥ अशा रीतीने जर तुम्ही धर्मपरायण झाला तर तुम्ही सर्व भोगसंपन्न व्हाल. तुम्ही दु:खरहितहि व्हाल. ॥ १०२ ॥ याच्या उलट सर्व संपत्ति प्राप्त होऊन जो कोणी विषयाच्या सुखाला भुलून इंद्रियांना जसें वाटेल तसें वागण्याचा प्रयत्न करील. ॥ १०३ ॥ स्वधर्मरूप यज्ञांत ज्या देवतांना संतुष्ट केलें व त्या देवतांनी प्रसन्न होऊन मनुष्याला जीं इच्छित भोगसंपत्ति दिली, त्या भोगसंपत्तीने जो कोणी पुरुष त्या देवतांचे द्वारा सृष्टिचालक परमेश्वराचें यजन करणार नाही. ॥ १०४ ॥ अग्नीच्या मुखांत हवन करणार नाही, देवतांचें पूजन करणार नाही, प्रसंगाने ब्राह्मणाचें भोजन करणार नाही. ॥ १०५ ॥ आपल्या गुरूची भक्ति करणार नाही, अतिथीचा आदर करणार नाही, आपल्या जातिबांधवांचें कार्य करून त्यांना संतोष देणार नाही. ॥ १०६ ॥ अशा रीतीने स्वधर्मक्रिया न करणारा होऊन संपत्तीमुळे माजून जाईल व स्वत:च केवळ नानाप्रकारचे भोग भोगीत जाईल. ॥ १०७ ॥ अशा पुरुषाला पुढे फार दु:ख होतें. त्याला प्राप्त झालेली संपत्ति सर्व नाहिशी होते, आणि प्राप्त भोग भोगण्याकरिताहि तो समर्थ राहत नाही. ॥ १०८ ॥ ज्याप्रमाणे ज्या पुरुषाचें आयुष्य सरलें त्याच्या देहांत चैतन्य राहत नाही, किंवा ज्याचें दैव फिरलें त्याचें घरीं लक्ष्मी राहत नाही. ॥ १०९ ॥ त्याप्रमाणे जसा दिवा मालवला की प्रकाश तात्काळ नाहिसा

होतो तसा स्वधर्माचा लोप झाला असतां सर्व सुखांचा थारा मोडतो, कोणतेंच सुख भोगण्यास मिळत नाही. ॥ ११० ॥ त्याचप्रमाणे निजवृत्ति म्हणजे आपल्या सुखाने जगण्याचें साधन जो स्वधर्म तो टाकला गेला की जीवाचें स्वातंत्र्य नाहिसें होतें. तो इंद्रियांच्या परतंत्र होतो, असें ब्रह्मदेव प्रजेला सांगू लागला. ॥ १११ ॥ म्हणून स्वधर्माचें आचरण जो करणार नाही, त्याला अवश्य दंड भोगावा लागेल, आणि तो चोर गणला जाऊन त्याचे प्राप्त झालेले भोग पुढे त्याच्यापासून हिरावून घेतले जातील. ॥ ११२ ॥ असें झाल्यावर मग ज्याप्रमाणे रात्रीं स्मशानांत भूतेंच राहतात, त्याप्रमाणे स्वधर्माचें अनुष्ठान न करणाऱ्या पुरुषाचे ठिकाणी सर्व पापें येतात. ॥ ११३ ॥ त्रिभुवनांत जेवढें कांही दुःख असेल व जेवढें कांही पाप असेल आणि जेवढें कांही दारिद्र्य असेल तें सर्व स्वधर्म सोडणाऱ्या पुरुषाचे ठिकाणीं प्राप्त होतें. ॥ ११४ ॥ ब्रह्मदेव म्हणतात, हे प्रजाजनांनो! संपत्तीमुळे उन्मत्त होऊन व इंद्रियांच्या स्वाधीन होऊन धर्म सोडून वागणाऱ्या उन्मत्त पुरुषाला अशी स्थिति प्राप्त होते. मग कितीहि तो रडला व दुःख केलें तरी कोणी त्याला त्यांतून कल्पांतींहि सोडवूं शकत नाही. ॥ ११५ ॥ म्हणून निजवृत्ति म्हणजे शरीरयात्रा चालण्याचें साधन जो धर्म तो कोणी सोडू नये, इंद्रियांना वाटेल तसे स्वैर वागूं देऊं नये, असें ब्रह्मदेव प्रजाजनांना सांगूं लागले. ॥ ११६ ॥ ज्याप्रमाणे मासे इत्यादि जलांत जगणाऱ्या प्राण्यांना जलावांचून तात्काळ मरण येतें, त्याप्रमाणे स्वधर्म हा तसाच असल्यामुळे कधी सोडूं नये ॥ ११७ ॥ म्हणून तुम्ही सर्व लोकांनी आपआपल्या विहित कर्माचे ठिकाणींच तत्पर राहावें हें मी पुनः पुनः सांगत आहे. ॥ ११८ ॥

**यज्ञशिष्टाशिनः सन्तो मुच्यन्ते सर्वकिल्बिषैः । भुञ्जते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात् ॥ १३ ॥**

**अर्थ**—देवतांचे हविर्भाग दिल्यावर जें कांही यज्ञांतून अवशिष्ट अन्न उरेल ते खाणारे जे पुरुष असतात ते सर्व पापांपासून मुक्त होतात. परंतु केवळ आपल्या भोगाकरिता पाकसिद्धि करणारे पुरुष मात्र पापी होतात व पापच खातात. ॥ १३ ॥

**देखा विहित क्रियाविधि। निर्हेतुका बुद्धी। जो असतिये समृद्धी। विनियोगु करी॥ ११९ ॥**
**गुरु गोत्र अग्नि पूजी। अवसरीं भजे द्विजीं। निमित्तादिकीं यजी। पितरोद्देशें॥ १२० ॥**
**या यज्ञक्रिया उचिता। यज्ञेशीं हवन करितां। हुतशेष स्वभावता। उरे जें जें॥ १२१ ॥**
**तें सुखें आपुले घरीं। कुटुंबेंसीं भोजन करी। कीं भोग्यचि तें निवारी। कल्मषातें॥ १२२ ॥**
**तें यज्ञावशिष्ट भोगी। म्हणोनि सांडिजे तो अघीं। जयापरी महारोगीं। अमृतसिद्धि॥ १२३ ॥**
**कीं तत्त्वनिष्ठु जैसा। नागवे भ्रांतिलेशा। तो शेषभोगी तैसा। नाकळे दोषा॥ १२४ ॥**
**म्हणोनि स्वधर्में जें अर्जे। तें स्वधर्मेंचि विनियोगिजे। मग उरे तें भोगिजे। संतोषेंसीं॥ १२५ ॥**
**हें वांचूनि पार्था। राहाटों नये अन्यथा। ऐसी आद्य हे कथा। श्री मुरारी सांगे॥ १२६ ॥**
**जे देहचि आपणपें मानिती। आणि विषयांतें भोग्य म्हणती। यापरतें न स्मरती। आणिक कांहीं॥ १२७ ॥**
**हें यज्ञोपकरण सकळ। नेणतसांते बरळ। अहंबुद्धि केवळ। भोगूं पाहती॥ १२८ ॥**
**इंद्रियरुचीसारखे। करविती पाक निके। ते पापिये पातकें। सेविती जाण॥ १२९ ॥**
**हे संपत्तिजात आघवें। हें हवनद्रव्य मानावें। मग स्वधर्मयज्ञें अर्पावें। आदिपुरुषीं॥ १३० ॥**
**हें सांडोनियां मूर्ख। आपणपेयालागीं देख। निपजविती पाक। नानाविध॥ १३१ ॥**
**जिहीं यज्ञु सिद्धी जाये। परेशा तोषु होये। तें हें सामान्य अन्न न होये। म्हणोनियां॥ १३२ ॥**
**हें न म्हणावें साधारण। अन्न ब्रह्मरूप जाण। जे जीवनहेतु कारण। विश्वा यया॥ १३३ ॥**

**अर्थ**—अर्जुना! हे पहा, जो कोणी विहित कर्म करण्यांत निष्काम बुद्धीने आपल्याला प्राप्त झालेल्या संपत्तीचा उपयोग करितो. ॥ ११९ ॥ गुरु, स्वजाति, अग्नि यांचे पूजन करतो, प्रसंगी ब्राह्मणाचीहि सेवा करितो, पितरांच्या निमित्ताने प्राप्त झालेल्या श्राद्धादि प्रसंगी पितरांचेंही यजन करितो. ॥ १२० ॥ या सर्व विहित क्रिया आहेत. त्या स्वधर्माप्रमाणे करून हवन केल्यावर जें जें मग उरेल. ॥ १२१ ॥ तें तें मग खुशाल आपल्या कुटुंबातील माणसासह

खावें. हा भोग घेणें असलें तरी तशा भोग घेण्याने पापाचा लेप लागत नाही. ॥ १२२ ॥ ज्याप्रमाणे अमृताच्या सेवनाने महारोगहि नाहिसा होतो त्याप्रमाणे स्वधर्मरूप यज्ञाचरण करून जें शेष राहील तें खाणारे ते लोक असतात म्हणून पातकें त्यांना सोडून देतात. ॥ १२३ ॥ किंवा ज्या प्रमाणे आत्मतत्त्व अनुभवणारा पुरुष पुन: भ्रांतीने कवळिला जात नाही त्याप्रमाणे यज्ञशेष भक्षण करणारा पुरुषहि पापाने लिप्त होत नाही. ॥ १२४ ॥ म्हणून स्वधर्माने जें जें आपण मिळविले ते तें स्वधर्मांत खर्च करावें आणि उरेल तें आनंदाने भोगावें. ॥ १२५ ॥ अर्जुना! स्वधर्माला सोडून भलत्याच रीतीने वागू नये, असा हा सृष्टीच्या आरंभी घडलेला वृत्तान्त भगवानांनी सांगितला. ॥ १२६ ॥ जे पुरुष देहालाच मी समजतात व विषयाला भोग्य समजतात, यावांचून दुसरें कांही जाणत नाहीत ॥ १२७ ॥ वास्तविक पाहतां ही सर्व विषयसंपत्ति, स्वधर्मरूप यज्ञाची यज्ञसामग्री आहे. हें न जाणतां मी भोक्ता व हे विषय भोग्य असा अभिमान धरून जे विषय भोगतात. ॥ १२८ ॥ आपल्या इंद्रियांना जसे जसे रुचेल तसे तसे पदार्थ करवून जे खातात ते अन्न खात नाहीत तर पापच खातात. ॥ १२९ ॥ अर्जुना! ही सर्व संपत्ति यज्ञसामग्री आहे असें समजावें आणि स्वधर्मयज्ञाच्या द्वारा सृष्टीचा जनिता जो परमात्मा त्याला समर्पण करावी. ॥ १३० ॥ असें करणें सोडून देऊन मूर्खलोक आपल्याकरिता नानाप्रकारचे भोग्य पदार्थ निर्माण करितात. ॥ १३१ ॥ म्हणूनच ज्याच्या योगाने यज्ञ पूर्ण होतो व परमात्माहि संतुष्ट होतो असें हें अन्न सामान्य म्हणतां येत नाही. ॥ १३२ ॥ या अन्नाला सामान्य वस्तूप्रमाणे लेखू नये. सर्व जग त्या अन्नावर जगतें म्हणून तें परब्रह्मरूप आहे. ॥ १३३ ॥

**अन्नाद्भवन्ति भूतानि पर्जन्यादन्नसम्भवः। यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः॥ १४॥**
**कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम्। तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम्॥ १५॥**

**अर्थ**—अन्नापासून भूतांची उत्पत्ति आहे. पावसामुळे अन्न पिकतें. तो पाऊस यज्ञामुळे पडतो व यज्ञ स्वधर्मरूप कर्मापासून निपजतो. स्वधर्मरूप कर्म हें वेदापासून प्रगट झालें आहे आणि वेद हे अक्षर म्हणजे अविनाशी ब्रह्मापासून उत्पन्न झाले आहेत. म्हणून सर्वत्र व्यापक असणारी ब्रह्मवस्तु स्वधर्मरूप यज्ञाचे ठिकाणीं स्थित आहे. ॥ १४-१५ ॥

**अन्नास्तव भूतें। प्ररोह पावती समस्तें। मग वरिषु या अन्नातें। सर्वत्र प्रसवे॥ १३४॥**
**तया पर्जन्या यज्ञीं जन्म। यज्ञातें प्रगटी कर्म। कर्मासि आदि ब्रह्म। वेदरूप॥ १३५॥**
**मग वेदांतें परापर। प्रसवतसे अक्षर। म्हणऊनि हें चराचर। ब्रह्मबद्ध॥ १३६॥**
**परी कर्माचिये मूर्ति। यज्ञीं अधिवासु श्रुति। ऐकें सुभद्रापति। अखंड गा॥ १३७॥**

**अर्थ**—अन्नामुळे जीव उत्पन्न होतात आणि पर्जन्य हा सर्वत्र अन्नाला पिकविणारा आहे. ॥ १३४ ॥ त्या पावसाचा जन्म यज्ञापासून असून यज्ञ हा कर्मापासून उत्पन्न होतो व कर्माचें कारण वेद आहेत. ॥ १३५ ॥ या वेदाची उत्पत्ति सर्वांच्या पलीकडे असलेल्या अविनाशी ब्रह्मापासून आहे. म्हणून ही सर्व सृष्टि ब्रह्माने व्याप्त आहे. ॥ १३६ ॥ हें, अर्जुना! अखंड ध्यानांत ठेव की कर्म मूर्तिमंत प्रगट होण्याकरिता यज्ञाचे ठिकाणीं श्रुतीचें राहणें आहे. म्हणजे यज्ञादि कर्मे कशीं करायचीं हें श्रुतींत सांगितले आहे किंवा श्रुतींत सांगितल्याप्रमाणे यज्ञादि कर्में होतात. ॥ १३७ ॥

**गूढार्थदीपिका विवरण—''यज्ञाद्भवति पर्जन्योः''** या वाक्याचा अर्थ असा की खूप धान्य पिकेल असा योग्य पाऊस पाडणे इत्यादि सृष्टींतील कार्ये भगवंतांनी इंद्रादि देवतांकडे सोंपविलीं असल्यामुळे यज्ञाने संतुष्ट झालेल्या इंद्रादि देवता योग्य पाऊस पाडणें इत्यादि कार्ये करीत असतात. ''कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि'' या पंक्तीतील ''ब्रह्म'' शब्दाचा चौदावे अध्यायांतील ''महत् ब्रह्म'' या शब्दाच्या आधारें ''प्रकृति'' असा कोणी अर्थ करतात. पण त्यांतील ''ब्रह्म'' शब्दाचे मागे ''महत्'' हा शब्द लावल्यामुळे तेथे महत् ब्रह्माचा प्रकृति असा अर्थ केला आहे. नुसत्या ब्रह्म शब्दाचा प्रकृति असा अर्थ कोठे केलेला आढळत नाही.

सर्व कर्म प्रकृतीपासून उत्पन्न होतें, म्हणून कर्म या शब्दाचा अर्थ सामान्यत: यच्चयावत् कर्म असा होऊं शकला, तरी येथील 'कर्म' शब्दाचा यच्चयावत कर्म असा सामान्य अर्थ विवक्षित आहे असें ''अन्नाद्भवंति भूतानि'' इत्यादि मागील संदर्भ पाहतां दिसत नाही. येथे मनुष्याच्या जीवनधारणाशीं ज्या विशेष कर्माचा प्रत्यक्ष संबंध

आहे. तेवढ्याच विशेष कर्माचाच उल्लेख केलेला आहे असें स्पष्ट दिसतें आणि तें विशेष कर्म म्हणजे ''देवान्भावयतानेन'' या श्लोकांत यज्ञादि कर्म होय, हें भगवंतांनी सांगितले आहे. ते यज्ञादि कर्म वेदापासून प्रगट होत असल्यामुळे ''कर्म ब्रह्मोद्भवें विद्धि'' या पंक्तींतील ''ब्रह्म'' शब्दाचा अर्थ 'प्रकृति' असा न करता 'वेद' असाच अर्थ करावा लागतो.

**एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः । अघायुरिन्द्रियारामो मोघं पार्थ स जीवति॥ १६॥**

**अर्थ**—असें अनादिकालापासून प्रवृत्त झालेलें चक्र जो कोणी चालूं ठेवणार नाही व इंद्रियासक्त होईल त्याचें जीवन व्यर्थ आहे, त्याचें आयुष्य सर्व पापरूप आहे. ॥ १६ ॥

**ऐशी हे आदि परंपरा। संक्षेपें तुज धनुर्धरा। सांगितली या अध्वरा। लागौनियां॥ १३८॥**
**म्हणूनि समूळ हा उचितु। स्वधर्मरूप क्रतु। नानुष्ठी जो मत्तु। लोकीं इये॥ १३९॥**
**तो पातकांची राशी। जाण भार भूमीसी। जो कुकर्मे इंद्रियांसी। उपेगा गेला॥ १४०॥**
**तें जन्म कर्म सकळ। अर्जुना अति निष्फळ। जैसें कां अभ्रपटळ। अकाळींचे॥ १४१॥**
**कां गळां स्तन अजेचे। तैसें जियालें देखें तयाचें। जया अनुष्ठान स्वधर्माचें। घडेचिना॥ १४२॥**
**म्हणोनि ऐकें पांडवा। हा स्वधर्मु कवणें न संडावा। सर्वभावें भजावा। हाचि एकु॥ १४३॥**
**हां गा शरीर जरी जाहलें। तरी कर्तव्यवोघें आलें। मग उचित कां आपुलें। वोसंडावें॥ १४४॥**
**परिस पां सव्यसाची। मूर्ती लाहोनि देहाची। खंती करिती कर्माची। तें गांवढे गा॥ १४५॥**

**अर्थ**—अशी ही अनादि परंपरा, अर्जुना! तुला या स्वधर्मरूप यज्ञाचें अनुष्ठानाकरिता सांगितली॥ १३८ ॥ म्हणून हा स्वधर्मरूप यज्ञ विहित आहे व आचरणाला योग्य आहे. पण या लोकांत जो कोणी इंद्रियांच्या परतंत्र होऊन उन्मत्त होईल व स्वधर्माचे अनुष्ठान करणार नाही. ॥ १३९ ॥ जो शास्त्राने विहित केलेला धर्म सोडून आपल्या मनाला व इंद्रियाला वाटेल तसें वागून त्यांच्या स्वाधीन झाला तो केवळ पापाचा पर्वत होय असें समज. तो भूमीला भारभूत होतो व त्याच्या योगें भूमि त्रस्त होते. ॥ १४० ॥ अकाळींचे अभ्र जसें निरर्थक असतें, तसें धर्म सोडून वागणाऱ्याचें जन्म व कर्म दोन्ही निष्फळ असतात. ॥ १४१ ॥ किंवा शेळीच्या गळ्याला असलेले स्तन जसें निरर्थक असतात त्याप्रमाणे स्वधर्माचे अनुष्ठान न करणाऱ्याचें जीवंत राहणें निरर्थक आहे. ॥ १४२ ॥ म्हणून, अर्जुना! आपला विहित धर्म कोणीहि सोडू नये; एवढेच नाही तर सर्वतोपरी त्याचेंच आचरण करावें. ॥ १४३ ॥ अर्जुना! जोपर्यंत या शरीराचा संबंध आहे. तोपर्यंत त्या शरीराबरोबर कर्म होणारच; मग आपलें विहित कर्म कां बरें सोडावें?॥ १४४॥ अर्जुना! ऐक, हें शरीर प्राप्त होऊन ज्यांना कर्म करण्याचा कंटाळा वाटतो ते अत्यंत मूर्ख होत. ॥ १४५ ॥

**गूढार्थदीपिका विवरण**—''सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा'' या श्लोकापासून तर ''एवं प्रवर्तितं चक्रम्'' या श्लोकापर्यंत जेवढे श्लोक आहेत व त्यांवर श्रीज्ञानेश्वर माऊलीच्या ज्या ओव्या आहेत, त्यांचे तात्पर्य असें आहे की या जगांत सुखभोग मिळविण्याकरिता व दुःख प्राप्त होऊं नये म्हणून मनुष्याला जो प्रयत्न किंवा कर्म करावें लागतें तें कर्म किंवा तो प्रयत्न कोणता, याचा मनुष्याने विचार केला पाहिजे.

भगवंतानी सर्व जीवसृष्टि निर्माण केली. त्यांत देव, मनुष्य, पशु, पक्षी, कृमि, कीटक, वृक्ष पाषाणादिक सर्वजीवांचा समावेश होतो. त्यांत मनुष्यप्राण्याकरिताच धर्म सांगितला आहे व बाकीच्या जीवयोनी केवळ भोगयोनी आहेत. म्हणजे त्या योनींत प्राणी पूर्वकर्मानुसार सुखदुःखफळें भोगतात. पूर्वकर्मानुसार मिळणाऱ्या सुखदुःखांत प्रयत्नाने कांही बदल घडवून आणणें हें मनुष्ययोनींतच शक्य आहे; दुसऱ्या योनींत नाही. हा मनुष्ययोनींत होणारा प्रयत्न म्हणजे स्वधर्म होय. जेव्हा सृष्टि निर्माण झाली तेव्हाच सृष्टिबरोबर धर्महि निर्माण झाला. सृष्टि व धर्म दोन्ही परमेश्वराने एकदमच निर्माण केले. विहित धर्माला धर्म हें जें नांव दिलें गेलें तें, तो धर्म जगाचे धारण करितो म्हणून दिलें गेलें. शास्त्राने सांगितलेल्या धर्मावांचून जगाचें धारण करणारा दुसरा धर्म नाही व दुसरा धर्म होऊं शकत नाही भगवंताची आज्ञा तो धर्म होय. व भगवंताची आज्ञा नाही तो अधर्म होय. धर्माने वागल्यास सर्व सुखभोग मिळतात

व अधर्माने वागल्यास दु:ख प्राप्त होतें म्हणून भगवंताची आज्ञा सोडून, आपल्याला बरें वाटतें तसें वागण्यांत मनुष्य मन व इंद्रियें यांच्या परतंत्र होतो व तेंच वागणें त्याच्या सर्व इहलोकांतील व परलोकांतील दु:खाला सर्वस्वी कारणीभूत होतें. म्हणून मनुष्याने आपला विहित धर्म सोडून मनाला वाटेल तसें वागू नये. या ठिकाणी हें स्पष्ट दिसून येते की धर्म जीवाने निर्माण केला व जीव आपल्या बुद्धीने धर्माधर्माचा निर्णय करूं शकतो, हें मत गीतेला मान्य नाही. त्याचप्रमाणे सुख प्राप्त करून घेण्याकरिता व दु:ख प्राप्त होऊ नये म्हणून जो कांही प्रयत्न करायचा तो धर्मानुष्ठानावांचून दुसरा कोणताच नाही. व्यक्तिव्यक्तीचा किंवा समाजासमाजाचा संघर्ष उत्पन्न होणार नाही किंवा कोणाचें कोणावर आक्रमण होणार नाही व समाजाचें ऐहिक पारलौकिक कल्याण होईल अशा रीतीने धर्माची रचना भगवंतांनी केली असल्यामुळे, मनुष्याला आपल्या स्वधर्माचें आचरण करणें एवढाच प्रयत्न केला की पुरें, असें भगवंतांनीच निक्षून सांगितलें आहे.

**यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः। आत्मन्येव च सन्तुष्टस्तस्य कार्यं न विद्यते॥ १७॥**
**नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन। न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः॥ १८॥**

**अर्थ**—जो कोणी पुरुष आपल्या आत्मस्वरूपाचे ठिकाणी रममाण होणारा असेल व आत्मप्राप्तीने तृप्त म्हणजे विषयवासनारहित झाला असेल आणि विषयावांचून ज्याचें चित्त आपल्या आत्मस्वरूपाचे ठिकाणीं प्रसन्न राहत असेल त्याला मग धर्माचरणाची जरूरी नसते.॥ १७॥ स्वधर्माचें आचरण करून त्याला कांही प्रयोजन साधायचें नसतें किंवा न केल्याने त्याची कांहीं हानि होत नाही सर्व भूतांचे ठिकाणींहि त्याला कांही अर्थ साधायचा नसतो.॥ १८॥

**देखें असतेनि देहधर्मे। एथ तोचि एकु न लिंपे कर्मे। जो अखंडित रमे। आपणपांचि॥ १४६॥**
**जे तो आत्मबोधें तोषला। तरी कृतकार्यु देखें जाहला। म्हणोनि सहजें सांडवला। कर्मसंगु॥ १४७॥**
**तृप्ति जालिया जैसीं। साधनें सरती आपैसीं। देखें आत्मतुष्टीं तैसीं। कर्मे नाहीं॥ १४८॥**
**जंववरी अर्जुना। तो बोध भेटेना मना। तंवचि यया साधना। भजावें लागे॥ १४९॥**

**अर्थ**—जो अखंड आत्मस्वरूपाचे ठिकाणींच रममाण होतो, त्याला असलेल्या देहाच्या धर्माचा किंवा कोणत्याहि कर्माचा लेप होत नाही.॥ १४६॥ कारण तो आत्मबोधाने म्हणजे मीच एक आहे, माझ्या शिवाय दुसरें कांही नाही या ज्ञानाने आपल्या ठिकाणीं संतुष्ट असल्यामुळे सर्व कर्मांच्या संगापासून तो सुटतो.॥ १४७॥ तृप्ति झाल्यावर ज्याप्रमाणे स्वयंपाकादि साधनांचा उपयोग नसतो, त्याप्रमाणे आत्मसुखानेच तृप्त झाल्यावर कर्तव्य उरत नाही.॥ १४८॥ अर्जुना! जोपर्यंत आपल्याला आत्मज्ञान होत नाही तोपर्यंतच या साधनरूप कर्मयोगाचें अनुष्ठान करायचें असतें.॥ १४९॥

**गूढार्थदीपिका विवरण**—आत्मस्वरूपाचे ठिकाणीं कर्म मुळीच नाही. तो केवळ कर्मरहित सच्चिदानंदस्वरूप आहे असें भगवंतांनी पुढे तेरावे अध्यायांत आत्मस्वरूप निरूपण करतांना सांगितले आहे. म्हणून ज्या ज्ञानी पुरुषाचे ठिकाणीं कर्मप्रवृत्ति अत्यंत क्षीण झाली आहे, अशा ज्ञानी पुरुषाचे ठिकाणी देह धारण होण्यापुरताच प्रारब्धबलाने व्यापार किंवा कर्म दिसू शकतें. आत्मा कर्मरहित असल्यामुळे व देहधारण व्यापारावांचून इतर व्यापार करणारी प्रकृति क्षीण झाल्यामुळे आत्मरूप झालेला ज्ञानी पुरुष प्रारब्धबलाने देहधारणार्थ होणाऱ्या व्यापारावांचून दुसरा व्यापार करूं शकत नाही असा अर्थ. असा अर्थ केला नाही तर शुद्ध आत्माच कर्म करणारा आहे असें मानण्याचा प्रसंग येतो व त्याचें तर भगवंतांनी खंडन केले आहे.

**तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर। असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः॥ १९॥**
**कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः। लोकसङ्ग्रहमेवापि सम्पश्यन्कर्तुमर्हसि॥ २०॥**
**यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः। स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते॥ २१॥**

**अर्थ**—म्हणून कर्माचे फळाचे ठिकाणीं आसक्ति न ठेवतां विहित कर्माचें अनुष्ठान कर. आसक्ति सोडून कर्म

केलें असतां त्याला परमेश्वराची प्राप्ति होते. ॥ १९ ॥ जनकादिक राजर्षि कर्म करूनच परमेश्वराची प्राप्ति करून घेते झाले. लोकसंग्रहाकडे लक्ष देऊनहि तुला कर्म केलें पाहिजे. ॥ २० ॥ श्रेष्ठ पुरुष जसें आचरण करितात तसें पाहून इतर लोकहि वागतात, हा सामान्य नियम आहे आणि श्रेष्ठ लोकांनी जें आचरण प्रमाण मानलें त्याचप्रमाणे इतर लोक वागतात. ॥ २१ ॥

**म्हणऊनि तूं नियतु। सकळ कामरहितु। होऊनियां उचितु। स्वधर्मे रहाटें॥ १५० ॥**
**जे स्वधर्मे निष्कामता। अनुसरले पार्था। ते कैवल्यपद तत्त्वता। पावले जगीं॥ १५१ ॥**
**देख पां जनकादिक। कर्मजात अशेख। न सांडितां मोक्षसुख। पावते जाहले॥ १५२ ॥**
**याकारणें पार्था। होआवी कर्मीं आस्था। हे आणिकाहि एका अर्था। उपकारेल॥ १५३ ॥**
**जे आचरतां आपणपेयां। देखी लागेल लोका यया। तरी चुकेल हा अपाया। प्रसंगेंचि॥ १५४ ॥**
**देखें प्राप्तार्थ जाहले। जे निष्कामता पावले। तयांही कर्तव्य असे उरलें। लोकांलागीं॥ १५५ ॥**
**मार्गी अंधासरिसा। पुढें देखणाही चाले जैसा। अज्ञाना प्रकटावा धर्मु तैसा। आचरोनि॥ १५६ ॥**
**हां गा ऐसें जरी न कीजे। तरी अज्ञानां काय उमजे। तिहीं कवणेंपरी जाणिजे। मार्गातें या॥ १५७ ॥**
**एथ वडील जें जें करिती। तया नाम धर्मु ठेविती। तेंचि येर अनुष्ठिती। सामान्य सकळ॥ १५८ ॥**
**हें ऐसें असे स्वभावें। म्हणोनि कर्म न संडावें। विशेषें आचरावें। लागे संतीं॥ १५९ ॥**

**अर्थ**—म्हणून अर्जुना! तू आपल्या मनाला व इंद्रियांना शास्त्रानुसार वागण्याचा अभ्यास लावून व कर्मानें विषयसुख मिळालें पाहिजे ही वासना सोडून देऊन आपल्या योग्य विहित धर्माचें आचरण कर. ॥ १५० ॥ जे लोक स्वधर्माचें आचरण करतांना निष्काम झाले ते या जगात-मोक्षाला गेले आहेत. ॥ १५१ ॥ अर्जुना पहा, जनकादिक राजर्षि संपूर्ण कर्म करूनच मोक्षसुखाला प्राप्त झाले. ॥ १५२ ॥ याचसाठी अर्जुना! कर्माचें आचरण करण्याकडे मनुष्याची आस्थापूर्वक प्रवृत्ति असावी. अशा प्रवृत्तीचा आणखी एक उपयोग होतो. ॥ १५३ ॥ आपण कर्माचें आचरण केलें असतां बाकीच्या लोकांनाहि वागण्याकरिता तें मार्गदर्शक होतें व अनायासें तसें लोक वागूं लागले की त्यांचा अध:पात चुकतो; म्हणजे तेहि जन्ममृत्युरूप संसारांतून सुटतात. ॥ १५४ ॥ अर्जुना! ज्यांना परमेश्वरप्राप्ति झाली व म्हणून ज्यांची विषयसुखाची वासना नाहिशी झाली अशा पुरुषांनाहि लोकांना सन्मार्ग दाखविण्याचें कर्तव्य करायचें असतें. ॥ १५५ ॥ डोळस मनुष्य ज्याप्रमाणे आंधळ्याला बरोबर मार्ग दाखवित असतो त्याप्रमाणे शहाण्यांनी स्वत:च्या आचरणाने अज्ञानी लोकांना धर्मरूप भगवत्प्राप्तीचा धर्मरूप मार्ग दाखवावा. ॥ १५६ ॥ अर्जुना! असे जर प्राप्तपुरुषाने केलें नाही तर अज्ञान्यांना आत्यंतिक कल्याणरूप परमेश्वराच्या प्राप्तीचा मार्ग कसा समजणार? त्यांनी हा मार्ग कसा जाणावा? ॥ १५७ ॥ या लोकांत श्रेष्ठ पुरुष जसे आचरण करितात तें आचरण म्हणजे धर्म होय, असें अज्ञानी लोकांना वाटते व ते सामान्य लोक तसेंच आचरण करूं पाहतात. ॥ १५८ ॥ अशी ही माणसाची स्वाभाविक अनुकरणशीलता आहे, म्हणून शहाण्यांनी कर्म सांडू नये. एवढेच नाही तर लोकांना मार्गास लावण्याकरितां प्राप्त पुरुषांनीच विशेषत: धर्माचें आचरण केलें पाहिजे. ॥ १५९ ॥

**न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किञ्चन। नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि॥ २२॥**
**यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतन्द्रितः। मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः॥ २३॥**
**उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम्। सङ्करस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः॥ २४॥**

**अर्थ**—अर्जुना! या तिन्ही लोकांमध्ये मला कांही प्राप्त करून घ्यावयाचें आहे व त्याकरिता मला कांही कर्तव्य केलें पाहिजे असें नाही; पण तो मी कर्माचें आचरण करितोच. ॥ २२ ॥ अर्जुना! सर्व लोक माझ्या मागे येणारे आहेत. मी जर अत्यंत दक्ष राहून कर्म केलें नाही तर सर्व लोक माझेंच अनुकरण करतील. ॥ २३ ॥ मग कल्याणाच्या मार्गांचा उच्छेद होऊन सर्व लोकस्थिति नाश पावेल. मी संकटाला कारण होईन व माझ्याकडूनच सर्व प्रजेचा घात होईल. ॥ २४ ॥

**आतां आणिकाचिया गोठी। तुज सांगों काई किरीटी। देखें मीचि इये राहाटी। वर्तत असें॥ १६०॥**
**काय सांकडें कांहीं मातें। कीं कवणें एकें आर्तें। आचरें मी धर्मातें। म्हणसी जरी॥ १६१॥**
**तरी पुरतेपणालागीं। आणिकु दुसरा नाहीं जगीं। ऐसी सामुग्री माझां अंगीं। जाणसी तूं॥ १६२॥**
**मृत गुरुपुत्र आणिला। तो तुवां पवाडा देखिला। तोही मी उगला। कर्मीं वर्ते॥ १६३॥**
**परी स्वधर्मीं वर्ते कैसा। साकांक्षु कां होय जैसा। तयाचि एका उद्देशा-। लागोनियां॥ १६४॥**
**जे भूतजात सकळ। असे आम्हांचि आधीन केवळ। तरी न व्हावें बरळ। म्हणोनियां॥ १६५॥**
**आम्ही पूर्णकाम होउनी। जरी आत्मस्थिती राहुनी। तरी प्रजा हे कैसेनि। निस्तरेल॥ १६६॥**
**इहीं आमुची वास पाहावी। मग वर्तती परी जाणावी। ते लौकिक स्थिति आघवी। नासिली होईल॥ १६७॥**
**म्हणोनि समर्थु जो एथें। आथिला सर्वज्ञते। तेणें सविशेषें कर्मातें। त्यजावें ना॥ १६८॥**

अर्थ—अर्जुना! इतर जनकादिकांचे पुरावे कशाला देत बसूं स्वत: मीच या मार्गाने वागत आहे. ॥ १६०॥ मला कांही कमी आहे किंवा इच्छा पूर्ण करून घेण्याकरिता धर्मांप्रमाणे आचरण करीत आहे असें जर कदाचित् समजशील. ॥ १६१॥ तर मी षड्गुणैश्वर्य संपन्न असल्यामुळे पूर्णतेच्या दृष्टीने पाहतां माझ्यासारख्या पूर्ण आप्तकाम कोणी दुसरा या जगात नाही, हें तूं जाणतोस. ॥ १६२॥ गुरूचा मेलेला मुलगा. परत आणून गुरूला समर्पण केला तो माझा पराक्रम तूं पाहिला आहेसच. असा मी समर्थ असूनहि निरिच्छपणे कर्म करीत राहतो. ॥ १६३॥ या धर्माचें आचरण मी, एखादा कामनिक पुरुष कामना पूर्ण व्हावी म्हणून जितक्या दक्षतेने वागतो, तितक्या दक्षतेने करितो. पण हें सर्व या एका उद्देशानेच असते. ॥ १६४॥ की सर्व लोकस्थिति आपल्या स्वाधीन आहे व आपण धर्म सोडून वागूं लागलों तर लोकहि स्वैर वर्तन करतील, तसें होऊ नये. ॥ १६५॥ आम्ही निर्वासन होऊन जर आत्मस्थितींत गढून राहिलो तर ही सर्व लोकप्रजा या संसारांतून कशी तरून जायची?॥ १६६॥ आम्ही कसें वागतो इकडे दृष्टि ठेवून, लोक कसें वागायचें हें जाणत असतात. आम्हीच जर धर्म सोडून वागू लागलो तर समाजव्यस्थाच सर्व नाहिशी होईल. ॥ १६७॥ म्हणून जो थोर पुरुष आहे व सर्वज्ञ आहे, त्याने तर मुख्यत: स्वधर्म सोडून वागू नये. ॥ १६८॥

**गूढार्थदीपिका विवरण—**शुद्ध आत्मस्वरूप स्वत: कर्ता नाही किंवा करविता नाही आणि कर्म हें प्रकृति आहे, असा वेदान्तशास्त्राचा अनुभूत सिद्धान्त आहे. म्हणून ज्यांचे ठिकाणी अत्यंत वैराग्यामुळे कर्मप्रवृत्ति अत्यंत क्षीण झाली आहे अशा साधक पुरुषाकरिताच आत्मविचाराने ब्रह्मप्राप्ति करून घेण्याकरिता संन्यासनिष्ठा मी प्रगट केली असें भगवंतांनी स्वमुखानें सांगितलें असल्यामुळे वरील श्लोकांतील कर्मयोगनिष्ठेचा भगवंतांनी केलेला उपदेश, ज्यांचे ठिकाणीं कर्मरूप प्रकृति अत्यंत वैराग्याने क्षीण झाली नाही अशा साधक पुरुषाकरिता व सिद्धपुरुषाकरिता आहें असें म्हणणें भाग आहे.

भगवान श्रीकृष्णाचा अवतार, कर्मप्रवृत्तिरूप प्रकृति ज्या क्षत्रियकुलांत असते, त्या क्षत्रियकुलांतच झाला असल्यामुळे भगवान श्रीकृष्णांनी कर्मप्रवृत्ति प्रबल असलेल्या क्षत्रियांतील सर्व जातींतील साधकांना संन्यासनिष्ठा दुर्घट असून ब्रह्मप्राप्तीकरिता कर्मयोगनिष्ठाच हितकर आहे असें सोदाहरणाने दाखविलें आहें. सर्व मनुष्यप्राण्याकरिताच कर्मयोगनिष्ठा हितकर आहे. कर्मसंन्यासनिष्ठेने कोणीच वागू नये असा भगवंताच्या सांगण्याचा आशय नाही. कारण कर्मप्रवृत्ति प्रधान असलेल्या क्षत्रियजातीत रामकृष्णादि अवतार घेऊन जसें भगवंतांनी कर्मयोगाचें अनुष्ठान केलें, तसेंच हंसादि अवतार घेऊन संन्यासनिष्ठेचेंहि मंडन केलें, असें पुराणादिकांतून वर्णन आहे. अत्यंत वैराग्याने ज्याची कर्मप्रवृत्ति क्षीण झाली आहे व जो शमादि लक्षणसंपन्न असून निर्गुण ब्रह्मप्राप्तीकडेच ज्याच्या चित्ताचा ओढा आहे. अशा ब्राह्मणालाच केवळ संन्यासनिष्ठेचा अधिकार सांगितला आहे. असा अधिकारी विरळाच असणार; म्हणून ज्यांची कर्मप्रवृत्ति क्षीण नाही असा सर्व ब्राह्मणादिवर्णांना कर्मयोगनिष्ठाच हितावह आहे असा भगवंताच्या उपदेशाचा भाव आहे. ह्या दोन्ही निष्ठा भगवंतांनी स्वेच्छेनी निर्माण केल्या नसून जीवांच्या ठिकाणीं असलेल्या प्रकृतिस्वभावानुसार निर्माण केल्या आहेत.

भगवंतांनी मला कांही प्राप्त करून घ्यावयाचें नाही तरी मी कर्माचें आचरण करितों असें जें स्वत:विषयी म्हटले आहे, तेंहि जीवाचे ठिकाणी खरेच कर्मकर्तृत्व आहे असें जें कर्मासक्त अज्ञानी जनांना वाटत असतें त्या अज्ञानी जनांच्या दृष्टीनेच म्हटले आहे. वास्तविक नाही. कारण अज्ञानी जन प्रकृतीचें कर्म व कर्तृत्व आपल्यावर ओढून घेतात असें पुढे या अध्यायांतच भगवंतांनी स्वमुखाने सांगितले आहे. जीवदशेंत जें कर्म व कर्तृत्व खरें वाटतें तेंच आत्मज्ञान झाल्यावर खरें वाटत नाही. म्हणजे कर्मकर्तृत्व याचें अस्तित्वच अनुभवाला येत नाही "तिन्ही अवस्थांचेनि द्वारें। उपाध्युपहिताकारें। भावाभावरूप स्फुरे। दृश्य जें हें॥ तें हें आघवेचि मी दृष्टा। ऐसिया बोधाचा माजिवटा। अनुभवाचा सुभटा। धेंडा तो नाचे॥" (ज्ञा० अ० १८ ओ० ११८६-८७) जेवढें कांही दृश्य आहे म्हणजे जाणले जातें तें सर्व केवळ चैतन्याचें स्फुरण आहे, असा ज्ञानदशेंतला स्वानुभव श्रीज्ञानेश्वर महाराजांनी सांगितला आहे. म्हणून अज्ञान्याला जसें कर्म व कर्तृत्वाचें ज्ञान होतें. तसें ज्ञान्याला होत नाही. त्यांना जर सर्व एक चैतन्याचा अनुभव येतो, तर नित्यज्ञानी भगवान् श्रीकृष्णाला कर्म व कर्तृत्वाचें ज्ञान असणें व कर्म करणें कसें शक्य आहे? चैतन्याच्या या स्फूर्तीला अज्ञानी जीव भ्रांतीने कर्मकर्तृत्वादिक दृश्य म्हणत असतो. म्हणून भगवंताचा हा उपदेश अज्ञानी जीवांच्या दृष्टीनेच आहे असें म्हणावें लागतें.

**सक्ता: कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत। कुर्याद्विद्वांस्तथासक्तश्चिकीर्षुर्लोकसङ्ग्रहम्॥ २५॥**

**न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसङ्गिनाम्। जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्त: समाचरन्॥ २६॥**

**अर्थ**—कर्मफळाची इच्छा करणारे अज्ञानी पुरुष ज्या आस्थेने कर्म करितात, तशाच आस्थेने ज्या ज्ञानी पुरुषाला लोकसंग्रह करायचा आहे, त्यानी धर्माचें आचरण फळाशा सोडून केलें पाहिजे.॥ २५॥ अज्ञानी व कर्मफळाची इच्छा करणारे अशा पुरुषांच्या बुद्धीचा भेद करूं नये. ज्ञानी पुरुषांनी परमेश्वराचे ठिकाणीं स्थिर चित्त ठेवून स्वत: धर्माचें आचरण करावें व लोकांकडून त्याचें अनुकरण करवावें.॥ २६॥

**देखें फळाचिया आशा। आचरे कामुक जैसा। कर्मीं भरू होआवा तैसा। निराशाही॥ १६९॥**
**जे पुढतपुढती पार्था। हे सकळ लोकसंस्था। रक्षणीय सर्वथा। म्हणऊनियां॥ १७०॥**
**मार्गाधारें वर्तावें। विश्व हें मोहरे लावावें। अलौकिक नोहावें। लोकांप्रति॥ १७१॥**
**जें सायासें स्तन्य सेवी। तें पक्वान्नें केवीं जेवी। म्हणोनि बाळका जैशीं नेदावीं। धनुर्धरा॥ १७२॥**
**तैसी कर्मी जया अयोग्यता। तयाप्रति नैष्कर्म्यता। न प्रगटावी खेळतां। आदिकरुनी॥ १७३॥**
**तेथें सत्क्रियाचि लावावी। तेचि एकी प्रशंसावी। नैष्कर्मीही दावावी। आचरोनी॥ १७४॥**
**तया लोकसंग्रहालागीं। वर्ततां कर्मसंगीं। तो कर्मबंधु आंगीं। वाजेलना॥ १७५॥**
**जैसी बहुरूपियांची रावो राणी। स्त्रीपुरुषभावो नाहीं मनीं। परी लोकसंपादणी। तैशीच करिती॥ १७६॥**

**अर्थ**—अर्जुना! हे पहा, फळाची आशा धरून कामनिक पुरुष जसें कर्म करितो तसें निरिच्छ ज्ञानीपुरुषाने आस्थेने कर्माचरण केलें पाहिजे.॥ १६९॥ या लोक संस्थेचें रक्षण झालें पाहिजे, म्हणून ज्ञानी पुरुषानीहि धर्माचरण सोडूं नये असें वारंवार सांगावें लागत आहे.॥ १७०॥ धर्ममार्गाने चालावें व सर्व लोकांनाहि त्या मार्गाने वागायला लावावें. लोकांना मार्गाने लावावयाचे असल्यास आपण अलौकिक म्हणजे सामान्य माणसांपेक्षा कांही विशेष आहो असें दाखवूं नये.॥ १७१॥ ज्या नुकत्याच जन्मलेल्या मुलाला आईचें स्तनपानहि करतां येत नाही तें पक्वान्न खावूं शकेल काय? म्हणून अर्जुना! अशा लहान मुलाला तीं देऊं नयेत.॥ १७२॥ त्याचप्रमाणे परमेश्वर प्राप्तीकरिता कशा रीतीने कर्म करायला पाहिजे हेंच ज्यांना समजत नाही त्यांना कर्मरहित होण्याचा उपदेश थट्टेने सुद्धां करूं नये.॥ १७३॥ त्यांना निष्काम कर्मानुष्ठानालाच लावावें त्याप्रमाणे कर्म करण्याचीच प्रशंसा करावी आणि जे कोणी ज्ञानाने कर्मरहित झाले असतील त्यांनीं स्वत: आचरण करून दाखवावें.॥ १७४॥ अशा लोकसंग्रहाकरिता धर्माचें आचरण करण्यांत कर्म बंधनकारक होत नाही.॥ १७५॥ बहुरूपी राजाराणीचें सोंग घेतात; पण त्यांच्या मनांत तसा स्त्रीपुरुषभाव उत्पन्न होत नाही. एवढेंच की लोकांत राजाराणी जसे असतात तसे नुसतें सोंग घेऊन लौकिक क्रीडा करून दाखवितात.॥ १७६॥

**गूढार्थदीपिका**—हाहि भगवंताचा उपदेश शुद्ध आत्मा कर्ता करविता नाही, म्हणून ज्या शुद्ध आत्मस्वरूप झालेल्या ज्ञान्याचे ठिकाणीं कर्मप्रवृत्तिरूप ज्ञानानंतरहि प्रारब्धानुसार शिल्लक राहते, अशा ज्ञानी पुरुषांनाच केलेला आहे व करणें शक्य आहे हें मागे आम्ही सांगितलें आहे. श्लोकांत "**अज्ञानां कर्मसंगीनाम्**" हीं जीं पदें आहेत त्यावरून असें स्पष्ट दिसतें की "अज्ञानाम्" म्हणजे मी कर्म व कर्तृत्व यांहून निराळा केवळ ज्ञानस्वरूप आहे असें विवेकाने ज्यांनी आपल्याला जाणलें नाही, म्हणून प्रकृतीचें कार्य जें कर्म व कर्तृत्व हे आपल्यावर ओढून घेऊन, कर्म करण्याची आसक्ति धरतात व प्रकृतीनुसार झालेलें कर्म मी केलें, असें कर्तृत्व वागवितात, अशा अज्ञानी पुरुषांना निष्कर्मतेचा बरोबर अर्थ समजत नसल्यामुळे, कर्म सोडून देणे यालाच ते निष्कर्मता म्हणतात. वास्तविक मी कर्म व कर्तृत्व यांहून अत्यंत निराळा, केवळ सच्चिदानंदस्वरूप आहे असें जाणणें, याला सर्वकर्मसंन्यास किंवा निष्कर्मता म्हणतात. कर्मासक्त अज्ञानी लोकांचा कर्म टाकणें म्हणजे निष्कर्मता असा गैरसमाज होऊं नये म्हणून ज्ञानानंतर कर्मप्रवृत्तिरूप प्रकृति ज्यांचीं क्षीण झाली नाही, अशा आत्मज्ञानी पुरुषांनी देखील लोकांना सन्मार्ग दाखविण्याकरिता शास्त्रानुसार कर्मानुष्ठान करावें असें भगवान् म्हणतात.

**प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः। अहङ्कारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते॥ २७॥**
**तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः। गुणा गुणेषु वर्तन्त इति मत्वा न सज्जते॥ २८॥**
**प्रकृतेर्गुणसम्मूढाः सज्जन्ते गुणकर्मसु। तानकृत्स्नविदो मन्दान्कृत्स्नविन्न विचालयेत्॥ २९॥**

**अर्थ**—सर्व जेवढें कांही कर्म होते तेवढेंहि प्रकृतीच्या त्रिगुणांकडून होत असते पण अहंकाराने विचारशून्य झालेला पुरुष त्या कर्माचा आपल्याला कर्ता समजतो. ॥ २७॥ पण ज्ञानी पुरुष गुण व कर्म हा दोन्ही प्रकारचा विभाग माझ्याहून भिन्न आहे व एका गुणाची दुसऱ्या गुणाचे ठिकाणी क्रीडा आहे असें तो जाणत असतो म्हणून तो आपल्याकडे कर्माचें कर्तृत्व घेत नाही. ॥ २८॥ प्रकृतीच्या शरीरेंद्रियादि गुणाने विचारशून्य झालेले पुरुष गुणांचा व कर्मांचा अहंकार धरितात, म्हणून त्यांत आसक्त होतात. अशा अल्पज्ञांना सर्व जाणणाऱ्या ज्ञानी पुरुषांनी बिघडवूं नये. ॥ २९॥

**देखें पुढिलाचें वोझें। जरी आपुला माथां घेईजे। तरी सांगें कां न दाटिजे। धनुर्धरा॥ १७७॥**
**तैसीं शुभाशुभें कर्में। जियें निफजती प्रकृतिधर्में। तियें मूर्ख मतिभ्रमें। मी कर्ता म्हणे॥ १७८॥**
**ऐसा अहंकाराधि रूढ। एकदेशी मूढ। तया हा परमार्थ गूढ। प्रगटावा ना॥ १७९॥**
**हें असो प्रस्तुत। सांगिजेल तुज हित। तें अर्जुना देऊनि चित्त। अवधारीं पां॥ १८०॥**
**जे तत्त्वज्ञानियांचां ठायीं। तो प्रकृतिभावो नाहीं। जेथ कर्मजात पाहीं। निपजत असे॥ १८१॥**
**ते देहाभिमानु सांडुनी। गुणकर्में वोलांडुनी। साक्षीभूत होऊनी। वर्तती देहीं॥ १८२॥**
**म्हणूनि शरीरीं जरी होती। तरी कर्मबंधा नातळती। जैसा कां भूतचेष्टा गभस्ती। घेपवेना॥ १८३॥**
**एथ कर्मीं तोचि लिंपे। जो गुणसंभ्रमें घेपे। प्रकृतीचेनि आटोपें। वर्ततु असे॥ १८४॥**
**इन्द्रियें गुणाधारें। राहाटती निजव्यापारें। तें परकर्म बलात्कारें। आपादी जो॥ १८५॥**

**अर्थ**—हें पहा, अर्जुना! आपण जर दुसऱ्यांचें ओझें आपल्या डोक्यावर घेतलें तर आपल्याला भार होणार नाही काय? ॥ १७७॥ त्याप्रमाणे जीं कांही पापपुण्यें होतात, तीं प्रकृतीकडून होत असतात. पण मूर्ख लोक अविचाराने मी तीं केलीं म्हणतात. ॥ १७८॥ याप्रमाणे अहंकारावर आरूढ होऊन म्हणजे अहंकार धरून तो मूर्ख पुरुष (सर्व व्यापक ब्रह्मस्वरूप असून) देहापुरता एकदेशी होतो. अशा अज्ञानी पुरुषाला गुह्य परमार्थज्ञान सांगूं नये. ॥ १७९॥ हें असो, सध्या तुला मी तुझ्या हिताचें काय तें सांगतों. तें नीट चित्त देऊन ऐक. ॥ १८०॥ ज्ञानी पुरुष कर्माचें कर्तृत्व आपल्याकडे घेत नाहीत, कारण ज्या प्रकृतीच्या ठिकाणी संपूर्ण कर्माची उत्पत्ति होते त्या प्रकृतीचा भाव (प्रकृतीचें ऐक्य) ज्ञानी पुरुषांचे ठिकाणीं नसतो. ॥ १८१॥ ज्ञानी पुरुष देहाचा अभिमान धरीत नाहीत म्हणजे मी देह आहे असें म्हणत नाहीत. गुणकर्मांना आपल्याहून निराळे पाहतात व त्या सर्वांचे साक्षी होऊन देहाचे ठिकाणीं

राहतात. ॥ १८२ ॥ ज्याप्रमाणे सूर्याच्या प्रकाशाच्या साह्याने सर्व प्राण्यांचे व्यापार होतात, पण त्यांचा लेप सूर्याला लागत नाही, त्याप्रमाणे शरीराचे ठिकाणीं ज्ञानी पुरुष राहतो तरी शरीरादिकांच्या कर्मांचा त्यांचाशीं कांही एक संबंध होत नाही. ॥ १८३ ॥ प्रकृतीच्या स्वाधीन होऊन जो वागतो व अविचाराने गुणच मी आहे असें समजतो तोच पुरुष कर्माने बद्ध होतो. ॥ १८४ ॥ गुणानुसार इंद्रियांचे व्यापार होतात. ते आपल्याहून निराळे असलेल्या इंद्रियांचें कर्म मुद्दाम आपल्यावर ओढवून घेतो म्हणजे मीं तें कर्म केलें म्हणतो, त्याला कर्म बाधतें. ॥ १८५ ॥

**गूढार्थदीपिका**—अज्ञानी जीवात्मा अहंकाराने प्रकृतीशीं ऐक्य पावून प्रकृतीचें कर्म व कर्तृत्व आपल्यावर ओढून घेतो हें भगवंतांनी सांगितलें असल्यामुळे, अहंकाराने प्रकृतीशीं ऐक्य पावणें व तिचें कर्मकर्तृत्व आपल्या ठिकाणीं घेणें हा जो अविवेकरूपी जीवभाव, तो शुद्ध आत्म्याच्या ज्ञानाने टाकून देऊन, जीवात्मा, शुद्ध आत्मस्वरूप झाल्यावर तो सर्व कर्म व कर्तृत्वरहित होतो. म्हणून असें शुद्ध आत्मस्वरूप झालेले जे ज्ञानी असतात ते त्यांचे ठिकाणीं ज्ञानानंतर जोपर्यंत कर्मप्रवृत्ति क्षीण होत नाही तोपर्यंतच प्रकृतीनुसार कर्मयोगानुष्ठान करून लोकसंग्रह करूं शकतात व ज्यांचे ठिकाणीं कर्मप्रवृत्ति क्षीण झाली, अशांना कर्मानुष्ठान करून त्यांनी लोकसंग्रह करावा असा निर्बंध घालतां येत नाही.

**मयि सर्वाणि कर्माणि सन्न्यस्याध्यात्मचेतसा । निराशीर्निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वरः ॥ ३० ॥**

**अर्थ**—आत्मस्वरूपाचे ठिकाणीं दृढ चित्तवृत्ति ठेवून माझे सगुण स्वरूपाचे ठिकाणीं कर्तृत्वासह सर्व कर्मे समर्पण कर व विषयाविषयींचा असलेला ममता अहंकार सोडून विषयसुखाची वासना निःशेष सोडून शोक न करतां युद्ध कर. ॥ ३० ॥

**तरी उचितें कर्मे आघवीं। तुवां आचरोनि मज अर्पावीं। परी चित्तवृत्ति न्यासावी। आत्मरूपीं॥ १८६ ॥**
**हें कर्म मी कर्ता। कां आचरेन या अर्था। ऐसा अभिमानु झणें चित्ता। रिगों देसी॥ १८७ ॥**
**तुवां शरीरपरा नोहावें। कामनाजात सांडावें। मग अवसरोचित भोगावे। भोग सकळ॥ १८८ ॥**
**आतां कोदंड घेऊनि हातीं। आरूढ पां इये रथीं। देईं आलिंगन वीरवृत्ती। समाधानें॥ १८९ ॥**
**जगीं कीर्ति रूढवीं। स्वधर्माचा मानु वाढवीं। यया भारापासोनि सोडवीं। मेदिनी हे॥ १९० ॥**
**आतां पार्था निःशंकु होईं। या संग्रामा चित्त देईं। एथ हेंवांचूनि कांहीं। बोलों नये॥ १९१ ॥**

**अर्थ**—तेव्हा जीं कांही विहित कर्मे असतील तीं सर्व करून मला अर्पण कर. पण आपली चित्तवृत्ति मात्र आत्मस्वरूपाचे ठिकाणीं दृढ ठेव. ॥ १८६ ॥ हें कर्म आहे व मी त्याचा कर्ता आहे किंवा मी तें करीन अशी अभिमानाची वृत्ति कदाचित् वागविशील. ॥ १८७ ॥ जें कांही करायचें तें देहाचे सुखाकरिता, असा केवळ देहपरायण होऊं नको. सर्व कामना चित्तांतून काढून टाक. मग जे जे प्रसंगोपात्त भोग प्राप्त होतील ते खुशाल भोग. ॥ १८८ ॥ आता धनुष्य घेऊन रथावर आरूढ हो व आनंदाने आपल्या वीरवृत्तीचा स्वीकार कर. ॥ १८९ ॥ जगांत आपली कीर्ति गाजूं दे. स्वधर्माचा आदर वाढव आणि या पृथ्वीची दुर्जनांच्या भारापासून सुटका कर. ॥ १९० ॥ अर्जुना! आता निःशंक हो, या युद्धाकडे लक्ष दे, कारण युद्धाचे वेळीं युद्धावांचून दुसरें कांही बोलूं नये. ॥ १९१ ॥

**ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठन्ति मानवाः । श्रद्धावन्तोऽनसूयन्तो मुच्यन्ते तेऽपि कर्मभिः ॥ ३१ ॥**
**ये त्वेतदभ्यसूयन्तो नानुतिष्ठन्ति मे मतम् । सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतसः ॥ ३२ ॥**

**अर्थ**—या माझ्या मताचें जे कोणी पुरुष अत्यंत श्रद्धेने व निर्मत्सरचित्ताने आचरण करतील तेहि कर्मबंधापासून मुक्त होतील. ॥ ३१ ॥ जे कोणी पुरुष या माझ्या उपदेशाकडे दोष दृष्टीने पाहतील व त्याप्रमाणे वागणार नाहीत, ते अत्यंत विचारशून्य मूर्ख आहेत व आपला घात करून घेणारे होत असें पक्के समज. ॥ ३२ ॥

**हें अनुपरोध मत माझें। जिहीं परमादरें स्वीकारिजे। श्रद्धापूर्वक अनुष्ठिजे। धनुर्धरा॥ १९२ ॥**
**तेही सकळ कर्मीं वर्ततु। जाण पां कर्मरहितु। म्हणोनि हें निश्चितु। करणीय गा॥ १९३ ॥**
**नातरी प्रकृतिमंतु होउनी। इंद्रिया लळा देउनी। जे हें माझें मत अव्हेरुनी। ओसंडिती॥ १९४ ॥**

**जे सामान्यत्वें लेखिती। अवज्ञा करूनि देखिती। कां हा अर्थवादु म्हणती। वाचाळपणें॥ १९५॥**
**ते मोहमदिरा भ्रमले। विषयविखें घारले। अज्ञानपंकीं बुडाले। निभ्रांत मानीं॥ १९६॥**
**देखें शवाचां हातीं दिधलें। जैसें कां रत्न वायां गेलें। नातरी जात्यंधा पाहलें। प्रमाण नोहे॥ १९७॥**
**कां चंद्राचा उदयो जैसा। उपयोगा न वचे वायसा। मूर्खा विवेकु हा तैसा। रुचेल ना॥ १९८॥**
**तैसे ते पार्था। जे विमुख या परमार्था। तयांसी संभाषण सर्वथा। करावें ना॥ १९९॥**
**म्हणोनि ते न मानिती। आणि निंदाही करूं लागती। सांगें पतंगु काय साहती। प्रकाशातें॥ २००॥**
**पतंगा दीपीं आलिंगन। तेथ त्यासी अचुक मरण। तेवीं विषयाचरण। आत्मघाता॥ २०१॥**

**अर्थ**—अर्जुना माझें हें निश्चित मत जे कोणी पुरुष अत्यंत आदराने प्रमाण मानून, त्याप्रमाणे अत्यंत श्रद्धेने वागतील. ॥ १९२॥ ते सर्व कर्म करीत असले तरी ते सर्व कर्मरहित आहेत असें समज. म्हणून मी सांगितल्याप्रमाणे निश्चित कर्म केलें पाहिजे. ॥ १९३॥ नाहीतर प्रकृतीच्या स्वाधीन होऊन व इंद्रियांचे लाड पुरवित माझ्या मताला धि:कारून जें कोणी वागतील. ॥ १९४॥ जे कोणी मला पूर्ण ब्रह्म न समजतां सामान्य पुरुषांप्रमाणे लेखतील, माझ्या म्हणण्याचा अनादर करतील, वाचाळपणाने आपलेंच शहाणपण मिरवून माझ्या या मताला अर्थवाद म्हणजे केवळ स्तुतिमात्र म्हणतील॥ १९५॥ ते अविवेकरूपी मद्य पिऊन विचारशून्य झाले, त्यांना विषयसुखरूपी विषाची बाधा झाली, ते अज्ञानरूपी चिखलांत फसले हें निसंशय जाण. ॥ १९६॥ ज्याप्रमाणे प्रेताचे हातांत दिलेलें रत्नहि फेंकून द्यावें लागतें किंवा जन्मांध असलेल्या पुरुषाला दिवसाच्या प्रकाशाचा उपयोग नसतो. ॥ १९७॥ किंवा चंद्राचा प्रकाश कावळ्याच्या कामीं पडत नाही त्याप्रमाणे अज्ञानी मूर्खांना माझा उपदेश हितकर वाटणार नाही किंवा रुचणार नाही. ॥ ११८॥ असे हे परमार्थाला विन्मुख असणारे जे पुरुष आहेत त्यांच्याशीं भाषणच करूं नये. ॥ १९९॥ हे मूर्ख लोक माझें म्हणणे मानत नाहीत व आणखी माझ्या मताची निंदा करूं पाहतात. खरेच आहे, अर्जुना! पतंगाला दिव्याचा प्रकाश पाहून बरें वाटतें का?॥ २००॥ ज्याप्रमाणे पतंगाने दिव्याला आलिंगन दिलें की निश्चित त्याचा नाश होतो, त्याचप्रमाणे स्वैर विषयसुख भोगणें हेंहि निश्चित आत्मघाताला कारण होते. ॥ २०१॥

**सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि। प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति॥ ३३॥**

**अर्थ**—सर्व प्राणी आपल्या प्रकृतीच्या स्वाधीन होऊन वागतात, एवढेच नाही तर ज्ञानी पुरुष देखील आपल्या प्रकृतीप्रमाणेच वागतात, मग तेथे दुसरा कोणी (म्हणजे मी देखील) शास्त्रानुसार इंद्रियांचें नियमन करूं शकत नाही (म्हणजे आपल्या इंद्रियांचे आपणच नियमन केलें पाहिजे, असा अर्थ). ॥ ३३॥

**म्हणोनि इंद्रियें एकें। जाणतेनि पुरुखें। लाळावीं ना कौतुकें। आदिकरुनी॥ २०२॥**
**हां गा सर्पेंसी खेळों येईल। कीं व्याघ्रसंसर्ग सिद्धी जाईल। सांगें हाळाहाळ जिरेल। सेविलिया काई॥ २०३॥**
**देखें खेळतां अग्नि लागला। मग तो न सांवरे जैसा उधवला। तैसा इंद्रियां लळा दिधला। भला नोहे॥ २०४॥**
**एऱ्हवीं तरी अर्जुना। या शरीरा पराधीना। कां नाना भोगरचना। मेळवावी॥ २०५॥**
**आपण सायासेंकरूनि बहुतें। सकळहि समृद्धिजातें। उदोअस्तु या देहातें। प्रतिपाळावें कां॥ २०६॥**
**सर्वस्वें शिणोनि एथें। अर्जवावीं संपत्तिजातें। तेणें स्वधर्मु सांडूनि देहातें। पोखावें काई॥ २०७॥**
**मग हें तंव पांचमेळावा। शेखीं अनुसरेल पंचत्वा। ते वेळीं केला कें गिंवसावा। शीणु आपुला॥ २०८॥**
**म्हणूनि केवळ देहभरण। तें जाणें उघडी नागवण। यालागीं एथ अंत:करण। देयावेंना॥ २०९॥**

**अर्थ**—म्हणून जाणत्या शहाण्या पुरुषाने आपल्या इंद्रियांचे लाड, कौतुक म्हणून देखील पुरवूं नये. ॥ २०२॥ सर्पाशीं कधी खेळतां येईल काय? किंवा वाघाचा संबंध ठेवणें शक्य आहे काय? अथवा हालाहल विषय प्यालें तर तें पोटांत पचेल काय?॥ २०३॥ अर्जुना! पहा, खेळतां खेळतां जरी अग्नि लागला व पेटला तर तो सांवरला जात नाही. तसेंच इंद्रियांचे लाड पुरविणें आपल्या कल्याणाचें होत नाही. ॥ २०४॥ नाही तरी हें आपलें शरीर काळाच्या स्वाधीन आहे. या पराधीन देहाच्या सुखाकरिता, अर्जुना! कां आपण नानाप्रकारचे कष्ट सोसून नानाप्रकारचे

भोग मिळविण्याचा प्रयत्न करावा ? ॥ २०५ ॥ नानाप्रकारचे कष्ट करून व नाना प्रकारची भोगसंपत्ति मिळवून आणि रात्रंदिवस या देहाची काळजी वाहून त्याचे पोषण कां करावें बरें ? ॥ २०६ ॥ सर्वथा कष्ट करून संपत्ति मिळवावी आणि स्वधर्माला सोडून या शरीरांचें पोषण करावें काय ? ॥ २०७ ॥ पुढे पंचभूतांचे समुदायाने बनलेलें हें शरीर जेव्हा पंचभूतांत शेवटीं मिळून जाईल तेव्हा या शरीराचें पोषण करण्याकरिता जे आपण कष्ट केले ते कांही दिसत नाहीत, सर्व व्यर्थच जातात. ॥ २०८ ॥ म्हणून स्वधर्माचरणात, मिळविलेल्या शक्तीचा व्यय न करतां केवळ देह पोसण्यांतच तिचा विनियोग करणें ही सर्वस्वीं नागवण आहे. म्हणून केवळ विषयसुख भोगण्याकडेच लक्ष देऊं नये. ॥ २०९ ॥

**इन्द्रियस्येन्द्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ । तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपन्थिनौ ॥ ३४ ॥**

**अर्थ**—इंद्रियांचे ठिकाणीं आपल्या विषयाविषयीं स्वाभाविकच रागद्वेष आहेत. पण मात्र मनुष्याने त्यांच्या तावडींत जाऊं नये. कारण रागद्वेष हे परमार्थ मार्गातील लुटारू आहेत. ॥ ३४ ॥

**एऱ्हवीं इंद्रियांचिया अर्था-। सारखा विषयो पोखितां। संतोषु कीर चित्ता। आपजेल ॥ २१० ॥**
**परी तो संवचोराचा सांगातु। जैसा नावेक स्वस्थु। जंव नगराचा प्रांतु। सांडिजेना ॥ २११ ॥**
**बापा विषाची मधुरता। झणें आवडी उपजे चित्ता। परी तो परिणाम विचारितां। प्राणु हरी ॥ २१२ ॥**
**देखें इंद्रियीं कामु असे। तो लावी सुखदुराशे। जैसा गळीं मीनु अमिषें। भुलविजे गा ॥ २१३ ॥**
**परी तयामाजी गळु आहे। जो प्राणातें घेऊनि जाये। तो जैसा ठाउवा नोहे। झांकलेपणें ॥ २१४ ॥**
**तैसें अभिलाषें येणें कीजेल। जरी विषयांची आशा धरिजेल। तरी वरपडा होईजेल। क्रोधानळा ॥ २१५ ॥**
**जैसा कवळोनियां पारधी। घातेचिये संधी। आणी मृगातें बुद्धी। साधावया ॥ २१६ ॥**
**एथ तैसीचि परी आहे। म्हणूनि संगु हा तुज नोहे। पार्था दोन्ही कामक्रोध हे। घातुक जाणें ॥ २१७ ॥**
**म्हणऊनि हा आश्रयोचि न करावा। मनींही आठवो न धरावा। एकु निजवृत्तीचा वोलावा। नासों नेदीं ॥ २१८ ॥**

**अर्थ**—एरव्हीं इंद्रियांची ओढ ज्या विषयाकडे आहे तोच विषय इंद्रियाला भोगूं दिल्यास मनाला संतोष होईल हें खरें. ॥ २१० ॥ पण ज्याप्रमाणे सोबती करणारे चोर गांवाची शींव सुटेपर्यंत कांही करीत नाहीत; स्वस्थ राहतात, पण पुढे गांवाची शींव सुटली की लुटतात, त्याप्रमाणेच इंद्रियांचे रागद्वेष हे सोबतीचे चोर आहेत. ॥ २११ ॥ बापा अर्जुना! या विषयसुखाचे ठिकाणीं जर का चित्ताला गोडी लागली की, त्याच्या परिणामाचा विचार करतां आपला नाशच दिसून येतो. ॥ २१२ ॥ अर्जुना! पहा, इंद्रियांचे ठिकाणीं सुखाची इच्छा असते व ती इच्छा मग कधी आवरली जाणार नाही अशी दुर्धर वाढते. ज्याप्रमाणे गळाला लागलेल्या मांसाच्या तुकड्याला मत्स्य भुलतो त्याप्रमाणे मनुष्य विषयसुखांत भुलतो. ॥ २१३ ॥ पण गळाला लागलेल्या मांसाच्या तुकड्याने गळ झांकला गेल्यामुळे प्राण घेणारा गळ त्या मत्स्याला दिसत नाही. ॥ २१४ ॥ त्याप्रमाणे या कामाने लोभ उत्पन्न होऊन विषयसुखाची आशा धरली जाईल आणि त्यामुळे क्रोधरूपी अग्नीच्या तावडींत मनुष्य सांपडेल. ॥ २१५ ॥ ज्याप्रमाणे पारधी किंवा शिकारी मृगाला पकडण्याकरिता किंवा मारण्याकरिता मृग मारला जाईल अशा अडचणींत मृगाला आपल्या बुद्धीने घेरतो. ॥ २१६ ॥ अर्जुना! तशीच स्थिति येथेहि आहे. म्हणून त्यांचा संगच तुझ्या उपयोगाचा नाही, अर्जुना! काम क्रोध हे दोन्ही परमार्थात घातक आहेत. ॥ २१७ ॥ म्हणून यांचा आश्रय करूं नको. एवढेंच नाही तर मनाने देखील त्यांचें कधी स्मरण करूं नये आणि मी आपल्या सर्वांहून निराळा साक्षिस्वरूप आहे या वृत्तीचा जो जिव्हाळा तो एक कधी नाहीसा होऊं देऊं नकोस. ॥ २१८ ॥

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात्। स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ३५ ॥**

**अर्थ**—दुसऱ्याला विहित असलेला धर्म आचरण्यास सोपा असला व आपला धर्म आचरण्यास कठीण वाटत असला, तरी दुसऱ्याला विहित असलेल्या धर्माचें आचरण करण्यापेक्षा आपल्याला विहित असलेला धर्मच श्रेयस्कर असतो. आचरण्यास कठीण म्हणून आपल्याला मरण आलें तरी त्यांत कल्याणच असतें; पण परक्याचा धर्म मात्र आपल्याला अनर्थकारक असतो. ॥ ३५ ॥

**अगा स्वधर्मु हा आपुला। जरी कां कठिणु जाहला। तरी हाचि अनुष्ठिला। भला देखें॥ २१९॥**
**येरु आचारु जो परावा। तो देखतां कीर बरवा। परी आचरतेनि आचरावा। आपुलाचि॥ २२०॥**
**सांगें शूद्रघरीं आघवीं। पक्वान्नें आहाति बरवीं। तीं द्विजें केवीं सेवावीं। दुर्बळु जरी जाहला॥ २२१॥**
**हें अनुचित कैसेनि कीजे। अग्राह्य केवीं इच्छिजे। अथवा इच्छिलेंही पाविजे। विचारीं पां॥ २२२॥**
**तरी लोकांचीं धवळारें। देखोनियां मनोहरें। असतीं आपुलीं तणारें। मोडावीं केवीं॥ २२३॥**
**हें असो वनिता आपुली। कुरूप जरी जाहली। तरी भोगितां तेचि भली। जियापरी॥ २२४॥**
**तेवीं आवडे तैसा सांकडु। आचरतां जरी दुवाडु। तरी स्वधर्मुचि सुरवाडु। परत्रींचा॥ २२५॥**
**हां गा साकर आणि दूध। हें गौल्य कीर प्रसिध्द। परी कृमिदोषीं विरुद्ध। घेपे केवीं॥ २२६॥**
**ऐसेनिही जरी सेविजेल। तरी ते आळुकीचि उरेल। जे तें परिणामीं पथ्य नव्हेल। धनुर्धरा॥ २२७॥**
**म्हणोनि आणिकांसी जें विहित। आणि आपणपेयां अनुचित। तें नाचरावें जरी हित। विचारिजे॥ २२८॥**
**या स्वधर्मातें अनुष्ठितां। वेंचु होईल जीविता। तोहि निका वर उभयतां। दिसत असे॥ २२९॥**
**ऐसें समस्त सुरशिरोमणी। बोलिले जेथ श्रीशार्ङ्गपाणी। तेथ अर्जुन म्हणे विनवणी। असे देवा॥ २३०॥**
**हें जें तुम्हीं सांगितलें। तें सकळ कीर म्यां परिसलें। परी आतां पुसेन कांहीं आपलें। अपेक्षित॥ २३१॥**

**अर्थ**—अर्जुना! आपला विहित धर्म कठीण जरी वाटत असला तरी त्याचेंच आचरण करणें आपल्या कल्याणाचें असतें. ॥ २१९॥ एरवीं दुसऱ्याला विहित असलेला धर्म जरी बरा दिसत असला तरी आचरण करायचें तें स्वधर्माचेंच केलें पाहिजे. ॥ २२०॥ अर्जुना! सांग, शूद्रजातीचें घरीं उत्तम उत्तम पक्वान्नें केलीं असलीं तरीं अत्यंत दरिद्री आहे म्हणून ब्राह्मणाने तीं कशी खावीं बरें?॥ २२१॥ असें विहित नसलेलें कर्म कसें करायचें किंवा जें शूद्रान्न आपल्याला निषिद्ध म्हणून शास्त्राने सांगितले त्यांची इच्छा तरी कशी करावी? अथवा इच्छिलें तरी कसें प्राप्त करून घ्यावें याचा विचार कर. ॥ २२२॥ तसेंच दुसऱ्या लोकांची सात मजलीं सुंदर घरें पाहून आपल्या गवंताच्या झोपड्या कशा मोडाव्या?॥ २२३॥ असो, आपली बायको जरी कुरूप असली तरी भोग घ्यावयाचा तर तिचाच घेणें हिताचें असतें. ॥ २२४॥ त्याप्रमाणे आपला स्वधर्म वाटेल तितका कठीण असला व आचरतांना दुःखदायक असला तरी स्वधर्माचें आचरणच मेल्यानंतर सुखकारक असतें. ॥ २२५॥ बा अर्जुना! साखर आणि दूध हे दोन्ही गोड म्हणून प्रसिद्ध आहेत पण कृमीच्या आजारांत देणे विरुद्ध आहे, तेव्हा तें कसें घ्यावें?॥ २२६॥ इतक्यावरहि अर्जुना! कृमिदोषवानाने त्यांचें सेवन केलेंच तर ती इच्छेची पूर्तीच होईल, पण परिणामी हितकर होणार नाही. ॥ २२७॥ म्हणून परलोकाचा विचार केला तर दुसऱ्याला जो धर्म विहित आहे व आपल्याला विहित नाही अशा धर्माचें आचरण करूं नये. ॥ २२८॥ आपल्या विहित धर्माचें अनुष्ठान करतां करतां प्राण जरी खर्ची पडलें तरी तें उत्तम असतें; कारण इहपरलोकांत तसें होणें श्रेष्ठ गणलें गेलें आहे. ॥ २२९॥ याप्रमाणे जेथे सर्व देवांच्या देवाचें असें बोलणें चाललें आहे तेथे अर्जुन म्हणतो, शार्ङ्गधरा! आपले चरणीं माझी एक प्रार्थना आहे. ॥ २३०॥ तुम्ही जें सर्व आतापर्यंत सांगितलें तें मी सर्व बरोबर ऐकिलें आहे; पण आता माझी कांही विचारावयाची इच्छा आहे तें मी विचारतो. ॥ २३१॥

**गूढार्थदीपिका**—मनुष्याला ब्राह्मणादि वर्णानुसार जो निरनिराळा धर्म भगवंतांनी सांगून ठेविला आहे तो त्याच्या समोर धर्म असतो व तोच त्याच्या इहपरकल्याणाचा आहे. पण केव्हा केव्हा मनुष्याला आपल्या स्वधर्मापेक्षा दुसऱ्याला विहित असलेल्या धर्मातील वर वर दिसणारा सुटसुटितपणा किंवा सोपेपणा अथवा फायदा पाहून आपला धर्म सोडून दुसऱ्याच्या धर्माने वागण्याचा मोह होतो. अर्जुनाला असाच मोह होऊन क्षत्रियांच्या युद्धरूपी घोर कर्मापेक्षा ब्राह्मणांचा क्षमाशांतिरूप संन्यासधर्मच आपलें व सर्व समाजाचें किंवा अपल्या ज्ञातीचें कल्याण करणारा आहे व इहपरलोक किंवा आत्मकल्याण साधणारा आहे असें वाटूं लागलें. पण इहलोकांतील भौतिक विषयसुख व अध्यात्मसुख या दोघांचीहि प्राप्ति होण्याकरिता भगवंतांनी प्रत्येकाचा धर्म सांगून ठेविला असल्यामुळे व तो भगवानच

सांगून ठेविलेल्या धर्माप्रमाणे अनुष्ठान करणाऱ्याचें दोन्ही प्रकारचें हित साधून देणारा असल्यामुळे, भगवंताने आपल्याला विहित केलेला धर्म जरी आपल्या बुद्धीने अकल्याणाचा व दुसऱ्याला विहित असलेला धर्म कल्याणाचा आहे असें वाटत असलें तरी, स्वधर्म सोडून परधर्माचें आचरण करण्याचा मनुष्याने आपल्या बुद्धीने केलेला विचार हितकर होत नाही, हेंच भगवंतांनी या श्लोकाने सांगितलें आहे.

*अर्जुन उवाच*

**अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पुरुषः। अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः॥ ३६॥**

**अर्थ**—अर्जुन म्हणतो हे वृष्णिकुळांत उत्पन्न झालेल्या भगवंता! हा पुरुष इच्छा नसतांनाहि बळजबरीने-दुसऱ्याने प्रवृत्त करावें तसें कोणी प्रवृत्त केल्यामुळे पापाचरण करतो किंवा शास्त्र सोडून वागतो. ॥ ३६॥

**तरी देवा हें ऐसें कैसें। जे ज्ञानियांचीही स्थिति भ्रंशे। मार्गु सांडुनि अनारिसे। चालत देखों॥ २३२॥**
**सर्वज्ञुही जे होती। हे उपायही जाणती। तेही परधर्में व्यभिचरति। कवणें गुणें॥ २३३॥**
**बीजा आणि भुसा। अंधु निवाडु नेणे जैसा। नावेक देखणाही तैसा। बरळे कां पां॥ २३४॥**
**जे असता संगु सांडिती। तेचि संसर्गु करितां न धाती। वनवासीही सेविती। जनपदातें॥ २३५॥**
**आपण तरी लपती। सर्वस्वें पाप चुकविती। परी बलात्कारें सुइजती। तयाचि माजीं॥ २३६॥**
**जयाची जीवें घेती विवसी। तेंचि जडोनि ठाके जीवेंसी। चुकवितां तें गिंवसी। तयांतेंचि॥ २३७॥**
**ऐसा बलात्कारु एकु दिसे। तो कवणाचा एथ आग्रहो असे। हें बोलावें हृषीकेशें। पार्थु म्हणे॥ २३८॥**

**अर्थ**—तरी, देवा! हें आश्चर्यच आहे की ज्ञानी जे म्हणवितात ते देखील विहित मार्ग सोडून भलत्या मार्गाने चाललेले व विहित मार्गापासून भ्रष्ट झालेले दिसतात. ॥ २३२॥ जे सर्वज्ञ आहेत व जे आपल्या कल्याणाचा मार्ग जाणतात तेहि स्वधर्म सोडून परधर्माने वागतांना जे दिसतात ते कशामुळे?॥ २३३॥ बी आणि कोंडा यांचा निवाडा आंधळ्याला करतां येणार नाही; पण केव्हा केव्हा क्षणभर डोळस पुरुषहि चुकतो तें कां?॥ २३४॥ जे पुरुष, असलेला आप्तेष्टांचा संग सोडून दुसऱ्याचा संसर्ग लावून घेतांना पुरे म्हणत नाहीत, लोकसंसर्ग सोडून जंगलात राहायला गेलेले पुरुषहि पुनः लोकांतच राहू इच्छितात. ॥ २३५॥ पाप होऊं नये म्हणून पाप प्रसंगाला चुकविण्याचा प्रयत्न करितात व पापापासून आपण लपून राहतात. पापकर्मीच्या दृष्टीस आपण पडत नाहीत. असे जे पुरुष तेहि पण बळजबरीने पापाचरणांत लोटले जातात. ॥ २३६॥ ज्या वस्तूचा मनापासून त्रास वाटतो, त्याच वस्तूचा मनांत ध्यास लागतो आणि जी वस्तु आपण चुकवू पाहतों ती गळयात येऊन पडते. ॥ २३७॥ असा एक बलात्कार दिसून पडतो तो कोणाचा आग्रह किंवा बलात्कार आहे! हे, देवा! मला नीट सांगा. ॥ २३८॥

*श्रीभगवानुवाच*

**काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः। महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम्॥ ३७॥**

**अर्थ**—भगवान म्हणतात—अर्जुना! रजोगुणापासून उत्पन्न झालेला हा काम आहे व हाच पुढे क्रोधहि होतो. हा मोठा खादाड आहे. म्हणजे याची कधी तृप्तीच होत नाही. तसाच हा मोठा पापी आहे. (कारण हाच पापाला प्रवृत्त करितो) म्हणून या जगाचा हा वैरी आहे असें समज. ॥ ३७॥

**तंव हृदयकमळआरामु। जो योगियांचा निष्काम कामु। तो म्हणतसे पुरुषोत्तमु। सांगेन आइक॥ २३९॥**
**तरी हे काम क्रोधु पाहीं। जयांतें कृपेची सांठवण नाहीं। हे कृतांताचां ठायीं। मानिजती॥ २४०॥**
**हे ज्ञाननिधीचे भुजंग। विषयदरीचे वाघ। भजनमार्गीचे मांग। मारक जे॥ २४१॥**
**हे देहदुर्गीचे धोंड। इंद्रियग्रामींचे कोंड। यांचें व्यामोहादिक बंड। जगावरी॥ २४२॥**
**हे रजोगुण मानसीचे। समूळ आसुरियेचे। धालेपण ययांचें। अविद्या केलें॥ २४३॥**
**हे रजाचे कीर जाहले। परी तमासी पढियंते भले। तेणें निजपद यां दिधलें। प्रमादमोहो॥ २४४॥**
**हे मृत्यूचां नगरीं। मानिजती निकियापरी। जे जीविताचे वैरी। म्हणऊनियां॥ २४५॥**

**जयांसि भुकेलियां आमिषा। हें विश्व न पुरेचि घांसा। कुळवाडी यांची आशा। चाळीत असे॥ २४६ ॥**
**कौतुकें कवळितां मुठी। जिये चवदा भुवनें थेंकुटी। ते भ्रांति तिये धाकुटी। वाल्हीदुल्ही॥ २४७ ॥**
**जे लोकत्रयाचें भातुकें। खेळतांचि खाय कवतिकें। तिच्या दासीपणाचेनि बिकें। तृष्णा जिये॥ २४८ ॥**
**हें असो मोहें मानिजे। यांतें अहंकारें घेपे दीजे। जेणें जग आपुलेनि भोजें। नाचवीत असे॥ २४९ ॥**
**जेणें सत्याचा भोकसा काढिला। मग असत्य तृणकुटा भरिला। तो दंभु रूढविला। जगीं इहीं॥ २५० ॥**
**साध्वी शांति नागविली। मग माया मांगी शृंगारिली। तियेकरवीं विटाळविलीं। साधुवृंदें॥ २५१ ॥**
**इहीं विवेकाची त्राय फेडिली। वैराग्याची खाली काढिली। जितया मान मोडिली। उपशमाची॥ २५२ ॥**
**इहीं संतोषवन खांडिलें। धैर्यदुर्ग पाडिले। आनंदरोप सांडिले। उपडूनियां॥ २५३ ॥**
**इहीं बोधाचीं रोपें लुंचिलीं। सुखाची लिपी पुसिली। जिव्हारीं आगी सूदली। तापत्रयाची॥ २५४ ॥**
**हे आंगा तंव घडले। जीवींचि आथी जडले। परी नातुडती गिंवसिले। ब्रह्मादिकां॥ २५५ ॥**
**हे चैतन्याचे शेजारीं। वसती ज्ञानाचां एका हारीं। म्हणोनि प्रवर्तले महामारी। सांवरती ना॥ २५६ ॥**
**हे जळेंवीण बुडविती। आगीविण जाळिती। न बोलतां कवळिती। प्राणियांतें॥ २५७ ॥**
**हे शस्त्रेंवीण साधिती। दोरेंवीण बांधिती। ज्ञानियासी तरी वधिती। पैज घेउनी॥ २५८ ॥**
**हे चिखलेंवीण रोंविती। पाशिकेंवीण गोंविती। हे कवणाजोगे न होती। आंतौटेपणें॥ २५९ ॥**

**अर्थ—**यावर, हृदयरूपी कमळ हें ज्याचें क्रीडास्थान आहे, योगीजनाचा जो कामनारहित काम आहे म्हणजे योगी विषयसुखाची इच्छा सोडून ज्याच्या प्राप्तीची इच्छा करितात, तो परमात्मा श्रीकृष्ण म्हणतो, अर्जुना! सांगतों ऐक. ॥ २३९ ॥ तू विचारलेस तर, हे कामक्रोध जे आहेत त्यांचे ठिकाणी दयावृत्तीचा मुळीच सांठा नाहीं. हे साक्षात् मृत्युच आहेत असें समज. ॥ २४० ॥ हे आत्मज्ञानरूपी ठेव्यावर बसलेले सर्प आहेत, हे विषयरूप गुहेंत दडून बसलेले वाघ आहेत, हे परमेश्वराच्या भजनमार्गाने जाणारे जे लोक आहेत त्यांना मारणारे मारेकरी मांग आहेत. ॥ २४१ ॥ हे देहरूप किल्ल्याचे मजबूत दगडी चिरे आहेत (म्हणजे मजबूत दगडांनी जसा किल्ला मजबूत राहतो, त्याप्रमाणे काम क्रोध हे देहबुद्धि दृढ करणारे आहेत). हे इंद्रियरूपी गांवीचे गांवकुस आहेत (म्हणजे गांवाच्या भोंवतीं जी भिंत असते तिच्या योगाने गांवाचें संरक्षण होतें त्याप्रमाणे कामक्रोधाचे योगाने इंद्रियांचें संरक्षण होतें किंवा इंद्रियांच्या विषयासक्तीचें संरक्षण होते). या कामक्रोधांनी विचारशून्यता इत्यादिकांच्या साह्याने सर्व जगावर उठाव केला आहे. ॥ २४२ ॥ कामक्रोध हे मनाचा रजोगुणच होय. हे कामक्रोध नि:शेष आसुरी संपत्तीच होय आणि अविद्येने म्हणजे विपरीत भ्रांतीने यांना दाईप्रमाणे दूध पाजून वाढविलें. ॥ २४३ ॥ हे रजोगुणापासून जन्मले हें अगदी खरें, पण हे तमोगुणाचेहि मोठे आवडते आहेत. त्या तमोगुणाने या कामक्रोधांना प्रमाद, विचारशून्यता किंवा अविवेक हें आपलें पद दिलें. ॥ २४४। मृत्यूच्या नगरांत यांना अगदीं सच्च्या मित्राप्रमाणे मानिलें जातें; कारण हें जीविताचे वैरी आहेत. ॥ २४५ ॥ या कामक्रोधाच्या भुकेची शांति करण्याकरिता मांस द्यावयाचें तर संपूर्ण विश्वाचें मांस त्यांना एका घांसाला देखील पुरत नाही. जगरूप शेतीचा सर्व उदीम यांच्या ठिकाणीं असणाऱ्या आशेनेच होत असतो. ॥ २४६ ॥ या कामक्रोधांनी सृष्टीच्या चवदाहि लोकांना कौतुकाने मुठींत धरतो म्हटलें तर ती चवदा भुवनेंहि कमी पडतात आणि या कामक्रोधांची भ्रांति ही आवडती धाकटी बहीण आहे. ॥ २४७॥ त्रैलोक्य हें मुलांचे भातुक्याप्रमाणे कामक्रोधांकडून सहज खाल्ले जातें. विषयसुखाची वासना ही या कामक्रोधांच्या दासीपणाचें बळावर जगते. ॥ २४८॥ हे असो. अर्जुना! अविवेक या कामक्रोधांना मोठा मान देतो. अहंकार याच्याशीं घेण्यादेण्याचा व्यापार करितो. म्हणून तो अहंकार वाटेल तसें सर्व जग हौसेने नाचवित आहे. ॥ २४९ ॥ या अहंकाराने सत्यपणाचा जो गाभा तोच नाहिसा केला व त्यांत असत्यपणाचें कुटार भरून दिलें. तोच जगांत दंभ प्रसिद्ध झाला. ॥ २५० ॥ सती शांतीला लुटून टाकिलें. कपटरूपी मांगिणीला सजविलें व तिच्या हाताने साधुसमुदाय बाटविला. ॥ २५१ ॥ यांनी विवेकाची प्रतिष्ठाच नाहिशी केली. वैराग्याची साल सोलून काढली व जिवंत उपशमाची मानच मोडली. ॥ २५२ ॥

यांनी संतोषरूपी वन उध्वस्त केलें. धैर्यरूपी मजबूत किल्ला जमीनदोस्त केला आणि मनाच्या समाधानाचें रोपटें उपटून टाकिलें. ॥ २५३ ॥ यांनी ज्ञानाचीं रोपटें तोडून टाकलीं, सुख हा शब्दच पुसून टाकिला व हृदयांत आध्यात्मिकादि तीन दु:खरूपी अग्नीची शेगडी घातली. ॥ २५४ ॥ हे अंगात उत्पन्न झाले आहेत. चित्तांत दृढ खिळून बसले आहेत, पण ब्रह्मादिकांनी शोध केला तरी त्यांच्या हातीं लागत नाहीत. ॥ २५५ ॥ हे चैतन्याचे अगदी जवळ असतात, ज्ञानाच्या एका सत्तारूप पंक्तींत राहतात, म्हणूनच ते आटोपले जाऊं शकत नाहीत व सर्व नाश करण्यास प्रवृत्त होतात. ॥ २५६ ॥ हे पाण्यावांचून बुडवितात, अग्निवांचून जाळतात. न बोलतांच मनुष्याला घेरतात. ॥ २५७ ॥ हे शस्त्रावांचून मारतात, दोरीवांचून बांधतात आणि ज्ञानी पुरुषाला प्रतिज्ञा करून मारतात, म्हणजे त्यांचे ठिकाणीं देहबुद्धि उत्पन्न करितात. ॥ २५८ ॥ हे चिखलावांचून गाडतात, जाळ्यावांचून गुंतवितात आणि आपल्या चिवटपणाने कोणाच्या स्वाधीन होत नाहीत. ॥ २५९ ॥

**धूमेनाऽऽव्रियते वह्निर्यथादर्शो मलेन च । यथोल्बेनावृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ॥ ३८ ॥**
**आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा । कामरूपेण कौन्तेय दुष्पूरेणानलेन च ॥ ३९ ॥**

**अर्थ**—जसा धूमाने अग्नि, धुळीने आरसा व वारेने गर्भ आच्छदिलेला असतो, तसें हें आत्मज्ञान कामक्रोधाने झांकलेलें आहे. ॥ ३८ ॥ अर्जुना जो काम, ज्याची कधी तृप्तिच होत नाही असा अग्निच आहे व जो ज्ञान्याचा सदा वैरी आहे, त्या कामाने आत्मज्ञान झांकून टाकिलें आहे. ॥ ३९ ॥

**जैसी चंदनाची मुळी। गिंवसोनि घेपें व्याळीं। नातरी उल्बाची खोळी। गर्भस्थासी ॥ २६० ॥**
**कां प्रभावीण भानु। धूमेंवीण हुताशनु। जैसा दर्पण मळहीनु। कंहींच नसे ॥ २६१ ॥**
**तैसें इहींवीण एकलें। आम्हीं ज्ञान नाहीं देखिलें। जैसें कोंडेनि पां गुंतलें। बीज निपजे ॥ २६२ ॥**
**तैसें ज्ञान तरी शुद्ध। परी इहीं असे प्ररुद्ध। म्हणोनि तें अगाध। होऊनि ठेलें ॥ २६३ ॥**
**आधीं यांतें जिणावें। मग तें ज्ञान पावावें। तंव पराभवो न संभवे। रागद्वेषां ॥ २६४ ॥**
**यांतें साधावयालागीं। जें बळ आणिजे आंगीं। तें इंधन जैसे आगी। सावावो होय ॥ २६५ ॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे चंदनाच्या मुळाला सर्प वेढून असतात किंवा गर्भातील जीवाला वारेची खोळ असते. ॥ २६० ॥ का प्रकाशांवाचून सूर्य राहत नाही, धूरावांचून अग्नि नसतो किंवा आरसा मळणार नाही, असे होत नाही. ॥ २६१ ॥ ज्याप्रमाणे कोंड्यावांचून बीं नसते त्याप्रमाणे या कामक्रोधांनी युक्त नाही असें निर्भेळ ज्ञान आम्ही पाहिलें नाही. ॥ २६२ ॥ तसें पाहिलें तर ज्ञान हें निर्भेळच आहे, पण या कामक्रोधांनी त्या ज्ञानाला रोधून धरिलें आहे, म्हणून अत्यंत कठीण होऊन बसलें आहे. ॥ २६३ ॥ अगोदर या कामक्रोधाला जिंकावे तरच तें ज्ञान प्राप्त होतें कामक्रोध जिंकले जात नाहीत तोपर्यंत रागद्वेषहि जिंकले जात नाहीत. ॥ २६४ ॥ या कामक्रोधांना जिंकण्याकरिता जें सामर्थ आपण आपल्या आंगीं आणावें तें अग्नीला सरपण जसें साह्यभूतच होतें तसें कामक्रोधाला साह्यभूतच होतें. (कारण रागद्वेषपूर्वकच सामर्थ्याने प्रयत्न केला जातो व रागद्वेषाने पुन: कामक्रोध वाढतात). ॥ २६५ ॥

**गूढार्थदीपिका**—काम म्हणजे विषयाचें प्रेम; ज्ञान म्हणजे जाणणें; विरोधी पदार्थच विरोधी पदार्थाचा नाश करूं शकतो. पण कामक्रोधादिक जाणले जातात म्हणून जाणीवेचा कामाशीं विरोध नाही व म्हणूनच ज्ञानाने कामाचा नाश न होतां ज्ञानाबरोबर तो राहूं शकतो. एका विषयाच्या प्रेमाने दुसऱ्या विषयाचें प्रेम नाहिसें होतें; हें आपण पाहतों. म्हणून परमेश्वराच्या प्रेमाने कामरूपी विषयांचें प्रेम नाहीसें होऊं शकतें.

**इन्द्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते । एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥ ४० ॥**
**तस्मात्त्वमिन्द्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ । पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥ ४१ ॥**
**इन्द्रियाणि पराण्याहुरिन्द्रियेभ्य: परं मन: । मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धे: परतस्तु स: ॥ ४२ ॥**
**एवं बुद्धे: परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना । जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ॥ ४३ ॥**

*ॐतत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मयोगो नाम तृतीयोऽध्याय: ॥ ३ ॥*

**अर्थ**—इंद्रिये, मन, बुद्धि हीं या कामक्रोधांचीं वसतिस्थानें आहेत. त्यांच्या आश्रयाने हा काम ज्ञानाला वेढून घेऊन झांकून टाकतो व पुरुषाला भुरळ पाडतो. ॥ ४० ॥ म्हणून अर्जुना! अगोदर इंद्रियांचें दमन कर किंवा विषयांपासून आवर. ज्ञान विज्ञान यांचा नाश करणाऱ्या या पाप्याला ठार कर. ॥ ४१ ॥ बाह्य स्थूल विषय जे आहेत त्यांच्या पलीकडे इंद्रियें आहेत. इंद्रियांच्या पलीकडे मन आहे. मनाच्या पलीकडे बुद्धि आहे व बुद्धीच्या पलीकडे तो आत्मा आहे. ॥ ४२ ॥ याप्रमाणे बुद्धीच्या पलीकडे असणाऱ्या आत्म्याला जाणून बुद्धीने त्याला दृढ धरून ठेवून कधीहि हातीं न लागणाऱ्या या कामरूपी शत्रूला ठार कर. ॥ ४३ ॥

**तैसे उपाय कीजती जे जे। ते यांसीचि होती विरजे। म्हणोनि हटियांतें जिणिजे। इहींचि जगीं॥ २६६ ॥**
**ऐसियांही सांकडां बोला। एक उपायो आहे भला। तो करितां जरी आंगवला। तरी सांगेन तुज॥ २६७ ॥**
**यांचा पहिला कुरुठा इंद्रियें। एथूनि प्रवृत्ति कर्मातें विये। आधीं निर्दळूनि घालीं तियें। सर्वथैव॥ २६८ ॥**
**मग मनाची धांव पारुषेल। आणि बुद्धीची सोडवण होईल। इतुकेनि थारा मोडेल। या पापियांचा॥ २६९ ॥**
**हे अंतरींहूनि जरी फिटले। तरी निभ्रांत जाण निवटले। जैसें रश्मीविण उरलें। मृगजळ नाहीं॥ २७० ॥**
**तैसे रागद्वेष जरी निमाले। तरी ब्रह्मींचें स्वराज्य आलें। मग तो भोगी सुख आपुलें। आपणचि॥ २७१ ॥**
**जे गुरुशिष्याची गोठी। पदपिंडाची गांठी। तेथ स्थिर राहोनि नुठीं। कवणे काळीं॥ २७२ ॥**
**ऐसें सकळ सिद्धांचा रावो। देवी लक्ष्मीयेचा नाहो। राया ऐक देवदेवो। बोलता जाहला॥ २७३ ॥**
**आतां पुनरपि तो अनंतु। आद्य एकी मातु। सांगेल तेथ पंडुसुतु। प्रश्नु करील॥ २७४ ॥**
**तया बोलाचा हन पाडु। कां रसवृत्तीचा निवाडु। येणें श्रोतयां होईल सुरवाडु। श्रवणसुखाचा॥ २७५ ॥**
**ज्ञानदेवो म्हणे निवृत्तीचा। चांग उठावा करूनि उन्मेषाचा। मग संवादु श्रीहरिपार्थाचा। भोगावा बापा॥ २७६ ॥**

*इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां तृतीयोऽध्याय:॥ ३ ॥*

**अर्थ**—त्याचप्रमाणे कामाला जिंकण्याला जे जे उपाय करावे ते ते त्यालाच साह्य होतात. म्हणूनच कामाला जिंकायाचेंच असा हट्ट धरून जे प्रयत्न करितात त्यांना हाच जिंकतो. ॥ २६६ ॥ अशाहि अडचणींत सांगण्यासारखा एक उपाय आहे. तो जर तुझ्या अंगीं बाणूं शकेल तर सांगतों. ॥ २६७ ॥ यांचे मूळस्थान इंद्रियें आहेत. या इंद्रियांपासून प्रथम प्रवृत्ति होऊन कर्म घडतें. म्हणून इंद्रियांचेंच अगोदर निर्दालन कर. ॥ २६८ ॥ (इंद्रियांचें स्वाधीन मन असल्यामुळे) इंद्रियें जिंकलीं की मनाचीहि विषयांकडील धाव नाहिशी होते आणि (बुद्धि मनाच्या स्वाधीन असल्यामुळे मन स्थिर झालें की) बुद्धिहि मनाहून स्वतंत्र होते. अशा रीतीने कामाचा आश्रयच नाहिसा झाल्यामुळे या कामक्रोधरूपी पाप्यांचें नांवहि राहत नाही. ॥ २६९ ॥ अर्जुना! ज्याप्रमाणे सूर्याचीं किरणें नाहिशीं झालीं की मृगजळ कोठेच दृष्टीस पडत नाही त्याप्रमाणे हे कामक्रोध अंत:करणांतून नाहिसे झाले की कोठेच दृष्टीस पडायचे नांहीत. ॥ २७० ॥ तसेंच कामक्रोधाच्या नाशामुळे रागद्वेषाचांहि नाश झाला की परब्रह्मप्राप्तिरूप स्वराज्य स्वाधीन झालेंच. मग असा पुरुष आपण आपलेंच सुख भोगतो. ॥ २७१ ॥ ही ब्रह्मस्वराज्याची प्राप्तीहि गुरुशिष्याच्या एकांतांतील गुप्त गोष्ट आहे. तींत जीवाशीवांचें ऐक्य होतें. तें ऐक्य प्राप्त करून घेऊन तेथे स्थिर हो. तेथून केव्हाहि ढळूं नको. ॥ २७२ ॥ संजय म्हणतो, राया धृतराष्ट्रा! सर्व सिद्धांचा राजा, लक्ष्मी देवीचा नाथ, सर्व देवांचाहि देव, भगवान श्रीकृष्ण, याप्रमाणे अर्जुनाला म्हणाला. ॥ २७३ ॥ आता पुन: तो अनंत भगवान् श्रीकृष्ण सृष्टीच्या आरंभीची एक गोष्ट सांगेल व त्यावर अर्जुन प्रश्न करील. ॥ २७४ ॥ त्या दोघांच्या बोलण्याची योग्यता तसेंच त्या भाषणांतील रसाळपणाचा परिपोष यांचे योगाने श्रोत्यांना श्रवणाच्या सुखाचा अत्यंत सुकाळ होईल. ॥ २७५ ॥ श्रीनिवृत्तिनाथांचे श्रीज्ञानेश्वर महाराज श्रोत्यांना म्हणतात, ज्ञानश्रवणाची अत्यंत उत्कंठा वाढवून तुम्ही श्रीकृष्ण भगवान व अर्जुन यांचा संवाद श्रवण करा. ॥ २७६ ॥

श्रीसद्गुरुमाऊलीच्या कृपेने श्रीज्ञानेश्वरीच्या तिसऱ्या अध्यायाचा अनुवाद गूढार्थदीपिकेसह पूर्ण झाला तो सद्गुरुचरणीं समर्पण असो.

## समारोप

अर्जुन म्हणतो, हे केशवा! जीव कर्मकर्तृत्वरहित आहे असें सांगता व युद्धरूपी घोर कर्मालाहि मला प्रवृत्त करता, तर यांत माझ्या कल्याणाचा निश्चित असा एक मार्ग कोणता हें मला सांगा.

श्रीभगवान म्हणतात, अर्जुना! मी दोन प्रकारच्या निष्ठा पूर्वीच सांगून ठेविल्या आहे. एक ज्ञानयोगनिष्ठा व दुसरी कर्मयोगनिष्ठा. कर्मयोगाचें आचरण केल्याशिवाय ज्ञानयोगनिष्ठेचा अधिकारी होऊं शकत नाही. प्रत्येक मनुष्य एक क्षण देखील कर्माशिवाय राहूं शकत नाही. कारण तो प्रकृतीच्या आधीन असल्यामुळे त्याच्याकडून न कळत कर्म घडतच असतें. कर्मेंद्रियांचा निरोध करून मनांत विषयांचें चिंतन करितो तो ढोंगी होय. परंतु जो मनाचा निग्रह करून कर्मफळामध्ये आसक्त न होतां, कर्माचें आचरण करतो तो श्रेष्ठ समजावा. म्हणून, अर्जुना! तूं असा योगी हो. तुला तुझ्या धर्माप्रमाणे जो विहित आचार सांगितला आहे, त्याचें पालन कर. जो विषयसुखाचे स्वाधीन झाला, तो कर्माने बांधला जातो. याकरिता सर्व प्रकारची कामना सोडून परमेश्वरप्रीत्यर्थ आपल्या विहित धर्माचें आचरण कर. यासंबंधी पूर्वी एक इतिहास घडला तो सांगतों, ऐक.

ब्रह्मदेवाने यज्ञासहित सर्व सृष्टि निर्माण केली; पण यज्ञाची गति सूक्ष्म असल्यामुळे त्या यज्ञाचें कसें आचरण करावें हें प्रजेला समजले नाही. म्हणून प्रजेने ब्रह्मदेवाला विनंती केली की हे ब्रह्मदेवा! आम्हाला तुम्ही उत्पन्न केलें, पण आम्ही कशाचा आश्रय करावा? तेव्हा ब्रह्मदेव म्हणाले की तुम्ही तुमचा जो जो वर्ण असेल, त्या वर्णधर्माचे आचरण करा व देवांना संतुष्ट करा. हाच तुमचा यज्ञ होय. देवानां तुम्ही संतुष्ट केलें म्हणजे देव तुमच्यावर संतुष्ट होतील व त्यामुळे सर्व भोग तुम्हाला प्राप्त होतील. असे भोग प्राप्त झाले असता त्या भोगाने पुन: देवतांचे आराधन करा. अशा रीतीने भोग प्राप्त झाले असतां जो ते भोग देवतादिकांना न देतां आपणच त्याचा उपभोग घेईल तो चोर समजावा.

अन्नापासून सर्व सृष्टि उत्पन्न होते, पर्जन्यापासून अन्न उत्पन्न होतें. यज्ञापासून पर्जन्य पडतो. यज्ञापासून कर्म प्रकट झाले व यज्ञाला आधार वेद हें परमेश्वरापासून उत्पन्न झाले; म्हणून सर्व सृष्टि परमेश्वरव्याप्त आहे. अशी ही परंपरा ब्रह्मदेवाने सांगितली. म्हणून या स्वधर्मरूप यज्ञाचें जो पालन करणार नाही त्याचें जीवित व्यर्थ आहे.

जो या देहांतच राहून आत्मस्वरूपांत रंगला, तो कृतकृत्य झाला. त्याला कधीच कर्माचा लेप लागत नाही. त्याला या जगांत कांही करावयाचें उरलेलें नाही. पण जोपर्यंत ज्ञान होत नाही तोपर्यंत विहित धर्मानुसार कर्माचरण करणें आवश्यक आहे. म्हणून अर्जुना? तूं सर्व विषयसुखाची इच्छा सोडून धर्माचरण कर. या योगाने तूं मोक्षपदाला जाशील. असेच कर्म करून जनकादिक राजर्षि मोक्षसुखाला पावले.

श्रेष्ठ लोकांचें धर्माचरण अज्ञानी लोकांना मार्ग दाखविणारे होतें. माझेंच उदाहरण पहा. मी पूर्णकाम आहे. मला कांहीहि कर्तव्य म्हणून त्रैलोक्यांत उरलेलें नाही. पण मी कर्म करीतच असतो. उद्देश एवढाच की हे सर्व लोक माझ्या आधीन असल्यामुळे ते कुमार्गाला लागूं नयेत व लोकसंस्थेचें रक्षण व्हावें. ज्ञानी पुरुषांनी, अज्ञानी पुरुष जसा कर्माच्या फळाच्या इच्छेने आस्थेने कर्म करतो, तसें धर्माचें आचरण करावें. कर्म व त्याचें फळ यांत आसक्ति ठेवणाऱ्या अज्ञानी लोकांना निष्कर्मतेचा उपदेश करूं नये. त्यांना कर्म करण्यासच प्रवृत्त करावें. देहालाच मी म्हणणारे विवेकहीन जे पुरुष असतात ते मीच कर्माचा कर्ता आहे असें मानितात. वास्तविक प्रकृतीच्या गुणामुळे बरीं वाईट कर्मे देहाकडून होतात. ज्ञानी लोक गुणाच्या ठिकाणीं गुणाची क्रीडा आहे असें समजून त्यांत आसक्त होत नाहीत. ज्याने प्रकृतीचे धर्म आपले अंगावर ओढून घेतले तो या कर्माने बांधला जातो.

म्हणून अर्जुना! सर्व कर्मे मला अर्पण कर व तूं आसक्तिरहित होऊन शोकरहित होवून या युद्धाकडे लक्ष दे.

माझ्या ह्या मताचा जे कोणी आदर करून श्रद्धापूर्वक अनुष्ठान करतात ते कर्मापासून मुक्त होतात व जे माझी निंदा करून या मताचा तिरस्कार करितात ते नतदृष्ट होत.

ज्ञानी जरी असला तरी आपआपल्या स्वत:च्या प्रकृतीच्या आधारानेच प्रत्येक मनुष्याचीं कर्मे होत असतात. तेव्हा तेथे कोणाचाहि निग्रह काय करणार? इंद्रियें व त्यांचे विषय यांच्या संगामुळेच रागद्वेष उद्भवतात. तेव्हा तूं त्यांच्या स्वाधीन होऊं नकोस. दुसऱ्याच्या धर्मापेक्षा आपलाच धर्म श्रेष्ठ आहे. म्हणून स्वधर्माचरणांत मरण आलेलें बरें; पण परधर्माचें आचरण नरकादि भय प्राप्त करून देणारें आहे.

अर्जुन म्हणतो भगवंता! हें असें कसें हो, की ज्ञानी जरी झाला तरी तो पाप करण्याची इच्छा नसतांहि बलात्काराने आपल्या मार्गापासून भ्रष्ट झालेला दिसतो. भगवान म्हणतात अर्जुना! रजोगुणापासून झालेले काम व क्रोध हे विवेकाचे वैरी होत. ते ज्ञानाला झांकून टाकतात व आत्म्याची शुद्ध स्थिती प्रकट होऊं देत नाहीत. यांना जिंकले की ज्ञान प्राप्त होतेच. यांचे राहण्याचें ठिकाण म्हणजे इंद्रिये, मन व बुद्धि हीं होत. म्हणून अर्जुना! या इंद्रियांचाच प्रथम मुळांत घाव घालून निरोध कर. कारण इंद्रियांकडूनच सर्व कर्मे प्रवृत्त होतात. शरीराचे पलीकडे इंद्रियें आहेत. इंद्रियाचे पलीकडे मन आहे व मनाच्या पलिकडे बुद्धि आहे. आत्मा हा बुद्धीचेहि पलीकडे आहे. त्या आत्म्याचे ठिकाणीं बुद्धीला स्थिर करून कामक्रोधरूपी शत्रूचा नाश कर.

**श्रीमद्सद्गुरु श्रीज्ञानेश्वरमहाराजार्पणमस्तु।**



॥ श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ ॥

# अध्याय चवथा

**आजि श्रवणेंद्रिया पिकलें। जे येणें गीतानिधान देखिलें। आतां स्वप्नचि हें तुकलें। साचासरिसें॥ १ ॥**

**अर्थ**—आता या श्रवणेंद्रियाने आज गीतेसारखा अमोल ठेवा पाहिला, म्हणून परमसुखाची सकाळ झाली व स्वप्नासारखे असलेले जगत् सत्य वाटूं लागलें. ॥ १ ॥

**गूढार्थदीपिका**—कानाने जें खरोखर ऐकायला पाहिजे तें ऐकिलें. समर्थ म्हणतात, "**आता असो हें बोलणें जयासि स्वहित करणें। तेणें सदा विचरणें। अद्वैतग्रंथीं॥ २६ ॥ जेणें परमार्थ वाढे। आंगीं अनुताप चढे। भक्तिसाधन आवडे। त्या नांव ग्रंथ॥ ३० ॥ जेणें होये उपरति। अवगुण पालटती। जेणें चुके अधोगती। त्या नांव ग्रंथ॥ ३२। जेणें नुपजे विरक्ति भक्ति। तो ग्रंथचि नव्हे.॥ ३५ ॥**" (दास० द० ७ स० ९). कानाला अद्वैत परमात्मवस्तूचें निरूपण ऐकायला मिळालें तरच कानाचें सार्थक झालें म्हणायचें. अद्वैतवस्तूच्या श्रवणाने कर्णेंद्रियाला खऱ्या वस्तूचा प्रकाश होतो किंवा ज्ञान होते. श्रीज्ञानेश्वर माऊली म्हणतात आज अद्वैत ग्रंथ जी गीता, त्यातील अद्वैत आत्मवस्तूचा उपदेश ऐकून माझें कर्णेंद्रिय खऱ्या ज्ञानाने प्रकाशित झालें म्हणून आत्म्याहून निराळा अनेक वस्तूरूप जड, विनाशी असा जो जगाचा प्रत्यय पूर्वी येत होता, तो स्वप्नासारखा अत्यंत खोटा होता आता आत्मविचाराने पाहूं गेलें असतां जगहि सच्चिदानंद आत्मस्वरूपच आहे असा अनुभव आला, असा अर्थ.

**आधींचि विवेकाची गोठी। वरी प्रतिपादी श्रीकृष्ण जगजेठी। आणि भक्तराजु किरीटी। परिसत असे॥ २ ॥**

**जैसा पंचमालापु सुगंधु। कीं परिमळु आणि सुस्वादु। तैसा भला जाहला विनोदु। कथेचा इये॥ ३ ॥**

**अर्थ**—आधीच आत्मानात्मविवेकासारख्या विषयाचें प्रतिपादन व त्यांतहि जो विवेक, जगन्नियंता साक्षात् परमात्मा श्रीकृष्ण सांगत आहे आणि भक्तश्रेष्ठ अर्जुन ऐकत आहे (असा महद्‌भाग्याचा संवाद ऐकायला मिळणें दुर्लभ)॥ २ ॥ ज्याप्रमाणे सुगंधित परिमळाने व अत्यंत मधुर रुचीने युक्त अशा अत्यंत कोमल पंचमालापाचा लाभ होणे महदानंद होय, त्याप्रमाणेच श्रीकृष्णार्जुन संवादरूप कथेचा आनंद आहे (ज्याचें बोल अत्यंत कोवळे व मनमोहक असें मधुर आहेत व जो अत्यंत हळुवार किंवा कोमल चित्ताने ऐकत आहे अशा श्रीकृष्णार्जुनांच्या संवादाचा लाभ होणें श्रोत्याचें महद्‌भाग्यच होय.)॥ ३ ॥

**कैसी आगळिक दैवाची। जे गंगा वोळली अमृताची। हो कां जपतपें श्रोतयांची। फळा आलीं॥ ४ ॥**

**अर्थ**—असा श्रीकृष्णार्जुनाचा संवाद श्रोत्यांना ऐकायला मिळाला, श्रोत्यांचें केवढें थोर भाग्य की त्यांना अमृताची गंगाच प्राप्त झाली किंवा त्यांची अनेक जन्मांचीं जपतपादि पुण्यकर्मे या रीतींने फलद्रूप झालीं. ॥ ४ ॥

**गूढार्थदीपिका**—अनंत जन्मातील पुण्याचा सांठा पदरीं असल्याखेरीज अद्वैत श्रवणाकडे चित्ताचा ओढा लागत नाही "**बहुता सुकृताची जोडी। म्हणूनि विठ्ठलीं आवडी**" **अद्वैत ग्रंथ श्रवण करण्याची आवडी असणें व त्यांचें श्रवण घडणें हें महत्पुण्याचेंच फळ असतें "यावन्नानुग्रहःसाक्षात् जायते परमेश्वरात्। तावन्न सद्गुरुः कश्चित्सच्छास्त्रं वापि नो लभेत्॥**" जोपर्यंत निष्काम कर्मानुष्ठानाचें पुण्याने साक्षात् परमेश्वराची कृपा होत नाही तोपर्यंत अद्वैतग्रंथ श्रवण करण्याची आवडी उत्पन्न होत नाही व त्या ग्रंथाचें यथार्थ ज्ञान करून देण्यास पुरुषहि मिळत नाहीत असें वचनहि आहे.

**आतां इंद्रियजात आघवें। तिहीं श्रवणाचें घर रिघावें। मग संवादसुख भोगावें। गीताख्य हें॥ ५ ॥**

अर्थ—आता सर्व इंद्रियांनी श्रवणेंद्रियाचे ठिकाणी यावें व मग गीतारूपी संवादाचें खरें सुख भोगावें. ॥ ५

**गूढार्थदीपिका**—अत्यंत एकाग्र चित्तानें श्रवण करणाऱ्याच्या अंत:करणांतच बोध उत्पन्न होतो व तशाच बोधापासून उपदेशाचें फळ मिळतें असा अर्थ.

**हा अतिसो अतिप्रसंगें। सांडूनि कथाचि ते सांगें। जे कृष्णार्जुनु दोघे। बोलत होते॥ ६॥**
**ते वेळीं संजयो रायातें म्हणे। अर्जुनु अधिष्ठिला दैवगुणें। जे अतिप्रीति नारायणें। बोलिजतु असे॥ ७॥**

**अर्थ**—असें विशेष विषयांतर न करतां आता श्रीकृष्ण व अर्जुन हे दोघेजण काय बोलत होते ती कथाच मी सांगतों.॥ ६॥ त्यावेळीं राजा धृतराष्ट्राला, संजय म्हणायला लागला की राजा! अर्जुन हा सर्व दैवगुणाला अधिष्ठानरूप होता, म्हणूनच भगवान् श्रीकृष्ण त्याच्याशीं अत्यंत प्रेमाने बोलूं लागले.॥ ७॥ (असें म्हणण्याचें कारण की)—

**जें न सांगेचि पितया वसुदेवासी। जें न सांगेचि माते देवकीसी। जें न सांगेचि बंधु बळिभद्रासी। तें गुह्य अर्जुनेंशीं बोलत॥ ८॥**

**अर्थ**—जे अत्यंत गुह्य असल्यामुळे भगवंतांनी आपल्या पित्या वसुदेवालाहि सांगितलें नाही किंवा माता देवकीलाहि सांगितलें नाही. अथवा भाऊ बळीराम यालाहि सांगितलें नाही; तें अंत:करणांतील निजगुज भगवान अर्जुनाला सांगूं लागले.॥ ८॥

**गूढार्थदीपिका**—"**ब्रूयुः स्निग्धस्य शिष्यस्य गुरवो गुह्यमप्युत**" (भाग, द० स्कं अ० १३ श्लो० ४) स्वानुभवी पुरुषाने आपला अत्यंत प्रिय स्वानुभव प्रेमळ शिष्यांनाच द्यावा असा ईश्वरासह सर्व अनुभवी संतांचा दंडकच आहे. ते ब्रह्मानुभवरूप गुह्य कधीही उघड सर्वांना सांगत नसतात. आपण जितक्या प्रेमाने त्या गुह्याचें संगोपन केलें, तितक्या प्रेमाने त्याचें संगोपन करणाऱ्या प्रेमळ शिष्यापाशीच ते प्रगट करितात.

**देवी लक्ष्मीये एवढी जवळिक। तेही न देखे या प्रेमाचें सुख। आजि श्रीकृष्णस्नेहाचें बिक। यातेंचि आथी॥ ९॥**
**सनकादिकांचिया आशा। वाढीनल्या होतिया कीर बहुवसा। परी त्याही येणें मानें यशा। येतीचिना॥ १०॥**
**या श्रीजगदीश्वराचें प्रेम। एथ दिसतसे निरुपम। कैसें पार्थे येणें सर्वोत्तम। पुण्य केलें॥ ११॥**

**अर्थ**—देवीं लक्ष्मी नेहमी भगवंतापाशीच राहणारी पण तिलाहि हें प्रेमसुख मिळालें नाही. श्रीकृष्ण प्रेमाचें संपूर्ण पीक या अर्जुनाला मिळालें.॥ ९॥ सनकादिक हें श्रीकृष्णाचे प्रेमसुख मिळावें म्हणून पुष्कळ दिवसांपासून सारखी आशा करीत राहिले, पण त्यांच्या आशा अर्जुनासारख्या सफळ झाल्या नाहीत.॥ १०॥ या अर्जुनाचे केवढें थोर पुण्य आहे पहा! या श्रीकृष्णाचें अर्जुनावर जें प्रेम आहे त्याला उपमाच देतां येत नाही.॥ ११॥

**हो कां जयाचिया प्रीति। अमूर्त हा आला व्यक्ती। मज एकवंकी याची स्थिति। आवडतु असे॥ १२॥**

**अर्थ**—ज्या अर्जुनाच्या प्रेमांकरिता अमूर्त म्हणजे निर्गुण निराकार परमात्मा सगुण साकार झाला, त्या अर्जुनाची एकनिष्ठ प्रेमस्थितीच मला आवडते.॥ १२॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे सत्वादिगुणांचा आश्रय करून परब्रह्म परमात्मा सृष्टीच्या उत्पत्त्यादि कार्याकरिता विष्णू आदि रूपाने सगुण साकार होतो, त्याप्रमाणें तो सत्वादिगुणांचा आश्रय न करतां मुख्यत: प्रेमळ भक्तांच्या परमप्रेमरूप वृत्तीचा विषय होऊन, रामकृष्णादि रूपानें साकार होत असतो, असा भाव.

**एऱ्हवीं हा योगियां नाडळे। वेदार्थासी नाकळे। जेथ ध्यानाचेही डोळे। पावतीना॥ १३॥**
**तें हा निजस्वरूप। अनादि निष्कंप। परी कवणें मानें सकृप। जाहला आहे॥ १४॥**
**हा त्रैलोक्यपटाची घडी। आकाराची पैलथडी। कैसा याच्रिये आवडी। आवरला असे॥ १५॥**

**अर्थ**—एरव्ही पाहतां एका प्रेमावांचून हा श्रीकृष्ण परमात्मा योग्यांनाहि प्राप्त होत नाही वेदाचा जो अर्थ त्यांतहि तो सांपडत नाही. ध्यानाच्या डोळ्यांनाहि दिसत नाही.॥ १३॥ तो हा आपल्या सच्चिदानन्द स्वरूपाने अखंड स्थित असलेला, अनादि, अचल आहे, पण या अर्जुनाला कसा कृपाळू झाला आहे, पहा.॥ १४॥ हा श्रीकृष्ण परमात्मा त्रैलोक्यरूपी उकललेल्या वस्त्राची घडी आहे म्हणजे जगद्व्यापक आहे. आकाराचें परतीर (म्हणजे मर्यादित असे भौतिक आकार ज्या सगुण परमेश्वराच्या आकाराच्या आधींच संपतात किंवा ज्याचा आकार भौतिक नाही असा)





आहे. पण तोच आपलें व्यापकत्व व निराकारत्व न सोडतां या अर्जुनाच्या प्रेमामुळे तेवढाहि व्यापक श्रीकृष्ण परमात्मा कसा एकदेशी सगुण साकार झाला आहे पहा. ॥ १५ ॥

*श्रीभगवानुवाच*

**इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम्। विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत्॥ १॥**
**एवं परम्पराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः। स कालेनेह महता योगो नष्टः परन्तप॥ २॥**
**स एवाऽयं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः। भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम्॥ ३॥**

**अर्थ—**भगवान म्हणतात अर्जुना! (पूर्वी) मी हा योग विवस्वानाला सांगितला होता. विवस्वनांने (पुढे) मनूला सांगितला व मनूंनी इक्ष्वाकु राजाला सांगितला. ॥ १ ॥ याप्रमाणे परंपरेने प्राप्त झालेल्या या योगाला राजर्षि जाणते झाले. हा योग पुष्कळ काळ लोटल्यामुळे, हे शत्रूला ताप देणाऱ्या अर्जुना (सांप्रत) नष्ट झाला आहे. ॥ २ ॥ तोच पुरातन काळचा योग व उत्तम रहस्य तू माझा प्रेमळ भक्त व मित्र असल्यामुळे आज मी तुला सांगितला आहे. ॥ ३ ॥

**मग देव म्हणे अगा पंडुसुता। हाचि योगु आम्हीं विवस्वता। कथिला परी ते वार्ता। बहुतां दिवसांची॥ १६॥**
**मग तेणें विवस्वतें रवी। हे योगस्थिति आघवी। निरूपिली बरवी। मनूप्रती॥ १७॥**
**मनूनें आपण अनुष्ठिली। मग इक्ष्वाकुवा उपदेशिली। ऐसी परंपरा विस्तारिली। आद्य हे गा॥ १८॥**
**मग आणिकहि या योगातें। राजर्षि जाहले जाणते। परि तेथोनि आतां सांप्रतें। नेणिजे कोणी॥ १९॥**
**जे प्राणिया कामीं भरु। देहाचिवरी आदरु। म्हणोनि पडिला विसरु। आत्मबोधाचा॥ २०॥**
**अव्हांटलिया आस्थाबुद्धि। विषयसुखचि परमावधि। जीवु तैसा उपाधि। आवडे लोकां॥ २१॥**
**एऱ्हवीं तरी खवणेयांच्या गांवीं। पाटाउवें काय करावीं। सांगें जात्यंधा रवी। काय आथी॥ २२॥**
**कां बहिरयांचा आस्थानीं। कवण गीतातें मानी। कीं कोल्हेया चांदणीं। आवडी उपजे॥ २३॥**
**पैं चंद्रोदया आरौतें। जयांचे डोळे फुटती असते। ते काउळे केवीं चंद्रातें। वोळखती॥ २४॥**
**तैसे वैराग्याची शिंव न देखती। जे विवेकाची भाष नेणती। ते मूर्ख केवीं पावती। मज ईश्वरातें॥ २५॥**
**कैसा नेणों मोहो वाढीनला। तेणें बहुतेक काळु व्यर्थ गेला। म्हणोनि योगु हा लोपला। लोकीं इये॥ २६॥**
**तोचि हा आजि आतां। तुजप्रती कुंतीसुता। सांगितला आम्हीं तत्त्वता। भ्रांति न करीं॥ २७॥**
**हें जीवींचें निज गुज। परी केवीं राखों तुज। जे पढियेसी तूं मज। म्हणऊनियां॥ २८॥**
**तूं प्रेमाचा पुतळा। भक्तीचा जिव्हाळा। मैत्रियेची चित्कळा। धनुर्धरा॥ २९॥**
**तूं अनुसंगाचा ठावो। आतां तुज काय वंचूं जावों। जरी संग्रामारूढ आहों। जाहलों आम्ही॥ ३०॥**
**तरी नावेक हें सहावें। गाजाबज्यही न धरावें। परी तुझें अज्ञानत्व हरावें। लागे आधीं॥ ३१॥**

**अर्थ—**मग देव म्हणाले, पंडुसुता! हाच योग मी विवस्वानाला सांगितला होता, पण ती फार दिवसांची गोष्ट आहे. ॥ १६ ॥ मग त्या विवस्वान् रवीने ती संपूर्ण योगस्थिति मनूला सांगितली. ॥ १७ ॥ मनूने त्याचें स्वतः अनुष्ठान करून इक्ष्वाकु राजाला सांगितली. अशी ही या आद्य योगधर्माची परंपरा आहे. ॥ १८ ॥ पुढे मग कांही कांही राजर्षींनी याला जाणून त्याचें अनुष्ठान केलें, पण सांप्रत हा योग कोणी जाणत नाहीत. ॥ १९ ॥ याचें कारण हें आहे कीं मनुष्यप्राणी देहाचेच अत्यंत प्रेम धरून विषयसुखांतच अत्यंत आसक्त झाल्यामुळे त्याला आत्मज्ञानाचा अगदीच विसर पडला. ॥ २० ॥ परमेश्वराला सोडून आस्था व बुद्धि या दोन्ही भलत्या देहादिक आडमार्गाने जाऊ लागल्यामुळे विषयसुख हें परम ध्येय वाटूं लागून लोकांना आपल्या जीवात्म्याइतकेच देहादिक उपाधीचें प्रेम वाटूं लागलें. ॥ २१ ॥ नाही तरी दिगंबर लोकांच्या गांवीं वस्त्रांचा काय उपयोग आहे? जन्मांध जो आहे त्याला सूर्याचा काय उपयोग होणार?॥ २२ ॥ किंवा बहिऱ्यांच्या सभेत कोण गाण्याला मान देतो? किंवा कोल्ह्याला चंद्रप्रकाश आवडेल का?॥ २३ ॥ चंद्राचा उदय होण्यापूर्वीच ज्याचे डोळे फुटतात म्हणजे डोळ्याला दिसत नाही, त्या कावळ्यांना चंद्राचे

ओळख कशी होईल ?॥ २४॥ त्याप्रमाणे ज्यांनी वैराग्याची हद्दच पाहिली नाही व ज्यांनी आत्मानात्मविवेक हा शब्दच ऐकला नाही असे मूर्ख लोक मला ईश्वराला कसें प्राप्त होतील ?॥ २५॥ हा अविवेक व देहादिकांची आसक्ति कशी वाढत गेली, हें समजत नाही, पण अशा स्थितींतच फार काळ लोटल्यामुळे, हा योग या लोकांतून नष्ट झाला.॥ २६॥ तोच योग आज आता, अर्जुना! तुला आम्ही सांगितला आहे, यांत मुळींच संशय नाही.॥ २७॥ ही आमच्या अंत:करणांतील अत्यंत गुप्त गोष्ट आहे; पण तूं मला अत्यंत प्रिय असल्यामुळे, तुझ्यापासून ती मी गुप्त कसा ठेवूं शकेन ?॥ २८॥ अर्जुना! तूं प्रेमाची मूर्ति आहेस; भक्तीचा ओलावा आहेस व सख्य भक्तीचें केवळ चैतन्य आहेस.॥ २९॥ तू पूर्ण विश्वासू सांगाती असा, विश्वास ठेवण्यास पात्र आहेस, मग तुझ्यापासून काय लपवून ठेवितां येईल ? जरी आपण या वेळी युद्धाला सज्ज झालों आहो॥ ३०॥ तरी घटकाभर तें बाजूला ठेवून या युद्धाच्या गडबडीचा मनावर परिणाम होऊं न देतां अगोदर तुझी गैरसमजूत नाहिशी केली पाहिजे.॥ ३१॥

**गूढार्थदीपिका**—हा कर्मयोगमार्ग अर्वाचीन नसून सनातन मार्ग आहे. किंबहुना सृष्टीच्या आरंभीं हाच आद्य धर्म म्हणून सांगितला गेला, हें दाखविण्याकरिता भगवंतांनी चवथ्या अध्यायाच्या आरंभी कर्मयोगाची अनादि परंपरा सांगितली आहे. हीच परंपरा भारताच्या शांतिपर्वात सांगितलेल्या नारायणीय धर्मातहि सांगितली आहे. भारताच्या शांतिपर्वातील धर्माला नारायणीय धर्म म्हणण्याचें कारण असें आहे की "एष धर्मो जगन्नाथात्साक्षान्नारायणान्नृप" (शां० प०अ० ३४६ श्लो० १०) तो धर्म साक्षात् नारायणानेच स्वमुखाने सांगितला व "धार्यते स्वयमीशेन राजन्नारायणेन च" (शां० प० अ० ३४८ श्लो० १०). भगवान अवतारकालीं त्या धर्माचें स्वत: अनुष्ठान करून दाखवितात. या धर्मालाच श्रीमद्भागवत ग्रंथांत भागवतधर्म किंवा भक्तियोग हें नांव दिलें आहे. श्रीमद्भागवतांतील दशमस्कंधांतर्गत वेदस्तुतींतहि याच धर्माचें विवेचन आलें आहे. एकादश स्कंधांत या कर्मयोगाला भागवतधर्म असें नांव देऊन "ये वै भगवता प्रोक्ता उपाया ह्यात्मलब्धये। अज: पुंसामविदुषां विद्धिभागवतान्हि तान्" या श्लोकांत भागवतधर्म हा भोळ्या भाविकांना देखील सहज व निर्विघ्न भगवत्प्राप्ति करून देणारा आहे असे म्हटलें आहे.

या कर्मयोगाचें अनुष्ठान करीत असतांनाच पुढे भगवन्नामाची व भगवत्कथेची गोडी लागून, अखंड सगुण भगवंताचें ध्यान होऊं लागलें की या कर्मयोगालाच एकांत धर्म किंवा एकान्तभक्तिही संज्ञा प्राप्त होते. म्हणून या भागवतधर्मात भगवत्प्रीत्यर्थ म्हणजे भगवंताच्या प्रेमाने कर्म करणे, भगवंताच्या कथा ऐकणें, भगवंताचें नाम स्मरणें, भगवंताचें ध्यान करणें या सर्वांचा समावेश होतो. या धर्माचे सविस्तर विवेचन पुढे नवव्या अध्यायांत भगवंताने केलें आहे.

*अर्जुन उवाच*

**अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वत:। कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति॥ ४॥**

**अर्थ**—अर्जुन म्हणतो, देवा! विवस्वान हा किती तरी वर्षापूर्वी होऊन गेला आणि तुझा जन्म तर आता झाला. मग तूं विवस्वानाला हा योग सांगितलास हें आम्ही कसें समजावें ?॥ ४॥

**तंव अर्जुन म्हणे श्रीहरी। माय आपुलेयाचा स्नेहो करी। एथ विस्मयो काय अवधारीं। कृपानिधी॥ ३२॥**
**तूं संसारश्रांतांची साउली। अनाथा जीवांची माउली। आमुतें कीर प्रसवली। तुझीच कृपा॥ ३३॥**
**देवा पांगुळ एकादें विइजे। तरी जन्मौनि जोजारु साहिजे। हें बोलों काय तुझें। तुजचि पुढां॥ ३४॥**
**आतां पुसेन जें मी कांहीं। तेथ निकें चित्त देईं। तेवींचि देवें कोपावें ना कांहीं। बोला एका॥ ३५॥**
**तरी मागील जे वार्ता। तुवां सांगितली होती अनंता। ते नावेक मज चित्ता। मानेचिना॥ ३६॥**
**जे तो विवस्वतु म्हणजे कायी। ऐसें हें वडिलां ठाउवें नाहीं। तरी तुवांचि केवीं पाहीं। उपदेशिला॥ ३७॥**
**तो तरी आइकिजे बहुतां काळांचा। आणि तूं तंव कृष्ण सांपेचा। म्हणोनि गा इये मातुचा। विसंवादु॥ ३८॥**
**तेवींचि देवा चरित्र तुझें। आपण कांहीं काय जाणिजे। हें लटिकें केवीं म्हणिजे। एकिहेळां॥ ३९॥**
**परी हेचि मातु आघवी। मी परियेसें तैशी सांगावी। जे तुवांचि तया रवी केवीं। उपदेशु केला॥ ४०॥**

**अर्थ**—तेव्हा अर्जुन म्हणाला, हें पहा, परम कृपाळु देवा! आई आपल्या बाळाचें स्वाभाविक प्रेम करिते यां आश्चर्य करण्यासारखें काय आहे ?॥ ३२ ॥ त्याप्रमाणेच देवा! या संसारांत अत्यंत पोळलेल्यांना तूं सावलींत बसण्याचे ठिकाण आहेस, जे अनाथ असतील त्यांची तूं आई आहेस. आम्ही तर सर्वस्वी तुझ्या कृपेचेंच फळ आहोंत. ॥ ३३ देवा! एखादें मूल पांगळें जन्मलें असता जन्मापासून शेवटपर्यंत आईलाच त्याची काळजी वाहावी लागते, (अशीच आमची सर्व काळजी तुलाच करावी लागते). हें तुझें (प्रेम) तुझ्यासमोरच काय सांगायचें ?॥ ३४ ॥ आतां हें असो मी जें विचारणार आहे त्याकडे नीट लक्ष द्या व देवा! माझ्या एका बोलण्याचा रागहि येऊं देऊं नका. ॥ ३५ ॥ हे अनंता! मी हा योग विवस्वानाला सांगितला होता असा जो तूं आपला पूर्वीचा वृत्तांत सांगतोस, तो जरा मला पटत नाही. ॥ ३६ ॥ करण तो विवस्वान् किती पूर्वी होऊन गेला हें आमच्या वडिल माणसांनाहि माहीत नाही तेव्हा तूंच कसा व केव्हा त्याला उपदेश केलास ?॥ ३७ ॥ तो विवस्वान फार दिवसांपूर्वी होऊन गेला आणि तूं आता जन्मलास. म्हणून तूं विवस्वानाला उपदेश केला ही गोष्ट विसंगत वाटते. ॥ ३८ ॥ त्याचप्रमाणे देवा! तुझी लीला अगाध आहे. आम्ही पामर ती काय जाणणार ? म्हणून तुझें म्हणणें एकदम खोटें तरी कसें म्हणायचें ?॥ ३९ ॥ पण विवस्वानाला तूं उपदेश करूं शकलास ही गोष्ट मला बरोबर समजेल अशा रीतीने सांग. ॥ ४० ॥

*श्रीभगवानुवाच*

**बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन। तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परन्तप॥ ५ ॥**
**अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन्। प्रकृतिं स्वामधिष्ठाय सम्भवाम्यात्ममायया॥ ६ ॥**

**अर्थ**—भगवान म्हणतात, अर्जुना! माझे व तुझे पुष्कळ जन्म होऊन गेलेत. पण मी आपल्या सर्व जन्मांना जाणतों. तूं मात्र आपल्या जन्मांना जाणत नाहीस. ॥ ५ ॥ मी अजन्मा, अविनाशी व सर्व जीवांचा शास्ता राहूनच आपल्या प्रकृतीला आपल्या स्वाधीन ठेवून, त्या आपल्या मायेने जन्म घेतों. ॥ ६ ॥

**तवं कृष्ण म्हणे पंडुसुता। तो विवस्वतु जैं होता। तैं आम्हीं नसों ऐसी चित्ता। भ्रांति जरी तुज॥ ४१ ॥**
**तरी तूं गा हें नेणसी। पैं जन्में आम्हां तुम्हांसी। बहुतें गेलीं परी तियें न स्मरसी। आपुलीं तूं॥ ४२ ॥**
**मी जेणें जेणें अवसरें। जें जें होऊनि अवतरें। तें समस्तही स्मरें। धनुर्धरा॥ ४३ ॥**
**म्हणोनि आघवें। मागील मज आठवे। मी अजुही परि संभवें। प्रकृतियोगें॥ ४४ ॥**
**माझें अव्ययत्व तरी न नसे। परी होणें जाणें एक दिसे। तें प्रतिबिंबे मायावशे। माझ्याचि ठायीं॥ ४५ ॥**
**माझी स्वतंत्रता तरी न मोडे। परी कर्माधीनु ऐसा आवडे। तेही भ्रांतिबुद्धि तरी घडे। एऱ्हवीं नाहीं॥ ४६ ॥**
**कीं एकचि दिसे दुसरें। तें दर्पणाचेनि आधारें। एऱ्हवीं काय वस्तुविचारें। दुजें आहे॥ ४७ ॥**
**तैसा अमूर्तचि मी किरीटी। परी प्रकृति जैं अधिष्ठीं। तैं साकारपणें नटें नटीं। कार्यालागीं॥ ४८ ॥**

**अर्थ**—तेव्हा भगवान म्हणतात! पंडुसुता (तुला अशी शंका घेण्याचें कारण हें आहे की) जेव्हा तो विवस्वान् होता तेव्हा आम्ही नव्हतों असें तुला वाटतें. पण ही तुझी भ्रांति आहे. ॥ ४१ ॥ अर्जुना! माझे व तुझे असे पुष्कळ जन्म होऊन गेले आहेत, पण तुला त्यांचें स्मरण नाही. ॥ ४२ ॥ मी मात्र ज्या ज्या वेळीं ज्या ज्या रूपाने अवतीर्ण होतो तें तें सर्व मला आठवतें. ॥ ४३ ॥

**गूढार्थदीपिका**—परमेश्वराप्रमाणेच अवतारांचे ठिकाणीहि विस्मृति म्हणजे अविद्या हा धर्म कधीच नसतो. ते सदा सर्वदा सर्वज्ञ व सर्वशक्तिमानच असतात. हाच सिद्धांत, भगवंतांनी मला माझे अवतार आठवतात असें सांगून येथे मांडला आहे. हे अर्जुना! तुझें जन्म तूं विसरलास असें म्हणून जीवाला अविद्यारूप विस्मृति असते म्हणून तो अल्पज्ञ असतो, हें तत्व भगवंतांनी येथे सांगितलें आहे.

**अर्थ**—म्हणूनच मला मागें विवस्वानाला उपदेश केल्याची माझी जाणीव जशीच्या तशीच कायम आहे. मी जन्मरहित असूनहि प्रकृतीमुळे जन्मल्यासारखा भासतों. ॥ ४४ ॥ माझी अविनाश स्थिति नाहिशी होत नाही; पण माझे ठिकाणीं जन्मणें व अंतर्धान पावणें हें जें दिसतें तें प्रतिबिंबाप्रमाणें मायाभ्रांतीने दिसतें. ॥ ४५ ॥ मी स्वतंत्र आहे म्हणजे

माया माझ्या स्वाधीन असून मी तिचा नियंता आहे. मी कधी मायापरतंत्र होत नाहीं. परंतु मायेमुळे कर्माच्या परतंत्र वागतों असें मायाभ्रांतीमुळे दिसतें. एरव्ही माझे ठिकाणीं कर्म नाही व मी कधी कर्मपरतंत्रहि होत नाही. ॥ ४६ ॥ एकच वस्तु आरशांत तिचें प्रतिबिंब पडलें असतां दोनपणाला येते पण वस्तुदृष्टीने विचार केला असतां दोन वस्तु असतात काय ? ॥ ४७ ॥ त्याप्रमाणे, अर्जुन ! मी निराकारच असतो व निराकार राहूनच देवांचें कार्य साधण्याकरिता प्रकृतीचा आश्रय होऊन साकार भासतों. ॥ ४८ ॥

**गूढार्थदीपिका—''अजोऽपि सन्नव्ययात्मा..................''**

या श्लोकावरील आपल्या भाष्यांत आचार्यांनी ''प्रकृतिं स्वाम्'' या चरणाचा ''मायां त्रिगुणात्मिकाम्'' म्हणजे त्रिगुणात्मक माया असा अर्थ केला आहे. आणि ''अधिष्ठाय'' या पदाचा ''वशीकृत्य'' म्हणजे त्रिगुणात्मक मायेला आपल्या स्वाधीन ठेवून असा अर्थ केला आहे. पण प्रकाशरूप सूर्याचे ठिकाणीं जसा अंध:कार राहत नाही व राहाणें शक्य नाही त्याप्रमाणे सच्चिदानंदरूप परमेश्वराचें ठिकाणीं त्रिगुणात्मक माया ही राहात नाही व राहूं शकत नाही, असा सर्व आचार्यादि संतांनी आपला परम अनुभव सांगितला आहे. तेव्हा ''प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवामि'' म्हणजे ''त्रिगुणात्मक मायेचा आश्रय करून मी अवतार घेतों'' या चरणांतील अर्थाचा उलगडा होणें अवश्य आहे व तो उलगडा अशा रीतीनेच होऊं शकतो की मी अज्ञानी आहे, मी दु:खी आहे, मी सुखी आहे, मी अल्पज्ञ आहे अशी जी आपल्या ठिकाणीं जीवाने भ्रांतिरूप माया मानिली आहे, तीच त्रिगुणात्मक माया होय आणि ती परमेश्वराच्या आश्रयाने राहणारी परमेश्वराची शक्ति होय, असें तो समजतो. याच जीवाच्या गैरसमजूतीचा अनुवाद करून भगवंताने त्रिगुणात्मक मायेला आपले स्वाधींन ठेवून मी जन्म घेतों असें म्हटलें आहे.

परमेश्वर नित्य आहे, पण ही माया तो जन्मला असें भासविते व एवढेच तिचें कार्य आहे ती परमेश्वराचा देह निर्माण करीत नाही. कारण मायेपासून झालेला देह पांचभौतिकच राहणार आणि माया म्हणजे आत्मविस्मृती, आत्मविस्मृतीमुळे कर्म व कर्मामुळे पांचभौतिक देहाची प्राप्ति, अशा क्रमाने पांचभौतिक देह प्राप्त होतो. पण अवताराचे ठिकाणीं आत्मविस्मृति व कर्म मुळीच नसते, हा सर्व वेदान्तांनी मान्य केलेला सिद्धान्त आहे.

म्हणून परमेश्वराला पांचभौतिक देहाने अवतार घेता येत नाही.

**किंवा**

वरील श्लोकांत भगवंतांनी आपला अवतार कसा होतो हें सांगतांना ''प्रकृतिं स्वामधिष्ठाय'' व ''आत्ममायया'' अशी पदें घेतलीं आहेत. हीं दोन्ही पदें एकार्थी आहेत असें म्हणतां येत नाही. कारण तेथे पुनरुक्तीचा दोष येतो. तेव्हा वेदान्तशास्त्रांत अविद्या व विद्या असे मायेचे दोन भेद सांगितले आहेत. त्या उपाधी घेऊन या पदांचा अर्थ करणें योग्य होईल.

''प्रकृतिं स्वाम्'' या पदांचा माझी त्रिगुणात्मक प्रकृति (म्हणजे अविद्या) असा आचार्यांनी अर्थ केलाच आहे आणि ''आत्ममाया'' या शब्दाचा अर्थ ''विद्या'' असा केला असतां ''प्रकृति'' व ''आत्ममाया'' हीं दोन्ही पदें सार्थ होतात व अवतारदेहाची नीट उपपत्ति लागते.

अविद्या ही विपरीत ज्ञानरूप असून, विद्या ही यथार्थ ज्ञानरूप आहे, असें अविद्येचें व विद्येचें लक्षण श्रीज्ञानेश्वर माऊलींनी अमृतानुभवांत ''जिती अविद्या ऐसी। अन्यथा बोधाते गिवसी। तेचि यथाबोधेसी। निमाली उठी॥'' (प्र० ३-१०) या ओवीने केलें आहे. वरील श्लोकांतील दुसऱ्या चरणाचा ''प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवामि'' व ''आत्ममायया संभवामि'' असा ''संभवामि'' या पदाचा दोन्हीकडे संबंध लावून अर्थ केला असतां मी यथार्थ ज्ञानरूप विद्येने सच्चिदानंदरूप लीलाविग्रह असा देह धारण करतों; पण भ्रांतीरूप त्रिगुणात्मक अविद्येमुळे किंवा भ्रांतीमुळे मी जीवांना जन्मल्यासारखा भासतों, असा वेदान्ताला धरून सुसंगत अर्थ होतो.

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत। अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम्॥ ७॥**
**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्। धर्मसंस्थापनार्थाय सम्भवामि युगे युगे॥ ८॥**

**जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः। त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन॥ ९॥**

**अर्थ**—जेव्हा जेव्हा धर्माचा ऱ्हास होतो व अधर्माची वाढ होते तेव्हा तेव्हा, अर्जुना! अधर्माचा नाश करून धर्माचा पुनः उद्धार करण्याकरिता मी प्रगट होतों. ॥ ७॥ साधुपुरुषाचें संरक्षण करण्याकरिता व दुष्टांचा नाश करण्याकरिता आणि धर्माचें पुनः संस्थापन करण्याकरिता मी युगायुगाचे ठिकाणीं देह धारण करितो. ॥ ८॥ अशा माझे जन्म व कर्म हे दोन्ही दिव्य म्हणजे प्रकृतिजन्य नाहीत असें जो ज्ञानदृष्टीने ओळखतो तो देहपात झाल्यावर अर्जुना! पुनः जन्माला येत नाही व मला येऊन मिळतो. ॥ ९॥

**जें धर्मजात आघवें। युगायुगीं म्यां रक्षावें। ऐसा ओघु हा स्वभावें। आद्य असे॥ ४९॥**
**म्हणोनि अजत्व परतें ठेवीं। मी अव्यक्तपणही नाठवीं। जे वेळीं धर्मातें अभिभवी। अधर्मु हा॥ ५०॥**
**ते वेळीं आपुल्याचेनि कैवारें। मी साकारु होऊनि अवतरें। मग अज्ञानाचें आंधारें। गिळूनि घालीं॥ ५१॥**
**अधर्माची अवधी तोडीं। दोषांची लिहिलीं फाडीं। सज्जनांकरवीं गुढी। सुखाची उभवीं॥ ५२॥**
**दैत्यांचीं कुळें नाशीं। साधूंचा मानु गिंवशीं। धर्मासीं नीतीशीं। शेंज भरीं॥ ५३॥**
**मी अविवेकाची काजळी। फेडूनि विवेकदीप उजळीं। तैं योगियां पाहे दिवाळी। निरंतर॥ ५४॥**
**स्वसुखें विश्व कोंदें। धर्मचि जगीं नांदे। भक्तां निघती दोंदें। सात्त्विकाचीं॥ ५५॥**
**तैं पापाचा अचळु फिटे। पुण्याची पहाट फुटे। जैं मूर्ति माझी प्रगटे। पंडुकुमरा॥ ५६॥**
**ऐसेया काजालागीं। अवतरें मी युगींयुगीं। परी हेंचि वोळखे जो जगीं। तो विवेकिया॥ ५७॥**
**माझें अजत्वें जन्मणें। अक्रियताचि कर्म करणें। हें अविकार जो जाणे। तो परममुक्त॥ ५८॥**
**तो चालिला संगें न चळे। देहींचा देहा नाकळे। मग पंचत्वीं तंव मिळे। माझ्याचि रूपीं॥ ५९॥**

**अर्थ**—जेवढा कांही धर्म आहे त्याचें युगायुगाचें ठिकाणीं अवतार धारण करून रक्षण करावें असा सृष्टीच्या आरंभापासून प्रवाह चालत आला आहे. ॥ ४९॥ म्हणून मी, अर्जुना! जेव्हा अधर्माने धर्म दिसेनासा होतो तेव्हा आपलें न जन्मणें बाजूला ठेवितों, किंवा अव्यक्तपणहि लक्षांत घेत नाही. ॥ ५०॥

**गूढार्थदीपिका**—याचा अर्थ हे दोन्ही धर्म नाहिसे होतात असा नाही. कारण असा अर्थ केल्यास ''माझें अजत्वें जन्मणें'' इत्यादि माउलीच्या ओव्यांना विरोध येतो. म्हणून अज राहूनच जन्मल्यासारखा भासतो, अव्यक्त राहूनच व्यक्त होतों असे अर्थ करावे लागतात.

**अर्थ**—त्यावेळीं मी आपल्या भक्तांचा कैवार घेऊन सगुण साकार होऊन अवतरतों आणि मग संपूर्ण अज्ञान अंधकार नाहिसा करितों. ॥ ५१॥ अधर्माचा शेवट करितों, पापांचा जमाखर्च फाडून टाकितों आणि साधुपुरुषांच्या कडून भक्तीचा प्रसार करवून जिकडे तिकडे सुखाच्या गुढ्या उभारतों. ॥ ५२॥ दैत्यकुळांचा नाश करितों, साधूंचा लोकांत आदर वाढवितों आणि धर्म व नीति यांचे ऐक्य करवितों. ॥ ५३॥ अविचाराचें जमलेलें काजळ झाडून टाकून विवेकाचा दिवा पाजळतों. त्यावेळीं भगवद्भक्ताला जिकडे तिकडे अखंड सुखाची दिवाळी उजाडते. ॥ ५४॥ सर्व विश्व आत्मानंदाने भरून जाते व जगांत एक धर्मच राहतो आणि भक्तांना सत्वगुणांची पेटी फुटते. ॥ ५५॥ हे अर्जुना! जेव्हा भगवंताचा अवतार होतो तेव्हा पापांचे पर्वत नाहिसे होतात व पुण्याचा उदय होतो अशी सर्व सुखाची स्थिति जगांत नांदते. ॥ ५६॥ जगांत अशी ही सुखाची स्थिति उत्पन्न करण्याकरिता मी युगायुगाचे ठिकाणीं अवतरतों, पण हें माझें अवताराचें मर्म जो जाणतो तोच खरा विवेकी पुरुष होय. ॥ ५७॥ मी जन्मरहित राहूनच जन्मतों, निष्क्रिय राहूनच कर्म करितों, ही माझी अविकारी स्थिति जो जाणतो तो पूर्ण मुक्त झाला. ॥ ५८॥ तो पुरुष क्रियेच्या संगतीने क्रियावान होत नाही. देहांत राहूनहि देहाचा संबंध वागवीत नाही. शेवटीं मरणाचे वेळी माझ्या स्वरूपांतच तो मिळतो. ॥ ५९॥

**गूढार्थदीपिका**—या ठिकाणीं अवतार कसा ओळखतां येतो हें दाखविलें आहे. अवतार धर्मस्थापनेकरिताच होतो, म्हणून भगवद्भक्तिरूप धर्माचें संरक्षण व स्थापना करणाराच अवतार असतो. हें अवताराचें पहिलें लक्षण आहे.

अवतारकाळीं सर्व लोक विवेकसंपन्न, पुण्यशील, धर्मपरायण व सुखी होतात, हें दुसरे लक्षण होय.

अवताराचे जन्म व कर्म हेहि सामान्य माणसाच्या जन्मकर्माप्रमाणे पांचभौतिक नसतात; म्हणजे प्रकृतिजन्य पांचभौतिक नसतात. तेहि प्रकृतीच्या पलीकडे आहेत. अजन्मापरमेश्वराचें जन्मणें हें अविकार आहे, असें श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात. याचा अर्थ असा आहे की भगवंताचें जन्मकर्म मायेच्या पलीकडील आहेत. त्याचा मायेमध्ये अंतर्भाव होत नाही. म्हणजे मूळच्या पूर्ण ब्रह्मस्थितीत यत्किंचितहि बदल न होतां अधिकारी राहूनच परमेश्वर जीवाच्या ठिकाणीं असलेल्या मायेच्या योगाने जीवाला जन्मल्यासारखा भासतो. पण त्यांचे ठिकाणीं प्रकृतिजन्य जन्म संभवत नाही.

कोणी अज्ञ लोक अवतार म्हणजे पूर्ण ब्रह्मस्थितींतून खाली येणें असा अर्थ करितात, पण पूर्ण ब्रह्मस्थिति नित्य, अक्षय, तशीच पूर्ण राहणारी असल्यामुळे ती अपूर्ण कधी होत नाही, म्हणून 'अवतार' शब्दाचा अर्थ तसा करतां येत नाही. भगवंताच्या अवताराचें व अंतर्धानाचें लक्षण स्वानुभवी एकनाथ महाराजांनी चतु:श्लोकी भागवतांत केलें आहे तें असे "**श्रीनारायण साकारला। तंव तो इंद्रियां विषय केला। तोचि इंद्रियातीत जाहला। या नांव पावला अंतर्धांना॥ ७६३॥**" परब्रह्माची मूळ शक्ति नामरूपात्मक व सच्चिदानंदस्वरूप आहे; म्हणून ती परब्रह्माशीं एकरूप असते. तीच परब्रह्माचे ठिकाणीं स्फुरण पावली असतां परब्रह्माला नामरूपासहित व्यक्त करिते हें श्रीज्ञानेश्वर महाराजांनी अमृतानुभवाच्या पहिल्या प्रकरणांत सांगितलें आहे. अशा नामरूपाने व्यक्त झालेल्या परमेश्वराला अवतार म्हणतात व ती नामरूपात्मक चैतन्यशक्ति परब्रह्माशीं अत्यंत एकरूप झाली किंवा स्फुरणरहित झाली म्हणजे त्याला अवताराचें अंतर्धान पावणें म्हणतात.

परमेश्वराशीं एकरूप असलेल्या याच नामरूपात्मक चैतन्यशक्तीचे ठिकाणीं अज्ञानी जीवाला त्रिगुणात्मक मायेचा भ्रम झाला आहे व तो त्या मायाभ्रमाने मोहित होऊन परमेश्वराच्या सच्चिदानंदरूप अवतार देहाला मायाजन्य पांचभौतिक देह समजतो. वास्तविक परमेश्वराचा अवतारदेह पांचभौतिक आहे असें वेदान्ताने सिद्ध होत नाही. म्हणूनच भगवंताचें जन्मकर्म प्रकृतिजन्य नाहीत हें ज्याला समजलें, तो पुरुषहि प्रकृतीच्या पलीकडे जातो व मुक्त होतो.

सामान्य माणसाचें जन्मकर्म पांचभौतिक असल्यामुळे तें जाणून कोणीहि मुक्त होत नाही. म्हणून ज्याचें जन्म व कर्म प्रकृतीच्या पलीकडे आहे त्याला अवतार म्हणतात व हें अवताराचे तिसरें लक्षण होय.

"**धर्मासीं नीतीशी। शेंज भरी**"—

धर्म व नीतीचें ऐक्य होतें. नीतीचें स्वरूप सांगतांना श्रीज्ञानेश्वर माऊली म्हणतात की "पैं सारासार निर्धारितयां। धर्मज्ञानाचा पक्षु धरितयां। सकळशास्त्रांमाजी ययां। नीतिशास्त्र तें मी" (ज्ञा० अ० १० ओ० २९७), आपत्प्रसंगीं धर्म व ज्ञान यांचा पक्ष धरून हिताचें काय व अहिताचें कोणतें याचा निश्चय करून देणारें शास्त्र नीतिशास्त्र होय. वस्तुत: धर्म व नीति हे एकच आहेत; पण स्वधर्माप्रमाणे जेव्हा पूर्णपणे वागतां येत नाही, तथा आपत्प्रसंगीं धर्म व नीति यांच्या स्वरूपांत थोडा फरक होतो.

शास्त्राची आज्ञा तो धर्म होय. या धर्माला सर्वस्वीं न सोडतां ज्ञानाच्या बळावर त्या आपत्प्रसंगीं धर्माला थोडी मुरड घालून जें वागणें त्याला नीति म्हणतात. या नीतीचा आश्रय आपत्प्रसंगीच घेतात.

भगवंतांनी अवतार घेऊन धर्माचा उद्धार केला व आपत्प्रसंग नाहिसा झाला की धर्म व नीति एक होऊन जातात म्हणजे नीति नाहिशी होऊन धर्मच एक राहतो.

(१) साधूंचें संरक्षण (२) दुर्जनांचा नाश व (३) धर्म स्थापना; अशी ही भगवंताला अवतार घेण्याची तीन प्रयोजनें सांगितलीं आहेत. पण भगवान सर्व कर्माचीं फळें देणारा असल्यामुळे, साधूचें संरक्षण त्यांच्या सत्कर्मामुळेच करीत असतो व दुष्टांचा नाशहि त्यांच्या अधर्मामुळेच भगवान करीत असतो. म्हणून हीं दोन प्रयोजनें आनुषंगिक आहेत. हीं अवतारांची मुख्य प्रयोजनें म्हणतां येत नाहीत. परंतु लोकांची अधर्म प्रवृत्ति नाहिशी होऊन लोकांत जिकडे तिकडे धर्मादिकांची प्रवृत्ति निर्माण करण्याचें काम अवतारावांचून कोणी करूं शकत नाही. म्हणून धर्मसंस्थापन हेंच मुख्य अवतारांचें प्रयोजन म्हणावें लागतें. येथे "धर्म" या शब्दाने केवळ श्रुतिस्मृतियुक्त असा अर्थ घेतां येत

नाही. कारण तो युगपरत्वें बदलत असतो असे भारतादि ग्रंथांतून सांगितलें आहे, म्हणून येथील 'धर्म' शब्दाचा अर्थ भागवत धर्म, भक्तिधर्म किंवा एकांत धर्म अथवा कर्मयोग असा करावा लागतो आणि योगधर्म हाच आद्य धर्म असून तो जेव्हा जेव्हा बुडाला तेव्हा तेव्हा विवस्वान, मनु इत्यादिकांना त्याचा उपदेश करून त्याची स्थापना केली असा इतिहास आहे आणि आताहि तो नष्ट झाल्यामुळे तुला तो सांगत आहे असें भगवंतांनीच अर्जुनाला सांगितलें आहे.

**वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः। बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः॥ १०॥**

**अर्थ**—एक माझाच आश्रय करून माझ्या प्रेमाने माझ्याशीं तन्मय झाल्यामुळे विषयवासना, भय, क्रोध, यांचा ज्यांनी निःशेष नाश केला असें ऐक्यरूप ज्ञानतपाने संपन्न झालेले पुष्कळ पुरुष अत्यंत उपाधिरहित होऊन, माझ्या सायुज्यास प्राप्त झाले आहेत. ॥ १० ॥

**एऱ्हवीं परापर न शोचिती। जे कामनाशून्य होती। वाटा कें वेळीं न वचती। क्रोधाचिया॥ ६०॥**
**जे सदा मियांचि आथिले। माझिया सेवा जियाले। कां आत्मबोधें तोषले। वीतराग जे॥ ६१॥**
**जे तपोतेजाचिया राशी। कां एकायतन ज्ञानासी। जे पवित्रता तीर्थांसी। तीर्थरूप॥ ६२॥**
**ते मद्भावा सहजें आले। मी तेचि ते होऊनि ठेले। जे मज तयां उरले। पदर नाहीं॥ ६३॥**
**सांगें पितळेची गंधिकाळिक। जैं फिटली होय निःशेख। तैं सुवर्ण काई आणिक। जोडूं जाईजे॥ ६४॥**
**तैसे यमनियमीं कडसले। जे तपोज्ञानीं चोखाळले। मी तेचि ते जाहले। एथ संशयो कायसा॥ ६५॥**

**अर्थ**—जे आपपरभावाने दुःखी होत नाहीत, ते सर्व वासनारहित होतात. क्रोधाच्या तावडींत कधी सांपडत नाहीत. ॥ ६० ॥ जे सदा सर्वदा माझ्या प्रेमांत निमग्न असतात, माझ्या सेवेच्या प्रेमामुळे जीवंत राहतात, किंवा आत्मज्ञानामुळे रागद्वेषरहित शांत चित्त असतात. ॥ ६१ ॥ ज्यांनी अखंड भगवत्चिंतनाने तपाच्या राशी जोडल्या व सामर्थ्याचें तेजाने संपन्न झाले अथवा आत्मज्ञानाचा एकमेव आश्रय झाले व तीर्थांचेंहि पाप धुवून त्यांना पवित्र करणारें महान तीर्थ बनलें. ॥ ६२ ॥ असे जे पुरुष ते सहजच मला प्राप्त होतात किंवा सहजच मत्स्वरूप होतात. मी म्हणजे तेच होत. माझ्यांत व त्यांच्यांत यत्किंचित्‌हि अंतर नसतें. ॥ ६३ ॥ अर्जुना! सांग पाहूं, पितळेच्या धातूचे काळे पडणें व कळकणें हे दोन दोष निःशेष नाहिसे झाल्यास सोनें त्याहून निराळें राहतें काय? ॥ ६४ ॥ त्याप्रमाणे ज्यांचीं इंद्रियें व मन अनुक्रमें नियम व यम यांनी दृढ आवळलीं गेलीं, जे तप व ज्ञान यांच्या योगाने उपाधिरहित शुद्ध झाले, ते मीच झाले यांत संशयच नाही. ॥ ६५ ॥

**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्। मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः॥ ११॥**
**काङ्क्षन्तः कर्मणां सिद्धिं यजन्त इह देवताः। क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा॥ १२॥**

**अर्थ**—अर्जुना! जे ज्या भावाने माझें भजन करितात, त्याच भावाने मीहि त्यांचें भजन करितों. सर्व मनुष्य प्राणी स्वभावतःच माझे ठायीं भजनशील आहेत. ॥ ११ ॥ कर्माचें जे फळ सांगितलें आहे त्या फळाची इच्छा करणारे या लोकामध्ये नाना देवतांचे यजन करितात. कारण या मनुष्य लोकामध्ये कर्मानें देवतांचें यजन केल्याने त्या कर्माचें फळ लवकर प्राप्त होतें. ॥ १२ ॥

**एऱ्हवीं तरी पाहीं। जे जैसे माझ्या ठायीं। भजती तयां मीही। तैसाचि भजें॥ ६६॥**
**देखें मनुष्यजात सकळ। हें स्वभावता भजनशीळ। जाहलें असे केवळ। माझ्याचि ठायीं॥ ६७॥**
**परी ज्ञानेवीण नाशिले। जे बुद्धिभेदासी आले। तेणेंचि या कल्पिलें। अनेकत्व॥ ६८॥**
**म्हणऊनि अभेदीं भेदु देखती। यया अनाम्या नामें ठेविती। देवी देवो म्हणती। अचर्चातें॥ ६९॥**
**जें सर्वत्र सदा सम। तेथ विभाग अधमोत्तम। मतिवशें संभ्रम। विवंचिती॥ ७०॥**
**मग नानाहेतुप्रकारें। यथोचितें उपचारें। मानिलीं देवतांतरें। उपासिती॥ ७१॥**
**तेथ जें जें अपेक्षित। तें तैसेंचि पावती समस्त। परी तें कर्मफळ निश्चित। वोळख तूं॥ ७२॥**
**वांचूनि देतें घेतें आणिक। निभ्रांत नाहीं सम्यक। एथ कर्मचि फळसूचक। मनुष्यलोकीं॥ ७३॥**

**जैसें क्षेत्रीं जें पेरिजे। तेंवांचूनि आन न निपजे। कां पाहिजे तेंचि देखिजे। दर्पणाधारें॥ ७४॥**
**नातरी कडेयातळवटीं। जैसा आपुलाचि बोलु किरीटी। पडिसादु होऊनि उठी। निमित्तयोगें॥ ७५॥**
**तैसा समस्तां यां भजनां। मी साक्षिभूतु पैं अर्जुना। एथ प्रतिफळे भावना। आपुलाली॥ ७६॥**

**अर्थ**—एरव्ही तरी, अर्जुना! जे पुरुष ज्या रीतीने माझें भजन करितात, तसेंच मीहि त्यांचें भजन करितो. ॥६६॥ पहा, माझ्यावांचून दुसरी वस्तुच नसल्यामुळे सर्व हा मनुष्यप्राणी स्वभावत: माझ्या ठिकाणींच भजनशील आहे. ॥ ६७॥ पण माझ्या व्यापक स्वरूपाचें ज्ञान नसल्यामुळे मनुष्य आपल्या बुद्धीने निरनिराळ्या देवतांतराची कल्पना करून माझींच अनेक रूपाने कल्पना करितात. ॥ ६८॥ म्हणून एका अद्वैत वस्तूचे ठिकाणी द्वैत पाहतात. या नामरहित वस्तूला नामाचा संबंध लावितात आणि जी शब्दाचें वाच्य होऊं शकत नाही तिला ते देवदेवी असें म्हणतात. ॥ ६९॥ जी वस्तु सर्वत्र सम आहे, त्या वस्तूचे ठिकाणीं उत्तम अधम अशी विषमतेची भ्रान्त कल्पना करितात. ॥ ७०॥ मग नाना प्रकाराने व नाना प्रकारच्या वासनेने मानलेल्या देवतांचे त्यांना प्रिय असलेल्या उपचार सामग्रीने त्यांची उपासना करितात. ॥ ७१॥ या उपासनेंत उपासक जी जी कामना करितो ती ती पूर्ण होते; पण ते सर्व कर्माचें फळ होय, असें तूं जाण. ॥ ७२॥ येथे मनुष्यलोकांत जेवढे फळ किंवा सुख मिळतें तें कर्मावांचून स्वतंत्र फळ देणारा दुसरा कोणी नाही. कर्मच फळ देतें. ॥ ७३॥ ज्याप्रमाणे शेतांत जें पेरावें तेंच उगवतें किंवा आरशांत पहावें तेंच दिसतें. ॥ ७४॥ किंवा पर्वताचे दरींतून पोकळीमुळे आपला शब्दच प्रतिध्वनिरूपाने जसा उमटतो. ॥ ७५॥ त्याप्रमाणे सर्व प्राणीमात्रांच्या भजनाला मी केवळ साक्षीभूत राहतों आणि त्यांची भावनाच त्यांना इच्छेंप्रमाणे फळ देते. ॥ ७६॥

**चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः। तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम्॥ १३॥**
**न मां कर्माणि लिम्पन्ति न मे कर्मफले स्पृहा। इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बध्यते॥ १४॥**
**एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः। कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम्॥ १५॥**

**अर्थ**—गुण कर्माच्या विभागानुसार मी चातुर्वर्णाची उत्पत्ति केली. मी त्यांचा कर्ता भासतों, तरी मी अविनाशी, अकर्ता आहे असें जाण. ॥ १३॥ कर्माचा लेप मला लागत नाही व मला कर्मफळाची इच्छाहि नाही, असें मला जो जाणतो तोहि कर्माने बद्ध होत नाही. ॥ १४॥ असें मला जाणूनच पूर्वी मुमुक्षु जनांनी कर्म केलें आहे, म्हणून पूर्वीच्या लोकांनी आपलें पूर्वीपासूनच चालत आलेलें जसें कर्म केलें, तसें, अर्जुना! तूंहि कर. ॥ १५॥

**आतां याचिपरी जाण। चार्‍ही आहेती हे वर्ण। सृजिले म्यां गुण। कर्मभागें॥ ७७॥**
**जे प्रकृतीचेनि आधारें। गुणाचेनि व्यभिचारें। कर्मे तदनुसारें। विवंचिलीं॥ ७८॥**
**एथ एकचि हे धनुष्यपाणी। परी जाहले गा चहूं वर्णीं। ऐसी गुणकर्मीं कडसणी। केली सहजें॥ ७९॥**
**म्हणोनि आइकें पार्था। हे वर्णभेदसंस्था। मी कर्ता नव्हे सर्वथा। याचिलागीं॥ ८०॥**
**हें मजचिस्तव जाहलें। परी म्यां नाहीं केलें। ऐसें जेणें जाणितलें। तो सुटला गा॥ ८१॥**
**मागील मुमुक्षु जे होते। तिहीं ऐशियाचि जाणोनि मातें। कर्मे केली समस्तें। धनुर्धरा॥ ८२॥**
**परि तें बीजें जैसीं दग्धलीं। नुगवतीचि पेरिलीं। तैशीं कर्मेचि परि तयां जाहलीं। मोक्षहेतु॥ ८३॥**

**अर्थ**—त्याप्रमाणेच, अर्जुना! हेंहि जाण की, ब्राह्मणादि चार वर्ण गुणकर्माच्या विभागानुसार मी उत्पन्न केले. ॥ ७७॥ ब्राह्मणादि वर्णाच्या प्रकृतीला अनुसरून व त्यांच्या त्रिगुणाच्या मिश्रस्थितीचा विचार करून त्यांना तशीं कर्मे लावून दिलीं. ॥ ७८॥ धनुर्धारी अर्जुना! मनुष्यमात्र येथे एकच आहे. तरी तो मनुष्य चार वर्णात विभागला गेला. अशा रीतीने स्वभावत: गुणकर्मानुसार वर्ण मर्यादा केली गेली. ॥ ७९॥ म्हणून अर्जुना! ऐक, ही चार निराळ्या वर्णाची व्यवस्था मी केली नाही. ॥ ८०॥ हा वर्णभेद माझ्यामुळे झाला खरा, पण मी मात्र केला नाही, हें ज्याने जाणलें तो या कर्मबंधांतून सुटला. ॥ ८१॥ अर्जुना! मागे जे मुमुक्षु होऊन गेले. त्यांनी मी कर्म करून अकर्ता कसा आहे, हें जाणून सर्व कर्मे केलीं. ॥ ८२॥ जळलेलें धान्य पेरलें असतां जसें उगवत नाही, त्याप्रमाणे आपलें अकर्तृत्व जाणून निष्काम चित्ताने त्यांनी केलेलीं कर्मेच त्यांच्या मोक्षाला साधक झालीं. ॥ ८३॥

**किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः। तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात्॥ १६॥**
**कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः। अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः॥ १७॥**

**अर्थ**—कर्म कशाला म्हणायचें, अकर्म कशाला म्हणायचें याचा निर्णय करतांना सुज्ञ पुरुषांनाहि भ्रम झाला आहे; म्हणून जें कर्म जाणलें असतां तूं संसारांतून मुक्त होशील तें कर्म मी तुला सांगतों. ॥ १६ ॥ कर्माची गती म्हणजे व्याप्ति फार दुर्ज्ञेय आहे. म्हणून कर्माचें स्वरूप, विकर्माचें स्वरूप आणि अकर्माचें स्वरूप जाणणें आवश्यक आहे. ॥ १७ ॥

**एथ आणिकही एक अर्जुना। हे कर्माकर्मविवंचना। आपुलिये चाडें सज्ञाना। योग्य नोहे॥ ८४॥**
**कर्म म्हणिजे तें कवण। अथवा अकर्मा काय लक्षण। ऐसें विचारितां विचक्षण। गुंफोनि ठेले॥ ८५॥**
**जैसें कां कुडें नाणें। खऱ्याचेनि सारखेपणें। डोळयाचेंहि देखणें। संशयीं घालीं॥ ८६॥**
**तैसें नैष्कर्म्यतेचेनि भ्रमें। गिंवसिजत आहातीं कर्मे। जे दुजी सृष्टि मनोधर्में। करूं सकती॥ ८७॥**
**वांचूनि मूर्खाची गोठी कायसी। एथ मोहले गा क्रांतदर्शी। म्हणोनि आतां तेचि परियेसीं। सांगेन तुज॥ ८८॥**
**तरी कर्म म्हणजे स्वभावें। जेणें विश्वाकारु संभवे। तें सम्यक आधीं जाणावें। लागे एथ॥ ८९॥**
**मग वर्णाश्रमासी उचित। जें विशेष कर्म विहित। तेंही वोळखावें निश्चित। उपयोगेंसीं॥ ९०॥**
**पाठीं जें निषिद्ध म्हणिपे। तेंही बुझावें स्वरूपें। येतुलेनि येथ कांहीं न गुंफे। आपैसेंचि॥ ९१॥**
**एऱ्हवीं जग हें कर्माधीन। ऐसी याची व्याप्ती गहन। परी तें असो आइकें चिन्ह। प्राप्ताचें गा॥ ९२॥**

**अर्थ**—अर्जुना! येथे आणखी एक गोष्ट सांगायची आहे की मोठा शहाणा किंवा शास्त्रज्ञ झाला तरी त्याला आपल्या बुद्धीनुसार कर्माकर्माची मर्यादा ठरवितां येण्याजोगी नाही. ॥ ८४ ॥ कारण कर्म म्हणजे काय व अकर्माचें लक्षण काय याचा विचार करतांना अत्यंत सूक्ष्म विचार करणाऱ्या पुरुषांना देखील भ्रम झाला आहे. ॥ ८५ ॥ ज्याप्रमाणे खोटे नाणें खऱ्याप्रमाणेच हुबेहुब दिसायला लागलें तर डोळ्यानेच आपण प्रत्यक्ष पाहतों तरी खरें खोटें निवडतांना भ्रम होतो. ॥ ८६ ॥ त्याप्रमाणे मनाने प्रतिसृष्टि निर्माण करण्याचें ज्याचें ठिकाणीं सामर्थ्य आहे असे पुरुष देखील निष्कर्मतेच्या भ्रमांत कर्म करीत असतात. ॥ ८७ ॥ येथे मोठमोठ्याला समजत नाही तेथे मूर्खाबद्दल काय बोलायचें, म्हणून मी तुला कर्माकर्माचा उलगडा सांगतों. ॥ ८८ ॥ ज्याच्या योगाने स्वाभाविक ही सृष्टीची उत्पत्ति होते, त्याला कर्म म्हणतात, हें आधीं नीट जाणलें पाहिजे. ॥ ८९ ॥ मग निरनिराळ्या वर्णाला व आश्रमाला योग्य असें जें शास्त्राने कर्म नियत करून ठेविलें आहे, तें विशेष कर्म विकर्म होय. तें कर्म व त्याचा उपयोग काय हेंही नीट जाणले पाहिजे. ॥ ९० ॥ त्यानंतर ज्याला निषिद्ध म्हणतात किंवा शास्त्राने करूं नये म्हणून म्हटलें आहे, त्याचेहि स्वरूप कळणें जरूर आहे. इतकें कळलें की मग पुरुष कर्म होत असतांहि सहजच कर्मबंधांत पडत नाही. ॥ ९१ ॥ एरव्ही सर्व जग कर्माचे आधीन आहे, या विधानाची किंवा या विचाराची व्याप्ति दुर्बोध आहे, परंतु तें असूं दे. आता तुला प्राप्त पुरुषाचे चिन्ह सांगतों, ऐक. ॥ ९२ ॥

**गूढार्थदीपिका**—कर्म म्हणजे व्यापार. हा व्यापार दोन निरनिराळ्या वस्तू असल्याखेरीज किंवा एक वस्तु असली तरी ती विभागली जाण्याजोगी असल्याशिवाय होवू शकत नाही. परब्रह्म अद्वितीय आहे. तेथे त्यासारखी किंवा त्याहून निराळी अशी कोणती दुसरी वस्तु नाही आणि ती कधी विभागलीहि जात नाही. असें तें ब्रह्म अतूट, एकरूप आहे; म्हणून तेथे व्यापाररूप कर्म संभवतच नाही. तें सर्वदा अखंड कर्मरहित आहे असें हें ब्रह्म नामरूपाने स्फुरण पावतें. असें नामरूपाने स्फुरण पावणें हा परब्रह्माचा स्वभावच आहे. जसा अग्नि क्रियेमुळे उष्ण होत नाही, उष्णता त्याचा स्वभाव आहे, त्याप्रमाणे नामरूपात्मक होणें हाहि परब्रह्माचा स्वभाव असल्यामुळे नामरूपात्मक स्फुरण होण्यांत परब्रह्माकडून कोणतीहि क्रिया होत नाही. तें नामरूपाने स्फुरण पावलें तरी कर्मरहितच असतें. पण अज्ञानी जीवाला परब्रह्माच्या या कर्मरहित स्वरूपाचा अनुभव नसल्यामुळे, परब्रह्माचें नामरूपाने स्फुरणें हा परब्रह्माचा स्वभाव न वाटतां, परब्रह्माने केलेलें कर्म वाटतें. आणि नामरूपांचें नानात्व हें त्याला जगत् वाटतें. ज्याप्रमाणे दोरीच्या एक

भागावर सर्पाचा भ्रम झाल्याबरोबर सर्वच दोरी सर्परूप दिसते, त्याप्रमाणे नामरूपाने ब्रह्माचें स्फुरण कर्मरूप वाटूं लागलें की सर्व ब्रह्मच त्याला कर्मरूप वाटतें म्हणजे नामरूपात्मक ब्रह्माण्डच कर्मबद्ध वाटून तोहि आपल्याला कर्मबद्ध समजतो.

अशा रीतीने कर्माची व्याप्ति अमर्याद होते व त्याच्या सर्व दु:खाला कारणीभूत होते. म्हणून कर्माचें स्वरूप जाणणें आवश्यक असतें.

व्यापाररूप कर्म म्हणून मुळीच नाही, तें सच्चिदानंद परब्रह्माचें स्फुरण आहे असें कर्माचें खरें स्वरूप कळून आलें असतां कर्माच्या वस्तुत्वाचा भ्रम नाहिसा होतो आणि दु:खाचें कारण नाहिसें होतें. हा कर्माचें स्वरूप जाणण्याचा उपयोग आहे.

कर्माचें स्वरूप जाणून कर्माच्या वस्तुत्वाविषयींचा भ्रम नहिसा झाला व आपण मुळांत अकर्मरूप ब्रह्म-स्वरूप आहों असें कळलें, म्हणजे दु:खाचें कारणच नाहिसें झाल्यामुळे सर्व दु:ख नाहिसें होतें हें खरें, पण हें कार्य कर्माचें स्वरूप कळल्याबरोबरच होतें असा अर्थ नाही. कर्म आहे अशी दृढ झालेली बुद्धि जोपर्यंत अखंड अकर्मरूप व सच्चिदानंदस्वरूप अशा परब्रह्माचें ठिकाणीं स्थिर होत नाही, तोपर्यंत हें कर्म झालें व मी तें केलें अशी कर्मकर्तृत्वाची बुद्धि स्फुरत राहते. म्हणून आपल्याकडून होणाऱ्या कर्माचा व मी त्या कर्माचा कर्ता आहे, या बुद्धीने जो संबंध होतो, तो संबंध नाहिसा झाला पाहिजे.

कर्मत्यागाने कर्मकर्तृत्व संबंध नाहिसा होत नाही. कारण तेथेहि 'हें कर्म मी सोडलें' अशी कर्मकर्तृत्व बुद्धि उत्पन्न होतेच. म्हणून होणारें कर्म व त्यांचे कर्तृत्व हीं दोन्ही भगवंताला समर्पण करणें हाच एक मार्ग कर्माशीं संबंध नाहिसा करण्याकरिता उरतो. जी कर्में आपणाकडून होतात व ज्यांचा ''मी केलें'' या कर्तृत्वबुद्धीने आपण संबंध वागवितों तीं कर्में दोन प्रकारचीं आहेत. सामान्य व विशेष.

सामान्य म्हणजे कर्तृत्वबुद्धिपूर्वक होणारा किंवा कर्तृत्वबुद्धिरहित होणारा असा यच्चयावत् सर्व व्यापार होय या व्यापाराची व्याप्ति गहन असल्यामुळे तो सर्व व्यापार परमेश्वराला समर्पण करणें कठीण आहे. बुद्धीला परमेश्वराचें दृढ ज्ञान झालें असतां आपोआप यच्चयावत् कर्में परमेश्वराला समर्पण होतात व आपला कर्माशीं संबंध राहत नाही. म्हणून बुद्धींत परमेश्वराचें ध्यान दृढ होण्याकरीता शास्त्रांनी विशेष कर्में जीवाला सांगितलीं आहेत. तीं विशेष कर्में लक्ष ठेवून व कर्तृत्वबुद्धीने केलीं जातात.

अशीं विशेष कर्में दोन प्रकारचीं आहेत. एक विहित-व दुसरें निषिद्ध. ''अमुक कर्में करावीं'' असें ज्या कर्मा विषयी शास्त्रांनी विधान केलें असेल त्या कर्माला विहित कर्म म्हणतात आणि जीवाने ''करू नये'' असें ज्या कर्माविषयी शास्त्राने विधान केलें असेल त्याला निषिद्ध कर्म म्हणतात.

विहित कर्में हीं फलाशेने केलीं असतां परमेश्वराचें ध्यान घडत नाही व कर्मबद्धताच विशेष दृढ होतें. म्हणून कर्में फलाशा सोडून केवळ भगवत्प्रीत्यर्थ केलीं असतां भगवंताचें ध्यान घडत जाऊन भगवंताचे ठिकाणीं बुद्धि स्थिर होत जाते व आपल्या अकर्मरूप ब्रह्मस्वरूपाचा अनुभव दृढ होत जातो हाच त्या विहित कर्माचा उपयोग आहे. आणि निषिद्धकर्माने पाप उत्पन्न होतें व तें परमेश्वराच्या ध्यानाला व परमेश्वराचें ठिकाणी बुद्धि स्थिर होण्याला प्रतिबंधक असतें. निषिद्धकर्म करूं नये अशी परमेश्वराची आज्ञा आहे, हें सारखे लक्षांत ठेऊन निषिद्धकर्म न होऊं देण्याची खबरदारी घेत राहिलें असतां, परमेश्वराचें ध्यान घडून, परमेश्वराचें ठिकाणीं बुद्धि स्थिर होत जाते आणि निषिद्धकर्म न घडल्यामुळे परमेश्वराच्या प्राप्तीला प्रतिबंधक होणारें पापकर्महि राहत नाही. हा त्या निषिद्धकर्माचें स्वरूप जाणण्याचा उपयोग आहे.

अशा रीतीने कर्म, विहितकर्म व निषिद्धकर्म हीं तिन्ही कर्में जीवाला त्याच्या मूळ अकर्मरूप सच्चिदानंद ब्रह्मस्थितीचा अनुभव आणून देण्याला कारणीभूत होतात व या अनुभवाने त्याने मानिलेलें कर्महि ब्रह्मस्वरूप दिसू लागतें.



**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः। स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत्॥ १८॥**

**अर्थ**—कर्माचे ठिकाणीं अकर्म जो पाहतो व अकर्माचे ठिकाणी कर्म जो पाहतो, तोच सर्व पुरुषांत बुद्धिमान् होय. तोच योगी होय व त्यांनीच सर्व कर्म केलें असें जाण. ॥ १८ ॥

**जो सकळकर्मीं वर्ततां। देखें आपुली नैष्कर्म्यता। कर्मसंगें निराशता। फळाचिया॥ ९३ ॥**
**आणि कर्तव्यतेलागीं। जया दुसरें नाहीं जगीं। ऐसिया नैष्कर्म्यता तरी चांगी। बोधला असे॥ ९४ ॥**
**परी क्रियाकलापु आघवा। आचरतु दिसे बरवा। तरी तो इहीं चिन्हीं जाणावा। ज्ञानिया गा॥ ९५ ॥**
**जैसा कां जळापाशीं उभा ठाके। तो जरी आपणपें जळामाजि देखे। तरी तो निभ्रांत वोळखे। म्हणे मी वेगळा आहें॥ ९६ ॥**
**अथवा नावे हन जो रिगे। तो थडियेचे रुख जातां देखे वेगें। तेचि साचोकारें जों पाहों लागे। तंव रुख म्हणे अचळ॥ ९७ ॥**
**तैसें सर्व कर्मी असणें। तें फुडें मानूनि वायाणें। मग आपणपें जो जाणे। नैष्कर्म्यु ऐसा॥ ९८ ॥**
**आणि उदोअस्ताचेनि प्रमाणें। जैसें न चालतां सूर्याचें चालणें। तैसें नैष्कर्म्यत्व जाणे। कर्मीचि असतां॥ ९९ ॥**
**तो मनुष्यासारिखा तरी आवडे। परी मनुष्यत्व तया न घडे। जैसें जळीं जळामाजीं न बुडे। भानुबिंब॥ १००॥**
**तेणें न पाहता विश्व देखिलें। न करितां सर्व केलें। न भोगितां भोगिलें। भोग्यजात॥ १०१॥**
**एकेचि ठायीं बैसला। परि सर्वत्र तोचि गेला। हें असो विश्व जाहला। आंगेंचि तो॥ १०२॥**

**अर्थ**—सर्व कर्म होत असतांना जो मी कर्मरहित आहे असें जाणतो व कर्माची आसक्ति धरीत नाही व फळाची इच्छा करीत नाही. ॥ ९३ ॥ आणि मला कर्म केलें पाहिजे असें कर्तव्य वागविण्याकरिता, ज्याला आपल्याहून दुसरें कांही दिसतच नाही, असा स्वत:च्या स्वरूपाविषयी ज्याला उत्तम निष्कर्मतेचा बोध असतो. ॥ ९४ ॥ असें असूनहि तो सर्व कर्मे करतांना दिसतो. अशा चिन्हांनी युक्त असलेला पुरुष ज्ञानी होय असे जाण. ॥ ९५ ॥ ज्याप्रमाणे एखादा पुरुष जलाशयाच्या कांठीं उभा राहून जरी आपलें प्रतिबिंब पाण्यांत पाहतो, तरी मी पाण्याहून निराळा आहे असें नि:संशय जाणतो. ॥ ९६ ॥ किंवा नावेंत बसून जात असलेला पुरुष नदीकांठचे वृक्ष वेगाने जातांना पाहतो, पण विचार करून पाहतो तेव्हा तो म्हणतो मी जात आहे व वृक्ष स्थिर आहेत. ॥ ९७ ॥ त्याप्रमाणे सर्व कर्मे मी करतों हें अनुभवाने स्पष्ट खोटें मानून मी वस्तुत: निष्कर्म आहे, (सर्वाचा साक्षी आहे) असें जाणतो. ॥ ९८ ॥ आणि ज्याप्रमाणे सूर्य चालत नाही तरी उदय व अस्त यांच्यामुळे सूर्य चालतो असें वाटतें, त्याप्रमाणे कर्मे होत असतांच जो आपली कर्मरहित स्थिति जाणतो. ॥ ९९ ॥ ज्याप्रमाणे पाण्यांत सूर्याचें प्रतिबिंब जरी पडलेले दिसलें तरी पाण्यांत सूर्यबिंब नसतें, त्याप्रमाणे तो पुरुष सामान्य माणसासारखाच दिसला तरी सामान्य माणसासारखी त्याची स्थिति नसते. ॥ १०० ॥ त्या पुरुषाने जग न पाहतां पाहिलें. कांही न करतांच सर्व केलें व न भोगताच सर्व भोग भोगले. ॥ १०१ ॥ एका ठिकाणी बसूनच तो सर्वत्र गेला. आता असो हें वर्णन. अर्जुना! तो स्वत: सर्व विश्वच होतो. ॥ १०२ ॥

**यस्य सर्वे समारम्भाः कामसङ्कल्पवर्जिताः। ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पण्डितं बुधाः॥ १९॥**
**त्यक्त्वा कर्मफलासङ्गं नित्यतृप्तो निराश्रयः। कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किञ्चित्करोति सः॥ २०॥**

**अर्थ**—ज्याचीं सर्व कर्मे काम व संकल्परहित म्हणजे विषयसुखाची इच्छा हा काम व हें कर्म आहे व तें मी करितों हा संकल्प, या दोहोंवांचून केवळ व्यापार मात्र असतात आणि आत्मज्ञानाने ज्याचीं सर्व कर्मे नाहिशी झाली, त्याला पंडित म्हणतात. ॥ १९ ॥ कर्मासक्ति म्हणजे मला कर्म केलें पाहिजे व तें सिद्धीस नेलें पाहिजे ही इच्छा व फळासक्ति म्हणजे कर्माचें फळ मला मिळालें पाहिजे ही इच्छा, या दोन्ही इच्छा सोडून आत्मसुखानेच जो तृप्त असतो व कशाचा आश्रय करीत नाही, असा पुरुष कर्म करितांना दिसला तरी (आत्मज्ञानाने, कर्म व कर्तृत्व यांचे अस्तित्व नाही असा अनुभव येत असल्यामुळे) तो कांहीं एक करीत नसतो. ॥ २० ॥

**जया पुरुषाचां ठायीं। कर्माचा तरी खेदु नाहीं। परी फळापेक्षा कंहीं। संचरेना॥ १०३॥**
**आणि हें कर्म मी करीन। अथवा आदरिलें सिद्धी नेईन। येणें संकल्पेंही जयाचें मन। विटाळेना॥ १०४॥**

**ज्ञानाग्नीचेनि मुखें। जेणें जाळिलीं कर्मे अशेखें। तो ब्रह्मचि मनुष्यवेखें। वोळख तूं॥ १०५॥**
**जो शरीरीं उदासु। फळभोगीं निरासु। नित्यता उल्हासु। होऊनि असे॥ १०६॥**
**जो संतोषाचां गाभारां। आत्मबोधाचिया वोगरां। पुरे न म्हणेचि धनुर्धरा। आरोगितां॥ १०७॥**

**अर्थ**—ज्या पुरुषाला कर्म करण्याचें वाईट वाटत नाही, आणि त्या कर्माच्या फळाचीहि इच्छा करीत नाही॥ १०३ ॥ आणि हें कर्म आहे व मी तें करीन किंवा आरंभलेलें कर्म बरोबर शेवटास नेईन असा संकल्प ज्याच्या मनाला शिवत नाही. ॥ १०४॥ आत्मज्ञानरूपी अग्नीच्या मुखांत ज्यांनी आपलीं सर्व कर्मे जाळलीं, अर्जुना! असा पुरुष म्हणजे मनुष्यवेषाने पूर्ण ब्रह्मच होय असें समज. ॥ १०५ ॥ जो शरीराचें ठिकाणीं उदास आहे, कर्माचें फळ भोगण्याची ज्याची इच्छा नाहीं, नित्य प्रसन्नचित्त असतो. ॥ १०६ ॥ जो संतोषाचें माजघरांत बसून आत्मानुभवाचें जेवण जेवीत असतों व ते जेवण कितीहि वाढलें गेलें तरी त्याची तृप्ति होतच नाही. ॥ १०७ ॥

**गूढार्थदीपिका**—ज्ञानी पुरुष साक्षी होऊन राहतो त्याला देह, कर्म, कर्मफल यांपैकी कांहीच सत्य वाटत नसल्यामुळे तो उदासीन असतो व त्याचे ठिकाणीं त्याच्या प्रकृतीनुसार कर्मे होत राहतात. त्यांचा त्याच्याशीं संबंध नसतो; म्हणून कर्म झाले असतां त्याला खेद होत नाही व न झाले असतां त्याला संतोषहि होत नाही.

**निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः। शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम्॥ २१॥**
**यदृच्छालाभसन्तुष्टो द्वन्द्वातीतो विमत्सरः। समः सिद्धावसिद्धौ च कृत्वापि न निबध्यते॥ २२॥**

**अर्थ**—विषयकामना सोडून ज्यांनी अंत:करणाचा निग्रह केला व सर्व संसाराची मनांतून आसक्ति सोडली, अशा पुरुषाला ज्याच्या केवळ शरीराकडून होणाऱ्या कर्माचा लेप लागत नाही. ॥ २१ ॥ प्रारब्धाने जे मिळेल त्यांतच जो पुरुष संतुष्ट असतो, सुखदु:खादि द्वंद्वापासून जो मुक्त झाला, अद्वैत अनुभवाने आपल्याहून दूसरा भासत नसल्यामुळे जो मत्सररहित झाला, सिद्धि व असिद्धि दोन्ही जो सम पाहतो असा पुरुष कर्म करूनहि बद्ध होत नाही. ॥ २२ ॥

**कैसी अधिकाधिक आवडी। घेत महासुखाची गोडी। सांडोनियां आशा कुरोंडी। अहंभावेंसीं॥ १०८॥**
**म्हणोनि अवसरें जें जें पावें। कीं तेणेंचि तो सुखावे। जया आपुलें आणि परावें। दोन्ही नाहीं॥ १०९॥**
**तो दिठीं जें पाहे। तें आपणचि होऊनि जाये। आइके तें आहे। तोचि जाहाला॥ ११०॥**
**चरणीं हन चाले। मुखें जें जें बोले। ऐसें चेष्टाजात तेतुलें। आपणचि जो॥ १११॥**
**हें असो विश्व पाहीं। जयासि आपणपेंवांचूनि नाहीं। आतां कवण तें कर्म कायी। बाधी तयातें॥ ११२॥**
**हा मत्सरु जेथ उपजे। तेतुलें नुरेचि जया दुजें। तो निर्मत्सरु काइ म्हणिजे। बोलवरी॥ ११३॥**
**म्हणोनि सर्वांपरी मुक्तु। तो सकर्मुचि कर्मरहितु। सगुण परि गुणातीतु। एथ भ्रांति नाहीं॥ ११४॥**

**अर्थ**—ज्याची आत्मसुखाची आवडी उत्तरोत्तर वाढत जाऊन जो अहंभावासह आशेला त्या आत्मसुखावरून ओवाळून टाकतो व आत्म्याचें महासुख भोगतो. ॥ १०८ ॥ ज्याचे ठिकाणीं आपपरभाव नसल्यामुळे, ज्या वेळीं जें प्राप्त होईल तेवढ्यानेच तो संतुष्ट असतो. ॥ १०९ ॥ तो आपल्या दृष्टीने जें जें पाहतो तें तें तोच होतो, जें जें ऐकतो ते ते तोच होतो. ॥ ११० ॥ पायाने जेवढी चालण्याची क्रिया होते किंवा मुखाने बोलण्याची जी क्रिया होते तितकी सर्व क्रिया तो आत्मस्वरूपच पाहतो. ॥ १११ ॥ हें असो. संपूर्ण जगच त्याला आत्मस्वरूप दिसते. अशा स्थितींत त्याला बंधनकारक होईल असें त्याच्याहून निराळे कोणते कर्म राहिले ?॥ ११२ ॥ आपल्याला हें बंधनकारक आहे असें वाटून ज्याच्या विषयी मत्सर उत्पन्न होईल, असें त्याच्याहून दुसरें कांहीच नसते, मग त्याला निर्मत्सर हा शब्द तरी कशाला लावायचा ?॥ ११३ ॥ म्हणून असा पुरुष पूर्ण मुक्त असतो. तो कर्म करीत असतो तरी कर्मरहितच असतो. सगुण असला तरी गुणरहित असतो, यांत मुळींच शंका नाही. ॥ ११४ ॥

**गतसङ्गस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः। यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते॥ २३॥**
**ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम्। ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना॥ २४॥**

**अर्थ**—ज्याचे चित्त आत्मज्ञानांत गढून गेले व ज्याची कर्म व कर्मफल यांच्या ठिकाणची आसक्ति नाहिशी झाली, म्हणून ज्याचे कर्मानुष्ठान केवळ परमेश्वराची आज्ञा आहे असें समजूनच होते, अशा मुक्त पुरुषाचे सर्व कर्म त्याचे ठिकाणींच लीन होते. म्हणजे कर्म फलस्वरूपाने उदयास येत नाही. ॥ २३ ॥ ज्ञानी पुरुषाला अर्पणक्रिया ब्रह्मस्वरूपच भासते, हविर्द्रव्यहि ब्रह्मच दिसते, अग्नि त्याला ब्रह्मस्वरूपच असतो, हवनकर्ता देखील ब्रह्मस्वरूपच दिसतो, कर्माने प्राप्त होणारें फलहि तो ब्रह्मस्वरूपच पाहतो, म्हणून कर्म व ब्रह्म एकरूप पाहणारा ज्ञानी, कर्म हें ब्रह्मच आहे अशा अढळ समदृष्टीमुळे तो ब्रह्मालाच प्राप्त होतो. ॥ २४ ॥

**तो देहसंगें तरी असे। परि चैतन्यासारिखा दिसे। पाहतां परब्रह्माचेनि कसें। चोखाळु भला॥ ११५॥**
**ऐसाही परी कौतुकें। जरी कर्मे करी यज्ञादिकें। तरी तियें लया जाती अशेखें। तयाचांचि ठायीं॥ ११६॥**
**अकाळींचीं अभ्रें जैशीं। उर्मीवीण आकाशीं। हारपती आपैशीं। उदयलीं सांतीं॥ ११७॥**
**तैशीं विधीविधानविहितें। जरी आचरे तो समस्तें। तरी तियें ऐक्यभावें ऐक्यातें। पावतीचि गा॥ ११८॥**
**जें हें हवन मी होता। कां इये यज्ञीं हा भोक्ता। ऐसिया बुद्धीसी नाहीं भिन्नता। म्हणऊनियां॥ ११९॥**
**जे इष्टयज्ञ यजावे। ते हविर्मंत्रादि आघवें। तो देखतसे अविनाशभावें। आत्मबुद्धि॥ १२०॥**
**म्हणऊनि ब्रह्म तेंचि कर्म। ऐसें बोधा आलें जया सम। तया कर्तव्य तें नैष्कर्म्य। धनुर्धरा॥ १२१॥**

**अर्थ**—तो ज्ञानी पुरुष देहाचा संबंध वागवितो असें दिसतें, पण तो चैतन्यरूप असतो. परब्रह्माची कसोटी लावून पाहतां तोहि शुद्ध परब्रह्मच ठरतो. ॥ ११५ ॥ असें असूनहि जर त्यांनी यज्ञादिक कर्मे केंलीं तरी, तीं संपूर्ण त्याचे ठिकाणीं लय पावतात. ॥ ११६ ॥ ज्याप्रमाणे अकाळीं आलेली अभ्रें पाऊस न पडतां तेथल्या तेथे आकाशांत नि:शेष नाहिशीं होतात. ॥ ११७ ॥ त्याप्रमाणे सर्व विहित कर्माचें आचरण जरी ज्ञानी पुरुष करीत असला तरी तीं सर्व त्यांशीं आत्मरूप होऊन ऐक्य पावतात. ॥ ११८ ॥ हें हवनकर्म, मी हवन करणारा किंवा या यज्ञांत हा भोक्ता अशी भिन्न भिन्न बुद्धि त्याचें ठिकाणीं नसतें; म्हणजे त्याला सर्वत्र एक अद्वैत ब्रह्मच भासतें. ॥ ११९ ॥ ज्या इष्ट यज्ञाचें यजन करायचें तें हविर्द्रव्य मंत्र वगैरे तो अविनाशी आत्मस्वरूपच पाहतो. ॥ १२० ॥ म्हणून जें ब्रह्म तेंच कर्म होय, असें जो आत्मज्ञानाने दोन्ही एकरूप पाहतो अशा ज्ञान्याचें कर्म करणेंच, हे अर्जुना! नैष्कर्म असतें. ॥ १२१ ॥

**गूढार्थदीपिका**—श्लोक १८ पासून २४ पर्यंत भगवंतांनी अर्जुनाला प्राप्त पुरुषाचीं चिन्हे सांगितलीं आहेत व प्राप्त पुरुष कर्मे करूनहि ब्रह्मैक्यज्ञानामुळे कसें कर्मरहित राहतात हें दाखविलें आहे.

अद्वैत सच्चिदानंद परमेश्वरस्वरूपाचें ठिकाणीं किंवा आत्मस्वरूपाचे ठिकाणीं बुद्धि स्थिर करणें यालाच भगवान योग म्हणतात हें दुसऱ्या अध्यायांत स्पष्ट केलेंच आहे. ब्रह्मस्वरूपाचे ठिकाणीं स्थिर नसलेली बुद्धी, निरनिराळ्या पदार्थाच्या अस्तित्वाची जोपर्यंत कल्पना करते तोपर्यंत सच्चिदानंद अद्वैत अशा परमेश्वरस्वरूपाचें ठिकाणीं ती स्थिर होत नाही आणि एकदा ती तेथे स्थिर झाली की तिला एका परमेश्वरावांचून दुसऱ्या कोणत्याच पदार्थाचें ज्ञान होत नाही. म्हणून ब्रम्हस्वरूपाचे ठिकाणी स्थिर झालेले पुरुष, इतर लोकांना कर्म करतांना दिसले तरी कर्मरहित असतात असें भगवंताचें म्हणणें आहे.

**दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते। ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति॥ २५॥**

**अर्थ**—कित्येक योगी दैव यज्ञाचीच उपासना करितात व कोणी ब्रह्मारूप अग्नीत यज्ञाचें हवन करितात. ॥ २५ ॥

**आतां अविवेककुमारत्वा मुकले। जयां विरक्तीचें पाणिग्रहण जाहलें। मग उपासन जिहीं आणिलें। योगाग्नीचें॥ १२२॥**
**जे यजनशील अहर्निशीं। जिहीं अविद्या हविली मनेंसीं। गुरुवाक्यहुताशीं। हवन केलें॥ १२३॥**
**तिहीं योगाग्निकीं यजिजे। तो दैवयज्ञु म्हणिजे। जेणें आत्मसुख कामिजे। पंडुकुमरा॥ १२४॥**
**दैवास्तव देहाचें पाळण। ऐसा निश्चयो परिपूर्ण। जो चिंती ना देहभरण। तो महायोगी जाण दैवयोगें॥ १२५॥**
**आतां अवधारीं सांगेन आणिक। जे ब्रह्माग्नी साग्निक। तयांतें यज्ञेंचि यज्ञु देख। उपासिजे॥ १२६॥**

**अर्थ**—आतां अविवेकरूपी बालदशा सुटून ज्यांचें विरक्तीशीं लग्न लागलें व म्हणून मग ज्यांनी योगाग्नीची

उपासना सुरू केली. ॥ १२२ ॥ जे असे अद्वैत ब्रह्मबुद्धीने अखंड यजन करितात व ज्यांनी गुरुवचनरूपी अग्नींत मनासह अविद्येचें हवन केलें. ॥ १२३ ॥ ते अशा रीतीने जीवब्रह्मैक्यरूप योगाग्नीचें यजन करितात, म्हणून त्या यज्ञाला दैवयज्ञ म्हटलें जातें. असे यज्ञ करून ते त्या यज्ञापासून आत्मसुखाच्या प्राप्तीची इच्छा करितात. ॥ १२४ ॥ जो कोणी देहाचें पालन पोषण सर्वस्वीं, दैवाने होतें असें समजून, दैवावर टाकतो व देहाच्या पोषणाची चिंता करीत नाही, तो त्या दैवयोगाने महायोगी समजला जातो. ॥ १२५ ॥ आता, अर्जुना! आणखी एक सांगतों ऐक. जे ब्रह्मरूप अग्नि ठेवून अग्निहोत्री झाले ते यज्ञानेच यज्ञाची उपासना करितात. ॥ १२६ ॥

**श्रोत्रादीनीन्द्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति । शब्दादीन्विषयानन्य इन्द्रियाग्निषु जुह्वति ॥ २६ ॥**

**अर्थ**—कित्येक संयमरूपी अग्नींत श्रवणेंद्रियादि इंद्रियांची आहुति देतात. कित्येक दुसरे इंद्रियरूपीं अग्नींत शब्दादि विषयांची आहुति देतात. ॥ २६ ॥

**एक संयमाग्निहोत्री। ते युक्तित्रयाच्या मंत्रीं। यजन करिती पवित्रीं। इंद्रियद्रव्यीं॥ १२७ ॥**
**एकां वैराग्य रवि विवळे। तंव संयती विहार केले। तेथ अपावृत जाहले। इंद्रियानळ॥ १२८ ॥**
**तिहीं विरक्तीची ज्वाळा घेतली। तंव विकारांचीं इंधनें पळिपलीं। तेथ आशाधूमें सांडिलीं। पांचही कुंडें॥ १२९ ॥**
**मग वाक्यविधींचिया निरवडी। विषयआहुती उदंडीं। हवन केलें कुंडीं। इंद्रियाग्नीच्या॥ १३० ॥**

**अर्थ**—("त्रयमेकत्र सयमः") या योगसूत्राप्रमाणे, धारणा, ध्यान, समाधि हे तिन्ही एका वस्तूचे ठिकाणीं करणें याला संयम म्हणतात. कित्येक आसक्तिरहित असल्यामुळे पवित्र झालेल्या इंद्रियरूपी द्रव्याचें, या युक्तित्रयरूप मंत्राने संयमरूपी अग्निहोत्राचे ठिकाणीं यजन करितात. (युक्तित्रय म्हणजे शरीरांत धातुसाम्य राहील अशा रीतीने आहारविहार व निद्रा यांचें शास्त्रानुसार नियमन करणें होय). (विषय वैराग्याने विषयासक्ति सुटली की इंद्रियरूपी द्रव्य शुद्ध होतें). ॥ १२७ ॥ कोणाचे ठिकाणीं वैराग्यरूपी सूर्य प्रकाशू लागतो व त्यांचे आहार विहार सर्व संयमाने होतात, तेव्हा त्यांचे ठिकाणीं इंद्रियरूपीं अग्नि, धूमरहित होऊन तेजस्वी होतो. ॥ १२८ ॥ तो अग्नि मग विरक्तीची ज्वाळा घेतो. त्या ज्वाळेंत मनोविकारांचीं लांकडें पेटूं लागतात. त्या इंद्रियरूपी पांच कुंडांत यत्किंचित्‌हि आशेचा धूर राहत नाही. ॥ १२९ ॥ मग त्या प्रज्वलित इंद्रियाग्निकुंडांत सद्गुरूंचे वाक्य हेंच विधिवाक्य जाणून त्या विधिवाक्याचे विश्वासावर सर्व विषयांचें हवन केलें जातें. ॥ १३० ॥

**सर्वाणीन्द्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे। आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते॥ २७॥**

**अर्थ**—कित्येकजण आत्म्याचे ठिकाणीं धारणा, ध्यान समाधिरूप संयम करून ज्ञानाने प्रज्वलित झालेल्या त्या संयमरूप अग्नीमध्ये इंद्रियांच्या व प्राणांच्या सर्व कर्मांचें हवन करितात. ॥ २७ ॥

**एकीं ययापरी पार्था। दोषु क्षाळिले सर्वथा। आणिकीं हृदयारणीं मंथा। विवेकु केला॥ १३१ ॥**
**तो उपशमें निहटिला। धैर्यें वरी दाटिला। गुरुवाक्यें काढिला। बळकटपणें॥ १३२ ॥**
**ऐसें समरसें मंथन केलें। तेथ झडकरी काजा आलें। जें उज्जीवन जाहालें। ज्ञानाग्नीचें॥ १३३ ॥**
**पहिला ऋद्धिसिद्धीचा संभ्रमु। निवर्तोनि गेला धूमु। मग प्रगटला सूक्ष्मु। विस्फुलिंगु॥ १३४ ॥**
**तया मनाचें मोकळें। तेंचि पेटवण घातलें। जें यमदमीं हळुवारलें। आइतें होतें॥ १३५ ॥**
**तेणें सादुकपणें ज्वाळा समृद्धा। मग वासनांतराचिया समिधा। स्नेहेंसी नानाविधा। जाळिलिया॥ १३६ ॥**
**तेथ सोहंमंत्रें दीक्षितीं। इंद्रियकर्मांचिया आहुती। तिये ज्ञानानळीं प्रदीप्तीं। दिधलिया॥ १३७ ॥**
**पाठीं प्राणकर्मांचिये स्रुवेनिशीं। पूर्णाहुती पडली हुताशीं। तेथ अवभृथ समरसीं। सहजें जाहलें॥ १३८ ॥**
**मग आत्मबोधींचें सुख। जें संयमाग्नीचें हुतशेष। तोचि पुरोडाशु देख। घेतला तिहीं॥ १३९ ॥**
**एक ऐशिया इहीं यजनीं। मुक्त ते जाहले त्रिभुवनीं। या यज्ञक्रिया तरी आनानी। परि प्राप्य तें एक॥ १४० ॥**

**अर्थ**—याप्रमाणे कित्येक योगीपुरुष आपलें पाप नाहिसें करितात. कित्येक जण आपल्या हृदयाची अरणि (म्हणजे मंथनाचे खालचे काष्ठ) करून विवेकाची रवी करितात. ॥ १३१ ॥ मनाच्या उपशमाने रवी घट्ट धरून

अतिशय धैर्याने व गुरुवाक्यावरील दृढ विश्वासांने जोरदार मंथन करितात व ज्ञानाग्नि काढतात. ॥ १३२ ॥ असें समदृष्टीने मंथन केलें असतां तत्क्षणीं कार्य झालें समजावें, कारण त्या मंथनाने ज्ञानाग्नि प्रगट होतो. ॥ १३३ ॥ प्रथम ऋद्धिसिद्धि यांचा मोह हा धूर निघून जातो व मग अग्नीची ठिणगी प्रगट होते. ॥ १३४ ॥ त्या ठिणगींत यमनियमांच्या अभ्यासाने आयतें वाळून शुष्क झालेलें व विषयरहित झालेलें मनाचें पेटवण घातलें. ॥ १३५ ॥ त्या पेटवणाने ज्ञानाग्नि प्रज्वलित होऊन तो ज्वाळांनी युक्त होतो व त्या ज्वाळेमध्ये विषयाचें विविध स्नेह हेंच तूप, त्या तूपासह नाना वासनांच्या समिधा जाळल्या जातात. ॥ १३६ ॥ तेथे त्या प्रदीप्त ज्ञानाग्नींत यज्ञकर्त्याने सोहं मंत्राने (मी तो आहे या मंत्राने) सर्व इंद्रियें व त्यांचीं कर्मे यांच्या आहुत्या दिल्या असतां. ॥ १३७ ॥ नंतर प्राणाचें कर्म हाच स्रुवा, (म्हणजे ज्या पात्राने आहुति टाकतात तें पात्र) त्या स्रुवेने अग्नीत पूर्णाहुति दिल्यावर समदृष्टिरूप अवभृत स्नान होतें. ॥ १३८ ॥ मग आत्मज्ञानाचें हें जें संयमाग्निहोत्राचें शेष तो पुरोडाश ते सेवन करितात. ॥ १३९ ॥ कित्येकजण अशाप्रकारे यजन करून या संसारातून मुक्त होतात. या सर्व यज्ञक्रिया भिन्न असल्या तरी त्यांचे योगाने प्राप्त होणारें फळ मात्र एकच असतें. ॥ १४० ॥

**द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथापरे । स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥ २८ ॥**

**अर्थ**—द्रव्ययज्ञ म्हणजे तीर्थांत द्रव्य दान देणें, तपयज्ञ म्हणजे तप करणें, योगयज्ञ म्हणजे प्राणायामादि योगानुष्ठान करणें, स्वाध्याययज्ञ म्हणजे भगवन्नास्मरण किंवा वेदाध्ययन करणें, ज्ञानयज्ञ म्हणजे शास्त्रार्थ जाणणें ब्रह्म जाणणें इत्यादि यज्ञांचे कित्येक अनुष्ठान करितात आणि कित्येक प्रयत्न करणारे अति तीव्र व्रतें करणारे असतात. ॥ २८ ॥

**एक द्रव्ययज्ञु म्हणिपती। एक तपसामग्रीया निपजती। एक योगयागुही आहाती। जे सांगितले॥ १४१ ॥**
**एकीं शब्दीं शब्दु यजिजे। तो वाग्यज्ञु म्हणिजे। ज्ञानें ज्ञेय गमिजे। तो ज्ञानयज्ञु॥ १४२ ॥**
**हें अर्जुना सकळ कुवाडें। जे अनुष्ठितां अतिसांकडें। परी जितेंद्रियासीचि घडे। योग्यतावशें॥ १४३ ॥**
**ते प्रवीण तेथ भले। आणि योगसमृद्धी आथिले। म्हणोनि आपणपां तिहीं केलें। आत्महवन॥ १४४ ॥**

**अर्थ**—एक द्रव्ययज्ञ म्हटला जातो, कोणी तपाच्या सामग्रीलाच निर्माण करितात, शास्त्रांत सांगितलेला अष्टांगयोगरूप यज्ञहि एक आहे. ॥ १४१ ॥ शब्दाने शब्दाचें यजन म्हणजे आपल्या मुखांतून वेद शब्दाचें अध्ययन करणें हा वाग्यज्ञ होय, ज्ञानाने ज्ञेय असें परब्रह्म जाणणें तो ज्ञानयज्ञ होय. ॥ १४२ ॥ अर्जुना! हे यज्ञ सर्व कठीण आहेत, कारण यांचें अनुष्ठानांत कष्ट पडतात. असें असूनहि जितेंद्रिय पुरुषासच ते योग्यतेनुसार साधू शकतात. ॥ १४३ ॥ अशा रीतीने इंद्रियांना जिंकण्यात चांगले प्रवीण व योगाभ्याससंपन्न होतात, म्हणून आपल्या शुद्ध आत्मस्वरूपाचें ठिकाणीं आपल्या जीवदशेचें हवन करितात. म्हणजे जीवदशेचा नाश करितात. ॥ १४४ ॥

**गूढार्थदीपिका**—शुद्ध आत्मस्वरूपाचे ठिकाणीं जीवदशेचा नाश करणें याला आत्महवन म्हणतात.

**अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथापरे । प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः ॥ २९ ॥**
**अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति । सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥ ३० ॥**
**यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्म सनातनम् । नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम॥ ३१ ॥**
**एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे । कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे॥ ३२ ॥**

**अर्थ**—कोणी अपानांत प्राणाचा होम करितात म्हणजे नुसता रेचकच करितात. दुसरे प्राणाच्या ठिकाणीं अपानाचा होम करितात म्हणजे केवल पूरकच करितात. कोणी प्राण व अपान यांच्या गतीचा रोध करून प्राणायाम करितात म्हणजे आंतहि वायु जाऊं देत नाहीत व बाहेरहि येऊं देत नाहीत. म्हणजे केवल कुंभक करितात. हे सर्व प्राणायाम करणारे होत. ॥ २९ ॥ कित्येकजण आहाराचें नियमन करून प्राणाचें प्राणाच्या ठिकाणीच हवन करितात. हे सर्व यज्ञाला जाणणारेच होत व यज्ञाने आपलें सर्व पाप दग्ध करणारे होत. ॥ ३० ॥ यज्ञावशिष्ट खाणारे सनातन ब्रम्हाला प्राप्त होतात. यज्ञ न करणाऱ्याला हा लोकच मिळत नाही, तर परलोक कोठला

मिळणार? ॥ ३१ ॥ त्याप्रमाणे वेदद्वारा पुष्कळ प्रकारच्या यज्ञाचा विस्तार झाला. पण हे सर्व यज्ञ कर्मजन्य आहेत. हें जाणलें असतां तूं मुक्त होशील. ॥ ३२ ॥

**मग अपानाग्नीचे मुखीं। प्राणद्रव्यें देखीं। हवन केलें एकीं। अभ्यासयोगें॥ १४५ ॥**
**एक अपानु प्राणीं अर्पिती। एक दोहींतेंही निरुंधिती। ते प्राणायामी म्हणिपती। पंडुकुमरा॥ १४६ ॥**
**एक वज्रयोगक्रमें। सर्वाहारसंयमें। प्राणीं प्राणु संभ्रमें। हवन करिती॥ १४७ ॥**
**ऐसे मोक्षकाम सकळ। समस्त हे यजनशीळ। जिहीं यज्ञद्वारा मनोमळ। क्षाळण केले॥ १४८ ॥**
**जया अविद्याजात, जाळितां। जें उरलें निजस्वभावता। जेथ अग्नि आणि होता। उरेचिना॥ १४९ ॥**
**जेथ यजितयाचा कामु पुरे। यज्ञींचें विधान सरे। मागुतें जेथूनि वोसरे। क्रियाजात॥ १५० ॥**
**विचार जेथ न रिगे। हेतु जेथ न निगे। जें द्वैतदोषसंगें। लिंपेचिना॥ १५१ ॥**
**ऐसें अनादिसिद्ध चोखट। जें ज्ञान यज्ञावशिष्ट। तें सेविती ब्रह्मनिष्ठ। ब्रह्माहंमंत्रें॥ १५२ ॥**
**ऐसे शेषामृतें धाले। कीं अमर्त्यभावा आले। म्हणोनि ब्रह्म ते जहाले। अनायासें॥ १५३ ॥**
**येरां विरक्ति माळ न घालीचि। जयां संयमाग्नीची सेवा न घडेचि। जे योगु यागु न करितीचि। जन्मले सांते॥ १५४ ॥**
**जयां ऐहिक धड नाहीं। तयांचें परत्र पुससी काई। म्हणोनि असो हे गोष्टी पाहीं। पंडुकुमरा॥ १५५ ॥**
**ऐसें बहुतीं परी अनेग। जे सांगितले तुज कां याग। ते विस्तारूनि वेदेंचि चांग। म्हणितले आहाती॥ १५६ ॥**
**परि तेणें विस्तारें काय करावें। हेंचि कर्मसिद्ध जाणावें। येतुलेनि कर्मबंधु स्वभावें। पावेल ना॥ १५७ ॥**

**अर्थ**—कोणी अभ्यासाच्या साह्याने अपानरूपी अग्नींचें मुखांत प्राणरूपी द्रव्याचें हवन करितात म्हणजे नुसता रेचक प्राणायाम करितात. ॥ १४५ ॥ कोणी प्राणाचे ठिकाणीं अपानाचें हवन करतात म्हणजे केवळ पूरकच करितात? कोणी प्राण व अपान या दोघांचाहि रोध करितात म्हणजे केवळ कुंभक करितात. हे सर्व प्राणायामी म्हटले जातात. ॥ १४६ ॥ (सहाव्या अध्यायांत सांगितल्याप्रमाणे) लययोगांतील वज्रासनसाधनादि क्रमाने व सर्व आहाराचें नियमन करून प्राणाचें प्राणाच्या ठिकाणींच उल्हासाने हवन करितात. ॥ १४७ ॥ हे सर्व यज्ञ मोक्षाकरिताच आहेत व मोक्षाची इच्छा करणारेच हे यज्ञ करीत असतात. ते अशा यज्ञाचे द्वारा मनाचे दोष नाहिसे करितात. ॥ १४८ ॥ अशा रीतीने त्यांनी आपली सर्व प्रकारची अविद्या नाहिशी केली असतां उर्वरित जी मूळ ब्रम्हरूप स्थिति राहते तेथे अग्नि आणि हवन करणारा हे कांहीच राहत नाही. ॥ १४९ ॥ तेथे यज्ञ करणाऱ्याची यज्ञ करण्याची इच्छाहि नाहिशी होते किंवा मोक्षेच्छा पूर्ण होते. त्याच्याकरिता यज्ञाचें विधानहि राहत नाही. किंबहुना जेथून संपूर्ण क्रिया मागे फिरतात, म्हणजे कोणती क्रियाच जेथे राहत नाही. ॥ १५० ॥ जेथे विचाराचाहि प्रवेश होत नाही, तर्काने जे घेतलें जाऊं शकत नाही, जें द्वैतभावाने लिप्त होत नाही. ॥ १५१ ॥ जें यज्ञाचे शेष म्हणून उरलेलें अनादि, स्वयंभू व शुद्ध असें ब्रह्म ते अहंब्रह्मा म्हणून सेवन करितात. ॥ १५२ ॥ असें ज्ञानयज्ञाच्या शेषरूप "अहंब्रह्मास्मि" या बोधरूप अमृताने तृप्त होतात. एवढेंच नाही तर, अविनाशभावालाच प्राप्त होतात. म्हणून ते अनायासे ब्रह्मस्वरूप होतात. ॥ १५३ ॥ या यज्ञ करणाऱ्यावांचून दुसरे जे आहेत, ज्यांना जन्मास आल्यापासून संयमाग्नीची सेवा घडलीं नाही, जे योग याग कधी करीतच नाहीत, अशांना विषयवैराग्य कधी बाणत नाही. ॥ १५४ ॥ अशांना ऐहिक सुख धड मिळत नाही तेथे त्यांच्या पारलौकिक सुखाचें काय विचारायचें? म्हणून, अर्जुना! ह्यांची गोष्टच नको. ॥ १५५ ॥ याप्रमाणे पुष्कळ प्रकारें घडणारे जे अनेक याग, अर्जुना! तुला सांगितले, ते सर्व वेदाने विस्तारपूर्वक सांगितले आहेत. ॥ १५६ ॥ पण त्या विस्ताराशीं आपल्याला कांही कर्तव्य नाही. हे सर्व यज्ञ कर्मजन्य आहेत इतकें जाण. इतकें जाणलें असतां कर्माचे बंधन होणार नाही. ॥ १५७ ॥

**गूढार्थदीपिका**—योग साधल्यावांचून म्हणजे परमेश्वराचे ठिकाणीं बुद्धि स्थिर झाल्यावांचून वैराग्य बाणणें किंवा निष्काम चित्त होणें शक्य नाही व निष्काम कर्मयोगाचें अनुष्ठानहि होऊं शकत नाही; म्हणून निष्काम कर्मयोगाचें अनुष्ठान करण्याकरिता कर्माचरणाबरोबर परमेश्वराचे ठिकाणीं बुद्धि स्थिर करण्याचा व विषयवासना क्षीण

होण्याचा अभ्यास व्हायला पाहिजे. पण जोपर्यंत मन विषयसुखाकरिता चंचल होतें, तोपर्यंत परमेश्वराचे ठिकाणीं बुद्धि स्थिर होत नाही आणि वैराग्यहि बाणत नाही. म्हणून श्लोक २५ ते ३० पर्यंतच्या श्लोकांत भगवंताने नानाप्रकारच्या योगानुष्ठानांचें वर्णन केलें आहे. हे सर्व योगाभ्यासाचे प्रकार जरी कर्मरूप असले तरी, शेवटीं परमेश्वराचे ठिकाणीं बुद्धि स्थिर करून व जीवाशिवाचें ऐक्यज्ञान करून देऊन परमेश्वर प्राप्ति करून देणारे आहेत.

**श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परन्तप । सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते॥ ३३ ॥**

**अर्थ**—हे शत्रूला ताप देणाऱ्या अर्जुना! द्रव्यमय यज्ञापेक्षा ज्ञानयज्ञ हा श्रेयस्कर आहे. कारण सर्व कर्म शेवटी या ज्ञानयज्ञांत समाप्त होतें. ॥ ३३ ॥

**अर्जुना वेदु जयांचे मूळ। जे क्रियाविशेषें स्थूळ। जयां नव्हाळियेचें फळ। स्वर्गसुख॥ १५८ ॥**
**ते द्रव्यादियागु कीर होती। परी ज्ञानयज्ञाची सरी न पवती। जैशी तारातेजसंपत्ती। दिनकरापाशीं॥ १५९ ॥**
**देखें परमात्मसुखनिधान। साधावया योगीजन। जें न विसंबिती अंजन। उन्मेषनेत्रीं॥ १६० ॥**
**जें धांवतया कर्माची लाणी। नैष्कर्म्यबोधाची खाणी। जें भुकेलिया धणी। साधनाची॥ १६१ ॥**
**जेथ प्रवृत्ति पांगुळ जाहली। तर्काची दिठी गेली। जेणें इंद्रियें विसरलीं। विषयसंगु॥ १६२ ॥**
**मनाचें मनपण गेलें। जेथ बोलाचें बोलपण ठेलें। जयामाजि सांपडलें। ज्ञेय दिसे॥ १६३ ॥**
**जेथ वैराग्याचा पांगु फिटे। विवेकाचाही सोसु तुटे। जेथ न पाहतां सहज भेटे। आपणपें॥ १६४ ॥**

**अर्थ**—अर्जुना! ज्यांना वेदच मूळ आहे, जे स्थूल क्रियाविशेष आहेत व ज्यांचें अपूर्व फल म्हणजे स्वर्गसुख होय. ॥ १५८ ॥ ते द्रव्यादियज्ञहि यज्ञच आहेत, पण ज्याप्रमाणे सर्व नक्षत्रांचें तेज सूर्याच्या तेजाची बरोबरी करूं शकत नाही, तसें ते ज्ञानयज्ञाची बरोबरी करूं शकत नाहीत. ॥ १५९ ॥ अर्जुना! पहा, परमात्मसुखाचा ठेवा प्राप्त करून घेण्याकरीता योगीलोक जें ज्ञानरूपी (उन्मेष) अंजन डोळ्यांत घालण्याचे कधी विसरत नाहीत. ॥ १६० ॥ जें ज्ञान, प्रवृत्त झालेल्या कर्मांच्या वेगाचा शेंवट आहे. मी कर्मरहित आहे अशा बोधाची खाणी आहे व मोक्षसुखाच्या साधनांची तृप्ति आहे. ॥ १६१ ॥ ज्या ज्ञानाचे ठिकाणीं प्रवृत्ति पांगळी होते, जें ज्ञान पाहण्याकरिता तर्काची दृष्टिच नाहिशी होते व ज्या ज्ञानाने इंद्रियें विषयांचा संबंधच विसरतात. ॥ १६२ ॥ ज्या ज्ञानाने मनपण राहत नाही. जेथे वाणीचा शब्द प्रवृत्त होत नाही, ज्या ज्ञानांत ज्ञेय जी ब्रम्हवस्तु सांपडते. ॥ १६३ ॥ जेथें वैराग्याचाहि संबंध नाहिसा होतो, विवेकाची हांवहि नाहिशी होते आणि ज्या ज्ञानाचे ठिकाणीं आपलें स्वरूप न पाहतांच सहज आपण आपल्याला प्राप्त होतो. ॥ १६४ ॥

**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया। उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः॥ ३४॥**
**यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पाण्डव। येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि॥ ३५॥**
**अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः। सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं सन्तरिष्यसि॥ ३६॥**
**यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन। ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा॥ ३७॥**

**अर्थ**—आत्मतत्वाला जाणणारे ज्ञानी पुरुष आहेत तेच तुला ज्ञान सांगू शकतात, पण त्या ज्ञानी पुरुषांची सेवा करून, अत्यंत नम्रभावाने त्यांचे पायावर डोकें ठेऊन व त्यांच्याशीं प्रश्नोत्तररूप चर्चा करून तें ज्ञान जाणून घे. ॥ ३४ ॥ जें ज्ञान जाणलें असतां, अर्जुना! पुन: तुला असा मोह होणार नाही व ज्या ज्ञानाने ही संपूर्ण भूतसृष्टि आपल्या आत्मस्वरूपाचे ठिकाणीं म्हणजेच माझ्या ठिकाणीं भासत आहे असें तुला कळून येईल. ॥ ३५ ॥ तूं जरी सर्व पाप्यांमध्ये अत्यंत पापी असलास तरी या ज्ञानरूपी नावेने त्या सर्व पापांपासून मुक्त होशील. ॥ ३६ ॥ हे अर्जुना! ज्याप्रमाणे पेटलेला अग्नि, लांकडें जाळून भस्म करितो, त्याप्रमाणेच हा ज्ञानाग्नि देखील सर्व पापें जाळून भस्म करितो. ॥ ३७ ॥

**तें ज्ञान पैं गा बरवें। जरी मनीं आथि आणावें। तरी संतां या भजावें। सर्वस्वेंशीं॥ १६५ ॥**
**जे ज्ञानाचा कुरुठा। तेथ सेवा हा दारवंटा। तो स्वाधीन करीं सुभटा। वोळगोनी॥ १६६ ॥**

**तरी तनुमनुजीवें। चरणासीं लागावें। आणि अगर्वता करावें। दास्य सकळ॥ १६७॥**
**मग अपेक्षित जें आपुलें। तेंही सांगती पुसिलें। जेणें अंत:करण बोधलें। संकल्पा न ये॥ १६८॥**
**जयाचेनि वाक्यउजिवडें। जाहलें चित्त निधडें। ब्रह्माचेनि पाडें। नि:शंकु होय॥ १६९॥**
**ते वेळीं आपणपेयांसहितें। इयें अशेषेंही भूतें। माझां स्वरूपीं अखंडितें। देखसी तूं॥ १७०॥**
**ऐसें ज्ञानप्रकाशें पाहेल। तैं मोहांधकारु जाईल। जैं श्रीगुरुकृपा होईल। पार्था गा॥ १७१॥**
**जरी कल्मषांचा आगरु। तूं भ्रांतीचा सागरु। व्यामोहाचा डोंगरु। होउनी अससी॥ १७२॥**
**तऱ्ही ज्ञानशक्तिचेनि पाडें। हें आघवेंचि गा थोकडें। ऐसें सामर्थ्य असे चोखडें। ज्ञानीं इये॥ १७३॥**
**देखें विश्वभ्रमाऐसा। जो अमूर्ताचा कडवसा। तो जयाचिया प्रकाशा। पुरेचिना॥ १७४॥**
**तया कायसे हे मनोमळ। हें बोलतांचि अति किडाळ। नाहीं येणें पाडें ढिसाळ। दुजें जगीं॥ १७५॥**
**सांगें भुवनत्रयाची काजळी। जे गगनामाजि उधवली। तियें प्रळयींचे वाहटुळी। काय अभ्र पुरे॥ १७६॥**
**कीं पवनाचेनि कोपें। पाणियेंचि जो पळिपे। तो प्रळयानळु दडपे। तृणें काष्ठें काइ॥ १७७॥**

**अर्थ**—हें उत्तम आत्मज्ञान आपल्याला प्राप्त व्हावें असें जर वाटत असेल तर ज्ञान प्राप्त झालेल्या सत्पुरुषांची सर्व भावाने उपासना करावी. ॥ १६५ ॥ हे सत्पुरुष म्हणजे ज्ञानाचें कोठार होत. त्यांची सेवा हा त्या कोठाराचा दारवंठा होय. त्या सेवारूपी दारवंठ्याचा अवलंब करून तूं तो आपल्या स्वाधीन करून घे. ॥ १६६ ॥ हा सेवारूपी दारवंठा स्वाधीन करून घेण्याकरिता शरीर, मन व जीवभाव हे संतांना अर्पण करून त्यांचे पाय धरावे व अत्यंत नम्र व निरहंकार होऊन त्यांची सेवा करावी. ॥ १६७ ॥ अशा प्रेमाने केलेल्या सेवेने ते प्रसन्न होऊन आपलें इच्छित जें आत्मज्ञान त्याच्याविषयी प्रश्न केला असतां त्याचा बोध करून देतात. हें ज्ञान प्राप्त झालें असतां अंत:करण संकल्प करणेंच विसरतें म्हणजे आत्मपदार्थावांचून इतर पदार्थाची कल्पनाच करीत नाही. ॥ १६८ ॥ आत्मज्ञान करून देणाऱ्या त्या संतवचनाने चित्त निर्भय होतें व जीव परब्रम्हासारखाच नि:संशय होतो. ॥ १६९ ॥ त्यावेळी आपल्यासह सर्व भूतें भगवंताचे ठिकाणीं, अर्जुना! तू एकरूप पाहूं लागशील. ॥ १७० ॥ अर्जुना! अशी श्रीगुरुकृपा होऊन जेव्हा या ज्ञानप्रकाशाचा उदय होईल तेव्हा हा तुझा मोहांध:कार संपूर्ण नाहिसा होईल. ॥ १७१ ॥ अर्जुना! जरी तूं सर्व पापांचें घर असलास किंवा भ्रांतीचा समुद्र असलास अथवा मोंहाचा डोंगर असलास. ॥ १७२ ॥ तरी आत्मज्ञानाच्या शक्तीच्या मानाने हे सर्व क:पदार्थ आहेत. एवढें आत्मज्ञान समर्थ आहे. ॥ १७३ ॥ अर्जुना! हें पहा, हा जो जगदाभास निराकार ब्रम्हाचा अंधुक प्रकाशरूप किरण आहे, तो देखील त्या ज्ञानप्रकाशापुढे कांहीच नाही. ॥ १७४ ॥ मग त्या ज्ञानापुढे मनाचे दोष काय आहेत? खरोखर अशी तुलना करणें देखील योग्य नाही. या ज्ञानासारखा दुसरा थोर पदार्थच नाही. ॥ १७५ ॥ अर्जुना! सांग बरें, त्रैलोक्यरूप ब्रम्हांडाची प्रलयाग्नीने झालेली राखरांगोळी आकाशांत उडवणाऱ्या प्रलयकाळाच्या वाऱ्यापुढे, अभ्र टिकू शकेल काय? ॥ १७६ ॥ वायूचाहि कोप होऊन त्याच्या साहायाने धडाडलेला व सर्व पाणी शोषून घेणारा प्रलयकाळचा अग्नि गवत लांकडें यांनी दडपला जाईल का? ॥ १७७ ॥

**न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते । तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विन्दति॥ ३८॥**

**अर्थ**—या लोकांत आत्मज्ञानासारखी पवित्र वस्तु दुसरी कोणतीच नाही. हें ब्रम्हज्ञान कर्मयोगाने अत्यंत शुद्धचित्त झालेल्या पुरुषाला कालान्तराने आपल्याच ठिकाणीं होतें (म्हणजे परमेश्वर कृपेने ज्ञानसंपन्न अशा श्रीगुरुची प्राप्ति होऊन त्या श्रीगुरूच्या द्वारा मी ब्रम्ह आहे असा अनुभव येतो.) ॥ ३८ ॥

**म्हणोनि असो हें न घडे। तें विचारितांचि असंगडें। पुढती ज्ञानाचेनि पाडें। पवित्र न दिसे॥ १७८॥**
**एथ ज्ञान हें उत्तम होये। आणिकही एक तैसें कें आहे। जैसें चैतन्य कां नोहे। दुसरें गा॥ १७९॥**
**या महातेजाचेनि कसें। जरी चोखाळु प्रतिबिंब दिसे। कां गिंवसिलें गिंवसे। आकाश हें॥ १८०॥**
**नातरी पृथ्वीचेनि पाडें। कांटाळें जरी जोडे। तरी उपमा ज्ञानीं घडे। पंडुकुमरा॥ १८१॥**
**म्हणूनि बहुतीं परीं पाहतां। पुढतपुढती निर्धारितां। हे ज्ञानाची पवित्रता। ज्ञानींचि आथि॥ १८२॥**

**जैसी अमृताची चवी निवडिजे। तरी अमृताचिसारिखी म्हणिजे। तैसें ज्ञान हें उपमिजे। ज्ञानेंसींचि॥ १८३॥**
**आतां यावरी जें बोलणें। तें वायांचि वेळु फेडणें। तंव सांचचि जी हें पार्थु म्हणे। जें बोलत असां॥ १८४॥**
**परि तेंचि ज्ञान केवीं जाणावें। ऐसें अर्जुनें जंव पुसावें। तंव तें मनोगत देवें। जाणितलें॥ १८५॥**
**मग म्हणतसे किरीटी। आतां चित्त देईं इये गोठी। सांगेन ज्ञानाचिये भेटी। उपाय तुज॥ १८६॥**

**अर्थ**—म्हणून आत्मज्ञानाने पाप जळत नाही हें म्हणणें विचाराने विसंगत दिसतें; कारण आत्मज्ञानाच्या बरोबरीचें दुसरें कांही पवित्र दिसत नाही. ॥ १७८ ॥ एक आत्मज्ञान उत्तम ठरल्यावर तसेंच उत्तम दुसरें कोणतें राहू शकेल? ज्याप्रमाणे चैतन्य एकच, दुसरें नाही, त्याप्रमाणे आत्मज्ञान हें एकच सर्वांत श्रेष्ठ आहे. ॥ १७९ ॥ जर एखादे वेळी या सूर्याच्या तेजाची कसोटी त्या सूर्याच्या प्रतिबिंबाच्या तेजाला लावून पाहतां प्रतिबिंबाचें तेज सूर्याच्या तेजाच्या बरोबरीचें ठरेल किंवा आकाश कवटाळण्याचा प्रयत्न करणाऱ्याकडून तें कवटाळलें जाईल. ॥ १८० ॥ किंवा तोलांत पृथ्वीच्या बरोबरीचें दुसरें कांही सापडेल तरच आत्मज्ञानाला उपमा देतां येईल. ॥ १८१ ॥ म्हणून पुष्कळ रीतीने पाहून व विचार करून निर्णय केला असतां असेंच दिसतें की या आत्मज्ञानाची पवित्रता आत्मज्ञानाच्याच ठिकाणीं आहे. ॥ १८२ ॥ ज्याप्रमाणे अमृताची रुचि अमृतासारखीच म्हणावी लागते, त्याप्रमाणे आत्मज्ञानाला आत्मज्ञानाचीच उपमा देतां येते. ॥ १८३ ॥ आता या पलीकडे बोलणें म्हणजे व्यर्थ वेळ घालविणें आहे. हें ऐकून अर्जुन म्हणतो, देवा! तुम्ही म्हणतां तेंच खरें आहे. ॥ १८४ ॥ पण तें आत्मज्ञान कसें जाणायचें हें देवाला अर्जुन विचारतो तोच देवानेच अर्जुनाच्या मनांतील इच्छा जाणली. ॥ १८५ ॥ ती जाणून मग देव म्हणतात, अर्जुना! या ज्ञानाचा अनुभव घेण्याचा उपाय मी तुला आता सांगतो तो चित्त देऊन ऐक. ॥ १८६ ॥

**श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेन्द्रियः। ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति॥ ३९॥**

**अर्थ**—आत्मज्ञानप्राप्तीच्या मागे लागून गुरुसेवादिक साधनें करणाऱ्या व इंद्रियें स्वाधीन ठेवणाऱ्या श्रद्धावान पुरुषाला ज्ञानप्राप्ति होते. हें ज्ञान प्राप्त झालें असतां तात्काळ परमशांति प्राप्त होते (चित्तातील विषयसुखाची धडपड नि:शेष नाहिशी होते असा भाव). ॥ ३९ ॥

**तरी आत्मसुखाचिया गोडिया। विटे जो कां सकळ विषयां। जयाचां ठायीं इंद्रियां। मानु नाहीं॥ १८७॥**
**जो मनासी चाड न सांगे। जो प्रकृतीचें केलें नेघे। जो श्रद्धेचेनि संभोगें। सुखिया जाहला॥ १८८॥**
**तयातेंचि गिंवसित। तें ज्ञान पावे निश्चित। जयामाजी अचुंबित। शांति असे॥ १८९॥**
**तें ज्ञान हृदयीं प्रतिष्ठे। आणि शांतीचा अंकुर फुटे। मग विस्तार बहु प्रगटे। आत्मबोधाचा॥ १९०॥**
**मग जेउती वास पाहिजे। तेउती शांतीचि देखिजे। तेथ अपारा पारु नेणिजे। निर्धारितां॥ १९१॥**
**ऐसा हा उत्तरोत्तरु। ज्ञानबीजाचा विस्तारु। सांगतां असे अपारु। परि असो आतां॥ १९२॥**

**अर्थ**—आत्मसुखाच्या गोडीने जो सर्व विषयसुखाला विटला, जो इंद्रियांच्या इच्छेला मुळीच मान देत नाही. ॥ १८७ ॥ जो आपली आत्मसुख भोगण्याची इच्छा मनाला कधी सांगत नाही, जो प्रकृतीचें कर्म आपलें ठिकाणीं मानीत नाही आणि शास्त्र व गुरु यांच्या वचनावर दृढ विश्वास ठेवून निश्चिंत झाला. ॥ १८८ ॥ ब्रह्मज्ञान आपोआप त्याचा शोध करीत त्याच्याकडे येतें व त्या ज्ञानांत स्वाभाविक शांति असते. ॥ १८९ ॥ आत्मज्ञानाची हृदयांत दृढ प्रतिष्ठा झाली की तेथे शांतीचा अंकुर फुटतो. मग तें आत्मज्ञान बहु विस्तारलें जातें म्हणजे व्यापक होतें किंवा सर्व पदार्थांशी ऐक्य करतें ("ज्ञान जिया तिया परी। जगीं आत्मैक्य करी" अमृ० प्र० ४ ओ० ३) ॥ १९० ॥ मग जेथे जेथे दृष्टि पडेल तेथें तेथे शांत अशा आत्म्याचाच प्रत्यय येतो व तेथे विचार करून पाहतांहि आपपर असा भेद सांपडत नाही. ॥ १९१ ॥ असा हा आत्मज्ञानाचा वाढता विस्तार अमर्याद होतो, म्हणून पुरे. अर्जुना! येथेच आपण थांबूं. ॥ १९२ ॥

**गूढार्थदीपिका**—३४ व्या श्लोकांत संताला शरण जाऊन ज्ञान प्राप्त करून घ्यावें असें सांगून "श्रद्धावाँल्लभते ज्ञानं" या ३९ व्या श्लोकांत श्रद्धावान्, तत्पर व संयतेंद्रिय पुरुषांना ज्ञान प्राप्त होतें असें भगवंतांनी सांगितले. येथे

हे ज्ञानप्राप्तीचे निरनिराळे मार्ग आहेत असें कोणी म्हणतात. पण हे निरनिराळे मार्ग नाहीत. ज्याप्रमाणे आधी झाडावर फळ पाहून मग आपण तें तोडतों, त्याप्रमाणे ३४ वें श्लोकांत अनुभवी संतांच्या मुखाने परब्रह्माचें स्वरूप जाणून घेऊन, मग तें आपल्या ठिकाणीं दृढ बाणवून घेण्याचे उपाय ३९ वे श्लोकांत सांगितले आहेत. अनुभवी संताच्या मुखाने परब्रह्माचें स्वरूप समजून घेणें याला वेदान्तांत परोक्ष ज्ञान म्हणतात आणि जाणलेली स्थिति दृढ अभ्यासाने आपल्या ठिकाणीं अनुभविणें याला अपरोक्ष ज्ञान म्हणतात.

याप्रमाणे आत्मज्ञानाचे परोक्ष व अपरोक्ष असे दोन भाग आचार्यांनी व सर्व संतांनी मानिले आहेत. "**आत्मावाऽरे दृष्टव्यः श्रोतव्यः मन्तव्यः निदिध्यासितव्यः**" अशी श्रुति असून या श्रुतीचाच अर्थ श्रीमुकुंदरायांनी "**आधीं आत्मयातें जाणावे। मग तयातें साधावें**" या ओवीने सांगितला आहे. म्हणून परमेश्वरप्राप्तीकरिता संतरूपी सदगुरूची आवश्यकता असून श्रीगुरूच्या वचनांवर दृढ श्रद्धा, सांगितल्याप्रमाणे वागणें व तसें वागण्याकरिता आपलीं इंद्रियें स्वाधीन ठेवणें हें सर्व आवश्यक आहे.

जीव कितीहि बुद्धीमान असला तरी अनुभवी संतांच्या मुखाने जसा आत्मस्वरूपाचा संशयरहित परिचय होतो तसा तो स्वत:च्या बुद्धीने होऊंच शकत नाही. "**तद्विज्ञानार्थ। स गुरुमेवाभिगच्छेत्**" ब्रह्मस्वरूप जाणण्याकरिता संतालाच शरण गेलें पाहिजे असें मुंडकश्रुतीने सांगितलें असून "शास्त्रज्ञोऽपि स्वातंत्र्येण ब्रह्मज्ञानान्वेषण न कुर्यात्" सर्व शास्त्रांचें अध्ययन झालें त्या पुरुषाने देखील केवळ आपल्या स्वत:च्या बुद्धीच्या साह्याने ब्रह्मस्वरूप जाणण्याचा प्रयत्न करूं नये असें आचार्यांनीहि वरील श्रुतीवरील भाष्यांत म्हटलें आहे.

"**मागां झाले थोर थोर। संत महंत मुनीश्वर। तयांसहि ज्ञानविज्ञानविचार। सद्गुरूचेनि॥ ४१ ॥ श्रीरामकृष्णादिकरूनी। अतितत्पर गुरुभजनीं। सिद्ध आणि सज्जनीं। गुरुदास्य केलें॥ ४२॥ असो जयास मोक्ष व्हावा। तेणें सद्गुरू करावा। सद्गुरूविणे मोक्ष पावावा। हे कल्पांतीं न घडे.॥ ४३॥**" (दासबोध दशक ५ समास १) असें समर्थांचेंहि वचन आहे.

प्रथम एकदां झाडावर फळ पाहिलें की तें मग कोणी झाडावर चढून हस्तगत करितो, कोणी दगड मारून हस्तगत करील व कोणी काठीने त्या फळाला पाडून हस्तगत करील. त्याप्रमाणे गुरुमुखाने निश्चित झालेल्या आत्मस्थितीचा आपलें ठिकाणीं प्रत्यक्ष अनुभव कोणी ध्यानाने घेतो. कोणी विचाराने घेतो, कोणी कर्मयोगाने घेतो. याप्रमाणें आत्मस्थितीचा पूर्ण निर्णय समजून घेण्याचा, गुरुमुखाने श्रवण करणें, हाच एक उपाय असून, त्याचा साक्षात् अनुभव घेण्याचें अधिकारानुसार निरनिराळे मार्ग असतात. यालाच वेदान्तशास्त्रांत प्रक्रिया म्हणतात.

**अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति। नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः॥ ४०॥**

**अर्थ**—अज्ञानी, मूर्ख, श्रद्धाहीन, संशयी अशा। पुरुषाला ज्ञान कधी होत नाही. तो संसारपरंपराच भोगतो, अशा पुरुषाला हा लोकहि सुखाचा व परलोकहि सुखाचा होत नाही. संशयी पुरुषाला सुखच मिळत नाही.॥ ४०॥

**ऐकें जया प्राणियाचां ठायीं। इया ज्ञानाची आवडी नाहीं। तयाचें जियालें म्हणों काई। वरी मरण चांग॥ १९३॥**
**शून्य जैसें गृह। कां चैतन्येंवीण देह। तैसें जीवित तें संमोह। ज्ञानहीना॥ १९४॥**
**अथवा ज्ञान कीर आपु नोहे। परि ते चाड एकी जरी वाहे। तरी तेथ जिव्हाळा कांहीं आहे। प्राप्तीचा पैं॥ १९५॥**
**वांचूनि ज्ञानाची गोठी कायसी। परि ते आस्थाही न धरी मानसीं। तरी तो संशयरूप हुताशीं। पडिला जाण॥ १९६॥**
**जे अमृतही परि नावडे। ऐसें सावियाचि अरोचकु जैं पडे। तैं मरण आलें असे फुडें। जाणों ये कीं॥ १९७॥**
**तैसा विषयसुखें रंजे। जो ज्ञानेंसींचि माजे। तो संशयें अंगीकारिजे। एथ भ्रांति नाहीं॥ १९८॥**
**मग संशयीं जरी पडला। तरी निभ्रांत जाणें नासला। तो ऐहिकपरत्रा मुकला। सुखासि गा॥ १९९॥**
**जया काळज्वरु आंगीं बाणें। तो शीतोष्णें जैशीं नेणें। आगी आणि चांदिणें। सरिसेंचि मानी॥ २००॥**
**तैसें साच आणि लटिकें। विरुद्ध आणि निकें। संशयीं तो नोळखे। हिताहित॥ २०१॥**
**हा रात्रिदिवसु पाहीं। जैसा जात्यंधा ठाउवा नाहीं। तैसें संशयीं असतां कांहीं। मना नये॥ २०२॥**

**म्हणऊनि संशयाहूनि थोर। आणिक नाहीं पाप घोर। हा विनाशाची वागुर। प्राणियासी॥ २०३॥**
**येणें कारणें तुवां त्यजावा। आधीं हाचि एकु जिणावा। जो ज्ञानाचिया अभावा-। माजि असे॥ २०४॥**
**जैं अज्ञानाचें गडद पडे। तैं हा बहुवस मनीं वाढे। म्हणोनि सर्वथा मागु मोडे। विश्वासाचा॥ २०५॥**
**हृदयीं हाचि न समाये। बुद्धीतें गिंवसूनि ठाये। तेथ संशयात्मक होये। लोकत्रय॥ २०६॥**

**अर्थ**—अर्जुना! ऐक, ज्या पुरुषाचे ठिकाणीं या आत्मज्ञानाची आवड नाही, त्याचें जिणें व्यर्थ आहे. त्यापेक्षा तो मेलेला बरा.॥ १९३॥ जसें ओसाड घर किंवा चैतन्यावांचून देह असावा, त्याप्रमाणे त्याचें जीवन भ्रमरूप ज्ञानरहित असतें.॥ १९४॥ अथवा निश्चित ज्ञान प्राप्त झालें नाही तरी आत्मज्ञानाची थोडी इच्छा जर असली तर कांही तरी प्राप्तीची आशा असते.॥ १९५॥ आत्मज्ञानाच्या प्राप्तीची गोष्ट असो, पण त्याच्या प्राप्तीची इच्छाहि जो मनांत ठेवित नाही, तो सर्वस्वीं संशयरूप अग्नींत पडला आहे असें समजावें.॥ १९६॥ जेव्हा अमृतासारखी वस्तूहि घ्यावीशी वाटत नाही अशात अरुचि उत्पन्न झाली. तेव्हा तो रोगी निश्चित मरणार असें समजावें.॥ १९७॥ त्याप्रमाणे जो विषयसुखांतच आनंद मानितो व आत्मज्ञानाला माजरेपणाने तुच्छ लेखतो तो संशयाने ग्रस्त झाला यांत संशय नाही.॥ १९८॥ मनुष्य संशयांत पडला की नि:संशय नाश पावतो व तो ऐहिक व पारत्रिक अशा दोन्ही सुखाला मुकतो.॥ १९९॥ ज्याला भयंकर सन्निपातज्वर उत्पन्न झाला त्याला शीत-उष्णाचें ज्ञान होत नाही, तो उष्णता व चांदणें सारखेंच समजतो.॥ २००॥ त्याप्रमाणे संशयाने ग्रस्त झालेला मनुष्यहि खरें खोटे, हिताचें व अहिताचें कांहीच जाणत नसतो.॥ २०१॥ ज्याप्रमाणे जन्मांध पुरुष रात्र व दिवस ओळखत नाही त्याप्रमाणे संशयात पडलेल्या मनुष्याच्या बुद्धीला दुसऱ्याचें सांगणें मुळीच पटत नाही.॥ २०२॥ म्हणून संशयाहून दुसरें अत्यंत घोर पातक नाही. संशय हा प्राण्याचा सर्वस्वीं नाश करणारें जाळें आहे.॥ २०३॥ म्हणून अर्जुना! तूं त्याचा त्याग कर. प्रथम संशयालाच जिंक, हा संशय जेथे यथार्थ ज्ञान नाही तेथेच असतो.॥ २०४॥ जेव्हा अज्ञानाचा गाढ अंध:कार असतो, तेव्हाच याची फार वाढ होते; म्हणूनच तो विश्वासाचा मार्ग मोडतो. संशय श्रद्धाच बसूं देत नाही.॥ २०५॥ हा संशय वाढला की मनांतच सामावत नाही. तो बुद्धीलाहि मग व्यापतो. असें झालें की त्रैलोक्यांत त्याला जेथे तेथे संशयच दिसतो.॥ २०६॥

**योगसन्न्यस्तकर्माणं ज्ञानसञ्छिन्नसंशयम्। आत्मवन्तं न कर्माणि निबध्नन्ति धनञ्जय॥ ४१॥**
**तस्मादज्ञानसम्भूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः। छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत॥ ४२॥**

*ॐतत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानकर्मसन्न्यासयोगो नाम चतुर्थोऽध्याय:॥ ४॥*

**अर्थ**—ब्रह्मैक्य ज्ञानाने (अपरोक्ष ज्ञानाने) सर्व कर्माहून मी निराळा आहे असें जाणून व परोक्ष ज्ञानाने आत्मस्वरूपाविषयी सर्व संशयरहित होऊन, जो आत्मस्वरूप झाला त्याला कोणत्याहि कर्माचा लेप लागत नाही.॥ ४१॥ अर्जुना! परोक्ष ज्ञानरूप खड्गाने आपल्या हृदयांतील अज्ञानजन्य, संशय नाहिसा करून जीवब्रह्मैक्यरूप अपरोक्ष अनुभवाकरिता (परमेश्वराचे ठिकाणीं बुद्धि स्थिर करणाऱ्या) कर्मयोगाचें अनुष्ठान कर व युद्धाकरिता सज्ज हो.॥ ४२॥

**ऐसा जरी थोरावे। तरी उपायें एकें आंगवे। जरी हातीं होय बरवें। ज्ञानखड्ग॥ २०७॥**
**तरी तेणें ज्ञानशस्त्रें तिखटें। निखळु हा निवटे। मग नि:शेष खता फिटे। मानसींचा॥ २०८॥**
**याकारणें पार्था। उठीं वेगीं वरौता। नाशु करोनि हृदयस्था। संशयासी॥ २०९॥**
**ऐसें सर्वज्ञाचा बापु। जो श्रीकृष्णु ज्ञानदीपु। तो म्हणतसे सकृपु। ऐकें राया॥ २१०॥**
**तंव या पूर्वापर बोलाचा। विचार करूनि कुमरु पंडूचा। कैसा प्रश्नु हन अवसरींचा। करिता होईल॥ २११॥**
**ते कथेचि संगति। भावाची संपत्ति। रसाची उन्नति। म्हणिपेल पुढां॥ २१२॥**
**जयाचिया बरवेपणीं। कीजे आठां रसांची ओवाळणी। जो सज्जनाचिये आयणी। विसांवा जगीं॥ २१३॥**
**तो शांतुचि अभिनवेल। ते परियसा मऱ्हाटे बोल। जे समुद्राहूनि खोल। अर्थभरित॥ २१४॥**
**जैसें बिंब तरी बचकें एवढें। परि प्रकाशा त्रैलोक्य थोकडें। शब्दाची व्याप्ति तेणें पाडें। अनुभवावी॥ २१५॥**

नातरी कामितयाचिया इच्छा। फळे कल्पवृक्षु जैसा। बोलु व्यापकु होय तैसा। तरी अवधान द्यावें॥ २१६॥
हें असो काय म्हणावें। सर्वज्ञु जाणती स्वभावें। तरी निकें चित्त द्यावें। हे विनंति माझी॥ २१७॥
जेथ साहित्य आणि शांति। हे रेखा दिसे बोलती। जैसी लावण्यगुणकुळवती। आणि पतिव्रता॥ २१८॥
आधींचि साखर आवडे। आणि तेचि जरी ओखदीं जोडे। तरी सेवावी ना कां कोडें। नावानावा॥ २१९॥
सहजें मलयानिलु मंदु सुगंधु। तया अमृताचा होय स्वादु। आणि तेथेंचि जोडे नादु। जरी दैवगत्या॥ २२०॥
तरी स्पर्शें सर्वांग निववी। स्वादें जिव्हेतें नाचवी। तेवींची कानाकरवीं म्हणवी। बापु माझा॥ २२१॥
तैसें कथेचें इये ऐकणें। एक श्रवणासी होय पारणें। आणि संसारदुःख मूळवणें। विकृतीविणें॥ २२२॥
जरी मंत्रेंचि वैरी मरे। तरी वायांचि कां बांधावी कटारें। रोग जाय दुधें साखरें। तरी निंब कां पियावा॥ २२३॥
तैसा मनाचा मारु न करितां। आणि इंद्रियां दुःख न देतां। एथ मोक्षु असे आयता। श्रवणाचिमाजी॥ २२४॥
म्हणोनि आथिलिया आराणुका। गीतार्थु हा निका। ज्ञानदेवो म्हणे आइका। निवृत्तिदासु॥ २२५॥

*इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां चतुर्थोऽध्यायः॥ ४॥*

**अर्थ**—अर्जुना! असा संशय वाढला तरी एका उपायाने म्हणजे आपल्या हातांत ज्ञानरूपी तीक्ष्ण खड्ग-जर असलें तर तो संशय आपल्या आटोक्यांत येतो. ॥ २०७॥ त्या तीक्ष्ण ज्ञानखड्गाने हा संशय संपूर्ण नाहिसा होतो व मनाला होणाऱ्या सर्व दुःखांचा नाश होतो. ॥ २०८॥ म्हणून, अर्जुना अंतःकरणांतील संशयाचा नाश करून सत्वर युद्धाला तयार हो. ॥ २०९॥ राजा धृतराष्ट्रा! सर्व सर्वज्ञांचा पिता व ज्ञानाचा दिवा जो श्रीकृष्ण तो अत्यंत प्रेमाने असें म्हणाला. ॥ २१०॥ आता भगवंताच्या मागल्या पुढल्या बोलण्याचा विचार करून पांडुकुमार अर्जुन कसा प्रसंगाला धरून प्रश्न करील. ॥ २११॥ तो कथेचा संदर्भ व बोधाची संपत्ति व रसाचा उत्कर्ष हे सर्व पुढे सांगण्यांत येईल. ॥ २१२॥ ज्याच्या उत्तमपणावरून आठहि रसांची ओवाळणी करावी आणि जो संतांच्या चित्ताला अत्यंत आवडणारा व जगालाहि विसावा देणारा आहे. ॥ २१३॥ असा जो शांतरस तो प्रगट होईल, असें माझें समुद्राहूनहि सखोल अर्थाने भरलेले मराठी बोल श्रवण करा. ॥ २१४॥ ज्याप्रमाणे सूर्यबिंब दिसायला टिचभर दिसतें, पण त्याच्या प्रकाशाला त्रिभुवनहि कमी पडते, त्याप्रमाणे माझ्या शब्दांची बोध करून देण्याची शक्तिहि सूर्यप्रकाशाच्या बरोबरीची अनुभवाला येईल. ॥ २१५॥ किंवा ज्याप्रमाणे कामिक लोकांची जी जो कामना असेल ती ती कामना कल्पवृक्ष पुरवितो, त्याप्रमाणेच माझा बोल देखील तशाच व्यापक अर्थाने वाचकांना फलद्रूप होईल; म्हणून एकाग्र चित्ताने ऐका. ॥ २१६॥ असो, मी काय जास्त प्रशंसा करूं! पण सर्वज्ञ पुरुष जाणतात, म्हणून चांगलें एकाग्र चित्ताने ऐका, अशी माझी विनंति आहे. ॥ २१७॥ एखाद्या स्त्रीचे ठिकाणीं सौंदर्य, सद्गुण व पातीव्रत्य यांच्या अलग अलग जशा मर्यादा दिसतात, त्याप्रमाणे येथेहि अलंकाराची व शांतरसाची अलग अलग स्पष्ट मर्यादा दिसेल. ॥ २१८॥ अगोदरच साखर हा आवडणारा पदार्थ आणि तीच जर औषधांत असली तर आनंदाने वारंवार औषध घ्यावेंसें वाटेल. ॥ २१९॥ मलयपर्वतावरून आलेला वारा स्वभावतःच मंद व सुगंधयुक्त असतो आणि तेथेच सुदैवाने जर अमृताचा स्वाद असून मधुर नादहि असला॥ २२०॥ तर त्याच्या स्पर्शानें सर्वांग शीतल होईल, स्वादाने जीभ नाचूं लागेल व कानहि वाहवा वाहवा म्हणतील. ॥ २२१॥ त्याचप्रमाणे या श्रीकृष्णार्जुनांचा संवाद ऐकण्याचें फळ आहे. श्रवणेंद्रियाच्या उपासाचें पारणें सुटेल आणि संपूर्ण संसारदुःखाला अनायासे आनंदाने घालविलें जाईल. ॥ २२२॥ वैरी जर मंत्रानेच मरूं शकेल तर शस्त्र बाळगण्याचें काय काम आहे.? दुधसाखरेने रोग गेला तर कडुनिंब पिण्याचें कारण काय?॥ २२३॥ त्याप्रमाणे मनाला न मारतां व इंद्रियांनाहि दुःख न देता या श्रीकृष्णार्जुनांचा सवांद श्रवण करण्यांतच मोक्ष होतो. ॥ २२४॥ म्हणून अत्यंत प्रसन्न चित्ताने हा गीतासंवाद ऐका असें श्रीनिवृत्तिदास श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात. ॥ २२५॥

याप्रमाणे श्रीज्ञानेश्वरीच्या चवथ्या अध्यायाचा अनुवाद गूढार्थदीपिकेसह श्रीगुरुकृपेने पूर्ण झाला तो श्रीगुरुचरणीं समर्पण असो.



## समारोप

श्रीभगवान म्हणतात, अर्जुना! मागील अध्यायांत मी जो कर्मयोग सांगितला तो मागे मी विवस्वानाला सांगितला होता. विवस्वानाने मनूला व मनूने इक्ष्वाकु राजाला सांगितला. पुढे परंपरेने त्याला राजर्षि लोक जाणते झाले. नंतर तो योग लुप्त झाला. तोच पुरातन योग मी आता तुला सांगतों. हा योग म्हणजे माझें एक परम गुह्य आहे. तूं माझा प्रेमळ सखा म्हणून तें गुह्य तुजजवळ प्रगट करीत आहे.

अर्जुन म्हणतो, देवा! आपला जन्म तर आजचा व विवस्वान तर इतके पूर्वी होऊन गेले की ज्यांच्याविषयी आमच्या वडिलांनाहि माहिती नाही. तेव्हा आपण त्यांना हा योग सांगितला ही गोष्ट जरा विसंगत वाटते, पण मी ती गोष्ट खोटी आहे असेंहि म्हणूं शकत नाही. आपण त्याचा जरा उलगडा करून सांगा।

श्रीभगवान म्हणतात, अर्जुना! तुझे व माझे पुष्कळ जन्म झाले, पण तुझे जन्म तुला आठवत नाहीत. माझे मात्र सर्व जन्म मला आठवतात. तूं प्रकृतीच्या आधीन असल्यामुळे तुझ्या ठिकाणीं विस्मृति वगैरे जीवाचे धर्म आहेत. मी जन्मरहित, अविनाशी, सर्व प्रकृतीचा नियंता आहे. पण मायेने मी जन्मलों असें भासतें. हें माझें अप्राकृत जन्मकर्म जो जाणतो तो मला प्राप्त होतो व मत्स्वरूप होतो. माझे खरें स्वरूप अज्ञानाने न ओळखतां जो इतर देवतांची उपासना करितो त्याला त्याच्या भावनेप्रमाणे ती उपासना फलद्रूप होते. मी तेथे साक्षीभूत असतो. जीवांच्या स्वाभाविक गुणकर्मानुसार हे चार वर्ण मी उत्पन्न केले, पण मी त्याचा कर्ता नाही. कारण माझे ठिकाणीं कोणत्याहि कर्माचा लेप नाही व कोणत्या कर्माच्या फळाची अपेक्षाहि नाही.

अशाप्रकारे मला जाणून पूर्वी मुमुक्षु जनांनी आपआपली कर्मे केलीं. तसेंच तूहि आपलें विहित कर्म कर. कर्माची व्याप्ति अति गहन आहे, याकरिता कर्माचें, विकर्माचें व अकर्माचें तात्विकस्वरूप जाणलें पाहिजे. कर्म करीत असतांना तें कर्म मी करतों असा अभिमान जो धारण करीत नाही व त्या कर्माच्या फळाचीहि इच्छा सोडतो तो खरा योगी होय. त्याचे ठिकणीं कर्तव्य म्हणून जगांत कांहीच उरलेलें नसतें. तो कर्म करीत असतांना दिसला तरी त्याची नैष्कर्म्य स्थिती भंग पावत नाही. त्याचीं सर्व कर्मे काम व संकल्परहित असतात. तो आत्मसुखाने तृप्त असतो. त्याने आपल्या अंत:करणाचा निग्रह केलेला असतो व संसाराची मनांतून आसक्ति सोडलेली असते. प्रारब्धाने जें मिळेल त्यांत तो संतुष्ट असतो. अद्वैतभावाने तो मत्सररहित झालेला असतो. तो सर्व कर्मे परब्रम्हस्वरूप पाहतो. असा हा पूर्ण परब्रम्हस्वरूपच असतो.

ही ब्रम्हस्थिति बाणण्याकरिता लोक नानाप्रकारच्या यज्ञांची उपासना करतात. ह्या सर्व यज्ञाक्रिया भिन्न असल्या तरी साक्षात् वा परंपरेने त्या सर्वांचें फळ एकच असतें. कोणी द्रव्य यज्ञ करतात, कोणी तपयज्ञ करतात, कोणी अष्टांगयोगरूप यज्ञ करतात, कोणी वाग्यज्ञ करतात व कोणी ज्ञानयज्ञ करतात. सर्व यज्ञात ज्ञानयज्ञ श्रेष्ठ आहे. या ज्ञानयज्ञाने आत्मस्वरूपाचें ज्ञान झालें असता परमसुखाची प्राप्ति होते.

पण हें आत्मज्ञान श्रीगुरूची सेवा करून व श्रीगुरूशीं प्रश्न करूनच घ्यावें लागतें. श्रीगुरूच्या मुखाने असें परोक्षज्ञान झाल्यावर श्रद्धा इंद्रियनिग्रह इत्यादि उपायाने तें दृढ करून, त्याचा अपरोक्ष अनुभव घेतला जातो.

ज्यांनी असें आत्मज्ञान प्राप्त करून घेतलें नाही, तो विषयसुखांतच आनंद मानतो व आपलें हित कशांत आहे याची त्याला ओळख नसते. तो संशयाने ग्रस्त झालेला असतो. म्हणून, अर्जुना! खड्ग हातांत घेऊन त्या संशयाचा नाश कर व निष्काम कर्मयोगाचे आचरण करून युद्धाला सज्ज हो.

**॥ श्रीमद्सद्गुरु श्रीज्ञानेश्वरमहाराजार्पणमस्तु ॥**



॥ श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ॥

# अध्याय पांचवा

अर्जुन उवाच

**सन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि। यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम्॥ १॥**

अर्थ—अर्जुन म्हणतो, देवा! तुम्ही कर्मसंन्यासाची प्रशंसा करता व कर्मानुष्ठानाचीहि प्रशंसा करता. या दोहोंपैकी माझ्या कल्याणाचा मार्ग कोणता हें निश्चित करून मला सांगा॥ १॥

**मग पार्थु श्रीकृष्णातें म्हणे। हां हो हें कैसें तुमचें बोलणें। एक होय तरी अंत:करणें। विचारूं ये॥ १ ॥**
**मागां सकळ कर्मांचा संन्यासु। तुम्हींचि निरोपिला होता बहुवसु। तरी कर्मयोगीं केवीं अतिरसु। पोखीतसां पुढती॥ २ ॥**
**ऐसे द्व्यर्थ हें बोलतां। आम्हां नेणतयांच्या चित्ता। आपुलिये चाडे अनंता। उमजु नोहे॥ ३ ॥**
**ऐकें एकसारातें बोधिजे। तरी एकनिष्ठचि बोलिजे। हें आणिकीं काय सांगिजे। तुम्हांप्रति॥ ४ ॥**
**तरी याचिलागीं तुमतें। म्यां राउळासि विनविलें होतें। जे हा परमार्थु ध्वनितें। न बोलावा॥ ५ ॥**
**परी मागील असो देवा। आतां प्रस्तुतीं उकलु देखावा। सांगें दोहींमाजि बरवा। मार्गु कवण॥ ६ ॥**
**जों परिणामींचा निर्वाळा। अचुंबितु ये फळा। आणि अनुष्ठितां प्रांजळा। सावियाचि॥ ७ ॥**
**जैसें निद्रेचें सुख न मोडे। आणि मार्गु तरी बहुसाल सांडे। तैसें सुखासना सांगडें। सोहपें होय॥ ८ ॥**
**येणें अर्जुनाचेनि बोलें। देवो मनीं रिझले। मग होईल ऐकें म्हणितलें। संतोषोनियां॥ ९ ॥**
**देखा कामधेनुऐसी माये। सदैवा जया होये। तो चंद्रुही परी लाहे। खेळावया॥ १० ॥**
**पाहें पां शंभूची प्रसन्नता। तया उपमन्यूचिया आर्ता। काय क्षीराब्धि दूधभाता। देइजेचिना॥ ११ ॥**
**तैसा औदार्याचा कुरुठा। श्रीकृष्ण आपु जाहलिया सुभटा। कां सर्व सुखांचा वसौटा। तोचि नोहावा॥ १२ ॥**
**एथ चमत्कारु कायसा। गोसावी श्रीलक्ष्मीकांताऐसा। आतां आपुलिया सवेसा। मागावा कीं॥ १३ ॥**
**म्हणोनी अर्जुनें म्हणितलें। तें हांसोनी येरें दिधलें। तेंचि सांगेन बोलिलें। काय कृष्णें॥ १४ ॥**

**अर्थ**—मग अर्जुन श्रीकृष्णाला म्हणतो, देवा! हें तुमचें बोलणें कसें आहे हो! एक निश्चित कांही सांगितलें तर, त्याचा अंत:करणाने विचार करतां येतो. ॥ १ ॥ आत्मस्वरूपाचे ठिकाणीं सर्व कर्माचा संन्यास म्हणजे तेथे कर्म-कर्तृत्वच नाही हें तुम्हीच मागे सांगितलें; मग आता कर्मयोगाचें अनुष्ठान करावें, या गोष्टीवर कां भर देत आहा ?॥२॥ असें हे दुटप्पी बोलणें आहे, पण आमच्यासारख्या मूढांना आपल्या कल्याणाचें काय हें त्यांतून निवडतां येत नाही. ॥ ३ ॥ ऐका, देवा! मला त्यापैकी एक कोणता तरी सारभूत मार्ग सांगायचा असेल तर, आपण त्यालाच धरून बोलिलें पाहिजे, हें काय दुसऱ्यांनी तुम्हाला सांगितलें पाहिजे ?॥ ४॥ मागे एकदां आपणाला मी घरीं अशी प्रार्थना केली होती की, भगवंता! आम्हांला आपल्या बुद्धीने तुमच्या बोलण्यांतील गूढ अर्थ समजून घ्यावा लागेल, अशा गूढभाषेने मला परमार्थ सांगू नये. ॥ ५॥ परंतु मागील गोष्ट जाऊं द्या. आता तरी देवा, स्पष्ट करून सांगा की या दोन्ही मार्गांपैकी मला हितावह कोणता मार्ग आहे. ॥ ६ ॥ ज्याचा खात्रीने शेवट चांगला होईल व ज्याचें अचूक फळ मिळेल आणि खरोखरच ज्याचें अनुष्ठान करणें सरळ सोपें असेल. ॥ ७॥ ज्याप्रमाणे पालखीसारख्या सुखकर वाहनांतून प्रवास करितांना निद्रेचें सुख अंतरत नाही व मार्गहि लवकर तोडला जातो, त्याप्रमाणे तुम्ही सांगणार तो मार्ग अनुष्ठान करण्यास सोपा असावा. ॥ ८ ॥ हें अर्जुनाचें बोलणें ऐकून भगवंताला फार संतोष झाला व अर्जुनाला म्हणाले, हो बरें, अर्जुना! तुझ्या इच्छेप्रमाणेच होईल. ॥ ९ ॥ पहा, जर एखाद्या भाग्यवानाला कामधेनुसारखी आई

मिळाली, तर त्याला खेळायला चंद्र देखील मिळूं शकेल. ॥ १० ॥ तसेंच, पहा बरें उपमन्यूची दूधभात खाण्याची इच्छा होती. ती इच्छा भगवान शंकर प्रसन्न झाल्याने क्षीराब्धि (दुधाचा सागर) प्राप्त होऊन पूर्ण झाली नाही काय? ॥ ११ ॥ त्याचप्रमाणे औदार्याचें केवळ कोठारच असा श्रीकृष्ण भगवान ज्या योद्धया अर्जुनाचे स्वाधीन झाला तो अर्जुन सर्व सुखांचें वसतिस्थान कां होणार नाही? ॥ १२ ॥ येथे आश्चर्य करण्याचें कारणच नाही. ज्या अर्जुनाचा, लक्ष्मीपति भगवान धनी आहे, त्या श्रीकृष्णापाशी इच्छेप्रमाणे मागितलेंच पाहिजे. ॥ १३ ॥ म्हणून अर्जुनाने जे म्हटलें त्यावर श्रीकृष्णाने हासून जें उत्तर दिलें, तेंच मी सांगतों. ॥ १४ ॥

*श्रीभगवानुवाच*

**सन्न्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ । तयोस्तु कर्मसन्न्यासात्कर्मयोगो विशिष्यते ॥ २ ॥**
**ज्ञेयः स नित्यसन्न्यासी यो न द्वेष्टि न काङ्क्षति । निर्द्वन्द्वो हि महाबाहो सुखं बन्धात्प्रमुच्यते ॥ ३ ॥**

**अर्थ**—श्रीभगवान म्हणतात, संन्यास व कर्मयोग हे दोन्ही मार्ग आत्मकल्याण करणारेच आहेत खरे, पण त्या दोहोंमध्ये कर्मसंन्यासापेक्षा कर्मयोग हा विशेष बरा आहे. ॥ २ ॥ हे महाबाहो, अर्जुना! जो कशाचा द्वेष करीत नाही व कशाची इच्छाहि करीत नाही, तोच खरा अखंड संन्यासी होय. तो सुखदुःखादि द्वंद्वापासून व संसारबंधापासून मुक्त होतो. ॥ ३ ॥

**तो म्हणें गा कुंतीसुता। हे संन्यास योग विचारितां। मोक्षकर तत्त्वता। दोनीही होती ॥ १५ ॥**
**तरी जाणां नेणां सकळां। हा कर्मयोगु कीर प्रांजळा। जैसी नाव स्त्रियां बाळां। तोयतरणीं ॥ १६ ॥**
**तैसें सारासार पाहिजे। तरी सोहपा हाचि देखिजे। येणें संन्यासफळ लाहिजे। अनायासें ॥ १७ ॥**
**आतां याचिलागीं सांगेन। तुज संन्यासियाचें चिन्ह। मग सहजें हें अभिन्न। जाणसी तूं ॥ १८ ॥**
**तरी गेलियाची से न करी। न पवतां चाड न धरी। जो सुनिश्चळु अंतरीं। मेरु जैसा ॥ १९ ॥**
**आणि मी माझें ऐसी आठवण। विसरलें जयाचें अंतःकरण। पार्था तो संन्यासी जाण। निरंतर ॥ २० ॥**
**जो मनें ऐसा जाहला। संगीं तोचि सांडिला। म्हणोनि सुखें सुख पावला। अखंडित ॥ २१ ॥**
**आतां गृहादिक आघवें। तें कांही न लगे त्यजावें। जें घेतें जाहलें स्वभावें। निःसंगु म्हणऊनि ॥ २२ ॥**
**देखें अग्नि विझोनि जाये। मग जे राखोंडी केवळु होये। तैं ते कापुसें गिंवसूं ये। जियापरी ॥ २३ ॥**
**तैसा असतेनि उपाधी। नाकळिजे तो कर्मबंधी। जयाचिये बुद्धी। संकल्पु नाहीं ॥ २४ ॥**
**म्हणोनि कल्पना जैं सांडे। तैंचि गा संन्यासु घडे। या कारणें दोनी सांगडे। संन्यासयोगु ॥ २५ ॥**

**अर्थ**—भगवान् म्हणतात, कुंतीसुता अर्जुना! संन्यास व कर्मयोग या दोघांचा विचार करून पाहतां दोन्ही मार्ग मोक्षसाधकच आहेत. ॥ १५ ॥ तरीपण, ज्याप्रमाणे नावेंत बसून स्त्रियाना व मुलाबाळांना देखील नदी तरून जातां येते, त्याप्रमाणे कर्मयोग हा जाणत्या व नेणत्या सर्वांना अनुष्ठान करण्यास सरळ व सोपा आहे. ॥ १६ ॥ योग्यायोग्याचा विचार केल्यास कर्मयोगच सोपा आहे आणि याच अनुष्ठानाने अनायासे संन्यासमार्गाचेहि फळ मिळते. ॥ १७ ॥ या करिताच तुला हें समजावें म्हणून खऱ्या संन्याशांचें लक्षण सांगतों पहा, म्हणजे संन्यास व कर्मयोग हे दोन्ही साध्याचे दृष्टीने किंवा फळप्राप्तीचे दृष्टीने कसे सारखे आहेत हें तुला कळून येईल. ॥ १८ ॥ जो पुरुष गेल्या गोष्टीची कधी आठवण करीत नाही व प्राप्त नसलेल्या वस्तूची कधी इच्छाहि करीत नाही व अंतःकरणांत मेरुपर्वताप्रमाणे निश्चळ राहतो. ॥ १९ ॥ आणि मी अमुक देहधारी आहे व माझें अमुक हे आहे असें ज्याचे अंतःकरणात स्मरण देखील होत नाही, अर्जुना! असा पुरुष खरोखर अखंड संन्यासी होय. ॥ २० ॥ अंतःकरणांतून जो देहादिक विसरला आणि म्हणूनच जो सर्व संग सोडून निःसंग झाला, तो पुरुष निश्चिंत अनायासे अखंड सुख भोगतो. ॥ २१ ॥ अशी स्थिति प्राप्त झाली असतां कशाचाहि, घरादाराचा त्याग करावा लागत नाही, कारण स्वतः तो मनाने सर्व संग सोडून निःसंगच झालेला असतो. ॥ २२ ॥ अर्जुना, पहा. ज्याप्रमाणे अग्नि विझून गेला असतां जी नुसती राख राहते, ती कापसाने देखील घेतां येते. ॥ २३ ॥ त्याप्रमाणे तो उपाधीत असूनच कर्मादिकांनी बांधला जात नाही व बुद्धीने एकहि

संकल्प करीत नाही. ॥ २४ ॥ म्हणून आपले संकल्पविकल्प नाहिसे झाले की अनायासें संन्यास होतो व या दृष्टीने संन्यास व कर्मयोग दोन्ही सारखेच आहेत. ॥ २५ ॥

**साङ्ख्ययोगौ पृथग्बाला: प्रवदन्ति न पण्डिता: । एकमप्यास्थित: सम्यगुभयोर्विन्दते फलम् ॥ ४ ॥**
**यत्साङ्ख्यै: प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते । एकं साङ्ख्यं च योगं च य: पश्यति स पश्यति ॥ ५ ॥**
**सन्न्यासस्तु महाबाहो दु:खमाप्तुमयोगत: । योगयुक्तो मुनिर्ब्रह्म न चिरेणाधिगच्छति ॥ ६ ॥**
**योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेन्द्रिय: । सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥ ७ ॥**

**अर्थ**—संन्यास व कर्मयोग हे दोन मार्ग निराळे आहेत, असें मूर्खांनां वाटतें, शहाण्यांना वाटत नाही. कारण यांपैकी कोण्याहि एका मार्गाचें योग्य अनुष्ठान केलें असतां, दोन्ही मार्गांचे एकच फळ मिळते. ॥ ४ ॥ संन्यासमार्गाने जें फळ मिळतें तेंच कर्मयोगानेहि मिळतें, म्हणून सांख्य व योग हे दोन्ही एके ठिकाणीं जाणारेच मार्ग आहेत. असा त्यांचा एकपणा जो जाणतो तोच सांख्ययोगाचें खरें तत्व जाणतो. ॥ ५ ॥ कर्मयोगाचें अनुष्ठान केल्यावांचून संन्यासस्थिति प्राप्त होणें कठिण आहे. योगयुक्त झालेल्या मुनीला शीघ्र ब्रह्मप्राप्ति होते. ॥ ६ ॥ जो योगयुक्त झालेला आहे व म्हणून त्या योगामुळे ज्याचें अंत:करण अत्यंत शुद्ध झालें व तें ज्याच्या स्वाधीन झालें, इंद्रियेंहि ज्यांनी जिंकलीं आणि जो पुरुष सर्व प्राणिमात्रांचा अंतर्यामी आत्मा झाला, तो पुरुष कर्म करूनहि कर्माने लिप्त होत नाही. ॥ ७ ॥

**एऱ्हवीं तरी पार्था। जे मूर्ख होती सर्वथा। ते सांख्यकर्मसंस्था। जाणती केवीं ॥ २६ ॥**
**सहजें ते अज्ञान। म्हणोनि म्हणती हे भिन्न। एऱ्हवी दीपाप्रति काई आनान। प्रकाशु आहाती ॥ २७ ॥**
**पैं सम्यक् एकें अनुभवें। जिहीं देखिलें तत्त्व आघवें। दोन्हींतेंही ऐक्यभावें। मानिती गा ॥ २८ ॥**
**आणि सांख्यीं जें पाविजे। तेंचि योगीं गमिजे। म्हणोनि ऐक्यता दोहींतें सहजें। इयापरी ॥ २९ ॥**
**देखें आकाशा आणि अवकाशा। भेदु नाहीं जैसा। तैसें ऐक्य योग-संन्यासा। वोळखे जो ॥ ३० ॥**
**तयासींचि जगीं पाहलें। आपणपें तेणेंचि देखिलें। जया सांख्य-योग जाणवले। भेदेंविण ॥ ३१ ॥**
**जो युक्तिपंथें पार्था। चढे मोक्षपर्वता। तो महासुखाचा निमथा। वहिला पावे ॥ ३२ ॥**
**येरा योगस्थिति जया सांडे। तो वायांचि गा हव्यासीं पडे। परि प्राप्ति कंहीं न घडे। संन्यासाची ॥ ३३ ॥**
**जेणें भ्रांतीपासूनि हिरतलें। गुरुवाक्यें मन धुतलें। मग आत्मस्वरूपीं घातलें। हारौनियां ॥ ३४ ॥**
**जैसें समुद्रीं लवण न पडे। तंव वेगळें अल्प आवडे। मग होय सिंधूचि एवढें। मिळे तेव्हां ॥ ३५ ॥**
**तैसें संकल्पोनि काढिलें। जयाचें मनचि चैतन्य जाहलें। तेणें एकदेशियें परी व्यापिलें। लोकत्रय ॥ ३६ ॥**
**आतां कर्ता कर्म करावें। हें खुंटलें तया स्वभावें। आणि करी जऱ्हीं आघवें। तऱ्हीं अकर्ता तो ॥ ३७ ॥**

**अर्थ**—अर्जुना! एरव्ही जे मूर्ख असतात ते सांख्यमार्ग किंवा योगमार्ग कसें जाणतील ? ॥ २६ ॥ कारण ते अज्ञानी असल्यामुळे, संन्यासमार्ग व योगमार्ग भिन्न आहेत असें समजतात; परंतु वास्तविक पाहतां एकाच दिव्याला निरनिराळे प्रकाश असतात का ? ॥ २७ ॥ कोणत्याहि एका मार्गाने जाऊन ज्यांनी आत्मवस्तूचा बरोबर पूर्ण अनुभव घेतला, ते पुरुष मात्र दोन्ही मार्गांना एकरूपच पाहतात. ॥ २८ ॥ आणि संन्यास मार्गाने जी आत्मप्राप्ति व्हावयाची तीच आत्मवस्तु योगमार्गानेहि प्राप्त होते, म्हणून दोन्ही मार्गांचें या रीतीने सहजच ऐक्य आहे. ॥ २९ ॥ अर्जुना! आकाश व पोकळी या दोहोंमध्ये जसा फरक नाही, त्याप्रमाणेच योगमार्ग व संन्यासमार्ग यांचें ऐक्य जो ओळखतो. ॥ ३० ॥ ज्याला सांख्ययोगाचें ऐक्य पटले, जगांत त्याचेंच ठिकाणीं खऱ्या ज्ञानाचा प्रकाश झाला, त्यानेच आपल्या खऱ्या स्वरूपाला ओळखलें. ॥ ३१ ॥ अर्जुना! जो या कर्मयोगरूपी युक्तीच्या मार्गाने जातो, तो ब्रह्मसुखाच्या माथ्यावर निश्चित प्राप्त होतो. ॥ ३२ ॥ इतर ज्याला योगमार्गाने टाकून दिलें तो व्यर्थ संन्यासमार्ग साधण्याच्या खटपटींत पडतो. पण तो मार्ग त्याला साधत नाही व खरा संन्यास त्याला कधी प्राप्त होत नाही. ॥ ३३ ॥ ज्यांनी आपलें मन श्रीगुरूच्या उपदेशानुसार संसारभ्रांति नाहिशी करून शुद्ध केले व आत्मस्वरूपाचे ठिकाणीं स्थिर केले. ॥ ३४ ॥ ज्याप्रमाणे मिठाचा

खडा समुद्रांत जोपर्यंत मिळत नाही तोपर्यंत तो मर्यादित वाटतो, समुद्रांत मिळाला की समुद्रच होऊन जातो. ॥ ३५ ॥ त्याप्रमाणे संकल्पविकल्पापासून ज्याचें मन निराळे झाले व त्यामुळे ते मन चैतन्यस्वरूपच होऊन राहिलें, तो देहदृष्टीनें मर्यादित दिसत असला तरी सर्व ब्रह्मांड व्यापून राहतो. ॥ ३६ ॥ मग मी कर्ता, हें कर्म, तें केलें पाहिजे, अशी जाणीव त्याचे ठिकाणी मुळीच राहत नाही. अशा स्थितींत, त्याचे ठिकाणीं जें कर्म होतांना दिसतें, त्याचा तो कर्ता होत नाही, तो अकर्ता असतो. ॥ ३७ ॥

**गूढार्थदीपिका**—मी सर्व सुखदु:खांपासून मुक्त असून, केवळसच्चिदानंद आत्मस्वरूप आहे व माझें ठिकाणीं कर्म व कर्तृत्व नाही, ते सर्व प्रकृतीचेच धर्म आहेत, असें आपल्याला ओळखणें व प्रकृति स्वभावानुसार जीं कर्मे होणारीं असतील, त्या कर्मांना प्रवृत्त न करतां किंवा निवृत्त न करतां केवळ साक्षी होऊन राहणे, हा खरा कर्मसंन्यास आहे. हा संन्यास प्राप्त होण्याकरीता, विषयवैराग्य व सत्वगुणाचा उत्कर्ष होणें आवश्यक असतें. निष्काम कर्मयोगाच्या अनुष्ठानाने मन व इंद्रिये यांच्या स्वैर वर्तनाला आळा पडून क्रमाक्रमाने विषयसुखाची इच्छा नि:शेष नाहिशी होते व सत्वगुणाचा उत्कर्ष होतो. सत्वगुणाच्या उत्कर्षाने मी कर्मकर्तृत्वरहित केवलसच्चिदानंदस्वरूप आहे असें ज्ञान होण्यास जी मनाची शुद्धभूमिका आवश्यक असते तीहि तयार होते. हें कार्य कर्मयोगाचें अनुष्ठानावांचून दुसऱ्या रीतीने होत नाही, म्हणून खरा कर्मसंन्यास प्राप्त होण्याकरिता, त्यापूर्वी निष्काम कर्मयोगाचें आचरण करावेंच लागतें.

**नैव किञ्चित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित् । पश्यञ्शृण्वन्स्पृशञ्जिघ्रन्नश्नन्गच्छन्स्वपञ्श्वसन् ॥ ८ ॥**
**प्रलंपन्विसृजन्गृह्णन्नुन्मिषन्निमिषन्नपि । इन्द्रियाणीन्द्रियार्थेषु वर्तन्त इति धारयन्॥ ९ ॥**
**ब्रह्मण्याधाय कर्माणि सङ्गं त्यक्त्वा करोति यः । लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवाम्भसा॥ १० ॥**

**अर्थ**—जो योगयुक्त पुरुष तत्वज्ञानी होतो, त्याचे ठिकाणीं मी कर्म करितों अशी कर्तृत्वबुद्धि कधीच उठत नसते तो आपल्याला कर्मरहित केवळ चैतन्यस्वरूप पाहतो. लोकांना तो पाहतो, ऐकतो, स्पर्श करितो, वास घेतो, खातो, जातो, निजतो श्वासोश्वास करितो. ॥ ८ ॥ बोलतो, मलमूत्र विसर्ग करितो, डोळ्यांची उघडझांप करितो, असें दिसतें पण तो मात्र इंद्रियें आपआपल्या विषयाचा व्यापार करीत आहेत, त्यांच्याशीं माझा (आत्मस्वरूपाचा) कांही एक संबंध नाही असें अंत:करणांत धारण करितो व मी त्याच्याहून निराळा आहे असें समजतो. ॥ ९ ॥ सर्व कर्मे परब्रह्मसत्तेवर भासतात असें जाणून जो कर्माची आसक्ति व कर्तृत्व सोडून कर्मे करितो, तो कमळाच्या पानाला जसें पाणी चिटकत नाही, तसा पापरूपी कर्माने लिप्त होत नाही. ॥ १० ॥

**जे पार्था तया देहीं। मी ऐसा आठऊ नाहीं। तरी कर्तृत्व कैंचें काई। उरे सांगें॥ ३८ ॥**
**ऐसें तनुत्यागेंवीण। अमूर्ताचे गुण। दिसती संपूर्ण। योगयुक्ता॥ ३९ ॥**
**एऱ्हवीं आणिकांचिये परी। तोही एक शरीरी। अशेषींही व्यापारीं। वर्ततु दिसे॥ ४० ॥**
**तोही नेत्रीं पाहे। श्रवणीं ऐकतु आहे। परि तेथींचा सर्वथा नोहे। नवल देखें॥ ४१ ॥**
**स्पर्शासि तरी जाणे। परिमळु सेवी घ्राणें। अवसरोचित बोलणें। तयाहि आथी॥ ४२ ॥**
**आहारातें स्वीकारी। त्यजावें तें परिहरी। निद्रेचिया अवसरीं। निदिजे सुखें॥ ४३ ॥**
**आपुलेनि इच्छावशें। तोही गा चालतु दिसे। पैं सकळ कर्म ऐसें। राहाटे कीर॥ ४४ ॥**
**हें सांगों काई एकैक। देखें श्वासोच्छ्वासादिक। आणि निमिषोन्निमिष। आदिकरूनि॥ ४५ ॥**
**पार्था तयाचे ठायीं। हें आघवेंचि आथि पाहीं। परी तो कर्ता नव्हे कांहीं। प्रतीतिबळें॥ ४६ ॥**
**जैं भ्रांतिसेजे सुतला। तै स्वप्नसुखें भुलला। मग तो ज्ञानोदयीं चेइला। म्हणोनियां॥ ४७ ॥**
**आतां अधिष्ठानसंगती। अशेषाही इंद्रियवृत्ती। आपुलालिया अर्थीं। वर्तत आहाती॥ ४८ ॥**
**दीपाचेनि प्रकाशें। गृहींचे व्यापार जैसे। देहीं कर्मजात तैसें। योगयुक्ता॥ ४९ ॥**
**तो कर्में करी सकळें। परी कर्मबंधा नाकळे। जैसें न सिंपे जळीं जळें। पद्मपत्र॥ ५० ॥**

**अर्थ**—अर्जुना! जर ज्ञानी पुरुषाला, मी देह, अशी बुद्धीच स्फुरत नाही, तर त्याचे ठिकाणी कर्तृत्व तरी कसें

राहणार बरें ? ॥ ३८ ॥ याप्रमाणे योगयुक्त (म्हणजे ईश्वराप्रीत्यर्थ कर्म करतां करतां ज्याचें चित्त ईश्वराचे ठिकाणीं स्थिर झालें) पुरुषाचे ठिकाणीं देह पडण्यापूर्वीच निर्गुण निराकार परमेश्वराचे धर्म दिसू लागतात. ॥ ३९ ॥ साधारणत: इतराप्रमाणे तोंहि शरीरधारीच असतो, तरी सर्व कर्मे करतांना दिसतो. ॥ ४० ॥ तोहि डोळ्याने पाहतो, कानाने ऐकतो, पण आश्चर्य हें की तो कर्माने लिप्त होत नाही (म्हणजे त्या कर्माचें कर्तृत्व घेत नाही). ॥ ४१ ॥ स्पर्श जाणतो, नाकाने सुगंध घेतो, प्रसंगोपात्त तो बोलतोहि. ॥ ४२ ॥ आहार घेतो, जें घेऊं नये तें टाकून देतो, झोंप आली असतां झोंपतोहि. ॥ ४३ ॥ मनाची इच्छा होईल तेव्हा चालतो, याप्रमाणे सर्व कर्मे करींत असलेला दिसतो. ॥ ४४ ॥ अर्जुना! एक एक कर्म काय सांगूं, श्वासोच्छ्वासादिक व डोळे उघडणें व डोळे झांकणें इत्यादि कर्मे देखील. ॥ ४५ ॥ हे अर्जुना! त्या पुरुषाचे ठिकाणीं हीं सर्व कर्म होतात, पण आत्मस्वरूप झालेला पुरुष, माझे ठिकाणीं कर्म नाही व कर्तृत्व नाही अशा ज्ञानानुभवामुळे, त्या कर्माचा आपल्याला कर्ता मानित नाही. ॥ ४६ ॥ जोपर्यंत कर्म आहे व मी त्याचा कर्ता आहे अशा भ्रांतीच्या बिछान्यावर निजला होता, तोपर्यंत तो आपल्याला भुलला होता व आपलें ठिकाणीं कर्म व त्याचे कर्तृत्व पाहत होता, पण आता स्वस्वरूपाचे ज्ञानाने जागा झाल्यामुळे तो आपले ठिकाणीं कर्म व कर्तृत्व पाहत नाही. ॥ ४७ ॥ आता अधिष्ठानरूप आत्म्याच्या सत्तेचा संबंध घेऊन संपूर्ण इंद्रियवृत्ति आपआपल्या विषयाचे ठिकाणीं प्रवृत्त होतात, असें तो जाणतो. ॥ ४८ ॥ ज्याप्रमाणे दिव्याचे प्रकाशाच्या साह्याने आपण घरांत सर्व व्यवहार करितो, त्याप्रमाणे भगवंताचे ठिकाणीं चित्तवृत्ति स्थिर केलेल्या योगयुक्ताचीं कर्मे होत असतात. ॥ ४९ ॥ योगयुक्त पुरुष सर्व कर्मे करतांना दिसतो, पण ज्याप्रमाणे कमळाचे पानाला पाणी चिकटत नाही, त्याप्रमाणे योगयुक्त पुरुषाला, कर्म व कर्तृत्वच भासत नसल्यामुळे कर्माचा लेप होत नाही. ॥ ५० ॥

**कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिन्द्रियैरपि । योगिनः कर्म कुर्वन्ति सङ्गं त्यक्त्वात्मशुद्धये ॥ ११ ॥**

**अर्थ**—कर्मयोगी जे असतात ते आत्मशुद्ध्यर्थ म्हणजे देहादिकांचे ठिकाणीं असलेली बुद्धीची आसक्ति नाहिशी करून, बुद्धि सगुण भगवंताचे ठिकाणी स्थिर करण्याकरिता, देहाच्या सुखाकरिता कर्म करण्याची इच्छा सोडून देवून व मी कर्म करितो हा कर्तृत्वाचा अहंकार सोडून, केवळ शरीराने, केवळ मनाने, केवळ बुद्धीने व केवळ इंद्रियाने कर्म करीत असतात. ॥ ११ ॥

**देखें बुद्धीची भाष नेणिजे। मनाचा अंकुर नुदैजे। ऐसा व्यापारु तो बोलिजे। शारीरु गा ॥ ५१ ॥**
**हेंच मराठें परियेसी। तरी बाळकाची चेष्टा जैशी। योगिये कर्मे करिती तैशीं। केवळा तनु ॥ ५२ ॥**
**मग पांचभौतिक संचलें। जेव्हां शरीर असे निदेलें। तेथ मनचि राहाटे एकलें। स्वप्नीं जेवीं ॥ ५३ ॥**
**नवल ऐकें धनुर्धरा। कैसा वासनेचा संसारा। देहा होऊं नेदी उजगरा। परी सुखदुःखें भोगी ॥ ५४ ॥**
**इंद्रियांचां गांवीं नेणिजे। ऐसा व्यापारु जो निपजे। तो केवळ गा म्हणिजे। मानसाचा ॥ ५५ ॥**
**योगिये तोही करिती। परी कर्मे तेणें न बंधिजती। जे सांडिली आहे संगती। अहंभावाची ॥ ५६ ॥**
**आतां जाहालिया भ्रमहत। जैसें पिशाचाचें चित्त। मग इंद्रियांचें चेष्टित। विकळु दिसे ॥ ५७ ॥**
**स्वरूप तरी देखे। आळविलें आइके। शब्दु बोले मुखें। परी ज्ञान नाहीं ॥ ५८ ॥**
**हें असो काजेंविण। जें जें कांही कारण। तें केवळ कर्म जाण। इंद्रियांचें ॥ ५९ ॥**
**मग सर्वत्र जें जाणतें। तें बुद्धीचें कर्म निरुतें। वोळख अर्जुनातें। म्हणे श्रीहरी ॥ ६० ॥**
**ते बुद्धि धुरे करुनी। कर्म करिती चित्त देउनी। परि ते कर्मापासुनी। मुक्त दिसती ॥ ६१ ॥**
**जे बुद्धीचिये ठावूनि देहीं। तयां अहंकाराची सेचि नाहीं। म्हणोनि कर्मेचि करितां पाहीं। चोखाळले ॥ ६२ ॥**
**अगा करितेनवीण कर्म। तेंचि तें निष्कर्म। हें जाणती सवर्म। गुरुगम्य जें ॥ ६३ ॥**
**आतां शांतरसाचें भरितें। सांडीत आहे पात्रातें। जें बोलणें बोलापरौतें। बोलवलें ॥ ६४ ॥**
**एथ इंद्रियांचा पांगु। जया फिटला आहे चांगु। तयासीचि आथि लागु। परिसावया ॥ ६५ ॥**
**हा असो अतिप्रसंगु। न संडीं पां कथालागु। होईल श्लोकसंगतिभंगु। म्हणोनियां ॥ ६६ ॥**

**जें मना आकळितां कुवाडें। घाघुसितां बुद्धी नातुडे। तें दैवाचेनि सुरवाडें। सांगवलें तुज॥ ६७॥**
**जें शब्दातीत स्वभावें। तें बोलींचि जरी फावे। तरी आणिकें काय करावें। सांगे कथा॥ ६८॥**
**हा आर्तिविशेषु श्रोतयांचा। जाणोनि दास निवृत्तीचा। म्हणे संवादु तया दोघांचा। परिसोनि परिसा॥ ६९॥**
**मग श्रीकृष्ण म्हणे पार्थातें। आतां प्राप्ताचें चिन्ह पुरतें। सांगेन तुज निरुतें। चित्त देईं॥ ७०॥**

अर्थ—बुद्धीची भाषा न जाणतां म्हणजे बुद्धीने कर्माचा निश्चय न होतां, मनाचें स्फुरण न होतां म्हणजे मनाने कर्माविषयी बरा-वाईट संकल्प न करतां जो व्यापार होतो त्याला केवळ शरीराचा व्यापार म्हणतात. ॥ ५१ ॥ हेंच मराठी भाषेत सांगतों ऐक. ज्याप्रमाणे अत्यंत लहान मुलांचा व्यापार होतो, त्याप्रमाणे योग्याचें केवळ शरीराने होणारें कर्म असतें. ॥ ५२ ॥ मग हें पंचभूतांपासून बनलेलें शरीर जेव्हा निद्रेंत विसरलें जातें, तेव्हा स्वप्नांतु नुसता जसा मनाचाच व्यापार असतो. ॥ ५३ ॥ अर्जुना! कसें आश्चर्य आहे पहा, स्वप्नांत कसा नुसता वासना संस्काराचाच संसार मांडला जातो व आंथरूणावर पडलेल्या देहाला जागे न करतां, सुखदुःख भोगतो. ॥ ५४ ॥ इंद्रियें देखील स्वप्नांतलें कांही जाणत नाहीत. याप्रमाणे जो व्यापार होतो तो केवळ मनानें होणारा व्यापार होय. ॥ ५५ ॥ योगी पुरुष असा केवळ मनाचा व्यापार करितात. पण देहावर त्यांचा अहंभाव किंवा मीपणाच नसल्यामुळे, तीं कर्में त्यांना बंधनकारक होत नाहीत. मी तीं कर्में करितों असें कर्तृत्व त्यांचे ठिकाणीं स्फुरत नाही. ॥ ५६ ॥ पिशाचाचें चित्त जसें भ्रमिष्ट झालें असतां इंद्रियांचे व्यापार नीट होत नाहीत. ॥ ५७ ॥ समोर असलेलें माणूस दिसतें, त्याने हांक मारली असतां ऐकूं येते व तो त्याला उत्तरहि देतो, पण त्या कशाचेंहि त्याला ज्ञान नसतें. ॥ ५८ ॥ असो, याप्रकारें कांहीं एक उद्देश मनांत न धरतां जें जे कांही केलें जातें तें तें कर्म, केवळ इंद्रियाने केलेलें होय असें समज. ॥ ५९ ॥ भगवान म्हणतात, अर्जुना! मग जेवढें कांही जाणणें आहे, तें बुद्धीचे कर्म होय, हें जाण. ॥ ६० ॥ त्या बुद्धीला पुढे करून व चित्त देऊन तें कर्म करितात, पण कर्मांपासून ते मुक्त असतात. ॥ ६१ ॥ कारण त्यांचा मीपणा आत्मस्वरूपाचे ठिकाणीं स्थिर असल्यामुळे तो मीपणा बुद्धी पासून देहापर्यंत जीं तत्वें आहेत, त्यांपैकी कोणाचेहि ठिकाणीं नसतो. या तत्वांना अहंकाराची आठवणच नसते. अशा रीतीने हा कर्मयोगी कर्म करीत असतांना निष्काम असतो. ॥ ६२ ॥ बापा अर्जुना! मी कर्माचा कर्ता असें कर्तृत्व उत्पन्न न होतां जें कर्म होतें, त्याला नैष्कर्म म्हणतात, हें नैष्कर्म्याचें अनुभविक वर्म गुरूच्या मुखानेच कळत असतें. हें मर्मज्ञ गुरुपुत्रच जाणतात. ॥ ६३ ॥

**गूढार्थदीपिका**—कर्म हें कर्त्यावांचून उत्पन्नच होत नाही, म्हणून कर्त्यावांचून कर्म राहूं शकत नाही. तेव्हा या ओवीचा अर्थ असा आहे की आत्मस्वरूपाचे ठिकाणीं जे कर्म दिसतें, त्याचा कोणीच कर्ता दिसत नाही. आत्मा कधी कर्ता दिसत नाही. आत्मा कधी कर्ता होत नाही व करवितहि नाही, कारण कर्म करणाऱ्याला कर्ता म्हणतात व त्याच्या व्यापाराला कर्म म्हणतात. कर्ता हा चेतनच असला पाहिजे व जेव्हा देशकालवस्तु या तीन मर्यादेने तो मर्यादित असतो तेव्हाच तो कर्म करू शकतो. पण चैतन्यवस्तु ही अद्वैत, अमर्याद व घनदाट भरली आहे. तिच्या ठिकाणीं पोकळीच नाही; म्हणून ती क्रिया करूं शकत नाही व करवूं शकत नाही. जीवात्मा आपल्याला देशकालवस्तु या मर्यादेने मर्यादित मानित असला तरी खरोखर तोहि कर्म करीत नाही, पण व्यर्थच प्रकृतीच्या कर्माचें कर्तृत्व आपल्याकडे मानतो, असें भगवंतांनींच "**प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः। अहंकार विमूढात्मा कर्ताहमिति मन्यते**" (गी० अ० ३) या श्लोकाने सांगितले आहे; म्हणून जीवही कर्माचा कर्ता नाही.

प्रकृति जड असल्यामुळे कर्म करूं शकत नाही. जडाचे ठिकाणींहि कर्म करण्याची किंवा करविण्याची शक्ति नाही, कर्मरूप होण्याची शक्ति आहे, म्हणून तीहि कर्म करूं शकत नाही किंवा करवू शकत नाही. म्हणून कर्माचें अस्तित्व अज्ञानी पुरुष भ्रांतीने मानतो. ज्ञानदृष्टिने सच्चिदानंदब्रह्माहून भिन्न अशी कर्म नांवाची व्यापाररूप वस्तु नाही. सर्व कर्म नैष्कर्म ब्रह्मरूपच असून कर्म आहे, कर्म होतें व कर्म झालें ही केवळ भ्रांति होय असा अर्थ.

**अर्थ**—श्रीज्ञानेश्वर माऊली म्हणतात जी स्थिति शब्दाने सांगता येत नाही, ती गुरुकृपेने माझ्याकडून शब्दानेच सांगितली गेली म्हणून माझ्या चित्तरूपी पात्रांत शांतरसाचे भरतें येऊन तें बाहेर ओसंडू लागले. (चित्ताची कर्ता

क्रिया कर्म या त्रिपुटीरहित निर्वासन स्थिति होणे याला शांतरस म्हणतात). ॥ ६४ ॥ ज्यांचा इंद्रियांचा नि:शेष संबंध सुटला, अशा पुरुषांनाच हें निरूपण ऐकण्याचा अधिकार आहे. त्यांनाच हें समजू शकेल. ॥ ६५ ॥ श्लोक संगति सुटली जाईल; हें विषयांतर राहूं देऊं व मूळ संवादाकडेच वळूं. ॥ ६६ ॥ अर्जुना जें मनाला आकलन होऊं शकत नाही, बुद्धीने विचारांची कितीहि घासघीस केली तरी जें तिला सांपडत नाही, तें आज तुझ्या थोर सुदैवाने माझ्याकडून सांगितलें गेलें. ॥ ६७ ॥ जें स्वभावत:च शब्दाचें पलीकडे आहे, तें जर शब्दाने सांगतां आलें, तर इतर निरर्थक कथा काय करायच्या ? ॥ ६८ ॥ श्रोत्यांची ही विशेष इच्छा जाणून श्रीनिवृत्तिदास श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, श्रीकृष्ण व अर्जुन या दोघांचा संवाद आतापर्यंत ऐकला. आता तसाच पुढेहि ऐका. ॥ ६९ ॥ मग भगवान श्रीकृष्ण म्हणतात, अर्जुना! तुला आता प्राप्त पुरुषांचें चिन्ह सांगतों, तें नीट चित्त देऊन ऐक. ॥ ७० ॥

**युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शान्तिमाप्नोति नैष्ठिकीम्। अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबद्ध्यते ॥ १२ ॥**
**सर्वकर्माणि मनसा सन्न्यस्यास्ते सुखं वशी। नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ॥ १३ ॥**
**न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः। न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ॥ १४ ॥**
**नादत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः। अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः ॥ १५ ॥**
**ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः। तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ॥ १६ ॥**

**अर्थ**—कर्मफळाची इच्छा सोडून ज्याचे चित्त सगुण भगवंताचे ठिकाणीं स्थिर झालें असा योगयुक्त पुरुष अढळ शांतीला प्राप्त होतो व ज्याचें चित्त परमेश्वराचे ठिकाणीं स्थिर झालें नाही, तो विषयसुखाच्या वासनेमुळे कर्मफळाची इच्छा करितो व संसारांत पडतो. ॥ १२ ॥ सर्व कर्मांचा मनाने संन्यास करून व इंद्रियें आपल्या स्वाधीन ठेवून विषयसुखाची इच्छा न करतां, मी कर्म करितों किंवा करवितों, असें न समजणारा संयमी पुरुष या नवद्वाराच्या देहामध्ये आनंदाने राहतो. ॥ १३ ॥ सृष्टिकर्त्या परमेश्वराने लोकांचीं कर्में लोकांचें कर्तृत्व किंवा कर्मफळ यांचा संबंध यांपैकी कांही उत्पन्न केलें नाही. कर्म, कर्तृत्व व कर्मफळसंयोग या सर्वरूपाने प्रकृतीच परिणाम पावते. ॥ १४ ॥ परमेश्वर कोणाचें पाप घेत नाही व पुण्यहि घेत नाही. प्राण्यांना आत्मस्वरूपाचें जें अज्ञान असतें, त्या अज्ञानाच्या भ्रांतीमुळे हें कर्म, हा मी कर्ता, त्याचें फळ व तें मी भोगतों अशा व्यर्थ भ्रांत कल्पना प्राणी करितात. ॥ १५ ॥ आत्मस्वरूपाच्या ज्ञानाने ज्यांचें अज्ञान नाहिसें झालें. त्यांचे ठिकाणी सूर्यासारखें प्रखर प्रगट झालेलें तें आत्मज्ञान त्यांना सर्व जग आत्मस्वरूप आहे असेंच दाखवितें. ॥ १६ ॥

**तरी आत्मयोगें आथिला। जो कर्मफळाशीं विटला। तो घर रिघोनि वरिला। शांती जगीं ॥ ७१ ॥**
**येरु कर्मबंधें किरीटी। अभिलाषाचिया गांठी। कळासला खुंटीं। फळभोगाच्या ॥ ७२ ॥**
**जैसा फळाचिये हावें। ऐसें कर्म करी आघवें। मग न कीजेचि येणें भावें। उपेक्षी जो ॥ ७३ ॥**
**तो जयाकडे वास पाहे। तेउती सुखाची सृष्टि होये। तो म्हणे तेथ राहे। महाबोधु ॥ ७४ ॥**
**नवद्वारें देहीं। तो असतुचि परि नाहीं। करितुचि न करी कांहीं। फलत्यागी ॥ ७५ ॥**
**जैसा कां सर्वेश्वरु। पाहिजे तंव निर्व्यापारु। परि तोचि रची विस्तारु। त्रिभुवनाचा ॥ ७६ ॥**
**आणि कर्ता ऐसें म्हणिपे। तरी कवणें कर्मी न शिंपे। जे हातुपावो न लिंपे। उदासवृत्तीचा ॥ ७७ ॥**
**योगनिद्रा तरी न मोडे। अकर्तेपणा सळु न पडे। परी महाभूतांचे दळवाडें। उभारी भलें ॥ ७८ ॥**
**जगाचां जीवीं आहे। परि कवणाचा कहीं नोहे। जगचि हें होय जाये। तो शुद्धीही नेणे ॥ ७९ ॥**
**पापपुण्यें अशेषें। पासींचि असतु न देखे। आणि साक्षीही होऊं न ठके। येरी गोठी कायसी ॥ ८० ॥**
**पैं मूर्तीचेनि मेळें। तो मूर्तचि होऊनि खेळे। परि अमूर्तपण न मैळे। दादुलयाचें ॥ ८१ ॥**
**तो सृजी पाळी संहारी। ऐसें बोलती जे चराचरीं। तें अज्ञान गा अवधारीं। पंडुकुमरा ॥ ८२ ॥**
**तें अज्ञान जैं समूळ तुटे। तैं भ्रांतीचें मसैरें फिटे। मग अकर्तृत्व प्रगटे। ईश्वराचें ॥ ८३ ॥**
**एथ ईश्वरु एकु अकर्ता। ऐसें मानलें जरी चित्ता। तरी तोचि मी हें स्वभावता। आदीचि आहे ॥ ८४ ॥**

**ऐसेनि विवेकें उदो चित्तीं। तयासि भेदु कैंचा त्रिजगतीं। देखें आपुलिया प्रतीति। जगचि मुक्त॥ ८५ ॥**
**जैशी पूर्वदिशेच्या राउळीं। उदया येतांचि सूर्य दिवाळी। कीं येरींही दिशा तियेचि काळीं। काळिमा नाहीं॥ ८६ ॥**

**अर्थ**—जो आत्मैक्याने संपन्न झाला व जो कर्माचें फळ जें विषयसुख, त्यालाहि विटला, त्यालाच या जगांत शांतीने त्याच्या घरीं येऊन त्याच्याशीं आपलें लग्न लावलें. ॥ ७१ ॥ बाकीचे जे आत्मैक्याने संपन्न नाहीत ते विषयवासनेच्या गांठीने कर्मफळाचें खुंटीवर लटकले राहतात. ॥ ७२ ॥ कर्मफळाचे आशेने कर्म करणारा ज्या तत्परतेने कर्म करितो, त्याच तत्परतेने कर्मफळाची आशा न करिता योगी कर्म करितो, पण मी कर्ता नाही या अनुभवाने तो त्या फळाची उपेक्षा करितो. ॥ ७३ ॥ असा योगी जिकडे दृष्टि देतो तेवढें आत्मसुखच त्याच्या प्रत्ययाला येतें. तो म्हणेल तेथे आत्मबोध प्रगट होतो. ॥ ७४ ॥ नवछिद्रांच्या या देहपुरांत, तो असून नसतो व फळत्याग केल्यामुळे कर्म करूनहि कांही करीत नाही. ॥ ७५ ॥ ज्याप्रमाणे परमात्मा अखंड कर्मरहितच आहे, पण तोच ब्रह्मांडाचीं उत्पत्ति, स्थिति, प्रलय करितो. ॥ ७६ ॥ आणि जर परमेश्वराला ब्रह्मांडाचा कर्ता म्हणावें तर, तो कोणत्याहि कर्माला स्पर्श करीत नाही; कारण उदासवृत्तीमुळे त्याचे हातापायाकडून कोणते कर्मच होत नाही. ॥ ७७ ॥ त्याची योगनिद्रा म्हणजे निर्विकल्प स्थिति तर यत्किंचित् भंग पावत नाही आणि अकर्तेपणा यत्किंचित् मोडत नाही. तरी पंचभूतांचा एवढा मोठा समुदाय उत्पन्न करितो. ॥ ७८ ॥ तो सर्व जगाच्या अंतर्यामि आहे, पण कधी कोणाचा होत नाही. जगच उत्पन्न होतें व नाश पावतें; पण त्याला त्याची शुद्धिहि नाही. ॥ ७९ ॥ पापपुण्यें, जवळ असून देखील तो जाणत नाही. त्या बाकीच्या गोष्टी तर असोत, पण तो त्यांचा साक्षी देखील होऊं इच्छित नाही. ॥ ८० ॥ नामरूपांच्या योगाने सगुण साकार देह घेऊन तो लीला करितो, पण त्या जगताच्या स्वामीचें निराकारपण भंगत नाही. ॥ ८१ ॥ परमेश्वर सृष्टि उत्पन्न करितो, तिचें पोषण करितो व तिचा संहारहि तोच करितो असें जें जगांत बोललें जातें, अर्जुना! तें सर्व लोकाचे अज्ञान होय. ॥ ८२ ॥ हें अज्ञान निःशेष नाहिसें झालें असतां परमेश्वराच्या कर्तृत्वाची भ्रांति नाश पावते व मग ईश्वराचे ठिकाणीं कर्म व कर्तृत्व दोन्ही मुळीच नाही असें जाणलें जातें. ॥ ८३ ॥ मग ईश्वर अकर्ता आहे, म्हणून सृष्टि झालीच नाही ही गोष्ट चित्ताला पटली की, सृष्टि मुळीच नसल्यामुळे, मुळांत परमेश्वर व मी एकच आहोंत असा सहजच अनुभव येतो. ॥ ८४ ॥ असा जेव्हा विवेक चित्तांत प्रगट होतो, तेव्हा तिन्ही लोकांत त्याला आपल्याहून भिन्न वस्तुच दिसत नाही आणि त्या अनुभवाने, तो आपल्याप्रमाणे सर्व जीवांना उपाधिरहित म्हणजे मुक्त समजतो. ॥ ८५ ॥ ज्याप्रमाणे पूर्व दिशेच्या घरीं सूर्याचा उदय झाल्याबरोबर जिकडे तिकडे सूर्यप्रकाशाची दिवाळी होते किंवा पूर्वदिशेप्रमाणे इतर दिशांचे ठिकाणीं अंधार नाहिसा होऊन प्रकाश होतो. ॥ ८६ ॥

**गूढार्थदीपिका**—एका आत्मवस्तूवांचून, जीवदशा, कर्म व कर्तृत्व, कर्मफळ इत्यादि आपले ठिकाणीं व कर्मफलदातृत्व, सृष्टिउत्पत्त्यादि कर्म व त्याचें कर्तृत्व परमेश्वराचे ठिकाणीं जीवानेच आपल्या अज्ञानभ्रांतीने आरोपित केलें आहे. वस्तुतः यापैकी कांहीच नाही. केवळ एक सच्चिदानंदपरब्रह्मच आहे. असा परमेश्वराचा व आत्मज्ञानी पुरुषाचा एकच अनुभव असतो असा अर्थ.

**तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः । गच्छन्त्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः ॥ १७ ॥**
**विद्याविनयसम्पन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि। शुनि चैव श्वपाके च पण्डिताः समदर्शिनः ॥ १८ ॥**
**इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः। निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः ॥ १९ ॥**

**अर्थ**—ज्यांनी बुद्धीने आत्मज्ञानाचाच निश्चय केला. मी ब्रह्म असेंच सर्वकाळ समजतात, ब्रह्मस्वरूपाचे ठिकाणीं कर्मसमर्पणरूप कर्मयोगाने चित्त स्थिर झालें व सर्व कर्मांचा परमेश्वराचे ठिकाणीच संन्यास केला, असे पुरुष आत्मज्ञानाने संपूर्ण पापरहित होऊन पुनः जन्माला येत नाहीत. ॥ १७ ॥ विद्याविनयादि सद्गुणसंपन्न ब्राह्मणाचे ठिकाणीं व गाय, हत्ती, कुत्रें व चांडाळ या सर्वांचे ठिकाणीं ज्ञानी पुरुषाची समदृष्टिच असते. ॥ १८ ॥ ज्यांचें चित्त समतेला पावलें, त्यांनी येथे जीवंतपणीच हा संसार जिंकला असतो, कारण समता ही शुद्ध ब्रह्मच होय, म्हणून समचित्त झालेले पुरुष ब्रम्हस्वरूपाचे ठिकाणीच स्थिर असतात. ॥ १९ ॥

**बुद्धिनिश्चयें आत्मज्ञान। ब्रह्मरूप भावी आपणा आपण। ब्रह्मनिष्ठा राखे पूर्ण। तत्परायण अहर्निशीं॥ ८७ ॥**
**ऐसें व्यापक ज्ञान भलें। जयांचिया हृदयातें गिंवसित आलें। तयांचि समता दृष्टि बोलें। विशेषूं काई॥ ८८ ॥**
**एक आपणपेंचि पां जैसें। ते देखती विश्व तैसें। हें बोलणें कायसें। नवलु एथ॥ ८९ ॥**
**परी दैव जैसें कवतिकें। कहींचि दैन्य न देखे। कां विवेकु हा नोळखे। भ्रांतीतें जेवीं॥ ९० ॥**
**नातरी अंधकाराची वानी। जैसा सूर्यो न देखे स्वप्नीं। अमृत नायके कानीं। मृत्युकथा॥ ९१ ॥**
**हें असो संतापु कैसा। चंद्र न स्मरे जैसा। भूतीं भेदु नेणती तैसा। ज्ञानिये ते॥ ९२ ॥**
**मग हा मशकु हा गजु। कीं हा श्वपचु हा द्विजु। पैल इतरु हा आत्मजु। हें उरेल कें॥ ९३ ॥**
**ना तरी हे धेनु हें श्वान। एक गुरु एक हीन। हें असो कैचें स्वप्न। जागतया॥ ९४ ॥**
**एथ भेदु तरी कीं देखावा। जरी अहंभाव उरला होआवा। तो आधींचि नाहीं आघवा। आतां विषम काई॥ ९५ ॥**
**म्हणोनि सर्वत्र सदा सम। तें आपणचि अद्वय ब्रह्म। हें संपूर्ण जाणे वर्म। समदृष्टीचें॥ ९६ ॥**
**जिहीं विषयसंगु न सांडितां। इंद्रियांतें न दंडितां। परि भोगिली निःसंगता। कामेंविण॥ ९७ ॥**
**जिहीं लोकांचेनि आधारें। लौकिकेंचि व्यापारें। पण सांडिलें निदसुरें। लौकिकु हें॥ ९८ ॥**
**जैसा जनामाजि खेचरु। असतुचि जना नोहे गोचरु। तैसा शरीरीं परि संसारु। नोळखे तयांतें॥ ९९ ॥**
**हें असो पवनाचेनि मेळें। जैसें जळींचि जळ लोळे। तें आणिकें म्हणती वेगळें। कल्लोळ हे॥ १०० ॥**
**तैसें नाम रूप तयाचें। एऱ्हवीं ब्रह्मचि तो साचें। मन साम्या आलें जयाचें। सर्वत्र गा॥ १०१ ॥**
**ऐसेंनि समदृष्टी जो होये। तया पुरुषा लक्षणही आहे। अर्जुना संक्षेपें सांगेन पाहें। अच्युत म्हणे॥ १०२ ॥**

**अर्थ**—बुद्धीचा निश्चय होऊन आत्मज्ञान झाल्यामुळे, जे सर्वकाळ आपल्याला ब्रह्मस्वरूपच समजतात; ब्रह्माचे ठिकाणीं कर्म समर्पण करून चित्त स्थिर करतात व जे याप्रमाणे अखंड ब्रह्मपरायण होतात. ॥ ८७ ॥ असे व्यापक ज्ञान ज्यांना प्राप्त झालें, त्यांची समतादृष्टि, अर्जुना! काय विशेष शब्दाने वर्णन करायची?॥ ८८ ॥ आपण जसें आपल्याला अनुभववितात, तसेंच ते सर्व विश्व पाहतात. असा हा अपूर्व प्रत्यय आहे. शब्दाने सांगतां येत नाही. ॥ ८९ ॥ ज्याप्रमाणे भाग्याला दारिद्र्य कधीच दृष्टीस पडत नाही किंवा विवेकाला भ्रांति कधी समोर दिसत नाही. ॥ ९० ॥ अथवा सूर्याला स्वप्नांत देखील अंधाराचा मासला पाहायला मिळत नाही किंवा अमृताला मृत्यूची गोष्टी ऐकण्याचा कधीं प्रसंग येत नाही. ॥ ९१ ॥ हें असूं दे, पण चंद्राला उकाड्याचें कधी ज्ञान होतें का? कधी होत नाही. त्याप्रमाणे त्या ज्ञानीं पुरुषांना भेद म्हणजे ब्रह्माहून ही भूतसृष्टि निराळी आहे किंवा भूतें परस्परांहून भिन्न आहेत असा भेद दिसत नाही. ॥ ९२ ॥ मग हा मशक, हा हत्ती, हा चांडाळ, हा ब्राह्मण असा किंवा हा माझा मुलगा व इतर परके असा भेदभाव उरेल काय?॥ ९३ ॥ अथवा ही गाय, हा कुत्रा, हा श्रेष्ठ, हा कनिष्ठ हा भेद तरी कोठला राहणार? जागणाऱ्या मनुष्याला स्वप्न कसें दिसेल?॥ ९४ ॥ जर कशाचा अहंकार उरला तरच भेदाचा प्रत्यय येतो. तो अहंकार तर पूर्वीच निःशेष नाहिसा झाला, मग विषमपणाचा प्रत्यय कोठून येणार?॥ ९५ ॥ म्हणून ज्ञानी पुरुष सर्वत्र सर्वदा समबुद्धिच असतात. ते आपणच अद्वैत ब्रह्मस्वरूप होतात व हीच खरोखर समदृष्टीची गुह्य खूण आहे. ॥ ९६ ॥ ज्यांनी विषयाचा संग न सोडतां व इंद्रियांना बळजबरीने न आवरतां, विषयसुखाची निःशेष कामना सोडल्यामुळे निःसंगपणाचा अनुभव घेतला. ॥ ९७ ॥ जो लोकांत राहूनच लोक करतात तसे व्यापार करतांना दिसतो पण हें अज्ञान-भ्रांतिजन्य लोक व लौकिक व्यापार ज्यांनी मनांतून सोडले (किंवा जो विसरला). ॥ ९८ ॥ ज्याप्रमाणे आकाशांत संचार करणारे पिशाचादिक असून लोकांना दिसत नाहीत, त्याप्रमाणे शरीरादिकांच्या ठिकाणीं होणारा संसार तो मुळीच जाणत नसतो. ॥ ९९ ॥ हें असूं दे, वाऱ्याच्या योगाने पाणीच पाण्यावर लोळतें, पण दुसरे अज्ञानी लोक त्या पाण्याच्या लोळण्याला वेगळें समजून त्याला तरंग म्हणतात. ॥ १०० ॥ त्याप्रमाणे ज्याची सर्वत्र समदृष्टि झाली असा ज्ञानी पुरुष केवळ नामरूपाने निराळा दिसतो वस्तुतः तो परब्रह्मच असतो. ॥ १०१ ॥ देव म्हणतात, अर्जुना! जो पुरुष समदृष्टि झाला त्या पुरुषाला ज्या लक्षणावरून ओळखतां येतें तें लक्षण तुला संक्षेपाने सांगतों. ॥ १०२ ॥

**गूढार्थदीपिका**—वरील श्लोकांत व त्यावरील ओव्यांत जी समदृष्टि वर्णिली आहे ती समदृष्टि म्हणजे ब्रह्मदृष्टि होय. त्या समदृष्टीने एक सच्चिदानंद परब्रह्मच अनुभवाला येतें; म्हणजे वस्तुमात्र सच्चिदानंदब्रह्मस्वरूपच भासतात व दीन-श्रीमंत, जड-चेतन, मनुष्य-पशु, सुखी-दुःखी, दुष्ट-सुष्ट इत्यादि सर्व विषम भावांचा विसर पडतो. ब्राह्मण जातीचे व मांग जातीचे किंवा पक्वान्नें व विष्ठा यांचें ज्ञान होऊन त्यांना समान लेखणें असा समदृष्टीचा अर्थ नाही.

**''भावाद्वैतं सदा कुर्यात् क्रियाद्वैतं न कर्हिचित्''॥ ८७॥** (शंकराचार्य तत्त्वोपदेश)

सर्व जगताचें कारण जी परब्रह्म वस्तु तीच सर्वत्र निरनिराळ्या नामरूपांत भरलेली आहे, असें परब्रह्माचें एक वस्तुत्व जाणणें यालाच आचार्यांनी भावाद्वैत-समदृष्टि किंवा अद्वैतदृष्टि म्हटलें आहे. भगवंतांनी गीतेंत ''अविभक्तंच भूतेषु'' या श्लोकांत निरनिराळ्या नामरूपांमुळे पृथक्-पृथक् भासणाऱ्या भावामध्ये किंवा वस्तूमध्ये एक अविनाशी परब्रह्म वस्तुच भरली आहे, असें पाहणें यालाच ज्ञान किंवा ज्ञानदृष्टि म्हटलें आहे.

या अद्वैत ज्ञानदृष्टींत किंवा समदृष्टींत व्यवहार होतच नाही. ज्ञान्यांचा व्यवहार, ही दृष्टि कायम राहून होत असला तरी, ज्ञान्यांची ही दृष्टि व्यवहार करीत नाही. ती परब्रह्माचे ठिकाणीं अभ्यासाने अखंड स्थिर झालेली असते आणि व्यवहारकालीं स्फुरणारा अहंकार हाच प्रारब्धानुसार व्यवहार करीत असतो. ज्ञानी व अज्ञानी या दोघांच्याहि ठिकाणीं दिसणारा व्यवहार अहंकारच करीत असतांना, अज्ञानी पुरुष अहंकाराचें कर्मकर्तृत्व आपल्यावर ओढून घेतो व ज्ञानी पुरुष समदृष्टीमुळे अहंकाराशीं संबंधच ठेवीत नाही व अहंकाराचें कर्मकर्तृत्व आपल्यावर ओढून घेत नाही, असा दोघांत फरक असतो.

साम्यदृष्टि किंवा अद्वैत ज्ञानदृष्टि प्राप्त होण्यापूर्वी ती प्राप्त होण्याकरिता, ज्ञानीपुरुष साधकदशेंत जें कर्मयोगाचें अनुष्ठान करितो, त्या अनुष्ठानाने तो भगवदाज्ञेच्या परतंत्र होत असल्यामुळे व त्याच्या अहंकारादि वृत्तीला भगवंताच्या आज्ञेच्या परतंत्र वागण्याचीच संवय असल्यामुळे, ज्ञान झाल्यावर किंवा समदृष्टि प्राप्त झाल्यावर, ज्ञानी पुरुषाला धर्ममर्यादा लागूं नसली तरी किंवा धर्ममर्यादेनुसार वागणें हें माझें कर्तृत्व आहे अशी कर्तव्यबुद्धि तो वागवूं शकत नसला तरी, ज्ञानी पुरुषाची अहंकारादि तत्त्वें भगवत्परायण होऊन धर्मरूप आज्ञेला अनुसरूनच वागत असतात किंवा व्यवहार करीत असतात. ते वाटेल तसे वागूं शकत नाहीत. कारण देहाहंकारामुळेच वाटेल तसें वागणें होऊं शकतें व तो अहंकार ज्ञान्याचे ठिकाणीं नसतो, असें ''न च नियोगाभावात्सम्यग्दर्शिनो यथेष्टचेष्टाप्रसंगः। सर्वत्राभिमानस्यैव प्रवर्तकत्वादभिमानाभावाच्च सम्यग्दर्शिनः'' (ब्र० सू० २। ३। ४८ शां० भा०) या वचनानें भगवान आचार्यांनी सांगितलें आहे.

वरील शास्त्रास सोडून असलेल्या अद्वैतव्यवहाराचा किंवा समदृष्टीच्या व्यवहाराचा आचार्यादि ज्ञानी पुरुषांनी निषेधच केला आहे.

**''बुध्द्याद्वैत स्वतत्वस्य यथेष्टाचरणं यदिः शुनां तत्वदृशां चैव को भेदोऽशुचि भक्षणे॥ ५५॥''**

(पं० द० द्वैतविवेक)

**''भेटलेया वाटेवरी। चोखी आणि माहारी। तेथ नातळे तियापरी। राहाटो जाणे॥ ४७९॥''** (ज्ञाने० अ० १३)

**''ना ना चांडाळ मंदिराशी। अवचटें आलिया संन्यासी। मग लाज होय जैसी। उत्तमा तया॥ १७६॥''** (ज्ञाने० अ० १६)

**''सांगें शूद्रघरीं आघवीं। पक्वान्नें आहाति बरवीं। तीं द्विजें केंवीं सेवावीं। दुर्बळु जरी जाहला॥ २२१॥''**

(ज्ञाने० अ० ३)

**गुरुमार्गामुळे भ्रष्ट सर्वकाळ। म्हणती यातीकुळ नाही ब्रह्मीं॥ १॥**
**पवित्राला म्हणती नको हा कंटक। मानिती आत्मिक अनामिका॥ २॥**
× × × ×
**नसता करूनि होम खाती एके ठायीं। म्हणती पाप नाहीं मोक्ष येणें॥ ५॥**
× × ×

नाहीं शास्त्राधार पात्रापात्र नेणें। उपदेशून घेणें द्रव्य कांहीं॥ ७॥
तुका म्हणे ऐसे गुरुशिष्य पूर्ण। विठोबाची आण नरका जाती॥ ८॥

(तु० गा० सरकारी प्रत अ० २९७३)

समदृष्टि नोहे मांगासवें खाणें। यथेच्छ सेंवणें वेश्येलागीं॥ १॥
समदृष्टीसाठीं देह व्हावा तृण। क्षणोक्षणीं प्राण कासावीस॥ २॥
जोडा आणि तोंड एकाचि चर्माचें। संघट्टन त्याचें करूं नये॥ ३॥
अन्न आणि विष्ठा एकाचि धान्याची। साम्यता दोहोंची म्हणूं नये॥ ४॥
देह प्राण मन बुद्धि ह्या उपाधि। सोडिलिया शुद्धि समता ये॥ ५॥
ज्ञानेश्वरस्वामी न होतां कृपाळ। वटवट वेळ वृथा सारी॥ ६॥

गुलाबराव महाराज—अभंग गाथा (१२६२)

कोण्याहि प्राचीन अनुभवी पुरुषाचा प्रारब्धानुसार होणारा व्यवहार, धर्माला सोडून झालेला दिसून येत नाही धर्माला सोडून होणारें आचरण लोकसंग्रहकारकहि होत नाही. उलट लोकांचा अध:पात करणारें होतें; कारण लोकसंग्रह म्हणजे लोकांना केवळ आपल्या मताचे अनुयायी करणे नव्हे तर आपण धर्मांप्रमाणे वागून लोकांनाहि धर्मपरायण करणें होय. हाच अर्थ भगवंतांनी "लोकसंग्रहमेवापि" या श्लोकांत व्यक्त केला आहे. आत्मस्वरूप झालेल्या ज्ञान्याच्या समदृष्टीला पृथक्पृथक् व विषम पदार्थांच्या अस्तित्वाचें ज्ञानच होत नाही असा भाव.

**न प्रहृष्येत्प्रियं प्राप्य नोद्विजेत्प्राप्य चाऽप्रियम्। स्थिरबुद्धिरसम्मूढो ब्रह्मविद् ब्रह्मणि स्थित:॥ २०॥**
**बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विन्दत्यात्मनि यत्सुखम्। स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षयमश्नुते॥ २१॥**

**अर्थ—**प्रिय वस्तु प्राप्त झाली असतां ज्याला आनंद होत नाही व अप्रिय वस्तु प्राप्त झाली असतां ज्याला उद्वेग वाटत नाही अशी ज्यांची स्थिति झाली तोच ब्रह्मज्ञानी होय. ज्याची बुद्धि आत्मस्वरूपाचे ठिकाणीं स्थिर झाली, त्याला कधी मोह उत्पन्न होत नाही. तो ब्रह्मस्वरूपाचे ठिकाणीं स्थिर झाला.॥ २०॥ बाह्य विषयसुखांत ज्याचें चित्ताला आनंद वाटत नाही, ज्याला आत्म्याच्या ठिकाणचे सुख प्राप्त होते, तो पुरुष ब्रह्माशीं ऐक्य पावून, त्या ऐक्याने अक्षय सुख भोगतो.॥ २१॥

**तरी मृगजळाचेनि पूरें। जैसें न लोटिजे कां गिरिवरें। तैसा शुभाशुभीं न विकरे। पातलिया जो॥ १०३॥**
**तोचि तो निरुता। समदृष्टि तत्त्वता। हरि म्हणे पंडुसुता। तोचि ब्रह्म॥ १०४॥**
**जया आपणपें सांडूनि कहीं। इंद्रियग्रामावरी येणें नाहीं। तो विषय न सेवी हें काई। विचित्र येथ॥ १०५॥**
**सहजें स्वसुखाचेनि अपारें। सुरवाडले नि अंतरें। रचिला म्हणऊनि बाहिरें। पाऊल न घाली॥ १०६॥**
**सांगें कुमुददळाचेनि ताटें। जो जेविला चंद्रकिरणें चोखटें। तो चकोरु काई वाळुवंटें। चुंबितु आहे॥ १०७॥**
**तैसें आत्मसुख उपाइलें। जयासि आपणपांचि फावलें। तया विषय सहज सांडवले। म्हणो काई॥ १०८॥**
**एऱ्हवीं तरी कौतुकें। विचारूनि पाहें पां निकें। या विषयांचेनि सुखे। झकवती कवण॥ १०९॥**

**अर्थ—**ज्याप्रमाणे मृगजळाच्या पूराने पर्वत वाहून जात नाही, त्याप्रमाणे प्रिय अप्रिय कांही प्राप्त झालें तरी ज्याच्या मनांत हर्षशोकादि विकार उठत नाहीत.॥ १०३॥ अर्जुना! तोच खरा समदृष्टीचा पुरुष होय व तोच ब्रह्मस्वरूप झाला असें जाण.॥ १०४॥ जो आत्मस्वरूप सोडून कधी इंद्रियांवर येत नाही, तो विषयाचें सेवन करीत नाही यांत कांही आश्चर्य नाही.॥ १०५॥ आत्म्याचें अमर्याद सुखाने त्याचें अंत:करण भरून जातें, म्हणून तें अंत:करण, बाहेर पाय ठेवित नाही.॥ १०६॥ अर्जुना! सांग बरें, जो चकोर पक्षी चंद्रविकासी कमळाच्या दळाचें ताट करून चंद्रकिरणांतील अमृतकणाचें भोजन करीतो तो वाळवंटांतील वाळूचे कण सेवन करील काय?॥ १०७॥ त्याप्रमाणे अमर्याद जें आत्मसुख ते ज्यांना आपल्या ठिकाणीच प्राप्त झालें, त्यांना विषयाचा विसर पडतो हें काय सांगायला पाहीजे?॥ १०८॥ साधारणत: या विषयसुखाने कोण फसले जातात. याचा सहज कौतुकाने नीट विचार करून पहा.॥ १०९॥

**ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते। आद्यन्तवन्तः कौन्तेय न तेषु रमते बुधः॥ २२॥**

**अर्थ**—बाह्य विषयाच्या संयोगाने होणारे भोग, उत्पन्न होणारे व नाश पावणारे असल्यामुळे, दुःख देणारेच असतात; म्हणून शहाणा पुरुष त्यांत रममाण होत नसतो.॥ २२॥

**जिहीं आपणपें नाहीं देखिलें। तेचि इहीं इंद्रियार्थी रंजले। जैसें रंक कां आळुकैलें। तुषांतें सेवी॥ ११०॥**
**नातरी मृगें तृषापीडितें। संभ्रमें विसरोनि जळातें। मग तोयबुद्धी बरडीतें। ठाकूनि येती॥ १११॥**
**तैसें आपणपें नाहीं दिठे। जयातें स्वसुखाचे सदा खरांटे। तयासीचि विषय हे गोमटे। आवडती॥ ११२॥**
**एऱ्हवीं विषयीं काइ सुख आहे। हें बोलणेंचि सारिखें नोहे। तरी विद्युत्स्फुरणें कां न पाहे। जगामाजीं॥ ११३॥**
**सांगें वातवर्षआतपु धरे। ऐसें अभ्रच्छायाचि जरी सरे। तरी त्रिमाळिकें धवळारें। करावीं कां॥ ११४॥**
**म्हणोनि विषयसुख जें बोलिजे। तें नेणतां गा वायां जल्पिजे। जैसें महूर कां म्हणिजे। विषकंदातें॥ ११५॥**
**नातरी भौमा नाम मंगळु। रोहिणीतें म्हणती जळु। तैसा सुखप्रवादु बरळु। विषयिक हा॥ ११६॥**
**हे असो आघवी बोली। सांग पां सर्पफणीची साउली। ते शीतल होईल केतुली। मूषकासी॥ ११७॥**
**जैसा आमिषकवळु पांडवा। मीनु न सेवी तंवचि बरवा। तैसा विषयसंगु आघवा। निभ्रांत जाणें॥ ११८॥**
**हे विरक्तांचिये दिठी। जैं न्याहाळिजे किरीटी। तैं पांडुरोगाचिये पुष्टी। सारिखें दिसे॥ ११९॥**
**म्हणोनि विषयभोगीं जें सुख। तें साद्यंतचि जाण दुःख। परि काय करिती मूर्ख। न सेवितां न सरे॥ १२०॥**
**तें अंतर नेणती बापुडे। म्हणोनि अगत्य सेवणें घडे। सांगें पूयपंकींचे किडे। काय चिळसी घेती॥ १२१॥**
**तयां दुःखियां दुःखचि जिव्हार। ते विषयकर्दमींचे दर्दुर। ते भोगजळातें जलचर। सांडिती केवीं॥ १२२॥**
**आणि दुःखयोनि जिया आहाती। तिया निरर्थका तरी नव्हती। जरी विषयांवरी विरक्ती। धरिती जीव॥ १२३॥**
**नातरी गर्भवासादि संकट। कां जन्ममरणींचे कष्ट। हे विसांवे वीण वाट। वाहावी कवणें॥ १२४॥**
**जरी विषयीं विषयो सांडिजेल। तरी महादोषी कें वसिजेल। आणि संसारु हा शब्दु नव्हेल। लटिका जगीं॥ १२५॥**
**म्हणोनि अविद्याजात नाथिलें। तें तिहींचि साच दाविलें। जिहीं सुखबुद्धी घेतलें। विषयदुःख॥ १२६॥**
**या कारणें गा सुभटा। हा विचारितां विषय वोखटा। तूं झणें कहीं या वाटा। विसरोनि जाशी॥ १२७॥**
**पैं यातें विरक्त पुरुष। त्यजिती कां जैसें विष। निराशा तयां दुःख। दाविलें नावडे॥ १२८॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे भुकेने व्याकुळ होणारा दरिद्री पुरुष धान्याचा कोंडाच आनंदाने खातो, त्याप्रमाणे ज्यांनी आपलें स्वरूप जाणलें नाही, तेच पुरुष या विषयांच्या सुखांत आनंद मानतात.॥ ११०॥ किंवा तहानेने व्याकुळ झालेले हरिण पाणी सोडून भ्रमाने बरड जमिनीवर भासणाऱ्या मृगजळालाच पाणी समजून तेथे धांवून येतात.॥ १११॥ त्याप्रमाणे ज्यांनी आपल्या आत्मस्वरूपाला जाणलें नाही, म्हणून ज्यांना आत्मसुखाचा सदाच दुष्काळ आहे, त्यांनाच हे विषय सुंदर वाटतात व आवडतात.॥ ११२॥ खरें पाहूं जातां विषयांत सुख आहे हें बोलणेंच योग्य नाही. मग जगामध्ये लोकांनी विजेच्या चमकण्याने क्षणभर होणाऱ्या प्रकाशानेच व्यवहार कां करूं नये?॥ ११३॥ सांग बरें, अर्जुना! ऊन, वायु, पाऊस, यांच्यापासून आपलें संरक्षण होण्याकरिता अभ्रामुळे पडलेली छाया जर समर्थ झाली तर लोकांनी तीन मजली घरें कशाला बांधावीं?॥ ११४॥ ज्याप्रमाणे बचनागाच्या कंदाला मधुर असा नुसता शब्दच लावावा त्याप्रमाणे विषयांत सुख आहे हें बोलणें देखील न जाणतां व्यर्थ बडबड करणें होय.॥ ११५॥ किंवा मंगळ या भयंकर उग्र ग्रहाला आपण मंगळ म्हणतो किंवा मृगजळाला जळ म्हणतों, त्याप्रमाणें विषयापासून होणाऱ्या सुखाला सुख म्हणण्याचा जो लोकांत प्रघात पडला. तो नुसता निरर्थक शब्दमात्रच आहे.॥ ११६॥ अर्जुना! असो हें बोलणें, पण सांग बरें, सर्पानें आपल्या फणांनी उंदरावर केलेली सावली उंदराला कितीशी सुखकारक होईल?॥ ११७॥ ज्याप्रमाणे आकडीला लागलेला मांसाचा तुकडा जोपर्यंत मासा गिळत नाही तोपर्यंत तो सुखी असतो, त्याप्रमाणेच संपूर्ण विषयांचा संबंध आहे, असे निःसंशय जाण.॥ ११८॥ विरक्त पुरुषाचे दृष्टीने या विषयसुखाकडे पाहिलें असतां हें विषयसुख पांडुरोगांत होणाऱ्या अंगपुष्टीसारखेंच वाटते.॥ ११९॥ म्हणून

विषयभोगांत जें सुख आहे ते सुख नसून संपूर्ण सुरवातीपासून तर शेवटपर्यंत दु:खच आहे, पण मूर्खांना तें विषयसुख भोगल्यावांचून राहवत नाही. ॥ १२० ॥ ते मूर्ख अविचारी लोक आत्मसुखांत व विषयसुखांत काय फरक आहे हें जाणत नाहीत; म्हणून विषयसुखच त्यांना भोगावेसे वाटतें. अर्जुना! सांग, पूवाच्या चिखलांतील किड्यांना पूवाची किळस येते का? ॥ १२१ ॥ त्याप्रमाणे नेहमी दु:ख भोगणाऱ्यांना दु:खच अत्यंत प्रिय होतें. ते विषयरूप चिखल खाणाऱ्या व चिखलांतच राहणाऱ्या बेडक्या होत. किंवा ते विषयभोगरूपी जळांत नेहमी राहाणारे जळचर प्राणीच होत. मग ते विषय कसें सोडतील? ॥ १२२ ॥ आणि हे मूर्ख अविचारी लोक जर विषयाचा कंटाळा करतील तर ज्या योनींत अत्यंत दु:ख आहे अशा योनी (त्या योनींत जाणारे कोणीच राहणार नाहीत तर) व्यर्थ होणार नाहीत का? ॥ १२३ ॥ किंवा ज्या संसार वाटेने गर्भवासाचे जन्ममरणाचें घोर दु:ख भोगावें लागतें ती संसारवाट कांही एक विश्रांती न घेता सारखी मग कोणी चालायची? ॥ १२४ ॥ जर विषयासक्त लोकांनी विषयसुखाचा त्याग करावा तर महादोषांनी कोठे राहावें? आणि संसार हा शब्दच निरर्थक होणार नाही का? ॥ १२५ ॥ म्हणून ज्यांनी विषयाच्या दु:खाचे ठिकाणीं सुखबुद्धि केली त्यांनीच हां संसाररूपी संपूर्ण खोटा अविद्याभ्रम खरा करून दाखविला. ॥ १२६ ॥ यास्तव हे उत्तम् योद्ध्या, अर्जुना विचार करून पाहतां विषय दु:खदायक आहेत. तूं कदाचित् चुकून या विषयाचे वाटेने जाशील? (म्हणजे जाऊं नकोस). ॥ १२७ ॥ पण विरक्त पुरुष या विषयसुखाच्या मार्गाचा हें विष आहे असें समजून त्याग करितात. ज्यांची विषयसुखाची इच्छा नि:शेष नाहिशी झाली अशा निरिच्छ पुरुषांना, विषयाचें सुख हें दु:खच वाटतें; म्हणून असें सुखरूप दु:ख आवडत नाही. ॥ १२८ ॥

**शक्नोतीहैव यः सोढुं प्राक्शरीरविमोक्षणात् । कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ॥ २३ ॥**
**योऽन्तःसुखोऽन्तरारामस्तथान्तर्ज्योतिरेव यः । स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति ॥ २४ ॥**
**लभन्ते ब्रह्मनिर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः । छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः ॥ २५ ॥**

**अर्थ**—हें शरीर पडण्यापूर्वीच जो मनातील कामक्रोधाचे वेग सहन करूं शकतो, त्याचीच बुद्धि सम झाली व तोच सुखी होय. ॥ २३ ॥ जो अंत:करणांत सुखी झाला व आत्मस्वरूपींच रममाण होतो व आंतील आत्मज्ञानज्योति प्राप्त झाली असा तो योगी ब्रह्मभूत होऊन शेवटी ब्रह्मांत मिळतो. ॥ २४ ॥ निष्पाप झालेले, ज्यांचा द्वैतप्रत्यय नि:शेष नाहिंसा झाला, ज्यांनी अंत:करण स्वाधीन केलें व सर्व भूतांचें कल्याण इच्छिणारे जे ऋषि त्यांना शेवटची ब्रह्मस्थिति प्राप्त होते. ॥ २५ ॥

**ज्ञानियांचां हन ठायीं। यांची मातुही कीर नाहीं। देहीं देहभावो जिहीं। स्ववश केले ॥ १२९ ॥**
**'जयांतें बाह्याची भाष। नेणिजेचि नि:शेष। अंतरीं सुख। एक आथि ॥ १३० ॥**
**परी तें वेगळेपणें भोगिजे। जैमें पक्षियें फळ चुंबिजे। तैसें नव्हे तेथ विसरिजे। भोगितेपणही ॥ १३१ ॥**
**भोगीं अवस्था एकी उठी। ते अहंकाराचा अचळु लोटी। मग सुखेंसि घे आंठी। गाढेपणें ॥ १३२ ॥**
**तिये आलिंगनमेळीं। होय आपेंआप कवळी। तेथ जळ जैसें जळीं। वेगळें न दिसे ॥ १३३ ॥**
**कां आकाशीं वायु हारपे। तेथ दोन्ही हे भाष लोपे। तैसें सुखचि उरे स्वरूपें। सुरतीं तिये ॥ १३४ ॥**
**ऐशी द्वैताची भाष जाय। मग म्हणों जरी एकचि होय। तरी तेथ साक्षी कवणु आहे। जाणतें जें ॥ १३५ ॥**
**म्हणोनि असो हें आघवें। एथ न बोलणें काय बोलावें। ते खुणचि पावेल स्वभावें। आत्माराम ॥ १३६ ॥**
**जे ऐसेनि सुखें मातले। आपणपांचि आपण गुंतले। ते मी जाणें निखळ वोतले। सामरस्याचे ॥ १३७ ॥**
**ते आनंदाचे अनुकार। सुखाचे अंकुर। कीं महाबोधें विहार। केले जैसे ॥ १३८ ॥**
**ते विवेकाचे गांव। कीं परब्रह्मींचे स्वभाव। नातरी अळंकारले अवयव। ब्रह्मविद्येचे ॥ १३९ ॥**
**ते सत्त्वाचे सात्त्विक। कीं चैतन्याचे आंगिक। हें बहु असो एकैक। वानिसी काई ॥ १४० ॥**
**तूं संतस्तवनीं रतसी। तरी कथेची से न करिसी। कीं निराळीं बोल देखसी। सनागर ॥ १४१ ॥**
**परि तो रसातिशयो मुकुळीं। मग ग्रंथार्थदीपु उजळीं। करीं साधुहृदयराउळीं। मंगळ उखा ॥ १४२ ॥**

**ऐसा गुरूचा उवायिला। निवृत्तिदासासी पातला। मग तो म्हणे श्रीकृष्ण बोलिला। तेंचि आइका॥ १४३॥**
**अर्जुना अनंत सुखाच्या डोहीं। एकसरा तळुचि घेतला जिहीं। मग स्थिराऊनि तेही। तेंचि जाहले॥ १४४॥**
**अथवा आत्मप्रकाशें चोखें। जो आपणपेंचि विश्व देखे। तो देहेंचि परब्रह्म सुखें। मानूं येईल॥ १४५॥**
**जें साचोकारें परम। ना तें अक्षर निःसीम। जिये गांवींचे निष्काम। अधिकारिये॥ १४६॥**
**जें महर्षी वाढलें। विरक्तां भागा फिटलें। जें निःसंशया पिकलें। निरंतर॥ १४७॥**

**अर्थ**—ज्ञानी पुरुषांच्या ठिकाणीं या विषयांची निश्चयाने मुळीच गोष्ट देखील नसते. (त्यांना विषय भासत नाहीत असा अर्थ) त्यांनी देहांत असूनच देहाचे विकार स्वाधीन करुन घेतलेले असतात.॥ १२९॥ ज्यांना बाह्य पदार्थाचें मुळी ज्ञानच नसतें व एक आत्मसुखच अंतःकरणात भरलेंले असतें.॥ १३०॥ ज्याप्रमाणे पक्षी फळाहून वेगळा राहून फळाचा, स्वाद घेतो, त्याप्रमाणे आपल्याला वेगळें ठेवून ज्ञानी पुरुष तें सुख भोगत नाही तर, तेथे भोक्तेपणहि विसरलें जातें विषयसुखाच्या भोगांत भोक्ता, भोग्य, भोग अशी जशी त्रिपुटी राहते, तशी आत्मसुखभोगांत राहत नाही.॥ १३१॥ या आत्मसुखाच्या भोगांत अशी कांही सुखाची स्थिति असते की तींत भोग झाला असतां अहंकाराचा पडदाच राहत नाही आणि चित्त आत्मसुखाशीं दृढ मिठी मारतें म्हणजे चित्त केवळ सुखस्वरूप होते.॥ १३२॥ चित्त व आत्मसुख यांच्या या आलिंगनांत जाणीवरहित सहज ऐक्य होतें व जळांत जळ मिळालें असतां तें मग वेगळें दिसत नाही, त्याप्रमाणे ज्ञानी व आत्मा त्या सुखांत वेगळे राहत नाहीत.॥ १३३॥ किंवा आकाशांत वायु लोपला गेला म्हणजे मग आकाश व वायु अशी दोनपणाची भाषाच राहत नाही. तसेंच ज्ञानी व आत्मा यांचें ऐक्य झालें की त्या ऐक्यांत ज्ञानी व आत्मा हे दोन शब्द जाऊन एक सुखच उरतें म्हणजे शब्दमात्र देखील दोनपणे राहत नाही.॥ १३४॥ अशी द्वैताची भाषा नाहिशी होते व मग तेथे दोघे एक झाले असे म्हणावें तर त्या ऐक्याची जाणीव ठेवणारा साक्षी तरी कोण राहतो?॥ १३५॥

**गूढार्थदीपिका**—आत्मसुखांत जाणीवच राहत नाही किंवा जाणीव ठेवून आत्मसुख किंवा ब्रह्मसुख मिळत नाही.

**अर्थ**—म्हणून अर्जुना! हें सर्व असूं दे. येथे जी स्थिति असते ती बोलतांच येत नाही मग कोणी काय बोलावें? आत्माराम झालेले पुरुष स्वभावतःच ह्या अनुभवाच्या खुणा जाणतात.॥ १३६॥ जे पुरुष अशा जाणीवरहित आत्मसुखाने मत्त झाले व केवळ आपणच होऊन राहिले ते पुरुष समरसतेच्या ओतलेंल्या मूर्ति आहेत असे मी म्हणतो.॥ १३७॥ ते ब्रह्मानंदाला आलेले आकार होत. ब्रह्मसुखाचे अंकुर होत किंवा पूर्ण आत्मज्ञानाने केलेली क्रीडा होय.॥ १३८॥ ते विवेकाचे मूळ गांव होय किंवा त्यांची मूर्ति म्हणजे परब्रह्माचा स्वभावच म्हणतां येतो. अथवा त्यांना ब्रह्मविद्येचे अलंकाराने भूषित केलेले अवयव म्हणतां येईल.॥ १३९॥ ते ज्ञानी पुरुष सत्वाचेंहि शुद्ध सत्व होत किंवा ते चैतन्याचे अवयव होत. हें वर्णन ऐकून श्रीगुरु निवृत्तिनाथ म्हणतात, हें असूं दे. हें एकेक किती आता वर्णन करशील?॥ १४०॥ तूं संतांचें स्तवन करतांना त्यांत इतका रंगून जातोस की तूं श्रीकृष्णार्जुनांचा संवाद सांगत आहेस हेंहि तुला भान राहत नाही आणि निर्गुणस्वरूपाचेंहि सुंदर गोड शब्दांनी वर्णन करतोस.॥ १४१॥ पण आता रसाचा पूर आवरता घे व ग्रंथाचा अर्थरूप दिवा लाव आणि श्रवण करणाऱ्या संतांच्या हृदयमंदिरांत आत्मकल्याणाचा प्रातःकाळ होऊं दे.॥ १४२॥ याप्रमाणे श्रीगुरु निवृत्तिनाथांचा ऐकण्याचा उल्हास पाहून श्रीनिवृत्तिनाथांचे दास श्रीज्ञानेश्वरमहाराज यांनाहि तसाच उल्हास प्राप्त झाला. मग श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणाले, की आता श्रीकृष्ण भगवान काय बोलले तेंच ऐका.॥ १४३॥ अर्जुना! अत्यंत अमर्याद व खोल आत्मसुखाच्या डोहांत ज्यांनी एकदम एकसारखा तळच गांठला व तेथेच कायमचे स्थिर झाले व तद्रूप बनले॥ १४४॥ किंवा जो स्पष्ट आत्मप्रकाशाने सर्व विश्वच आत्मस्वरूप पाहतो, तो देहासहच

सुखाने परब्रह्मरूप झाला असें मानितां येईल. ॥ १४५ ॥ जी परब्रह्मस्थिति अत्यंत सत्यरूप आहे किंवा जी निःसीम अविनाश आहे, ज्यांच्या मनांतून विषयसुखाची कामना निःशेष निघून गेली असे पुरुषच ज्या ब्रह्म-स्थितीचे अधिकारी असतात. ॥ १४६ ॥ जी ब्रह्मस्थिति इंद्रियादिकांना जिंकणाऱ्या महर्षीपुढे वाढली जाते, अत्यंत विरक्त झालेल्या पुरुषांच्याच वांट्याला येते आणि अखंड संदेहरहित झालेल्यांच्या ठिकाणी जिचें मुबलक पीक येतें. ॥ १४७ ॥

**कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम् । अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम् ॥ २६ ॥**
**स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवान्तरे भ्रुवोः । प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यन्तरचारिणौ ॥ २७ ॥**
**यतेन्द्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः । विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः ॥ २८ ॥**

**अर्थ**—ज्यांनी अंतःकरणाचा निग्रह केला आहे, कामक्रोधादि विकाररहित जे झाले आहेत आणि आत्मस्वरूप ज्यांनी जाणलें आहे, अशा ज्ञानी पुरुषाला सर्वत्र मुक्तस्थितिच प्रत्ययाला येते. किंवा सर्व आंत बाहेर ब्रह्मच दिसतें. ॥ २६ ॥ देहाच्या बाहेर असणारे जे शब्दादि विषय यांना बाहेरच ठेवून म्हणजे त्यांचें चिंतन न करतां (विषय चिंतनाने विषय मनांत शिरतात म्हणून) दोन भ्रुकुटीच्यामध्ये दृष्टि ठेवून, नाकांतून वाहणारे प्राण व अपान यांना सम करून. ॥ २७ ॥ ज्यांनी इंद्रियें, मन व बुद्धि यांचा निरोध केला व जो मोक्षपरायण झाला व विषयवासना भय, क्रोध या विरहित झाला असा मुनि सदा मुक्तच असतो. ॥ २८ ॥

**जिहीं विषयापासोनि हिरतलें। चित्त आपुलें आपण जिंतिलें। ते निश्चित जेथ सुतले। चेतीचिना ॥ १४८ ॥**
**तें परब्रह्म निर्वाण। जें आत्मविदांचें कारण। तेंचि ते पुरुष जाण। पंडुकुमरा ॥ १४९ ॥**
**ते ऐसे कैसेनि जहाले। जे देहींचि ब्रह्मत्वा आले। हें ही पुससी तरी भलें। संक्षेपें सांगों ॥ १५० ॥**
**तरी वैराग्याचेनि आधारें। जिहीं विषय दवडूनि बाहिरें। शरीरीं एकंदरें। केलें मन ॥ १५१ ॥**
**सहजें तिहीं संधी भेटी। जेथ भ्रूपल्लवां पडे गांठी। तेथ पाठिमोरी दिठी। पारुखोनियां ॥ १५२ ॥**
**सांडूनि दक्षिण वाम। प्राणापानसम। चित्तेंसीं व्योम-। गामिये करिती ॥ १५३ ॥**
**तेथ जैसीं रथ्योदकें सकळें। घेऊनि गंगा समुद्रीं मिळे। मग एकेक वेगळें। निवडूं नये ॥ १५४ ॥**
**तैसी वासनांतराची विवंचना। मग आपैसी पारुखे अर्जुना। जे वेळीं गगनीं लयो मना। पवनें कीजे ॥ १५५ ॥**
**जेथ हें संसारचित्र उमटे। तो मनोरूपु पटु फाटे। जैसें सरोवर आटे। मग प्रतिभा नाहीं ॥ १५६ ॥**
**तैसें मनपण मुदल जाये। मग अहंभावादिक कें आहे। म्हणोनि शरीरेंचि ब्रह्म होये। अनुभवी तो ॥ १५७ ॥**

**अर्थ**—ज्यांनी आपलें चित्त विषयांपासून हिरावून घेतलें व अशा रीतीने आपणच आपल्या चित्ताला जिंकलें, ते पुरुष, जेथे निजलें असतां पुनः जागे होत नाहीत; म्हणजे ज्यांचे ठिकाणीं पुनः देहबुद्धि उत्पन्न होंत नाही. ॥ १४८ ॥ तें ब्रह्मच शेवटली स्थिति आहे. तें जाणूनच ब्रह्मविद् होत असतात; म्हणून ते पुरुषहि ब्रह्मच होतात. ॥ १४९ ॥ ते पुरुष देहासकट ब्रह्मरूप कसे झाले असें जर विचारशील तर संक्षेपाने सांगतो ऐक. ॥ १५० ॥ विषयांविषयीच्या वैराग्याने ज्यांनी विषयांचे चिंतन करणें सोडून देऊन विषयांना मनांतून बाहेर घालवून दिलें व संपूर्ण मनच केलें. ॥ १५१ ॥

**गूढार्थदीपिका**—बाहेरच्या विषयांचें सेवन करण्याकरिता मनच इंद्रियरूप होते. बाहेरच्या विषयांचें सेवन करण्याचा व्यापार बंद पडला की सर्व इंद्रियें मनरूप होऊन राहतात व मग एकंदर सर्व एक मनच राहतें.

**अर्थ**—मग दोन भ्रुकुटींची जेथे गांठ पडते व इडापिंगळा व सुषुम्ना ह्या ज्या संधीचे ठिकाणीं एकवटतात, त्या भ्रूकुटींच्या मध्यांत दृष्टि अंतर्मुख करून, डावी नाकपुडी उजवी नाकपुडीचे हे मार्ग सोडून, प्राण अपान यांना एक करून चित्ताला आकाशांत मिळवतात किंवा आकाशरूप करीतात. ॥ १५२-१५३ ॥ मग ज्याप्रमाणें रस्त्यावरील

सर्व पाणी घेऊन गंगा समुद्रांत मिळाली असतां मग पाणी अलग अलग निवडलें जात नाही. ॥ १५४ ॥ त्याप्रमाणे ज्या वेळीं प्राणायामाने मनाचा आकाशांत लय केला जातो, त्यावेळी सर्व प्रकारच्या वासना आपोआप नाहिशा होतात. ॥ १५५ ॥ ज्या मनोरूप वस्त्रावर हें जगाचें चित्र भासतें तें मनोरूप वस्त्र फाटलें जातें. मग ज्याप्रमाणे सरोवरांतील पाणी आटलें म्हणजे त्यांतील प्रतिबिंब नाहिसें होते. ॥ १५६ ॥ त्याप्रमाणे सर्व जगाच्या भासाला कारण असणारें मुख्य मनच नाहिसें झाल्यावर अहंभावादिक तत्वें कोठून भासणार? म्हणून अशा रीतीने तो आत्मानुभवी पुरुष शरीरानेच ब्रह्म होतो. ॥ १५७ ॥

**भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम्। सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति ॥ २९ ॥**

**अर्थ**—यज्ञ तप या कर्माचा भोक्ता, सर्व लोकांचा शास्ता सर्व जीवांचा अहेतुक कल्याणकर्ता असा जो मी, त्या मला जाणून पुरुष परम शांतीला प्राप्त होतो. ॥ २९ ॥

*ॐतत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे*
*कर्मसंन्यासयोगो नाम पञ्चमोऽध्यायः ॥ ५ ॥*

**आम्ही मागां हन सांगितलें। जे देहींचि ब्रह्मत्व पावले। ते येणें मार्गें आले। म्हणऊनियां ॥ १५८ ॥**
**आणि यमनियमांचे डोंगर। अभ्यासाचे सागर। क्रमोनि हे पार। पातले ते ॥ १५९ ॥**
**तिहीं आपणपें करूनि निर्लेप। प्रपंचाचें घेतलें माप। मग साचाचेंचि रूप। होऊनि ठेले ॥ १६० ॥**
**ऐसा योगयुक्तीचा उद्देशु। जेथ बोलिला हृषीकेशु। तेथ अर्जुनु सुदंशु। म्हणोनि चमत्कारला ॥ १६१ ॥**
**तें देखिलिया कृष्णें जाणितलें। मग हांसोनि पार्थातें म्हणितलें। काई पां चित्त उवाइलें। इये बोलीं तुझें ॥ १६२ ॥**
**तंव अर्जुन म्हणे देवो। परचित्तलक्षणांचा रावो। भला जाणितला जी भावो। मानसु माझा ॥ १६३ ॥**
**म्यां जें कांहीं विवरूनि पुसावें। तें आधींचि कळिलें देवें। तरी बोलिलें तेंचि सांगावें। विवळ करूनि ॥ १६४ ॥**
**एऱ्हवीं तरी अवधारा। जो दाविला तुम्ही अनुसारा। तो पव्हण्याहूनि पायउतारा। सोहपा जैसा ॥ १६५ ॥**
**तैसा सांख्याहूनि प्रांजळा। परी आम्हांसारिखियां अभोळां। एथ आहाति परि कांहीं काळा। तो साहों ये वर ॥ १६६ ॥**
**म्हणोनि एक वेळ देवा। तोचि पडताळा घेयावा। विस्तरेल तरी सांगावा। साद्यंतुचि ॥ १६७ ॥**
**तंव श्रीकृष्ण म्हणती हो कां। तुज हा मार्गु गमला निका। तरी काय जाहलें आईकीजो कां। सुखें बोलों ॥ १६८ ॥**
**अर्जुना तूं परिससी। परिसोनि अनुष्ठिसी। तरी आम्हांसीचि वानी कायसी। सांगावयाची ॥ १६९ ॥**
**आधींच चित्त मायेचें। वरी मिष जाहलें पढियंतयाचें। आतां तें अद्‌भुतपण स्नेहाचें। कवण जाणे ॥ १७० ॥**
**ते म्हणो कारुण्यरसाची वृष्टि। कीं नवया स्नेहाची सृष्टि। हें असो नेणिजे दृष्टी। हरीची वानूं ॥ १७१ ॥**
**जे अमृताची वोतली। कीं प्रेमचि पिऊन मातली। म्हणोनि अर्जुनमोहें गुंतली। निघों नेणें ॥ १७२ ॥**
**हें बहु जें जें जल्पिजेल। तेथें कथेसी फांकु होईल। परि तें स्नेहरूपा न येल। बोलवरी ॥ १७३ ॥**
**म्हणोनि विसुरा काय येणें। तो ईश्वरु कवळावा कवणें। जो आपुलें मान नेणे। आपणचि ॥ १७४ ॥**
**तरी मागीला ध्वनीआंतु। मज गमला सावियाचि मोहितु। जे बलात्कारें असे म्हणतु। परिस बापा ॥ १७५ ॥**
**अर्जुना जेणें जेणें भेदें। तुझें कां चित्त बोधे। तैसें तैसें विनोदें। निरूपिजेल ॥ १७६ ॥**
**तो काइसया नाम योगु। तयाचा कवण उपेगु। अथवा अधिकारप्रसंगु। कवणा येथ ॥ १७७ ॥**
**ऐसें जें जें कांहीं। उक्त असे इये ठाईं। तें आघवेंचि पाहीं। सांगेन आतां ॥ १७८ ॥**
**तूं चित्त देऊनि अवधारीं। ऐसें म्हणोनि श्रीहरी। बोलिजेल ते पुढारी। कथा आहे ॥ १७९ ॥**
**श्रीकृष्ण अर्जुनासी संगु। न सांडोनि सांगेल योगु। तो व्यक्त करूं प्रसंगु। म्हणे निवृत्तिदासु ॥ १८० ॥**

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां पंचमोऽध्यायः ॥ ५ ॥

**अर्थ**—ज्ञानी पुरुष सदेह ब्रम्हरूप होतात असे जें आम्ही सांगितलें तें या मार्गाने आले म्हणून सदेह ब्रम्हरूप होतात. ॥ १५८ ॥ आणि यमनियमाचे डोंगर उतरून व अभ्यासाचे सागर तरून ते पार होतात. ॥ १५९ ॥ त्या ज्ञानी पुरुषांनी कर्मादि उपाधिरहित आपल्याला करून सर्व प्रपंच मनोमात्र आहे असें प्रत्यक्ष अनुभवाने त्याचें माप केलें म्हणजे वस्तुत: प्रपंच मुळीच नाही असा प्रपंचाचा अंत पाहिला व मग केवळ शांतीचें स्वरूप म्हणजे नि:शेष वासनारहित ब्रम्हस्वरूप होऊन राहिले. ॥ १६० ॥ याप्रमाणे अभ्यासरूपी योगाच्या युक्तीचा सदेह ब्रम्ह होणें हा उद्देश आहे असें भगवान बोलले, तेव्हा त्या चतुर अर्जुनाला त्या मार्गाचा मोठा चमत्कार वाटला. ॥ १६१ ॥ तें पाहून भगवान हसून म्हणाले, काय अर्जुना! माझे हें बोलणें ऐकून तुझें चित्त उल्हासित झालें असें दिसतें. ॥ १६२ ॥ तेव्हा अर्जुन म्हणतो, देवा! तूं अंतर्यामी आहेस. दुसऱ्याचें चित्तांतलें जाणणाऱ्यांचा तूं राजा आहेस. माझ्या मनांतील भाव आपण बरोबॅर ओळखला. ॥ १६३ ॥ मी जें कांही विचार करून आपणाला म्हणणार होतो तें आपण अगोदरच जाणलें, तर मग तेंच आता स्पष्ट आपण सांगा. ॥ १६४ ॥ साधारणत: पहा देवा! जो तुम्ही आता मार्ग दाखविला तो पाण्यांतून पोहून जाण्यापेक्षा जसा पाणउतार मार्ग सोपा असतो. ॥ १६५ ॥ तसा तो आमच्यासारख्या अशक्तांना ज्ञानमार्गाहून सरळ सोपा वाटतो. पण त्यांत सिद्धि होण्याला काळ लागतो. तो काळ एकदांचा खुशाल सहन करतां येईल. ॥ १६६ ॥ म्हणून देवा! पुन: एकदा त्याचीच मजपुढे उजळणी करा. विस्तार करून सांगत असाल तर सविस्तर सांगा. ॥ १६७ ॥ तेव्हा भगवान म्हणतात, बरें आहे. अर्जुना! हाच मार्ग तुला उत्तम वाटतो ना! तर हरकत काय आहे? तोच आम्ही तुला आनंदाने सांगतों, ऐक. ॥ १६८ ॥ अर्जुना! तू जर लक्ष देऊन ऐकशील आणि ऐकून त्याचें आचरण करशील तर आम्ही काय सांगण्यास कमी करूं? ॥ १६९ ॥ (श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात) अगोदरच मायेचें चित्त प्रेमळ असतें. त्यांतहि आवडत्याचें निमित्त झालें तर त्या अद्‌भुत प्रेमाचें कोण वर्णन करूं शकेल? ॥ १७० ॥ अर्जुनाचे ठिकाणीं भगवंताची जी प्रेमदृष्टि होतो ती म्हणजे करुणरसाचा वर्षाव होय असें म्हणावें! की ती नव्या नव्या प्रेमाची भगवंताने सृष्टिच निर्माण केली असें म्हणावें! कांही असो. भगवंताच्या प्रेमदृष्टीचें शब्दाने वर्णन करणें शक्य नाही. ॥ १७१ ॥ ती केवळ अमृताची ओतलेली होती किंवा अर्जुनाचें प्रेम पिऊन तिला उन्माद झाला होता, म्हणूनच ती अर्जुनाचे मोहाने इतकी अर्जुनाचे ठिकाणीं आसक्त झाली की ती अर्जुनाहून निघत नव्हती. ॥ १७२ ॥ अशी आपण कितीहि बडबड केली केली तरी कथा सुटून विषयांतर होईल, पण त्या प्रेमदृष्टीचे शब्दाने यथार्थ वर्णन होणार नाही. ॥ १७३ ॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे गाईला वासरें पुष्कळ असतात, पण वासराला गाय एकच असते, म्हणून वासरालाच गाईचें अनन्य प्रेम असतें; पण गाईला वासराचें प्रेम तितकें नसतें असें म्हणतां येत नाही. गाईचेंहि वासरावर अत्यंत प्रेम असतें. त्याप्रमाणेच भक्ताला एकच भगवान असतो आणि भगवंताला भक्त पुष्कळ असतात, म्हणून भक्ताचेंच भगवंतावर नि:सीम प्रेम असतें, पण भगवंताचें मात्र भक्तावर तितकें प्रेम राहत नाही असें नाही. लहान मुलावर आई जशी आपल्या सर्वस्वीं प्रेमाची छाया करिते त्याप्रमाणे भगवानहि आपल्या प्रेमाने अत्यंत अहंकाररहित झालेल्या म्हणजेच अत्यंत बाल झालेल्या भक्तावरहि तशीच अपल्या नि:सीम प्रेमाची छाया करितो. असें देव-भक्त परस्परांवर स्वाभाविक नि:सीम प्रेम करतात. याचें कारण असें आहे की जीवाने मी ब्रह्म आहे हें ओळखल्यावांचून तो मुक्त होत नाही. जीवाला मोक्षमार्गाचा उपदेश करण्याकरिता प्रतिबिंबरूप असलेल्या जीवाच्या अपेक्षेने बिंबरूप परमेश्वराचे ठिकाणीं हीच अहंब्रह्मास्मि विद्यावृत्ति व त्या वृत्तींतूनच जीवाला कल्याणमार्गाचा उपदेश करणारे वेद प्रगट होतात. ही अहंब्रह्मास्मि विद्यावृत्ति श्रीगुरूचें मूळ रूप होय असें अमृतानुभवांतील मंगलाचरणांत ''गुरुरित्याख्यया लोके विद्या साक्षाद्धि शांकरी'' या श्लोकाने माऊलींनी सांगितले आहे. म्हणजे परमेश्वरच गुरूरूपाने नटतो.

शिष्याच्या निष्कपट सेवेने श्रीगुरु प्रसन्न झाले असतां ते या आपल्या अहंब्रह्मास्मिविद्यावृत्तिरूपाने शिष्याचे हृदयांत प्रगट होतात. पण मूळ ब्रह्मस्थिति निर्विकल्प आहे म्हणजे तेथे स्वरूपाचीहि जाणीव नाही. ती मूळची जाणीवरहित निर्विकल्पस्थिति नित्य कायम ठेवण्याकरिता अहंब्रह्मास्मि ही जाणीव नाहिशी झाली पाहिजे. ती प्रेमांत नाहिशी होते. म्हणून भक्त निर्विकल्प होण्याकरिता भगवंताचें निःसीम प्रेम करतो व भगवंतहि भक्तावर निःसीम प्रेम करीत असतो.

निःसीम प्रेम हें आत्म्याचें स्वरूप आहे, म्हणून भगवान भक्ताचा आत्मा होतो व भक्त भगवंताचा आत्मा होतो. ''ज्ञानी त्वात्मैव मे मतम्'' असे भगवंताने म्हटलेंच आहे.

अर्थ—म्हणून या शब्द विस्ताराचा काय उपयोग? जो अमर्याद भगवान आपली मर्यादा आपण जाणूं शकत नाही. तेथे दुसरा कोण त्याला मर्यादा घालूं शकेल? (म्हणजे भगवंताचें प्रेमाला मर्यादाच नाही म्हणजे शब्दाने त्याचे वर्णन होवू शकत नाही असा अर्थ). ॥ १७४ ॥ वर भगवंतांनी अर्जुनाच्या मनांतला आशय जाणला असें जें म्हटलें, त्यावरून मला वाटतें की भगवान खरोखर अर्जुनाच्या प्रेमाने अर्जुनाच्या सर्वस्वीं स्वाधीन होऊन गेले कारण आपण होऊन भगवान अर्जुनाला म्हणतात, बापा अर्जुना! ऐक. ॥ १७५ ॥ अर्जुना! ज्या ज्या रीतीने तुझें समाधान होईल व तुला समजेल, त्या त्या रीतीने मोठ्या आनंदाने सांगेन पहा. ॥ १७६ ॥ योग हें नांव कशाला आहे? त्याने कोणता लाभ होतो किंवा त्याचा अधिकार कोणाला आहे? ॥ १७७ ॥ असें जें जें सांगणे अवश्य आहे तें सर्व आता सांगतों पहा. ॥ १७८ ॥ तूं मात्र एकाग्र चित्ताने श्रवण कर. असें म्हणून भगवान श्रीकृष्ण जें सांगणार तेंच पुढे निरूपण होणार आहे. ॥ १७९ ॥ भगवंताचा अर्जुनाशीं जो सख्यप्रेमाचा संबंध होता तो, श्रीनिवृत्तिनाथाचे दास श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात, पुढे स्पष्ट करून सांगूं. ॥ १८० ॥

**श्रीसद्‌गुरुकृपेने श्रीज्ञानेश्वरीच्या पांचव्या अध्यायाचा गूढार्थदीपिकेसह अनुवाद पूर्ण झाला तो सद्‌गुरुचरणीं समर्पण असो.**



## समारोप

कर्मयोग व संन्यास या दोन्ही मार्गांचें सरमिसळ निरूपण ऐकून अर्जुनाच्या मनांत घोटाळा उत्पन्न झाला व आपल्याला श्रेयस्कर मार्ग कोणता याचा निवाडा त्याला करतां आला नाही, म्हणून त्याने भगवंताला यांपैकी मला श्रेयस्कर मार्ग कोणता हें सांगा म्हणून विनंती केली. भगवंतांनी पुन: दोन्ही मार्ग मोक्षमार्गच किंवा भगवत्प्राप्ति करून देणारेच आहेत, पण त्यांतल्या त्यांत कर्मयोगच अधिक चांगला असें सांगितलें व पुढे म्हणाले की, अर्जुना! संन्यासदेखील कर्मयोगाचें अनुष्ठान केल्यावांचून प्राप्त होत नाही. विषयसुखाची इच्छा नि:शेष सोडून निष्काम चित्ताने कर्मयोगाचें अनुष्ठान होऊं लागलें असतां चित्त सम होतें. ही चित्ताची समस्थिति म्हणजे साक्षीरूप ज्ञानस्थिति होय. यां ज्ञानरूप साक्षीस्थितींत ज्ञानी पुरुष "सर्वकर्माणि मनसा संन्यस्यास्ते" मनाने सर्व कर्मांचा संन्यास करून राहतो. मनाने सर्व कर्मांचा संन्यास करणे म्हणजे आत्मज्ञानाचे अनुभवाने मी केवळ साक्षी आहे, माझे ठिकाणीं कर्म नाही व मी कर्ता नाही, मी सर्वांहून निराळा असंग आहे, असें पाहणें होय, श्रीज्ञानेश्वर माऊली म्हणतात की जोपर्यंत कर्तृत्वबुद्धि जात नाही तोपर्यंत मनुष्य नैष्कर्म किंवा कर्मरहित होत नाही, ही नैष्कर्मतेची गुरुगम्य खूण आहे. हा सर्वकर्मसंन्यास व भगवें वस्त्र परिधान करून संन्यासविधीने विहित कर्माचा त्याग करणें हा संन्यास, एक नव्हेत. सर्वकर्मसन्यास बाह्य नाही, आंतर आहे व तो "सर्वकामपरित्यागे च सर्वकर्मसंन्यास: सिद्धो भवति" (गी० भा० अ० ६) सर्व कामना नाहिशा झाल्या की सर्वकर्मसंन्यास होतो, म्हणजे कर्तृत्वबुद्धिच राहत नाही—असें आचार्य म्हणतात.

असें आपलें सर्वकर्मरहित साक्षीस्वरूप कळल्यानंतर तो साक्षीरूप निर्गुण स्वरूपाचा प्रत्यय दृढ करण्याकरिता अभ्यास करतां यावा व त्याला जितका अधिक अवसर मिळेल तितका मिळाला पाहिजे म्हणून बाहेरहि विहित कर्माचा त्यागरूप संन्यास करावा लागतो.

त्या ज्ञानी पुरुषाच्या देहादिकांचे ठिकाणीं कर्मकर्तृत्वादि सर्व दुसऱ्याला जरी दिसत असले तरी तो ज्ञानीपुरुष त्यांचा संबंध कधीहि वागवीत नाही, म्हणजे कर्म व कर्तृत्व यांच्या अस्तित्वाचें त्याला ज्ञानच होत नाही, म्हणून त्याचा सर्वकर्मसंन्यास होतो. कर्माचें व कर्तृत्वाचें ज्ञान होतें तोपर्यंत सर्वकर्मसंन्यास होणें कसें शक्य आहे? ज्ञानी पुरुषाचे ठिकाणीं जेव्हा बाहेर कोणतेंच कर्म होतांना दिसत नाही. तेव्हा त्याचा सर्वकर्मसंन्यास होतो असे कोणी म्हणत नाही, कारण तसा बाह्य सर्वकर्मसंन्यास कोणाचाच होत नाही. कर्म व कर्माचें कर्तृत्व हे दोन्ही वस्तुत: आत्म्याचे ठिकाणीं नाहीत, ते अज्ञानामुळे भासतात व अज्ञान ज्ञानाने नाहिसें झालें की मग सूर्यप्रकाशाप्रमाणें सर्वत्र एक आत्म्याचाच अनुभव येतो, त्यावांचून दुसऱ्या कशाचाच प्रत्यय येत नाही, असें भगवंतांनीच सांगितलें आहे. असा हा कर्मसंन्यास कर्मयोग्याचाहि होतो. म्हणजे बाहेर तो कर्में करीत असलेला दिसतो, पण अंत:करणांत मी कर्म करितों अशी त्याचे ठिकाणीं कर्तृत्वबुद्धि उत्पन्न होत नाही.

अशा रीतीने कर्मयोग्याचा कर्मयोग त्याच्या ठिकाणीं सर्वकर्मसंन्यासरूप ज्ञान उत्पन्न करून देऊन पुढे चालू राहतो; हेंच या पांचव्या अध्यायांत सांगितलें असल्यामुळे या अध्यायातील विषयाला संन्यासयोग हें नाव दिलें आहे. आपल्या ठिकाणीं कर्म नाही व त्याचें कर्तृत्वहि नाही, याचा साक्षात् अपरोक्ष अनुभव घेऊन पाहण्यासाठी भगवंतांनी योगाभ्यासहि सांगितला.

कर्मयोग्याने, कर्मयोगाबरोबर योगाभ्यास केला असतां, त्याला सदेह सच्चिदानंद ब्रह्मस्वरूप असल्याचा अनुभव येतो व सर्व विषयवासनाशून्य अशी परमशांति प्राप्त होते.

॥ श्रीमद्सद्गुरु श्रीज्ञानेश्वरमहाराजार्पणमस्तु ॥



॥ श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ॥

# अध्याय सहावा

**अवतरणिका**-मागील पांचव्या अध्यायांत अर्जुनाचे इच्छेनुसार जे ध्यानरूप लययोगाचें भगवंतांनी संक्षेपाने वर्णन केलें, त्याचेंच सविस्तर वर्णन, या सहाव्या अध्यायांत केलें आहे.

**मग रायातें म्हणें संजयो। तोचि अभिप्रावो अवधारिजो। श्रीकृष्ण सांगती आतां जो। योगरूप॥ १ ॥**
**सहजें ब्रह्मरसाचें पारणें। केलें अर्जुनालागीं नारायणें। कीं तेचि अवसरीं पाहुणे। पातलों आम्ही॥ २ ॥**
**कैसी दैवाची थोरी नेणिजे। जैसें तान्हेलिया तोय सेविजे। कीं तेंचि चवी करूनि पाहिजे। तंव अमृत आहे॥ ३ ॥**

**अर्थ**—मग संजय राजा धृतराष्ट्राला म्हणाला, भगवान श्रीकृष्ण आता अर्जुनाला जें योगमार्गाचें निरूपण सांगणार आहेत, तेंच आपण ऐका. ॥ १ ॥ राजा! भगवान श्रीकृष्णाने अर्जुनाला युद्धाला प्रवृत्त करीत असतां, अनायासें ब्रह्मानंदाची मेजवानी केली व आपणहि अगदी वेळेवर अनायासें पाहुण्याप्रमाणे येऊन पोहोंचलों. ॥ २ ॥ ज्याप्रमाणे पाण्यासाठी तळमळणाऱ्या एखाद्या तहानलेल्या मनुष्याने पाणी प्यावयास घेतलें, पण तें पाणी तोंडाला लावल्याबरोबर, त्याला तें अमृत आहे, असें कळून आलें, तर त्याचें केवढें थोर भाग्य, याची कल्पना देखील करतां येणार नाही. ॥ ३.॥

**गूढार्थदीपिका-कैसी दैवाची थोरी नेणिजे**—"**अनंत जन्मांचें पुण्य जोडे। तरीच हा परमार्थ घडें। मुख्य परमात्मा आतुडे। स्वानुभवेसि**"॥ ४॥ (दासबोध दश १-स-९) अनुभवी संतांचे मुखाने परब्रह्मवस्तूचें निरूपण ऐकावयास मिळणें, याला महद्भाग्यच लागतें. अनंत जन्मांतील पुण्यसंचयाने भगवत्कृपा होऊनच तें भाग्य प्राप्त होतें. "**परी कोणें काळें कोणें देशीं। कोण समय विशेषी। हरि कृपा करितो कैसी। कोणासी कळेना. ॥ ४४१ ॥**" (ए० भा० अ० २३)

**तैसें आम्हां तुम्हां जाहलें। जें आडमुठीं तत्त्व फावलें। तंव धृतराष्ट्रें म्हणितलें। हें न पुसों तूंतें॥ ४॥**
**तया संजया येणें बोलें। रायाचें हृदय चोजवलें। जें अवसरीं आहे घेतलें। कुमरांचिया॥ ५॥**
**हें जाणोनि मनीं हांसिला। म्हणे म्हातारा मोहें नाशिला। एऱ्हवीं बोलु तरी भला जाहला। आवसरीं इये॥ ६॥**

**अर्थ**—त्याप्रमाणे तुम्हाला व मला येथे, या प्रसंगी झालें, कारण तशी कांही इच्छा न करतां व कल्पनाहि नसतांना अकस्मात् आत्मतत्वाची प्राप्ति झाली हें ऐकून राजा धृतराष्ट्र म्हणाला, संजया! हें कांही तुला मी विचारीत नाही. ॥ ४॥ राजाचें भाषण ऐकून, संजयाला राजाचें अंत:करण कळून आलें व वाटलें की, ह्यावेळीं आपल्या मुलांकडे राजाचें लक्ष लागलें आहे. ॥ ५ ॥ अशी राजाच्या मनाची स्थिति कळून आली, तेव्हा संजयाला हसूं आलें व आपल्याशींच तो म्हणाला, हा म्हातारा पुत्रमोहाने भगवंताच्या उपदेशाकडे लक्ष न देतां आपला घात करून घेत आहे. खरें पाहतां ह्या वेळीं भगवंताने अर्जुनाला कसा सुंदर उपदेश केला आहे!॥ ६ ॥

**गूढार्थदीपिका-म्हणे म्हातारा मोहें नाशिला**—जोपर्यंत मनुष्याचें चित्त संसारात आसक्त असतें, तोपर्यंत "गोड परमार्थ लागे कडू। कडू विषय तो गोडू। जीवासी जाहाला॥" १५९, (ज्ञा० अ०१०) अखंड परमानंदाचा लाभ करून देणारा परमार्थ मनुष्याला रुचत नाही. सांसारिक गोष्टीच ऐकाव्याशा वाटतात. येथे साक्षात परब्रह्ममूर्ति परमात्मा श्रीकृष्ण परब्रह्माचा उपदेश करणारे व भक्तराज अर्जुन-श्रवण करणारा असा संवादाचा प्रसंग असूनहि धृतराष्ट्राच्या मनावर त्याचा कांही एक परिणाम झाला नाही. पण संजयाला मात्र आपल्या थोर भाग्याने हा संवाद अनायासें ऐकायला मिळाला असें वाटत होतें.

**परि तें तैसें कैसेनि होईल। जात्यंधा कैसें पाहेल। तेवींची येरु से घेईल। म्हणोनि बिहे॥ ७॥**
**परि आपण चित्तीं आपुलां। निकियापरी संतोषला। जे तो संवादु फावला। श्रीकृष्णार्जुनांचा॥ ८॥**

**अर्थ**—पण जन्मत: आंधळां असलेल्या धृतराष्ट्राला तो, भगवंताच्या उपदेशाचा प्रकाश मिळेल, असें होणें कसें शक्य आहे? तितक्यांत राजाला आपल्या म्हणण्याचा कदाचित राग येईल, म्हणून संजय भ्याला. ॥ ७॥ पण (थोर भाग्याने) आपल्याला श्रीकृष्णार्जुनांचा संवाद ऐकायला मिळाला असें वाटून, स्वत: संजयाला मात्र अत्यंत संतोष वाटला. ॥ ८॥

**गूढार्थदीपिका-परि आपण चित्तीं आपुला। निकियापरी संतोषला॥**—सज्जनांना मात्र परमार्थग्रंथाचें श्रवण व परमार्थ ग्रंथाचे वाचन करण्यांत आनंद वाटतो॥ जेथें नाही आत्मज्ञान। तया नांव करमणूक॥ असें त्यांचें निश्चित मत असतें, म्हणून ते दुसऱ्यालाहि परमार्थच सांगतात.

**तेणें आनंदाचेनि धालेपणें। साभिप्राय अंत:करणें। आतां आदरेसीं बोलणें। घडेल तया॥ ९ ॥**
**तो गीतेमाजि षष्ठींचा। प्रसंगु असे आयणीचा। जैसा क्षीरार्णवीं अमृताचा। निवाडु जाहला॥ १०॥**
**तैसें गीतार्थाचें सार। जें विवेकसिंधूचें पार। नाना योगविभवभांडार। उघडलें कां॥ ११॥**

**अर्थ**—त्या आनंदाने तृप्त होऊन व श्रीकृष्णाच्या उपदेशांतील अभिप्राय नीट ओळखून, संजय आता पुढे धृतराष्ट्राला आदरपूर्वक कृष्णार्जुनांचा संवाद निवेदन करील. ॥ ९॥ ज्याप्रमाणे क्षीरसमुद्राच्या मंथनातून निघालेल्या वस्तूंतून अमृत हें देवांनी घेण्याजोगें ठरविलें, त्याप्रमाणे गीतेमध्ये या सहाव्या अध्यायांतील निरूपण प्रत्यक्ष आत्मानुभव प्राप्त करून देणारें असल्यामुळें, ऐकण्याजोगें आहे. ॥ १०॥ त्याचप्रमाणें तें निरूपण गीतार्थाचे सारभूतच म्हणता येईल किंवा तें आत्मानात्मविवेकरूपी समुद्राचें पैलतीर म्हणतां येईल. अथवा योगैश्वर्याचें उघडलें गेलेलें कोठार म्हणतां येईल. ॥ ११॥

**गूढार्थदीपिका-गीतार्थाचें सार**—सहाव्या अध्यायांत सांगितलेला योग म्हणजे संपूर्ण गीतेचें सार होय, असें श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात, असा या चरणाचा अर्थ नाही. गीताशास्त्र हें वेदान्तशास्त्र आहे. वेदान्तशास्त्राप्रमाणेच गीतोपदेशांतील सार किंवा प्रयोजनहि जीवब्रह्माचें ऐक्य हेच आहे. हें सार किंवा प्रयोजन योगाने प्रत्यक्ष साध्य होतें, म्हणून या अध्यायांतील निरूपणाला गीतार्थाचें सार म्हटले आहे.

**विवेकसिंधूचे पार**—विवेक म्हणजे विचार. मी सर्व जाणणारा असून, बुद्धीपासून देहापर्यंत जेवढें पदार्थ आहेत, तेवढे सर्व जाणले जाणारे आहेत. म्हणून या सर्वांहून मी निराळा आहे. मी जागृती, स्वप्न, सुषुप्ति या तिन्ही अवस्था जाणतो; म्हणून त्या अवस्थांहूनहि निराळा आहे व चेतनस्वरूप आहे. मी आपल्या नाशाची कल्पना करूं शकत नाही; म्हणून अविनाशी सत्स्वरूप आहे आणि मला ज्या अखंडसुखाची इच्छा आहे, तें जगांत कोठें मिळूं शकत नाही; म्हणून मीच अखंड सुखस्वरूप आहे. असा मी सच्चिदानंदस्वरूप आहे असें जाणणें याला विवेक म्हणतात.

हा विवेक ज्ञानमार्गांत केला जातो आणि या विवेकाने जीव ब्रह्मस्वरूप होतो. पण अशा या विवेकाने जीवाचें परब्रह्माशीं होणारें ऐक्य नुसतें विचारमूलक असल्यामुळें-अनुमानजन्यच असतें; म्हणून नुसत्या विचाराने ब्रह्मस्वरूप होणाऱ्या व्यतिरेक ज्ञान्यांना मरेतोपर्यंत असा विवेकच करीत राहावें लागतें. त्यांचा तो विवेक बंद पडत नाही. हे ''विवेकसिंधु'' या पदाने सुचविलें आहे.

आत्मा व अनात्मा किंवा चेतन व जड असे दोन पदार्थ परस्परांत मिसळलेले जोपर्यंत भासतात, तोपर्यंत विवेक करावा लागतो. पण योगाने अद्वैत ब्रह्मस्वरूपाशीं ऐक्य होऊन, अद्वैतदृष्टि म्हणजे एका सच्चिदानंद परब्रह्मावांचून दुसरी वस्तु नाही, अशी दृष्टि दृढ झाली म्हणजे मग विवेक करायला दोन वस्तुच राहत नाहीत. म्हणून विवेक बंद पडतो. हेंच 'पार' या शब्दाने सुचविलें आहे. योगाभ्यासाने अद्वैताचा प्रत्यक्ष अनुभव येतो व तो अनुभव दृढ झाला असतां, पुढे विवेकाचें कामच पडत नाही. अशा रीतीने योग हा विवेक सिंधूचा पार आहे.

**योगविभव भांडार**—नुसत्या ज्ञान्याला कांही एक ऐश्वर्य प्राप्त होत नाही. पण योग्याला अनेक प्रकारचें सामर्थ्य प्राप्त होतें.

**जें आदिप्रकृतीचें विसवणें। जें शब्दब्रह्मासि न बोलणें। जेथूनि गीतावल्लीचें ठाणें। प्ररोहो पावे॥ १२॥**

**अर्थ**—जेथे मूळ प्रकृति लीन होते. जें वेदरूप शब्दाने देखील बोलतां आलें नाही व ज्या ठिकाणाहून या गीतारूपवल्लीचें (भवौषधीचें) बीजरूप अस्तित्व व्यक्तदशेला येतें.॥ १२॥

**गूढार्थदीपिका**-**जें आदिप्रकृतीचें विसवणें**—या सहाव्या अध्यायांत सांगितलेल्या योगाने, जीव ज्या परब्रह्म स्वरूपाशीं ऐक्य पावतो, त्या परब्रह्माचें या ओवींत माऊली वर्णन करीत आहेत.

परब्रह्म हें आदिप्रकृतीचें विश्रांतिस्थान होय. नाथांनी आदि प्रकृतीचें म्हणजे मूळमायेचें वर्णन केलें आहे "**स्वरूप निर्विकल्प पूर्ण। तेथ मी म्हणावया असे कोण। ऐसेहि ठायीं स्फुरे मीपण। तें मुख्यत्वें जाण मूळमाया**"॥ ७२॥ (ए० भा० अ० ३) मूळमाया, म्हणजे 'अहंब्रह्मास्मि' हें स्फुण होय. या स्फुरणाला मूळमाया म्हणण्याचें कारण असें आहे की, हें स्फुरण होतांक्षणींच, जीवाला सर्व नामरूपात्मक सृष्टि प्रगट झालेली दिसते. परमात्मा या मूळमायेचें विश्रांतिस्थान आहे असें माऊली म्हणतात. 'अहंब्रह्मास्मि' हें स्फुरण झालें की, जाणीव स्फुरते. त्यापूर्वी परब्रह्म जाणीवरहित निर्विकल्प असतें. परब्रह्माची मूळची जाणीवरहित अवस्था, हीच 'अहंब्रह्मास्मि' या जाणीवरूप मूळमायेचें विश्रांतिस्थान होय.

**शब्दब्रह्मासि न बोलणें**—शब्दब्रह्म म्हणजे वेद. परमात्मा नित्य निर्विकल्पच आहे. "**जाणीव नेणीव भगवंती नाही**" असे श्रीज्ञानेश्वर महाराजांनी हरिपाठाच्या अभंगांत म्हटलें आहे. नाथहि म्हणतात—**विजातीय भेद 'मी देह म्हणणें।' सजातीय भेद 'मी जीवपणे।' स्वगत भेद 'मी ब्रह्म' स्फुरणें। हे तिन्ही नेणें परमात्मा॥ ५२६॥** (ए० भा० अ० २८) मी देह म्हणणें व मी जीव म्हणणें ही स्वरूपाची नेणीव व मी ब्रह्म म्हणणें ही स्वरूपाची जाणीव किंवा ज्ञान हे तिन्ही स्वरूपाचे ठिकाणीं नसतात. हें सर्व जीवाच्या दृष्टीने सांगितलें गेलें आहे. जाणीव स्फुरली असतांनाच कशाचेंहि वर्णन होऊं शकतें. जाणीवरहित निर्विकल्प अवस्थेंत जाणीवच स्फुरत नाही. म्हणून जाणीवरूप वेदहि निर्विकल्प परमात्म्याचें वर्णन करूं शकत नाहीत.

**जेथूनि गीतावल्लीचें ठाणें। प्ररोह पावे**—जेथून म्हणजे या निर्विकल्प स्वरूपाच्या ठिकाणीं, गीतावेली बीजरूपाने असते व ती तेथूनच पुढे प्रगट होते, असें माऊलीचें म्हणणें आहे. पण भगवान श्रीकृष्णाच्या मुखाने गीता सांगितली गेली हें प्रसिद्ध आहे. या दोहींचाहि विचार केल्यास, भगवान् श्रीकृष्ण निर्विकल्प स्वरूप आहेत असाच श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या म्हणण्याचा निष्कर्ष निघतो. मायाभ्रांतीमुळे जीवाच्या स्वरूपांत जशी अपूर्णता येते, तशी परमेश्वराच्या स्वरूपांत येत नाही म्हणून परमात्म्याचे अवतारहि पूर्ण निर्विकल्प ब्रह्मस्वरूप असतात व गीतोपदेशाची वेली, ज्या श्रीकृष्णस्वरूपापासून प्रगट झाली, तें श्रीकृष्णस्वरूप पूर्ण निर्विकल्प ब्रह्म होय, असें माऊलींनी या चरणांत सुचविलें आहे.

**तो अध्याय हा सहावा। वरि साहित्याचिया बरवा। सांगिजैल म्हणोनि परिसावा। चित्त देउनी॥ १३॥**
**माझा मराठाचि बोलु कौतुकें। परि अमृतातेंही पैजां जिंकें। ऐसीं अक्षरें रसिकें। मेळवीन॥ १४॥**
**जिये कोंवळिकेचेनि पाडें। दिसती नादींचे रंग थोडे। वेधें परिमळाचें बीक मोडे। जयाचेनि॥ १५॥**
**ऐका रसाळपणाचिया लोभा। कीं श्रवणींचि होति जिभा। बोलें इंद्रियां लागे कळंभा। एकमेकां॥ १६॥**
**सहजें शब्दु तरी विषो श्रवणाचा। परि रसना म्हणे हा रसु आमुचा। घ्राणासि भावो जाय परिमळाचा। हा तोचि होईल॥ १७॥**
**नवल बोलतीये रेखेची वाहणी। देखतां डोळ्यांही पुरों लागे धणी। ते म्हणती उघडली खाणी। रूपाची हे॥ १८॥**
**जेथ संपूर्ण पद उभारे। तेथ मनचि धांवे बाहिरें। बोलु भुजाही आविष्करे। आलिंगावया॥ १९॥**
**ऐशीं इंद्रियें आपुलालिया भावीं। झोंबती परि तो सरिसेपणेंचि बुझावी। जैसा एकला जग चेववी। सहस्रकरु॥ २०॥**
**तैसें शब्दाचें व्यापकपण। देखिजे असाधारण। पाहातयां भावज्ञां फावती गुण। चिंतामणिचे॥ २१॥**

**अर्थ**—तो हा (अनिर्वाच्य ब्रह्मस्थितीचा अनुभव देणारा) सहावा अध्याय होय. तो आता उत्तम अलंकारिक भाषेंत सांगितला जाईल; म्हणून अत्यंत एकाग्रचित्ताने श्रवण करा. ॥ १३ ॥ माझी ही भाषा प्राकृत आहे खरी, पण ती अमृतालाहि पैज मारून जिंकील, अशी त्यांत रसाळ शब्दांची योजना करीन. ॥ १४ ॥ त्या अक्षराच्या कोमलपणाच्या मानाने पाहिलें असतां सप्तसुरांतील कोमलपणाहि थोडाच दिसेल आणि त्यांच्या चित्ताकर्षणाने सुगंधाचें चित्ताकर्षक सामर्थ्यहि नाहिसें होईल. ॥ १५ ॥ त्याचप्रमाणे हेंहि लक्षांत ठेवा की, भाषेच्या रसाळपणाच्या लोभाने श्रवणेंद्रियाच्या ठिकाणीं रसनेंद्रिय येतील आणि या भाषेने इंद्रियांमध्ये परस्परांत भांडण सुरूं होईल. ॥ १६ ॥ खरोखर, शब्द हा कानाचा विषय होय, पण जिभेला हा शब्द माझा विषय आहे असें वाटेल. नाकाला, त्या शब्दाचे ठिकाणी आपला सुगंध विषय आहे असें वाटेल व तो शब्द नाकाला सुगंधाचाच अनुभव देईल. ॥ १७ ॥ भाषेच्या मर्यादेची पद्धत अशी आश्चर्यकारक की तें पाहून डोळ्यांचें पारणें फिटेल व त्यांची इच्छा तृप्त होईल व ते म्हणतील की हे शब्द म्हणजे रूपाची खाणीच आहे. ॥ १८ ॥ जेथे संपूर्ण पद उभारलें जाईल, तेथे मन इंद्रियांना मागे सारून, त्या बोलाला बाह्या पसरून, आलिंगन देण्याला बाहेर धावेल. ॥ १९ ॥ याप्रमाणे ही इंद्रिये, त्या शब्दाला विषय समजून झोंबतील, पण ज्याप्रमाणे एकच सूर्य उदय पावून, सर्व जगाला जागे करितो, त्याप्रमाणे माझा तो शब्दहि, सर्वांचे सारखें समाधान करील. ॥ २० ॥ त्याप्रमाणेच त्या शब्दाचा अर्थहि असामान्य व्यापक व खोल आहें असें दिसेल. त्यांतील गुप्त अभिप्रायाकडे पाहणाऱ्याला, त्यांत चिंतामणीचे गुण दिसतील. ॥ २१ ॥

**गूढार्थदीपिका**-'**वाचामर्थोऽनुधावति**'—श्रीज्ञानेश्वर महाराजांसारख्या ज्ञानी भक्ताचे सर्व मनोरथ भगवान पूर्ण करतो. नव्हे, तेच स्वत: सत्यसंकल्प असे भगवद्रूप असतात, म्हणून त्यांची इच्छा पूर्ण होते. स्वत: सरस्वतीच, त्यांचेसमोर हात जोडून उभी असते. किंवा ज्ञानीभक्त, आपल्या ज्ञानभक्तीच्या बळाने जेवढा भगवान, तेवढे ते होतात म्हणजे सर्व स्वरूपच ते होऊन राहतात; म्हणून सरस्वतिहि तेच असल्यामुळे, श्रीज्ञानेश्वर महाराजांचे, वरील आत्मविश्वासाचे उद्गार योग्यच आहेत. त्यांच्यासारख्या पुरुषांनी जसा संकल्प करावा, तसा तो एकदम सिद्ध होतो. त्यांना योग्य शब्द शोधावे लागत नाहीत व पदरचनेचा विचार करावा लागत नाही "वाचामर्थोऽनुधावति" त्यांच्या तोंडातून शब्द निघाला, की अर्थ त्यांत तात्काल शिरतो. त्याचप्रमाणे सर्व अलंकारादि गुणहि तेथे हजर होतात.

**हें असोतु या बोलांचीं ताटें भलीं। वरी कैवल्यरसें वोगरलीं। ही प्रतिपत्ति मियां केली। निष्कामासी ॥ २२ ॥**

**अर्थ**—हें असों. अशा प्रकारच्या साहित्यपूर्ण शब्दांची उत्तम ताटें मांडून त्यांत ब्रह्मरस वाढला जाईल. पण हें माझे निवेदन निष्काम पुरुषांकरिता आहें. ॥ २२ ॥

**गूढार्थदीपिका**—ही प्रतिपत्ति मिया केली। निष्कामासि॥—विषयसुखाने घेरलेले चित्त, कितीहि उपदेश, केला, तरी ब्रह्माकार होत नाही. म्हणून विषयसुखाचा वीट येऊन, ज्यांना ब्रह्मसुखाच्या प्राप्तीची तळमळ लागली, तेच विरागी पुरुष योगाचे अधिकारी होत.

**आतां आत्मप्रभा नीच नवी। तेचि करूनि ठाणदिवी। जो इंद्रियांतें चोरूनि जेवी। तयासीचि फावे ॥ २३ ॥**

**( निष्काम पुरुषाचें निवेदन माऊली या ओवींत करीत आहे. )**

**अर्थ**—आता नित्य नूतन एकसारखा प्रकाशणारा नित्य ज्ञानरूप जो आत्मप्रकाश, त्याला ठाणदिवी करून म्हणजे स्थिर करून, इंद्रियांना न कळूं देता, जो या ताटांत जेवील, त्यालाच त्या कैवल्यरसाचा स्वाद घेतां येईल. ॥ २३ ॥

**गूढार्थदीपिका—आत्मप्रभा नित्य नवी—"द्वे दृष्टी चक्षुषोऽनित्या दृष्टिर्नित्याच आत्मन:"** (ऐत० २-४-१) मनुष्याच्या ठिकाणीं दोन ज्ञानदृष्टि आहेंत. एक नित्य ज्ञानदृष्टि व दुसरी अनित्य ज्ञानदृष्टि आहे. इंद्रिय ज्ञानदृष्टि ही अंधारांत पाहूं शकत नाही. उजेडांतच पाहूं शकते; म्हणून ती अनित्य आहें. या दृष्टीने जागृतींत, सूर्यप्रकाशाच्या साह्याने, बाहेरचे पदार्थच दिसतात. आत्म्याची ज्ञानरूप दृष्टि ही नित्य आहें. या दृष्टीने जागृति, स्वप्न, सुषुप्ति या तिन्ही अवस्थेंत दिसते. अंधार पडला तरी त्या दृष्टीने दिसूं शकते.

कैवल्यरसाने म्हणजे अखंड ब्रह्मानंदाने भरलेले आत्मस्वरूप हें या आत्मज्ञान दृष्टीनेच अनुभवाला येतें. तें अनित्य इंद्रिय दृष्टीने अनुभवितां येत नाही. म्हणून आत्मस्वरूपाचा अनुभव घेण्याकरिता, इंद्रियरूप अनित्य ज्ञानदृष्टीचा त्याग करून, अखंड नित्यदृष्टीचा आश्रय केला पाहिजे. या नित्यज्ञानदृष्टीलाच वेदान्तांत साक्षी म्हणतात.

**जो इंद्रियातें चोरूनि जेवी। तयासीचि फावे**—इंद्रियाची बाह्य विषयांकडेच धाव असल्यामुळे, जे जे ज्ञान किंवा जे जें सुख इंद्रियाच्या द्वारा होतें, तें तें ज्ञान किंवा तें तें सुख विषयाच्या ज्ञानाप्रमाणे किंवा सुखाप्रमाणे अनित्य असें अनुभवाला येतें; म्हणून नित्यज्ञानदृष्टिरूप आत्म्याचा नित्य अनुभव येण्याकरिता; तीव्र वैराग्याने विषयसुखाचा त्याग करून व इंद्रियांचा रोध करून, आपल्या साक्षी स्वरूपाचेंच अखंड अनुसंधान केलें पाहिजे.

**येथ श्रवणाचेनि पांगे-। वीण श्रोतयां होआवे लागे। हें मनाचेनि निजांगें। भोगिजे गा॥ २४॥**

**आहाच बोलाची वालीफ फेडिजे। आणि ब्रह्माचियाचि आंगा घडिजे। मग सुखेंसीं सुरवाडिजे। सुखाचिमाजि॥ २५ ॥**

**अर्थ**—तेथे श्रोत्याने श्रवणेंद्रियाचाहि संबंध सोडला पाहिजे व नुसत्या मनानेच तें भोगलें पाहिजे. ॥२४॥ बोलीचे दिसत असलेलें आच्छादन दूर करून, आंतील अर्थ जे ब्रह्म. त्याशीं समरस होऊन जावें व मन सुखांत मग्न होऊन सुख भोगावें. ॥ २५ ॥

**गूढार्थदीपिका—आहाच बोलाची वालिफ फेडिजे। आणि ब्रह्माचियाचि आंगा घडिजे**—ब्रह्मस्वरूपाचें निरूपण ऐकतांना शब्दावर दृष्टि न जाऊं देतां, अर्थावर दृष्टि देत गेलें पाहिजे म्हणजे आपलें चित्त ब्रह्माकार होत जाते. चित्ताचें ब्रह्माकार होणे, हेंच ब्रह्माच्या आंगावर घडणें म्हणजे ब्रह्माशीं ऐक्य पावणें होय.

**मग सुखेसी सुरवाडिजे**—चित्त ब्रह्माकार झालें म्हणजे चित्त सुखरूप होऊन राहतें.

**ऐसें हळुवारपण जरी येईल। तरीच हें उपेगा जाईल। एऱ्हवीं आघवी गोठी होईल। मुकया बहिरयाची॥ २६॥**

**अर्थ**—जर चित्त असें हळुवार म्हणजे कोमल होईल, तरच त्या चित्ताचा येथे उपयोग होईल (म्हणजे त्या चित्ताला मोक्षलाभ घेतां येईल) नाही तर पुढे होणारें योगाचें विवेचन मुक्याबहिऱ्यांनी ऐकल्यासारखे निरर्थक होईल. ॥ २६ ॥

**गूढार्थदीपिका—ऐसे हळुवारपण**—एखाद्याने, एखाद्या आपल्या आप्ताची उपेक्षा केली तर त्याचें चित्त निष्ठुर झालें असें आपण म्हणतों आणि तो जर त्याच्याकरिता तळमळत असला, तर त्याचें चित्त मोठें कोमल आहे, असें आपण म्हणतों. त्याचप्रमाणे विषयसुखाकरिता तळमळणारें चित्त, विषयाविषयी हळुवार असतें व त्याचा त्याग करणारें चित्त, विषयाविषयी निष्ठुर होतें. "काठिण्य विषये कुर्यात् द्रवत्वं भगवत्पदे" विषयाचा त्याग करून त्याविषयी निष्ठुर झालेलें व ब्रह्मप्राप्तीविषयी तळमळणारे म्हणून कोमल झालेलें चित्तच परब्रह्मप्राप्ति करून घेऊ शकतें.

**परी तें असो आतां आघवें। नलगे श्रोतयांतें कडसावें। जे अधिकारिये एथ स्वभावें। निष्कामकामु॥ २७॥**

**जिहीं आत्मबोधाचिया आवडी। केली स्वर्गसंसाराची कुरोंडी। ते वांचूनि एथींची गोडी। नेणती आणिक॥ २८ ॥**

**जैसा वायसीं चंद्र नोळखिजे। तैसा प्राकृतीं हा ग्रंथु नेणिजे। आणि तो हिमांशुचि जेविं खाजें। चकोराचें॥ २९॥**

**तैसा सज्ञानासी तरी हा ठावो। आणि अज्ञानासी आन गांवो। म्हणोनि बोलावया विषय पहा हो। विशेषें नाहीं॥ ३० ॥**

**परि अनुवादलों मी प्रसंगे। तें सज्जनी उपसाहावें लागे। आतां सांगेन काय श्रीरंगे। निरोपिलें जें॥ ३१॥**

**तें बुद्धीही आकळितां सांकडें। म्हणऊनि बोलीं विपायें सांपडे। परि निवृत्तिकृपादीपउजियेडें। देखेन मी॥ ३२ ॥**

**जें दिठीही न पविजे। तें दिठीविण देखिजे। जरी अतींद्रिय लाहिजे। ज्ञानबळ॥ ३३॥**

**ना तरी जें धातुवादाही न जोडे। तें लोहींचि पंधरें सांपडे। जरी दैवयोगें चढे। परिसु हातां॥ ३४॥**

**तैसी सद्गुरुकृपा होये। तरी करितां काय आपु नोहे। म्हणऊनि ते अपार मातें आहे। ज्ञानदेवो म्हणे॥ ३५॥**

**अर्थ**—पण हें बोलणें येथेच पुरे, कारण या ग्रंथाचें श्रवण करणारे निष्कामच असल्यामुळे स्वभावत:च ते श्रवणाला अधिकारी आहेत, म्हणून त्यांना निक्षून सांगण्याची गरज नाही. ॥ २७ ॥ ज्यांनी आत्मबोधाच्या आवडीवरून स्वर्गीय सुख व संसार सुख या दोन्ही सुखांना ओवाळून टाकून दिलें अशा पुरुषांवाचून, दुसऱ्या कोणालाच

कैवल्यानंद भोगतां येणार नाही. ॥ २८ ॥ ज्याप्रमाणे कावळ्याला चंद्राची कधी ओळखच नाही, त्याप्रमाणे अज्ञानी संसारासक्त अशा पुरुषांना हा ग्रंथ कधी समजणार नाही आणि ज्याप्रमाणे चंद्राचे किरणहि चकोराचाच खाऊ होतो. (दुसऱ्या कोणाचा नव्हे). ॥ २९ ॥ त्याप्रमाणे ज्ञानियांना हा ग्रंथ ब्रह्मप्राप्तीचें ठिकाण वाटेल, आणि विषयासक्त अज्ञानी पुरुषाला भलत्याच गांवाला जाणारा मार्ग वाटेल म्हणून येथे विशेष कांही सांगतां येण्याजोगा विषय नाही. ॥ ३० ॥ पण मी प्रसंगोपात्त त्या विषयाचा पुन: उच्चार केला आहे. तेवढी पुनरुक्ति, आपण सज्जनांनी सहन करावी. आता श्रीकृष्णाने अर्जुनाला काय सांगितलें तेंच सांगतों. ॥ ३१ ॥ जें बुद्धीला आकलन करणें कठीण आहे, म्हणूनच तें शब्दाने क्वचित् बोललें जातें. पण मी तें श्रीसद्‌गुरू निवृत्तिनाथांच्या कृपारूप दिव्याच्या प्रकाशाने पाहीन ॥ ३२ ॥ जर इंद्रियातीत अशा आत्म्याच्या नित्य ज्ञानदृष्टीचें बळ असलें तर, इंद्रिय दृष्टीलाहि जें दिसूं शकत नाही तें इंद्रियांवांचूनहि पाहतां येते. ॥ ३३ ॥ किमयाने धातूचें जातिवंत सोनें होऊं शकत नाही. पण जर दैवाने परिस हातीं आला तर त्या परिसाने मात्र धातूचें जातिवंत सोनें होऊं शकतें. ॥ ३४ ॥ त्याप्रमाणे श्रीगुरूची कृपा झाली, तर प्रयत्नाने काय साध्य होणार नाही? श्रीज्ञानेश्वरमाऊली म्हणतात ती श्रीगुरूची कृपा माझेवर अमर्याद आहे. ॥ ३५ ॥

**गूढार्थदीपिका—बुद्धीहि आकळितां सांकडे। म्हणवुनि बोलीं विपाये सांपडे**—बुद्ध्यादिकांनी ग्रहण केली जाणारी वस्तु शब्दाने सांगतां येते; पण बुद्ध्यादिकांच्या पलीकडे असणारी परब्रह्मवस्तु बुद्ध्यादिकांनी ग्रहण केली जात नाही. म्हणून ती शब्दाने सांगणे कठीण आहे. या सर्व ओव्यांतून श्रीज्ञानेश्वर माऊलींनी सद्‌गुरूच्या किंवा संताच्या कृपेची व समागमाची अत्यंत महती गायिली आहे. एका सद्गुरूच्या कृपेने असाध्य असलेलें देखील साध्य होतें असें माऊलीचें अनुभवाचें म्हणणें आहे. "**न करितां व्युत्पत्तीचा श्रम। सकळ शास्त्रार्थ होय सुगम। सत्समागमाचें वर्म। तें हें असें॥ ३८ ॥ जें व्युत्पत्तीने न कळे। तें सत्समागमें कळे। सकळ शास्त्रार्थ आकळे। स्वानुभवासी॥ ३९ ॥** (दासबोध द० ७ स० १) असें समर्थहि म्हणतात.

**तेणें कारणें मी बोलेन। बोलीं अरूपाचें रूप दावीन। अतींद्रिय परि भोगवीन। इंद्रियांकरवीं॥ ३६ ॥**

**अर्थ**—त्याच कृपेच्या विश्वासावर मी असें सांगतों की शब्दाने देखील अरूप ब्रह्माचें रूप दाखवीन आणि तें अतींद्रिय आहे तरी इंद्रियांकडूनहि भोगवीन. ॥३६ ॥

**गूढार्थदीपिका**—अरूप अतींद्रिय अशी ब्रह्मस्थिति श्रीगुरूच्या कृपेने जशीच्या तशीच शुद्ध ठेवून इंद्रियांकडून अनुभवितां येणें शक्य आहे. म्हणूनच श्रीज्ञानेश्वर माउलींनी "बोली अरूपाचें रूप दावीन। अतींद्रिय परी भोगवीन। इंद्रियां करवीं" अशी प्रतिज्ञा केली आहे. नाहीतर माऊलीची ही प्रतिज्ञा व्यर्थ होईल.

श्रीगुरुकृपेनेच त्रिगुणात्मक अज्ञान नाहीसे झाल्यावर, पूर्वीची मायिक म्हणून समजलीं गेलेलीं नामरूपें देखील, पूर्ण सच्चिदानंद ब्रह्मस्वरूप आहेत असा अन्वयाने अनुभव येऊन, जेथें शब्दाचा लाग नाही व जें अतींद्रिय आहे, तेंच परब्रह्म, नामरूपासह सगुण साकार झालेलें असें इंद्रियाने देखील अनुभविलें जातें असा श्रीज्ञानेश्वर महाराजांचा अभिप्राय आहे.

नाथहि म्हणतात "**ब्रह्म इंद्रियां गोचर नसे। गुण गेलिया डोळां दिसे। हें अनुभविथासीचि भासे। बोला ऐसें तें नव्हे. ॥ १५१ ॥** (ए० भा० अ० ९) परब्रह्म त्रिगुणात्मक मायेमुळें इंद्रियाला गोचर होत नाही, पण त्रिगुणात्मक मायेचा नाश झाल्यावर, तेंच शुद्ध परब्रह्म सगुणसाकार रूपाने डोळ्याला गोचर होते; हें अनुभवी पुरुषालाच माहित आहे. इतरांना सांगण्यासारखें नाहीं. "**तेव्हां अंतरी चैतन्यघन, बाह्य चिन्मात्र परिपूर्ण। आणिक न दिसे गा जाण। वृत्तीने आण वाहिली**" ॥ १४८ ॥ (ए० भा० अ० ९) पूर्ण अनुभवसंपन्न ज्ञान्याला ब्रह्माशिवाय कांहीच दिसत नाही आणि असा हा आंतबाहेर चैतन्यघन आत्मानुभव श्रीगुरुकृपेशिवाय येतच नाही.

*श्रीभगवानुवाच*

**अनाश्रित: कर्मफलं कार्यं कर्म करोति य: । स सन्न्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रिय: ॥ १ ॥**

**अर्थ**—भगवान म्हणतात, अर्जुना! कर्माच्या फळाची इच्छा न करतां जो आपलें विहित कर्म करतो, तोच

संन्यासी होय व तोच योगीहि होय. नुसता अग्नीचा उत्सर्ग केला किंवा अग्नि नाहीसा केला व कर्म सोडलें, म्हणजेच संन्यासी झाला असें नव्हे. ॥ १ ॥

**आइका यश श्री औदार्य। ज्ञान वैराग्य ऐश्वर्य। हे साही गुणवर्य। वसती जेथ॥ ३७॥**
**म्हणोनि तो भगवंतु। जो निःसंगाचा सांगातु। तो म्हणे पार्था दत्तचित्तु। होईं आतां॥ ३८॥**
**आइकें योगी आणि संन्यासी जनीं। हे एकचि सिनानें झणीं मानीं। एऱ्हवीं विचारिजती जंव दोन्ही। तंव एकचि ते॥ ३९॥**
**सांडिजे दुजया नामाचा आभासु। तरी योगु तोचि संन्यासु। पाहतां ब्रह्मीं नाहीं अवकाशु। दोहींमाजी॥ ४०॥**
**जैसें नामाचेनि अनारिसेपणें। एका पुरुषातें बोलावणें। कां दोहींमार्गीं जाणें। एकाचि ठायां॥ ४१॥**
**नातरी एकचि उदक सहजें। परि सिनाना घटीं भरिजे। तैसें भिन्नत्व हें जाणिजे। योगसंन्यासांचें॥ ४२॥**
**आइकें सकळ संमतें जगीं। अर्जुना गा तोचि योगी। जो कर्मे करूनि रागी। नोहेचि फळीं॥ ४३॥**
**जैसी मही हे उद्भिजें। जनी अहंबुद्धीवीण सहजें। आणि तेथिंचीं तिये बीजें। अपेक्षीना॥ ४४॥**
**तैसा अन्वयाचेनि आधारें। जातीचेनि अनुकारें। जें जेणें अवसरें। करणें पावे॥ ४५॥**
**तें तैसेंचि उचित करी। परी साटोपु नोहे शरीरीं। आणि बुद्धिही करोनि फळवेरी। जायेचिना॥ ४६॥**
**ऐसा तोचि संन्यासी। पार्था गा परियेसीं। तोचि भरंवसेनिसीं। योगीश्वरु॥ ४७॥**

**अर्थ—**ऐका. यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य हे सहा गुण श्रीकृष्णाच्या ठिकाणीं पूर्णपणें व नित्य असतात. ॥ ३७ ॥ म्हणून त्याला भगवान म्हणतात. सर्व संग सोडून निःसंग झालेल्याचा जो सांगाती म्हणजे मित्र, तो भगवान श्रीकृष्ण म्हणाला, अर्जुना! आतां माझ्या म्हणण्याकडे नीट चित्त दे. ॥ ३८ ॥ ऐक, अर्जुना! जगांत योगी व संन्यासी हे एकच आहेत. पण तू कदाचित् निरनिराळे मानशील. साधारणतः दोघांचाहि विचार केला असतां ते एकच आहेत असें दिसेल. ॥ ३९ ॥ योग व संन्यास या दोन नांवाच्या निराळेपणाचा भास सोडून दिल्यास, जो योग, तो संन्यासच आहे. कारण विचार करून पाहतां अद्वैत ब्रह्मस्वरूपाच्या ठिकाणीं योग व संन्यास यांच्या भिन्न अर्थाला अवकाश नाही. ॥ ४० ॥ ज्याप्रमाणे एका मनुष्याला दोन निराळ्या नांवांनी संबोधावें किंवा एकाच गावाला जाण्याचे दोन मार्ग असावेत. ॥ ४१ ॥ किंवा एक पाणी दोन निरनिराळ्या भांड्यांत भरावें, त्याप्रमाणे योग व संन्यास यांचें निराळेपण आहे, असें जाण. ॥ ४२ ॥ अर्जुना! जगांतील सर्व जाणत्या पुरूषांच्या मताने, जो आपलीं विहित कर्मे करून कर्मफळाची इच्छा धरीत नाही, तोच योगी होय. ॥ ४३ ॥ ज्याप्रमाणे पृथ्वी, उत्पन्न केल्याचा अभिमान न वागवितां, सहज झाडें उत्पन्न करते आणि त्या झाडाला येणाऱ्या फळरूपी बीजाचीहि इच्छा करीत नाही. ॥ ४४ ॥ त्याप्रमाणे, आपल्या वंशांत परंपरेने किंवा जातीला धरून जीं आचारकर्में चालत आलीं असतील, तीं ज्या ज्या काळीं करावयाचीं असतात. ॥ ४५ ॥ त्या त्या काळीं बरोबर तशींच योग्य प्रकारें जो करतो, पण शरीराच्या ठिकाणीं कर्तृत्वाच्या अहंकाराने फुगून जात नाही व ज्याची बुद्धिहि फळापर्यंत जात नाही (म्हणजे जो फळाची इच्छा करीत नाही). ॥ ४६ ॥ अर्जुना! ऐक. अशा रीतीने जो कर्म करणारा आहे. तोच संन्यासी होय व निश्चयाने कर्मयोगीहि तोच होय. ॥ ४७ ॥

**गूढार्थदीपिका—**योग म्हणजे परमेश्वरस्वरूपाशीं ऐक्य पावणे होय. हें मागें दुसऱ्या अध्यायांत सांगितलेच आहे. हा योग किंवा हें ऐक्य अंतःकरणवृत्ति परमेश्वराचे ठिकाणीं स्थिर झाली की साधलें जाते आणि विषय, देह, इंद्रियें, मन यांच्यांत आसक्त झालेलें अंतःकरण, त्यांना सोडून अलग झालें की तें स्वभावतः परमेश्वराचे ठिकाणीं स्थिर होतें. संन्यासाने जसें अंतःकरण विषयादिकांपासून सुटून अलग होतें, तसेंच योगानेहि होते. म्हणून योग व संन्यास एकच आहेत, असें येथे सांगितले आहे.

**वांचूनि उचित कर्म प्रासंगिक। तयातें म्हणे हें सांडीन बद्धक। तरी टांकोटांकीं आणिक एक। मांडीचि तो॥ ४८॥**

**अर्थ—**प्रसंगोपात्त जें विहित कर्म तें बंधनकारक आहे, तें सोडलें पाहिजे असें म्हणून तें केलें नाही तरी, लागलीच दुसरें कर्म तो करतोच. ॥ ४८ ॥

**गूढार्थदीपिका—**'कर्माचा त्याग' हा 'संन्यास' शब्दाचा खरा अर्थ नव्हे. मी प्रकृतीहून निराळा आहे म्हणजे कर्म, कर्तृत्व व भोकृत्व हें सर्व प्रकृतीचें कार्य आहे, माझ्याशीं त्याचा कांही एक संबंध नाही हें ओळखणें याला खरोखर संन्यास म्हणतात. म्हणून "म्हणऊनि संग जंव प्रकृतीचा। तंव त्याग न घडे कर्माचा"॥ ६३॥ (ज्ञा० अ० ३) 'विहितकर्मत्यागाने मी कर्मसंन्यास केला' असें प्रकृतिबद्धाने म्हणणें, हा त्याचा आग्रह होय, मी प्रकृतीहून निराळा आहे, असें जोपर्यंत तो ओळखत नाही व मी कर्ताभोक्ता आहे असें आपल्याला समजतो, तोपर्यंत त्याचा कर्मसंन्यास होत नाही. एक कर्म सोडले तरी तो लगेच दुसरें कर्म करतो.

**जैसा क्षाळूनियां लेपु एकु। सवेंचि लाविजे आणिकु। तैसेनि आग्रहाचा पाइकु। विचंबे वायां॥ ४९॥**
**गृहस्थाश्रमाचें ओझें। कपाळीं आधींचि आहे सहजें। कीं तेंचि संन्याससवा ठेविजे। सरिसें पुढती॥ ५०॥**
**म्हणूनि अग्निसेवा न सांडितां। कर्माची रेखा नोलांडितां। आहे योगसुख स्वभावतां। आपणपांचि॥ ५१॥**

**अर्थ—**ज्याप्रमाणें लावलेला एक लेप धुवून टाकून दुसरा लेप लावतात, त्याप्रमाणें कर्म सोडण्याचा आग्रह धरणारा, कर्मरहित न होतां, व्यर्थ दुसऱ्या कर्मात गुरफटला जातो.॥ ४९॥ गृहस्थाश्रमांतील कर्तव्यकर्माचें ओझें आधीच दैवाने सहज प्राप्त झालेलें आहे. तें टाकून देऊन लगेच पुन: संन्यासाश्रमांतील कर्तव्याच्या रूपाने तें वाढविणें म्हणजे घेणे होय॥ ५०॥ म्हणून अग्नीची सेवा म्हणजे अग्निहोत्रादि कर्में न सोडतां व कर्माची मर्यादा न उल्लंघितांच (म्हणजे कर्म करीतच) आपल्या ठिकाणीं सहज ब्रह्मैक्यभावरूपी योगाचें सुख मिळतें.॥ ५१॥

**गूढार्थदीपिका—आहे योगसुख स्वभावतां। आपणपांचि—**कर्मफळाची इच्छा न करितां, परमेश्वराची आज्ञा समजून, केलेलें विहितकर्मानुष्ठान देखील, आत्मस्वरूपाचें ठिकाणीं आपलें अंत:करण स्थिर करते व आपल्या ठिकाणींच आपल्याला ऐक्याचें सुख मिळतें.

**यं सन्न्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पाण्डव। न ह्यसन्न्यस्तसङ्कल्पो योगी भवति कश्चन॥ २॥**

**अर्थ—**ज्याला संन्यास म्हणतात तोच योग होय असे जाण. ज्याने संकल्पाचा त्याग केला नाही तो योगी कधीं होत नाही.॥ २॥

**ऐकें संन्यासी तोचि योगी। ऐसी एकवाक्यतेची जगीं। गुढी उभविली अनेगीं। शास्त्रांतरीं॥ ५२॥**
**जेथ संन्यासिला संकल्पु तुटे। तेथेंचि योगाचें सार भेटे। ऐसें हें अनुभवाचेनि धटें। साचें जया॥ ५३॥**

**अर्थ—**अर्जुना! ऐक. जो संन्यासी आहे तोच योगीहि होय. अशा दोन्ही मार्गाच्या एकवाक्यतेचा झेंडा, पुष्कळ लोकांनी शास्त्रांच्या आधारें या लोकांत फडकविला आहे.॥ ५२॥ जेथें टाकून दिलेला संकल्प मुळींच राहत नाही, तेंच कर्मयोगाचेंहि सार आहे, असें दृढ अनुभवाचे बळावर जो निश्चित जाणतो.॥ ५३॥

**गूढार्थदीपिका—संन्यासी तोचि योगी—**संन्यास किंवा योग या दोहोंनीहि एकच अनुभव येतो. म्हणून यादृष्टीने योग व संन्यास यांचे ऐक्यच आहे, असें शास्त्रकारांनी सांगितलें आहे. कारण ज्यांनी आत्मस्वरूप जाणून, कर्म, कर्तृत्व कर्मफळ या सर्वांहून आपल्याला निराळें पाहिलें, तो साक्षीस्वरूप झालेला ज्ञानी, कर्मादिकांचा आपल्याशीं संबंधच वागवित नसतो; म्हणून त्याला सर्वकर्मसंन्यास घडतो.

कर्मयोग्यालाहि निष्काम कर्मानुष्ठान करण्याकरितां, भगवंताचे ठिकाणीं चित्त ठेवून, संकल्पाचा म्हणजे कर्मफळाच्या इच्छेचा त्याग करावाच लागतो. (संकल्पाचा त्याग केला असतां,) कर्मयोग्याचें चित्त जसजसें भगवंताचे ठिकाणी स्थिर होतें, तसतसा त्यालाहि, मी सर्व कर्मरहित आहे असा अनुभव येतो. याप्रमाणें संन्यासी व योगी दोघांनाहि आपल्या कर्मरहित आत्मस्थितीचा अनुभव येतो, म्हणून दोन्ही मार्ग एकच आहेत असें भगवान म्हणतात.

**आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते। योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते॥ ३॥**

**अर्थ—**ब्रह्मैक्य पदावर चढूं इच्छिणाऱ्याला कर्मच कारण आहे व ब्रह्मैक्यपदावर आरूढ झालेल्यांना शमच कारण आहे.॥ ३॥

**आतां योगाचळाचा निमथा। जरी ठाकावा आथि पार्था। तरी सोपाना या कर्मपथा। चुका झणीं॥ ५४॥**
**येणें यमनियमांचेनि तळवटें। रिगे आसनाचिये पाउलवाटें। येई प्राणायामाचेनि आडकंठें। वरौता गा॥ ५५॥**

**अर्थ**—योगरूपी पर्वताचा माथा म्हणजे परब्रह्म, तेथें जर प्राप्त व्हावयाचें असेल तर अर्जुना! कर्ममार्गाची पायरी चुकतां कामा नये.॥ ५४॥ अर्जुना! (येणें म्हणजे कर्मयोगाने सिद्ध होणाऱ्या) यमनियमरूपी खालच्या पायऱ्यांनी आसनाच्या पाऊलवाटेने चढण्याला सुरुवात करून प्राणायामरूपी बाजूच्या कांठाने वर चढावे.॥ ५५॥

**गूंढार्थदीपिका—येणें यमनियमाचेनि तळवटें**—कर्मयोग म्हणजे योगाभ्यासांतील यमनियमरूपी खालच्या पायऱ्याच होत. निष्काम विहितकर्मानुष्ठानाने यमनियम हीं योगाचीं दोन अंगें साध्य होतात, अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रम्हचर्य व अपरिग्रह, असे हे योगशास्त्रांत यम सांगितले आहेत. अहिंसा म्हणजे मनवाचाकायेने कोण्याहि प्राण्याला दु:ख न देणे. सत्य म्हणजे मनवाचाकायेने असत्य न बोलणे. अस्तेय म्हणजे मनवाचाकायेने देखील दुसऱ्याच्या वस्तूंचा अभिलाष न धरणें. ब्रह्मचर्य म्हणजे मनवाचाकायेने स्त्रीसंगाची इच्छा न करणें व अपरिग्रह म्हणजे कोणत्याहि वस्तूंचा संग्रह न करणें.

परमेश्वरप्राप्तीकरिता कराव्या लागणाऱ्या निष्काम कर्मानुष्ठानांत "**निष्कामासी यागयजन। स्वधर्मार्थ करावे यज्ञ। तेथ पशूचें आलभन। सर्वथा हनन करूं नये.॥ २६४॥' पशूंचें करूं नये हनन। देवतोद्देशें अंगस्पर्शन या नांव बोलिजे आलभन। हें यज्ञाचरण निष्काम**'॥ २६५॥ (ए० भा० अ० ५) पशूंची हिंसा करावयाची नसते. असें नाथांनी म्हटलें आहे. हिंसारूपी यज्ञ हा स्वर्गप्राप्तीकरितां म्हणून सांगितला आहे; परमेश्वरप्राप्तीकरिता नाही. त्याचप्रमाणें फक्त ऋतुकाळीं सकृत् स्वस्त्रीगमन करणें हेंहि ब्रह्मचर्यच होय, असे शास्त्रांत सांगितलें आहे. म्हणून निष्कामकर्मानुष्ठानाने योगांतील यम साधले जातात. शौच, संतोष, तप, स्वाध्याय व ईश्वरप्रणिधान असे हे नियम योगशास्त्रांत सांगितले आहेत. शौच म्हणजे पाणी व माती यांनी शरीरशुद्धी करणें. संतोष म्हणजे दैवाने मिळेल त्यांत संतुष्ट असणें, तप म्हणजे व्रतादिकांनी शरीर कृश करणें, स्वाध्याय म्हणजे वेदाध्ययन करणें व ईश्वरप्रणिधान म्हणजे परमेश्वराचे नामस्मरण व ध्यान करणें, हे सर्व नियम धर्मशास्त्रांतून सांगितले असल्यामुळे, त्यांचें निष्काम अनुष्ठान विहितच आहे. म्हणून निष्काम विहितकर्मानुष्ठानरूप कर्मयोगाने नियमहि साधतात. याप्रमाणें निष्कामकर्मानुष्ठानाने योगमार्गांतील यम व नियम ह्या दोन पायऱ्या साधल्या जातात.

**आसनाचिये पाउलवाटे**—पाउलवाट म्हणजे सुखाने चालतां येणारी वाट.

"स्थिरसुखमासनम्" योगामध्यें पुष्कळ वेळ सुखानें बसतां येईल असें आसन घालून बसायला सांगितलें जातें, म्हणून त्या आसनाला पाउलवाट म्हटलें आहे. यम, नियम इत्यादि सर्व साधनें मनाच्या खंबीर निश्चयाने केलीं जातात.

**येई प्राणायामाचेनि आडकंठें। वरौता गा**—प्राणायाम म्हणजे प्राणापान यांच्या गतींचा रोध. मन ज्ञानशक्तिरूप असून, त्याचीच क्रियारूपशक्ति म्हणजे प्राण होय; म्हणून प्राणायामाला आडकांठ म्हणजे बाजूचा कांठ म्हटलें आहे. या प्राणायामाच्या योगाने मनाचें चांचल्य नाहिसे होतें, हेंच मनाचें वर म्हणजे चवथ्या अंगावर आरूढ होणें होय.

**मग प्रत्याहाराचा अधाडा। जो बुद्धीचियाही पाया निसरडा। जेथ हटिये सांडिती होडा। कडेलग॥ ५६॥**

**अर्थ**—पुढें प्रत्याहाररूपी तुटलेला कडा लागतो, जेथे बुद्धीचे पाय देखील घसरतील, असा तो पुढें प्रत्याहाररूपी कडा चढावा लागतो. मोठमोठ्या हठयोग्यांना देखील या कड्याशीं आल्यावर आपला हट्ट सोडून द्यावा लागतो.॥ ५६॥

**गूढार्थदीपिका—मग प्रत्याहाराचा अधाडा**—"स्वविषयासम्प्रयोगे चित्तस्य स्वरूपानुकार इवेंद्रियाणां प्रत्याहार:"

इंद्रियांचा आपआपल्या विषयाशीं संबंध सुटून, त्या चित्ताच्या स्वरूपाचें अनुकरण करणें याला प्रत्याहार म्हणतात. म्हणजे प्रत्याहारांत इंद्रिये चित्ताच्या स्वाधीन होतात. या प्रत्याहाराला श्रीज्ञानेश्वर माऊलींनी 'अधाडा म्हणजे पर्वताचा तुटलेला कडा' म्हटलें आहे. तुटलेल्या कड्यावर चढणें जसें कठीण असते, तसेंच प्रत्याहार साधणें अत्यंत कठीण आहे, हेंच या उपमेने दाखविलें आहे.

**बुद्धिचिया ही पायां निसरडा**—जीवाची बुद्धि आत्मस्वरूप विसरून, मनाच्या स्वाधीन असते. योग सिद्ध होण्याकरितां म्हणजे बुद्धीचें आत्म्याशी ऐक्य होण्याकरितां, मन इंद्रियें यांच्या पारतंत्र्यांतून बुद्धीची सुटका झाली पाहिजे. ''इंद्रियाणि प्रमाथीनि हरंति प्रसभं मन:'' विषयसक्तीमुळें जीवाचे ठिकाणीं इंद्रियांचेंच प्राबल्य असतें तीं मनांला ओढतात व मन बुद्धीला ओढते. अशा रीतीने बुद्धि आत्म्याच्या ठिकाणीं स्थिर न होतां तेथून घसरून देहासक्त व विषयासक्त होते.

**तरी अभ्यासाचेनि बळें। प्रत्याहारीं निराळें। नखी लागेल ढाळें ढाळें। वैराग्याची॥ ५७॥**

**अर्थ**—पण अभ्यासाचे बळाने, प्रत्याहाररूपी निरालंब भूमिकेंत, हळुहळु वैराग्याचीं नखें रोवलीं जाऊं शकतात. ॥ ५७ ॥

**गूढार्थदीपिका—''अभ्यासवैराग्याभ्यां तन्निरोध:''**—अनंतजन्मापासून विषयाकडे धांवण्याचा अभ्यास असलेल्या चित्ताला, इंद्रियांच्या स्वाधीन होऊन, विषयाकडे न धावूं देण्याचा सतत प्रयत्न करणें, याला अभ्यास म्हणतात. आणि इहपरलोकांतील विषयसुखाची यत्किंचित् इच्छा नसणें, याला वैराग्य म्हणतात. ज्याप्रमाणें घोरपड, ज्या ठिकाणीं चढण्यांचे साधन नाही, अशा किल्ल्यावर फेकली असतां ती आपलीं नखे रोवून, आपल्या सामर्थ्याने चिकटून बसते व तिच्या साह्याने मनुष्य किल्ल्यावर चढतो; त्याप्रमाणें अभ्यासाचे सामर्थ्य व वैराग्याचीं नखें असलीं तरच मनुष्य प्रत्याहाररूपी कड्यावर चढूं शकतो.

**ऐसा पवनाचेनि पाठारें। येतां धारणेचेनि पैसारें। क्रमी ध्यानाचें चवरें। सांडे तंव॥ ५८॥**

**अर्थ**—अशा प्रकारें प्राणवायूच्या आश्रयाने, धारणारूपी विस्तृत मार्गाने ध्यानाचें शिखर गांठेपर्यंत, वर चालावें. ॥ ५८ ॥

**गूढार्थदीपिका—ऐसे पवनाचेनि पाठारें। धारणेचेनि पैसारें**—पुढील मार्ग प्राणाचे साह्यानेच आक्रमावा लागतो.

''देशबंधश्चित्तस्य धारणा'' आधारचक्रादि देशांचे ठिकाणीं चित्त बांधलें जाणें किंवा स्थिर होणें, याला धारणा म्हणतात.

ज्याप्रमाणे विस्तृत रस्त्यावर पडण्याची भीति नसते, त्याप्रमाणें धारणा सिद्ध झाली असतां, पडण्याची भीति राहत नाही; म्हणून येथें धारणेला विस्तृत मार्गाची उपमा दिली आहे.

**क्रमी ध्यानाचें चवरें। सांडे तंव**—''तत्र प्रत्ययैकतानता ध्यानम्'' त्या देशाचे ठिकाणीं असलेल्या परमेश्वरस्वरूपाचे ठिकाणीं एकसारखा चित्ताचा प्रवाह राहणें याला ध्यान म्हणतात. ध्यान या भूमिकेपर्यंत मार्गक्रमणा आहे; म्हणून ध्यानाला चवरें म्हणजे मार्गक्रमणाचा शेवट म्हटलें आहे.

**मग तया मार्गाची धांव। पुरेल प्रवृत्तीची हांव। जेथ साध्यसाधना खेंव। समरसें होय॥ ५९॥**
**जेथ पुढील पैस पारुखे। मागील स्मरावें तें ठाके। ऐसिये सरिसीये भूमिके। समाधि राहे॥ ६०॥**

**अर्थ**—मग या ध्यान भूमिकेवर चालण्याची धांव बंद पडते. प्रवृत्तिहि वोहटीला लागते आणि मग तेथें साध्य व साधन यांची एकरूप मिठी पडते—म्हणजे साधन सरून साध्यच राहते. ॥ ५९ ॥ तेथें पुढील जाणण्याची प्रवृत्ति बंद पडते व मागीलहि कांही स्मरलें जात नाही, अशा सर्वापेक्षा सरस भूमिकेवर समाधिस्थिति राहते. ॥ ६० ॥

**गूढार्थदीपिका—जेथ पुढील पैस पारुखे। मागील स्मरावें ते ठाके**—''तदेवार्थमात्रनिर्भासं स्वरूप-शून्यमिव समाधि:'' जेव्हा ध्यान करणाऱ्याचे चित्त, मी ध्यान करीत आहे. असे आपले स्वरूप विसरून, केवळ ध्येयाकार होऊन जाते, तेव्हा ते ध्यानच समाधि होते. ध्यानांत मी ध्यान करतों अशी जाणीव राहते, म्हणून त्रिपुटी राहते. ही जाणीव नाहिशी झाली की ती ध्यानस्थितीच समाधि होते; म्हणून समाधि ही जाणीवरहित व त्रिपुटीरहित स्थिति होय. हेच श्रीज्ञानेश्वर माऊलींनी ''जेथ पुढील पैस पारुखे। मागील स्मरावें ते ठाके'' या चरणांत सांगितले आहे.

**ऐसिये सरिसीये भूमिके। समाधि राहे**—जाणीव स्फुरली की, जाणणारा व जाणली जाणारी वस्तु असें द्वैत

भासते. ही द्वैतस्थिति ध्यानापर्यंत राहते. आणि जाणीव नाहिशी झाली की, त्यापेक्षां सरस अशी जाणीवरहित अत्यंत एकरूप आनंदाची स्थिति राहते. समाधींत जाणीव राहत नाही, म्हणून समाधि ही ''सरिसिये भूमिके। समाधि राहे'' अत्यंत एकरूप किंवा अद्वैतस्थिति होय, असे माऊलीचें सांगणें आहे.

**येणें उपायें योगारूढु। जो निरवधि जाहला प्रौढु। तयाचिया चिन्हांचा निवाडु। सांगेन आइकें॥ ६१॥**

**अर्थ**—वरील उपायाने जो योगारूढ होऊन, अखंड पूर्ण व्यापक स्वरूप झाला, त्याचीं चिन्हें स्पष्ट करून सांगतों ऐक.॥ ६१॥

**गूढार्थदीपिका—निरवधि जाहला प्रौढु**—समाधिरूप भूमिकेवर आरूढ झालेला पुरुष अमर्याद व्यापक होतो.

**यदा हि नेन्द्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते। सर्वसङ्कल्पसन्न्यासी योगारूढस्तदोच्यते॥ ४॥**

**अर्थ**—जेव्हा योगी इंद्रियांच्या विषयांचे ठिकाणीं व कर्माचे ठिकाणीं मुळींच आसक्त राहत नाहीं व कर्म करण्याची किंवा कर्माचें फळ भोगण्याची त्याच्या मनांत वासनाच उत्पन्न होत नाही, तेव्हा तो पुरुष योगारूढ म्हटला जातो.॥ ४॥

**तरी जयाचिया इंद्रियांचिया घरा। नाहीं विषयांचिया येरझारा। जो आत्माबोधाचिया वोवरां। पहुडला असे॥ ६२॥**
**जयाचें सुखदुःखाचेनि आंगें। झगटलें मानस चेवो नेघे। विषय पासींही आलिया से न रिघे। हें काय म्हणऊनि॥ ६३॥**
**इंद्रियें कर्माचां ठायीं। वाढीनलीं परि कहीं। फळहेतूची चाड नाहीं। अंतःकरणीं॥ ६४॥**
**असतेनि देहें एतुला। जो चेतुचि दिसे निदेला। तोचि योगारूढु भला। वोळखें तूं॥ ६५॥**

**अर्थ**—ज्याचें आत्मस्वरूपाचे ठिकाणी जडलेलें मन, प्राप्त झालेल्या सुखदुःखाला जाणून, जागे होत नाही. म्हणजे देहावर येऊन भोग भोगत नाही—एवढेंच नव्हे तर विषय जवळ आले असतां, हें काय आहे, इतके देखील ज्याला स्मरण होत नाही.॥ ६३॥ इंद्रियें कर्माचे ठिकाणीं प्रवृत्त झालीं तरी, अंतःकरणांत कर्माचें फळ भोगावें अशी इच्छा, कधी उत्पन्न होत नाही.॥ ६४॥ देह असतांनाच जो याप्रमाणें आत्मस्वरूपाचे ठिकाणी जागा राहून विषयाचे ठिकाणीं निजला आहे—म्हणजे विषयाचें विस्मरण झालें—तो पुरुष पूर्ण योगारूढ झाला, असें समज.॥ ६५॥

**गूढार्थदीपिका—तोचि योगारूढ भला**—बुद्धि अत्यंत शुद्ध झालीं असतां, त्या बुद्धीने आत्मसाक्षात्कार होतो. विषय, इंद्रियें मन यांच्यापासून बुद्धि निराळी झाली की, ती शुद्ध होते. ही बुद्धि एकदां आत्मस्वरूपाचे ठिकाणीं स्थिर झाली म्हणजे विषय, इंद्रियें व मन यांच्याशीं पुनः ऐक्य पावत नाही. तीच साक्षीरूप होऊन राहते व तिला एका ब्रह्मावांचून दुसरें कांहीच वस्तुस्वरूपाने भासत नाही. अशा योगारूढ पुरुषाचे ठिकाणीं इतरांना जे सुखदुःखाचे भोग होतांना दिसतात ते त्याला होत नसून, प्रारब्धापर्यंत असणाऱ्या अहंकाराला होतात. पण अज्ञान्याला, योगारूढ पुरुष भोग भोगतो असे त्याच्या अज्ञानामुळें वाटते. ''दृष्टा श्रोता वक्ता कर्ता भोक्ता भवत्यहंकारः'' (वे० सि० सा० सं० श्लो० ४२४) असे आचार्यांनीहि म्हटलें आहे.

**तेथ अर्जुन म्हणे अनंता। हें मज विस्मो बहु आइकतां। सांगें तया ऐसी हे योग्यता। कवणें दीजे॥ ६६॥**

**अर्थ**—तेव्हा अर्जुन म्हणतो, अनंता! हें मी ऐकतांना, मला मोठें आश्चर्य वाटते की एवढी स्थिति त्यांना कोण प्राप्त करून देतो?॥ ६६॥

**उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत्। आत्मैव ह्यात्मनो बन्धुरात्मैव रिपुरात्मनः॥ ५॥**

**अर्थ**—आपणच आपला उद्धार करून घेतला पाहिजे. आपण आपला अधःपात करून घेऊ नये. (आपला आपण उद्धार करून घेतो म्हणून) आपणच आपला बंधु होतो व आपणच आपले शत्रु होतो.॥ ५॥

**तव हांसोनि कृष्ण म्हणे। तुझें नवल ना हें बोलणें। कवणासि काय दिजेल कवणें। अद्वैतीं इये॥ ६७॥**
**पैं व्यामोहाचिया शेजे। बळिया अविद्या निद्रित होईजे। ते वेळीं दुःस्वप्न हा भोगिजे। जन्ममृत्यूंचा॥ ६८॥**
**पाठीं अवसांत ये चेवो। तैं तें अवघेंचि होय वावो। ऐसा उपजे नित्य सद्भावो। तोहि आपणपांचि॥ ६९॥**
**म्हणऊनि आपणचि आपणपेया। घातु कीजतु असे धनंजया। चित्त देऊनि नाथिलिया। देहाभिमाना॥ ७०॥**

**अर्थ**—तेव्हा भगवान श्रीकृष्ण हंसून अर्जुनास म्हणतात, अर्जुना! तुझेंच बोलणें आश्चर्यकारक नाही का? या अद्वैत स्थितीत कोण कोणाला काय देईल? ॥ ६७ ॥ जेव्हा हा जीवात्मा आपण बळेच दुस्तर अनादि अविद्येने भ्रांतिरूप आंथरूणावर निजतो तेव्हा तो आपणच आपल्या जन्ममृत्यूचे दुष्ट स्वप्न पाहतो. ॥ ६८ ॥ नंतर अकस्मात्, पूर्व पुण्याने जेव्हा तो जागा होतो तेव्हा तें सर्व स्वप्न त्याला खोटे आहे व मी जन्ममृत्युरहित नित्य आहे, असा जो भाव उत्पन्न होतो; तोहि त्याच्याच ठिकाणीं होतो. ॥ ६९ ॥ म्हणून अर्जुना! या खोट्या देहाभिमानाकडे चित्त देऊन—म्हणजे खोट्या देहालाच मी असे समजून, आपणच आपला घात करून घेतो. ॥ ७० ॥

**गूढार्थदीपिका**—जीवाने आपल्या स्वरूपाचा विचार न करतां, मी देह आहे, अशी दृढ विपरीत कल्पना जशी करून घेतली. तशीच त्याने मी सच्चिदानंद स्वरूप आहे, अशी दृढ कल्पना करून घ्यायला पाहिजे.

**बन्धुरात्मात्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः । अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत् ॥ ६ ॥**

**अर्थ**—ज्यांनी (विपरीत कल्पना करणारें) आपलें अंत:करण जिंकलें म्हणजे आपल्या स्वाधीन केलें, त्यांचा आत्माच त्यांचा बंधु म्हणजे हितकर्ता असतो आणि ज्यांनी अंत:करणादिकांना जिंकलें नाही त्यांचा आत्मा शत्रूप्रमाणें त्यांच्याशीं शत्रुत्व करतो. ॥ ६ ॥

**हा विचारूनि अहंकारु सांडिजे । मग असतीच वस्तु होईजे । तरी आपली स्वस्ति सहजें । आपण केली ॥ ७१ ॥**
**एऱ्हवीं कोशकीटकाचिया परी । तो आपणपया आपण वैरी । जो आत्मबुद्धि शरीरीं । चारुस्थळी ॥ ७२ ॥**
**कैसे प्राप्तीचिये वेळे । निदैवा अंधळेपणाचे डोहळे । कीं असते आपुले डोळे । आपण झांकी ॥ ७३ ॥**
**कां कवण एकु भ्रमलेपणें । मी तो नव्हे गा चोरलों म्हणे । ऐसा नाथिला छंदु अंत:करणें । घेऊनि ठाके ॥ ७४ ॥**
**एऱ्हवीं होय तें तोचि आहे । परि काई कीजे बुद्धि तैशी नोहे । देखा स्वप्नींचेनि घायें । कीं मरे साचें ॥ ७५ ॥**
**जैसी ते शुकाचेनि आंगभारें । नळिका भोविन्नली एरी मोहरें । तरी तेणें उडावें परि न पुरे । मनशंका ॥ ७६ ॥**
**वायांचि मान पिळी । अटुवें हियें आवळी । टिटांतु नळी । धरूनि ठाके ॥ ७७ ॥**
**म्हणे बांधला मी फुडा । ऐसिया भावनेचिया पडे खोडां । कीं मोकळिया पायांचा चवडा । गोंवी अधिकें ॥ ७८ ॥**
**ऐसा काजेंवीण आंतुडला । तो सांग पां काय आणिकें बांधला । मग नोसंडी च जऱ्ही नेला । तोडूनि अर्धा ॥ ७९ ॥**
**म्हणऊनि आपणपया आपणचि रिपु । जेणें वाढविला हा संकल्पु । येर स्वयंबुद्धि म्हणे बापु । जो नाथिलें नेघे ॥ ८० ॥**

**अर्थ**—(आपण ज्या देहाचा अभिमान धारण करतो तो खोटा आहे) असा विचार करून, अर्जुना! आपण देहाचा अभिमान सोडला असतां मूळची जी आत्मवस्तु आहे, तीच आपण होतो. अशा रीतीने आपणच आपले कल्याण करून घेतो. ॥ ७१ ॥ वास्तविक जो शरीराला सुंदर समजून ते शरीर मी आहे अशी बुद्धि धारण करितो, तो कोशकीड्याप्रमाणें आपण आपला वैरी होतो. (म्हणजे आपल्या आत्मस्थितीचा नाश करून घेतो.) ॥ ७२ ॥ दुर्दैव्याला जसें अत्यंत थोर लाभ होण्याचे वेळीं आपण आंधळे व्हावे अशी इच्छा होऊन तो उघडे असलेले आपले डोळे आपण झांकून घेतो. ॥ ७३ ॥ किंवा एखादा कोणी भ्रांत होऊन "मी हारवलों, मी तो नव्हे" असें तो म्हणतो व खोटीच मनाची समज करून बसतो. ॥ ७४ ॥ एरवीं विचाराने जें आत्मस्वरूप तो होतो, ते तो असतोच. पण काय करावे, तशी त्याची बुद्धीच होत नाही. स्वप्नांतील शस्त्राच्या घावाने तो खरेंच मरतो, पहा! ॥ ७५ ॥ ज्याप्रमाणे राघूला धरण्याकरितां टांगलेली नळी राघूच्या अंगाच्या भारानेच सहज समोर फिरली असतां, त्याने उडून जावे, पण त्याच्या मनांतील शंकाच जात नाही. ॥ ७६ ॥ व्यर्थच तो राघू मानेला पिळ देतो व घट्ट छातीने आवळून ती नळी, तो पायांच्या चवड्यांत धरून ठेवतो. ॥ ७७ ॥ पण तो आपल्याला 'मी बांधला गेलों' असें व्यर्थच म्हणतो व या भावनेच्या खोड्यांत पडतो. मग आपल्या पायांचा मोकळा असलेला चवडा अधिक गुंतवून घेतो. ॥ ७८ ॥ याप्रमाणे तो राघू, विनाकारण आपणच अडकून पडतो. अर्जुना! सांग बरें! तो दुसऱ्याकडून बांधला गेला आहे काय? मग अर्धा तोडून जरी नेला तरी तो ती नळी सोडत नाही. ॥ ७९ ॥ म्हणून, जगाचे बाप असे श्रीकृष्ण म्हणतात, ज्याने 'मी म्हणजे देह' ही कल्पना दृढ केली, तो आपणच आपला वैरी होय आणि इतर, जो खोट्या देहाचा अभिमान धारण करीत नाही, तो मात्र आत्मबुद्धि धारण करणारा होय. ॥ ८० ॥

**गूढार्थदीपिका—स्वयंबुद्धि**—विचार करून पाहातां आत्म्यावांचून दुसरी वस्तु नाही असे श्रुतिसंतांनी सांगितले असल्यामुळे, आत्म्याहून निराळे भासणारे जीवजगत्, इत्यादी पदार्थ मुळींच अस्तित्वांत नाहीत, ते खोटे आहेत, असे जो जाणतो त्याला स्वयंबुद्धि म्हणतात.

**जितात्मनः प्रशान्तस्य परमात्मा समाहितः। शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः॥ ७॥**
**ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेन्द्रियः। युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकाञ्चनः॥ ८॥**

**अर्थ**—ज्याने आपले अंत:करण पूर्णपणें जिंकले, म्हणून जो सदा प्रसन्नचित्त असतो त्याला आपलेच ठिकाणीं परमेश्वरस्वरूपाचा अनुभव येतो. आणि तो शीत-उष्ण, सुख-दुख, मान-अपमान इत्यादि सर्व द्वंद्वे सारखीच पाहतो.॥ ७॥ ज्ञानाने विज्ञानरूप प्रपंचाचा आत्मस्वरूपाने अनुभव घेऊन, जो परम निर्वासन झाला, जो अखंड अविकारी असतो, ज्याने आपलीं इंद्रिये पूर्ण जिंकलीं आहेत व जो सोनें माती सारखेंच समजतो, तोच युक्त (मनइंद्रियांना जिंकणारा) पुरुष योगी म्हटला जातो.॥ ८॥

**तया स्वांतःकरणजिता। सकळकामोपशांता। परमात्मा परौता। दूरी नाहीं॥ ८१॥**

**अर्थ**—ज्याने आपले अंत:करण जिंकले आहे, म्हणून जो सर्व विषयवासनारहित झाला, त्याला परमात्मा, त्याच्या पलीकडे म्हणजे त्याच्याहून निराळा असा, दूर नाही. (तोच परमात्मा होतो असा अर्थ).॥ ८१॥

**गूढार्थदीपिका—स्वांतःकरणजिता।** जीव हा मूळांत परब्रह्मस्वरूपच आहे; पण तो अंत:करण उपाधीच्या स्वाधीन असल्यामुळे, आपल्या मूळच्या स्वरूपस्थितीस पारखा झाला. अंत:करणाकडून होणाऱ्या निरनिराळ्या व्यापारामुळे, एकच अंत:करण निरनिराळ्या नावांने संबोधिले जाते. ते परब्रह्मवस्तूहून निराळ्या वस्तूंची कल्पना करते, म्हणून त्याला मन म्हणतात. चिंतन करते, म्हणून त्याला चित्त म्हणतात व देहाचा अहंकार धारण करते, म्हणून तेच अहंकारहि होते. याप्रमाणें जीव हा अंत:करण उपाधीने परब्रह्माहून विषयासक्त होऊन निराळा पडला; पण आपल्या मूळ परब्रह्मस्वरूपाच्या विचाराने, तो अंत:करण जिंकू शकतो—म्हणजे आत्मस्वरूपाच्या विचाराने विषय खोटे आहेत व एक परब्रह्मच सत्य आहे असे जाणले असतां, अंत:करण परब्रह्माचे ठिकाणीं स्थिर होते. ज्यानें अंत:करण परब्रह्माचे ठिकाणीं स्थिर केलें, त्यानें आपलें अंत:करण जिंकलें असे समजावें.

**सकळकामोपशांता।** अंत:करण आत्मस्वरूपाचे ठिकाणीं स्थिर झालें असतां, विषय खोटें वाटतात व विषयसुखाची वासना नाहीशी होते व अंत:करण विषयसुखावांचूनच अखंड प्रसन्न राहते.

**परमात्मा परौता दूर नाहीं**—अशी अंत:करणाची जी स्थिति, त्यालाच परमात्मा म्हणतात. अर्थात् अज्ञान व सर्व वासना नाहिशा झाल्या असतां, जीवच परमात्मस्वरूप होतो. हेंच "परमात्मा परौता दूर नाही" या चरणाने माऊलींनी सांगितलें आहे.

**जैसा किडाळाचा दोषु जाये। तरी पंधरें तेंचि होये। तैसे जीवा ब्रह्मत्व आहे। संकल्पलोपीं॥ ८२॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणें हिणकसपणाचा कलंक नाहिसा झाला की तेंच शुद्ध सोनें होतें, त्याप्रमाणें मी ब्रह्म नाही, ही जीवाची कल्पना नाहिशी झाली, की जीव ब्रह्मस्वरूप झालाच म्हणून समज.॥ ८२॥

**गूढार्थदीपिका—जीवा ब्रह्मत्व आहे। संकल्पलोपीं**—ब्रह्मज्ञानाची किल्ली। सांगेन एक्याची बोली। ज्याची कल्पना निमाली। ते प्राप्त पुरुष॥ ४२१॥ (स्वात्मसुख) मी सच्चिदानंदस्वरूप नाही, मी देहस्वरूप आहे, मला जन्ममृत्यु, आहेत, मी कर्ताभोक्ता आणि अपूर्ण आहे, अशी जीवाने आपल्याविषयीं कल्पना करून घेतली आहे. ती नि:शेष नाहिशी झाली म्हणजे, मी म्हणजे देह, ही समजूत जितकी अत्यंत दृढ आहे, तितकीच मी ब्रह्मस्वरूप आहे. ही कल्पना अत्यंत दृढ झाली असतां, जीव ब्रह्मस्वरूप होतो. "**देहात्मज्ञानवज्ज्ञानं देहात्मज्ञानबाधकम्। आत्मन्येव भवेद्यस्य स नेच्छन्नपि मुच्यते**"॥ २०॥ (पं० द० तृप्तिदीप).

**हा घटाकारु जैसा। निमालिया तया अवकाशा। नलगे मिळों जाणें आकाशा। आना ठाया॥ ८३॥**
**तैसा देहाहंकारु नाथिला। हा समूळ जयाचा नाशिला। तोचि परमात्मा संचला। आधींचि आहे॥ ८४॥**

**अर्थ**—ह्या घटाचा नाश झाला म्हणजे घटांतील आकाशाला बाहेरच्या आकाशाशीं मिळण्याकरितां दुसऱ्या ठिकाणीं जावें लागत नाही. (तेथल्या तेथे तें मिळतें असा अर्थ) ॥ ८३ ॥ त्याप्रमाणे हा देहाचा खोटा अहंकार ज्याचा नि:शेष नाहिसा झाला, तो मूळचाच परमात्मस्वरूप होऊन राहतो. ॥ ८४ ॥

**गूढार्थदीपिका**—देहाच्या अहंकारामुळेच जीव हा परमेश्वराहून निराळा झाला. देहवस्तूची कल्पना करून, तिचा दृढ अहंकार तो धारण करतो व परमेश्वराहून निराळा पडतो. अर्थात्च. तो अहंकार नाहिसा झाल्याबरोबर, तो (जीव) आपल्या मूळच्या परमात्मा स्वरूपाशीं ऐक्य पावतो.

**समूळ**—आत्मज्ञानाने 'मी देह आहे' हा अहंकार नाहिसा होऊन, 'मी ब्रम्ह आहे' हा अहंकार उत्पन्न होतो. पण अद्वैतस्वरूपाच्या ठिकाणी मीं ब्रम्ह म्हणणारा दुसरा कोणी नाही. अर्थात् मी ब्रम्ह आहे असे चिंतन करितांना, 'मी' म्हणून व्यक्तिरूप स्थूल देहाकारच घेतला जातो; म्हणून देहाहंकाराबरोबर मी ब्रम्ह आहे, हा ज्ञानाहंकारहि नाहिसा झाला पाहिजे, हें 'समूळ' या शब्दाने माऊलींनी सुचविले आहे.

**आतां शीतोष्णाचिया वाहणी। तेथ सुखदु:खाची कडसणी। इयें न समाती कांहीं बोलणीं। मानापमानाचीं॥ ८५ ॥**
**जे जया वाटा सूर्यु जाये। तेउतें तेजाचें विश्व होये। तैसें तया पावे तें आहे। तोचि म्हणउनी॥ ८६ ॥**
**देखें मेघौनि सुटती धारा। तिया न रुपती जैसिया सागरा। तैंशीं शुभाशुभें योगीश्वरा। नव्हती आनें॥ ८७ ॥**
**जो हा विज्ञानात्मकु भावो। तया विवरितां जाहला वावो। मग लागला जंव पाहों। तंव ज्ञान तें तोचि॥ ८८ ॥**

**अर्थ**—अशा रीतीने जीव परमात्मस्वरूप झाला असतां, हें शीत हें उष्ण असा विचारप्रवाह, हें सुख हें दु:ख अशी निवड, किंवा हा मान हा अपमान, असे बोलणें, यापैकीं कांही एक, तेथें संभवत नाही. ॥ ८५ ॥ ज्याप्रमाणें ज्या दिशेने सूर्य जातो, त्या दिशेने सर्व जगच प्रकाशमय होते, त्याप्रमाणे, त्याला जें जें प्राप्त होतें, तें तें तो आत्मस्वरूपच पाहतो. ॥ ८६ ॥ अर्जुना! पहा, आकाशांतील मेघांतून पडणाऱ्या पाणाच्या धारा, (पाणीच असल्यामुळें,) ज्याप्रमाणे समुद्राला बोचत नाहीत, त्याप्रमाणे योग्याला शुभाशुभ देखील, आपल्याहून भिन्न आहेत, असे वाटत नाही (तेहि त्याला ब्रह्मस्वरूपच वाटतात). ॥ ८७ ॥ जो हा विज्ञानात्मकम्हणजे नामरूपात्मक प्रपंच-भाव आहे, त्याचा विचार करून पाहतां, तो खोटा आहे, असा अनुभव येतो. मग त्या ज्ञानाने नामरूपात्मक प्रपंचाकडे जेव्हा तो पाहतो, तेव्हा तो प्रपंच ज्ञानरूपच आहे, असा त्याला अनुभव येतो. ॥ ८८ ॥

**गूढार्थदीपिका**—ज्ञान म्हणजे आत्मज्ञान किंवा आत्मानुभव. हा आत्म्याचा "द्वेधा ब्रह्मप्रतीति:" अनुभव दोन प्रकारचा असतो "आदौ ब्रह्माहमस्मीत्यनुभव उदिते खल्विदं ब्रह्म पश्चात्" (श० श्लो०-श्लोक-३) मी ब्रह्म आहे असा एक व हा सर्व नामरूपात्मक पसारा ब्रह्म आहे, असा दुसरा ही दोन प्रकारची ब्रह्मप्रतीति, श्री आचार्यांनी 'शतश्लोकी' या ग्रंथांत सांगितलीं आहे. वर "तैसा देहाहंकार नाथिला। हा समूळ जयाचा नाशिला। तोचि परमात्मा संचला। आधींचि आहे" या ओवीने मी ब्रह्म आहे हा पहिला अनुभव सांगितला व या ओवींत, आतां दुसरा अनुभव, श्रीमाऊली सांगत आहे.

माऊली म्हणतात, अज्ञान आहे तोपर्यंत सर्व नामरूपाचा पसारा ही एक प्रपंचरूपवस्तु आहे, असे वाटत असते आत्मविचार केला असतां, प्रपंच म्हणून कांही वस्तु नसून, तें सर्व व्यापक नामरूपात्मक ज्ञानस्वरूप ब्रह्मच आहे व तें मीच झालों आहे, असा अनुभव येतो.

**आतां व्यापकु कीं एकदेशी। हे ऊहापोही जे ऐसी। ते करावी ठेली आपैशी। दुजेनवीण॥ ८९ ॥**
**ऐसा शरीरीचि परि कौतुकें। परब्रह्माचेनि पाडें तुके। जेणें जिंतलीं एकें। इंद्रियें गा॥ ९० ॥**

**अर्थ**—असा अनुभव आला असतां, मी एकदेशी म्हणजे मर्यादित आहे किंवा मी व्यापक म्हणजे अमर्याद आहे, अशी जी चिकित्सा पूर्वी केली जाते, ती करणें, अद्वैत ब्रह्माशिवाय कांहीच नाही. असा अनुभव आल्यामुळे आपोआप बंद पडते. ॥ ८९ ॥ ज्या कोणी पुरुषाने आपलीं इंद्रियें पूर्ण जिंकलीं, तो याप्रमाणे शरीरधारी, पण सहज परब्रह्मस्वरूप होतो. ॥ ९० ॥

**गूढार्थदीपिका**—शरीरीचि परि कौतुकें। परब्रह्माचेनि पाडें तुके। वरील ८८ ओवीमध्ये आत्मस्वरूपाचा विचार करून पाहतां, सर्व नामरूपात्मक प्रपंच नसून, तें ज्ञानच आहे, असें कळून येते, असे सांगितलें आहे. म्हणून ''शरीरीचि'' म्हणजे शरीर राहून तो ब्रह्मस्वरूप होतो, असा अर्थ करितां येत नसून, तें त्याचें शरीर दिसत असलें, तरी तो शरीरासह ब्रह्मस्वरूप होतो, असा अर्थ करावा लागतो.

**तो जितेंद्रियु सहजें। तोचि योगयुक्तु म्हणिजे। जेणें सानें थोर नेणिजे। कवणे काळीं॥ ९१ ॥**
**देखें सोनयाचें निखळ। मेरुयेसणें ढिसाळ। आणि मातियेचें डिखळ। सरिसेंचि मानी॥ ९२ ॥**
**पाहतां पृथ्वीचें मोल थोडें। ऐसें अनर्घ्य रत्न चोखडें। देखे दगडाचेनि पाडें। निचाडु ऐसा॥ ९३ ॥**

**अर्थ**—तो सहजच जितेंद्रिय असतो, त्यालाच योगयुक्त म्हणतां येते. तो केव्हाहि श्रेष्ठ-कनिष्ठ भाव जाणत नाही. ॥ ९१ ॥ अर्जुना! पहा, शुद्ध सोन्याचा मेरुपर्वताएवढा ढीग व मातीचें ढेंकूळ, दोन्ही तो सारखेंच मानतो. ॥ ९२ ॥ ज्याचे मोल पाहूं गेल्यास, सर्व पृथ्वीचें मोल देखील त्याच्या बरोबरीचें होणार नाही, असे अमोल रत्न देखील, तो दगडासारखें पाहतो. असा तो निरिच्छ असतो. ॥ ९३ ॥

**गूढार्थदीपिका**—आत्मा अस्फुट अद्वैतरूप असल्यामुळें ''**जगज्जीवादि रूपेण पश्यन्नपि परात्मवित्। न तत्पश्यति तद्रूपं ब्रह्मवस्त्वेव पश्यति**''॥ ५४॥ (य० वै० खं० सू० सं० उपरिभाग अ० ४) आत्माज्ञानी पुरुष, जगज्जीवादि पाहत असला, तरी ते तो तद्रूपाने म्हणजे जगज्जीव रूपाने पाहत नाही, ब्रह्मरूपानेच पाहतो. त्याला अद्वैत सच्चिदानंद लक्षणस्वरूप परब्रह्माहून भिन्न लक्षणाचें, दुसरें कांही दिसत नाही.

**सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबन्धुषु । साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते॥ ९ ॥**

**अर्थ**—सुहृद म्हणजे निरपेक्ष हितकर्ता, मित्र, शत्रु, उदासीन, मध्यस्थ, अप्रिय, संबंधी, साधु व पापी यांचे ठिकाणी समबुद्धि ठेवणारा श्रेष्ठ होय.

**तेथ सुहृद आणि शत्रु। कां उदासु आणि मित्रु। हा भावभेदु विचित्रु। कल्पूं कैंचा॥ ९४॥**
**तया बंधु कोण काह्याचा। द्वेषिया कवणु तयाचा। मीचि विश्व ऐसा जयाचा। बोधु जाहला॥ ९५॥**
**मग तयाचिये दिठी। अधमोत्तम असे किरिटी। काय परिसाचिया कसवटी। वानिया कीजे॥ ९६॥**
**ते जैशी निर्वाण सुवर्णुचि करी। तैसी जयाची बुद्धि चराचरीं। होय साम्याची उजरी। निरंतर॥ ९७॥**
**जे ते विश्वाळंकाराचे विसुरे। जरी आहाती आनानें आकारें। तरी घडले एकेचि भांगारें। परब्रह्में॥ ९८॥**

**अर्थ**—तेथे म्हणजे अद्वैत ब्रह्म स्थितींत, हा सुहृद, हा शत्रु, किंवा हा उदास आणि हा मित्र, असा पदार्थांचा नाना प्रकारचा भेद, तो अद्वैतदृष्टीचा पुरुष कसा करूं शकणार?॥ ९४॥ मीच एक विश्वांत भरून आहे, असें ज्ञान झालें असतां, मग त्याला बंधु (मित्र) कोण असणार? किंवा त्याला द्वेष्य (शत्रु) तरी कोण असणार?॥ ९५॥ मग त्याच्या अद्वैतदृष्टींत श्रेष्ठ कनिष्ठभाव राहतील काय? परिसावर घासलेल्या लोखंडाचे निरनिराळे कस लागतील काय!॥ ९६॥ तो परीस ज्याप्रमाणे लोखंडाला पूर्ण शंभर नंबरी सोनें करितो, त्याप्रमाणे ज्याच्या बुद्धीला सर्व चराचर विश्वांत एक साम्य ब्रह्मस्थितीचा नित्य अनुभव येतो.॥ ९७॥ जो आपण विश्वरूपी अलंकाराचा निरनिराळ्या नामरूपाने विस्तार पाहतो, तो एका परब्रह्मरूपी सोन्याचाच घडलेला आहे.॥ ९८॥

**गूढार्थदीपिका**—कार्य आपल्या कारणाहून मुळींच निराळे नाही, तें कारणरूपच आहे. असे पाहणें, याला अन्वय म्हणतात. सोन्याचें कार्य अलंकार होय. तो आपल्या सोनेरूप कारणाहून मुळींच निराळा नसतो. तो केवळ सोनेरूपच असतो. त्याप्रमाणे विश्वाचीं म्हणून समजली गेलेलीं नामरूपें, एका परब्रह्मवस्तुचाच नामरूपात्मक अलंकार आहे; म्हणून तो परब्रह्माहून मुळींच निराळा नाही. तो एक ब्रह्मवस्तुरूपच आहे, असे योगी पाहतो, असे श्रीज्ञानेश्वर माऊली म्हणते.

**ऐसें जाणणें जें बरवें। तें फावलें तया आघवें। म्हणोनि आहाचवाहाचे न झकवे। येणें आकारचित्रें॥ ९९॥**

**अर्थ**—असे जे यथार्थ जाणणें आहे, ते त्या ज्ञानी पुरुषाला पूर्ण प्राप्त झालेलें असतें, म्हणून वरवर दिसणाऱ्या आकाररूप चित्राने तो भ्रम पावत नाही.॥ ९९॥

**गूढार्थदीपिका—जाणणे जें बरवें।** सर्व जगत् पूर्ण ब्रह्मस्वरूप आहे, असा योगाने अनुभव येणें, हीच ज्ञान्याची पूर्ण ब्रह्मस्थिति होय, असें ''जाणणें जें बरवें'' या पदाने सुचविलें आहे.

**घापें पटामाजीं दृष्टी। दिसे तंतूंची सैंघ सृष्टी। परि तो एकवांचूनि गोठी। दुजी नाहीं॥ १००॥**
**ऐसेनि प्रतीती हे गवसे। ऐसा अनुभव जयातें असे। तोचि समबुद्धि हें अनारिसें। नव्हे जाणें॥ १०१॥**
**जयाचें नांव तीर्थरावो। दर्शनें प्रशस्तीसि ठावो। जयाचेनि संगें ब्रह्मभावो। भ्रांतासही॥ १०२॥**
**जयाचेनि बोलें धर्मु जिये। दिठी महासिद्धीतें विये। देखें स्वर्गसुखादि इयें। खेळु जयाचा॥ १०३॥**
**विपायें जरी आठवला चित्ता। तरी दे आपुली योग्यता। हें असो तयातें प्रशंसितां। लाभु आथि॥ १०४॥**

**अर्थ—**वस्त्राकडे सूक्ष्मदृष्टीने पाहिलें असतां, जसें वस्त्र म्हणजे केवळ तंतूचाच विस्तार आहे. असें कळतें, त्याप्रमाणे, सर्व सृष्टि म्हणजे केवळ परब्रह्मच नामरूपाने विस्तारलें आहे, दुसरे कांही नाही, असें दिसून येतें. ॥ १००॥ असा अनुभव ज्याला प्राप्त झाला, तोच, अर्जुना! समबुद्धि होय. हें खोटे नाही, असें पक्के जाण. ॥ १०१ ॥ तो सर्व तीर्थांत तीर्थराज होय. त्याच्या दर्शनाने संपूर्ण समाधान लाभतें व त्याच्या संगाने भ्रांत जीवालाहि ब्रह्मस्थिति प्राप्त होते. ॥ १०२ ॥ त्याच्या बोलण्याने धर्म जीवंत असतो—म्हणजे त्याचें सहज बोलणें देखील धर्माला धरून असते. त्याच्या कृपादृष्टीने महासिद्धि प्राप्त होतात आणि स्वर्गादिसुखाची प्राप्ति तर त्याचा खेळ आहे—म्हणजे त्याच्या म्हणण्याने देखील स्वर्ग प्राप्त होतो. ॥ १०३ ॥ एखादे वेळीं, सहजच त्याचें स्मरण झालें तर, तेवढ्यानेच आपली योग्यता त्याला तो प्राप्त करून देतो. असो, अशा ज्ञानी पुरुषाची कीर्ति गाण्यांत मोठा लाभ होतो. ॥ १०४ ॥

**गूढार्थदीपिका—**जो लाभ ब्रह्म प्राप्तींत आहे तोच लाभ सत्पुरुषांच्या संगांत आहे. ज्ञानी पुरुषहि पूर्ण ब्रह्मस्वरूपच होय. किंवा ज्ञानी पुरुष म्हणजे व्यक्त झालेलें, म्हणजे डोळ्यांना दिसण्याजोगे झालेलें, पूर्ण ब्रह्म होय, असा अर्थ.

ज्ञानीभक्तांत व पूर्णब्रह्मांत यत्किंचित्‌हि भेद राहत नसल्यामुळें, परमेश्वराच्या दर्शनाने, स्मरणाने, गुणकीर्तनाने व ध्यानाने जो लाभ होतो; तोच संपूर्ण लाभ ज्ञानीभक्तांच्या दर्शनाने, स्मरणाने व ध्यानानेहि होतो. पण ज्ञानीभक्तांत व परमेश्वरांत यत्किंचित्‌हि केव्हाहि भेदबुद्धि किंवा जीवबुद्धि होतां कामा नये.

**योगी युञ्जीत सततमात्मानं रहसि स्थितः। एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः॥ १०॥**

**अर्थ—**योग्याने एकान्तांत कोणाचेंहि साह्य न घेता एकटे, आपले चित्त व देह आपल्या स्वाधीन करून, कशाचाहि संग्रह न करितां सर्व कामनारहित होऊन आपलें अंतःकरण अखंड ध्यानांत लावावें. ॥ १० ॥

**पुढती अस्तवेना ऐसें। जया पाहलें अद्वैतदिवसें। मग आपणपांचि आपण असे। अखंडित॥ १०५॥**
**ऐसिया दृष्टी जो विवेकी। पार्था तो एकाकी। सहजें अपरिग्रही जे तिहीं लोकीं। तोचि म्हणऊनि॥ १०६॥**
**ऐसियें असाधारणें। निष्पन्नाचीं लक्षणें। आपुलेनि बहुवसपणें। श्रीकृष्ण म्हणे॥ १०७॥**

**अर्थ—**पुनः केव्हांहि अस्त होत नाही, अशा प्रकारें ज्याला अद्वैत दिवसाचा प्रकाश झाला, त्याला मग अखंड, आपण आपल्या ठिकाणीं आहो (दुसरें आपल्याहून कांही नाही) असा अनुभव येतो. ॥ १०५ ॥ अर्जुना! जो, असा ज्ञानदृष्टीचा विवेकी आहे, तो एकटाच असतो, म्हणून तो तिन्ही लोकांत व्यापून असल्यामुळें, अपरिग्रही म्हणजे कशाचाहि संग्रह न करणारा-असतो. ॥ १०६ ॥ (सामान्य पुरुषांच्या ठिकाणीं न राहणारी व प्राप्त पुरुषांच्या ठिकाणींच राहणारी) अशी ही प्राप्त पुरुषांची विशेष लक्षणें, भगवंताचे ठिकाणीं संपूर्णच असल्यामुळें भगवान श्रीकृष्णांनी (अर्जुनाला) तीं सांगितलीं. ॥ १०७ ॥

**गूढार्थदीपिका—'आपुलेनि बहुवसपणें'—**ज्या लक्षणांनी युक्त होऊन, सत्पुरुष पूर्ण ब्रह्मस्वरूप होतात, तीं लक्षणें, सर्व सत्पुरुषांच्या ठिकाणीं राहतातच, असा नियम नाही. त्यांच्या निरनिराळ्या प्रारब्धामुळे, कोणाचे ठिकाणीं कांही लक्षणें व कोणाचे ठिकाणीं कांही लक्षणें दिसून येतात. पण भगवान श्रीकृष्ण हे प्रारब्धरहित

लीलाविग्रही असल्यामुळें, त्यांचे ठिकाणीं मात्र संपूर्ण लक्षणे असतात, हेंच माऊलींनी "आपुलेनि बहुवसपणें" या पंक्तीने दाखविलें आहे.

**जो ज्ञानियांचा बापु। देखणेयांचे दिठीचा दीपु। जया दादुलयाचा संकल्पु। विश्व रची॥ १०८॥**

**अर्थ**—जो ज्ञानियांचा आद्य गुरु होय, जो सर्व पाहणाऱ्यांच्या दृष्टीलाहि प्रकाश देणारा दिवा होय; ज्या सर्वसमर्थाचा नुसता संकल्प विश्वाची उभारणी करतो. ॥१०८॥

**गूढार्थदीपिका—'ज्ञानियांचा बापु'-"स पूर्वेषामपि गुरुः कालनेनावच्छेदात्"** (पातंजल योगसूत्र २६) ज्या तत्त्वमस्यादि महावाक्याच्या विचाराने पुरुष ब्रह्मज्ञानी होतो, तीं महावाक्यें परमेश्वराने निर्माण केलेल्या वेदांतील असल्यामुळे, परमेश्वर सर्व ज्ञान्यांचा आद्य गुरु आहे. परमेश्वर आपल्या स्वरूपाला कधीं न विसरणारा आहे. म्हणून त्याला कोणीच गुरु नाही.

**'देखणेयांचे दिठीचा दीपु'**—परमेश्वर हा जीवाची चक्ष्वेंद्रियरूपदृष्टीचा दिवा म्हणजे चक्ष्वेंद्रियरूप दृष्टीला प्रकाश देणारा आहे. तो नित्यदृष्टीरूप आहे असा अर्थ.

**'जया दादुलयाचा संकल्पु। विश्व रची'**—विश्वाची उत्पत्ति करणारा संकल्प, सर्वसमर्थ अशा परमेश्वराचाच असतो. तो संकल्प म्हणजे "अहं बहुस्यां प्रजायेय" हा होय. "ज्ञानीयांचा बापु" "दिठीचा दीपु" "दादुलयाचा संकल्पु। विश्व रची" हीं सर्व विशेषणें नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त, सर्वज्ञ सर्व शक्तिमान अशा परब्रह्माची आहेत. आणि हीं विशेषणें माऊलींनी भगवान श्रीकृष्णाला लाविलीं आहेत. याचा अर्थ असा की, भगवान श्रीकृष्ण सगुण विग्रही जरीं असले, तरी त्यांची पूर्ण ब्रह्मस्थिति अवतारकालींहि कायमच असते.

**प्रणवाचिये पेठे। जाहलें शब्दब्रह्म माजिठें। तें जयाचिये यशा धाकुटें। वेढूं न पुरे॥ १०९॥**

**अर्थ**—ॐकाराचे पेठेंत वैदिक वाङ्मयरूपी निर्माण झालेले उत्कृष्ट वस्त्र देखील, ज्याचे यश वेढण्याला पुरेसें झालें नाही (म्हणजे कमी पडलें)-म्हणजे वेद देखील भगवंताच्या पूर्ण यशाचें वर्णन करूं शकले नाहीत असा अर्थ. ॥ १०९ ॥

**गूढार्थदीपिका**—ज्या यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य, या षड्गुणाने भगवान सगुण साकार होतो, तें भगवंताचे षड्गुणैश्वर्य अमर्याद असतें, असें "तत्र निरतिशयं सर्वज्ञबीजम्" (समाधिपाद सूत्र २५) योगसूत्रांत सांगितलें असून, आचार्यांनींहि "ज्ञानैश्वर्यशक्ति बलवीर्यं तेजोभि: सदा संपन्न" भगवान ज्ञान ऐश्वर्यादिकांनी सदा संपन्न असतो, असें म्हटलें आहे. याप्रमाणे भगवान व भगवंताचे गुण सदा सर्वदा अमर्यादच असल्यामुळें, वैदिक शब्दाने देखील त्यांचें वर्णन होऊं शकत नाही, असा भाव.

**जयाचेनि आंगिकें तेजें। आवो रविशशीचिये वणिजे। म्हणऊनि जग हें वेसजे-। वीण असे तया॥ ११०॥**

**अर्थ**—ज्याच्या अंगच्या तेजापासून सूर्यचंद्रांना प्रकाशाचें बळ प्राप्त होते व ते त्या तेजाच्या बळावर जगाला प्रकाशित करण्याचा आपला व्यापार करतात; म्हणून त्याच्यावांचून जग हें प्रकाशहीन आहे. (म्हणजे त्याच्यावांचून जगच नाही. जग हे ज्ञातसत्ताक आहे म्हणजे कळते तेव्हाच असतें. न कळतां तें राहूं शकत नाही, असा भाव).

**गूढार्थदीपिका**—"यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम्।" या श्लोकाने जें परब्रह्माचें वर्णन, श्रीकृष्णांनी गीतेच्या पंधराव्या अध्यायांत केलें आहे; तेंच येथेहि, या ओवींत, श्रीज्ञानेश्वर माऊलींनी भगवान श्रीकृष्णाचें केलें आहे. भाव असा की, भगवान श्रीकृष्ण परब्रह्मस्वरूपच आहेत.

**हां गा नांवचि एक जयाचें। पाहतां गगनही दिसे टांचें। गुण एकैक काय तयाचे। आकळिशील तूं॥ १११॥**

**अर्थ**—बा अर्जुना! ज्याच्या एका नामाचाच विचार केला असतां, आकाश हेंहि त्यापेक्षां कमीच वाटतें, अशा त्या भगवंताच्या एका एका गुणाचा पार, तुला काय कळणार आहे? ॥१११॥

**गूढार्थदीपिका—हां गा नांवचि एक जयाचें। पाहतां गगनही दिसे टांचें**—सगुण भगवंताच्या एका नावांपेक्षादेखील आकाश लहान आहे, असें माऊली म्हणतात. हरिपाठांतहि "गगनाहूनि वाड नाम आहे" आकाशापेक्षां नाम व्यापक आहे, असे माऊलींनी म्हटलें आहे.

"आत्मन आकाश: संभूत:" (तै० उ० २-१) आत्म्यापासून आकाश झालें अशी श्रुति असल्यामुळें निर्गुण ब्रह्मस्वरूप प्रकृतीच्या पलिकडे आहे, हे सर्वच वेदान्त्यांना मान्य आहे. अद्वैतवादी भगवान शंकराचार्यांवांचून दुसरे कोणीहि निर्गुणपरमात्मा मानीत नाहीत.

परमात्मा सगुण आहे व तो प्रकृतीच्या पलिकडे आहे असे द्वैतवादी रामानुजाचार्य वगैरे यांचें म्हणणें आहे. पण भगवान शंकराचार्यांनी या त्यांच्या मताचें खंडन केलें नाही. याचा अर्थ असा होतो की परमात्म्याची सगुण व निर्गुण दोन्ही रूपें प्रकृतीच्या पलिकडे आहेत हे आचार्यांना मान्य आहे. अर्थात् निर्गुण परमात्मा जसा व्यापक आहे, तसाच सगुण परमात्माहि प्रकृतीच्या पलिकडे असल्यामुळें, प्रकृतीपेक्षां व्यापक आहे; म्हणून प्रकृतीच्या पलिकडे असणाऱ्या परमेश्वराचें नांवहि, प्रकृतिजन्य नसल्यामुळें, प्रकृति व प्रकृतीचें आकाशादि कार्य यांच्यापेक्षां तें व्यापक आहे. हेंच माऊलींनी "हा गा नांवचि एक जयाचे। पाहतां गगनहि दिसे टांचें" या चरणांनी दाखविले आहे.

**गुण एकैक काय तयाचे। आकळिशील तूं**—परमेश्वर जसा अनंत अपार आहे, तसेंच त्याचे गुणहि अनंत अपार आहेत. "अनंताचे गुण अनंत अपार।" असे श्रीएकनाथमहाराजहि म्हणतात. ब्रह्मदेवाने भगवंताची स्तुति करतांना "**को वेत्ति भूमन् भगवन् परात्मन् योगेश्वरोतीर्भवतस्त्रिलोक्याम्**" (भाग० स्कं० १० अ० १४-२१) असे उद्गार काढले आहेत.

**म्हणोनि असो हें वानणें। सांगों नेणों कवणाचीं लक्षणें। दावावीं मिषें येणें। कां बोलिला तें॥ ११२॥**

**अर्थ**—आतां हें गौरवाचें बोलणें पुरे. प्राप्त पुरुषांचीं लक्षणें दाखवावीं या मिषाने जीं काय लक्षणें आम्ही बोलिलो तीं कोणाचीं (श्रीकृष्णाचीं किंवा अर्जुनाचीं) हे आम्ही सांगूं शकत नाही॥ ११२॥

**गूढार्थदीपिका**—भगवान श्रीकृष्ण संतांचें ध्येय असल्यामुळें व अर्जुन थोर भगवद्भक्त संतच असल्यामुळें दोघांचेहि ठिकाणीं संतांचीं लक्षणें पूर्णपणें होतीं; म्हणून श्रीज्ञानेश्वर माऊलींनी "सांगो नेणों कवणाची लक्षणें" असें म्हटलें आहे.

**ऐकें द्वैताचा ठावोचि फेडी। ते ब्रह्मविद्या कीजेल उघडी। तरि अर्जुनु पढिये ही गोडी। नासेल हन॥ ११३॥**
**म्हणोनि तें तैसें बोलणें। नव्हे सपातळ आड लावणें। केले मनचि वेगळवाणें। भोगावया॥ ११४॥**

**अर्थ**—पहा द्वैताचा जेथें मागमूसहि राहात नाही, ती ब्रह्मविद्या प्रगट करावी तर त्या जीवब्रह्मैक्यज्ञानाने अर्जुनाला अत्यंत प्रिय असलेली सगुणाची प्रेमगोडी नाहिशी होईल.॥ ११३॥ म्हणून भगवंताचे बोलणें तशा प्रकारचें (म्हणजे प्रेमाचा नाश करणारें) नव्हतें तर, तें बोलणें अत्यंत पातळ पडदा आड लावण्याप्रमाणे प्रेमसुख भोगण्याकरितां, केवळ मनच वेगळे दिसण्यासारखे ठेविलें होतें.॥ ११४॥

**जया सोहंभाव हा अटकु। मोक्षसुखालागोनि रंकु। तयाचिये दिठीचा झणें कळंकु। लागेल तुझिया प्रेमा॥ ११५॥**

**अर्थ**—(श्रीज्ञानेश्वर माऊली म्हणते, भगवान श्रीकृष्ण मनांत म्हणूं लागले की सगुणाच्या भक्तिप्रेमाची इच्छा सोडून) ज्यांचे ठिकाणीं मी ब्रह्म आहे हा अडथळा आहे व जे ब्रह्मैक्यरूप मोक्षसुखाकरितां दीन झालेले असतात. त्यांच्या या (अविद्यालेशरूप) दृष्टीचा डाग तुझ्या प्रेमाला लागण्याचा संभव आहे.॥११५॥

**गूढार्थदीपिका—जया सोहंभाव अटकु**—ज्या अविद्येने जीव परब्रह्माहून आपल्याला निराळे मानतो, ती अविद्या मुळीं वस्तुच नाही; म्हणून जीव खरोखर परब्रह्माहून निराळा नाही. तो आपल्या निराळेपणाची भ्रांत कल्पना करतो. नंतर मी म्हणजे देह व सर्व नामरूपें म्हणजें जगत ही विपरीत समजूत नाहिशी करून, मी ब्रह्मस्वरूप आहे अशी ऐक्याची कल्पना करितो. ही कल्पनाहि निराळेपणाच्या कल्पनेला धरूनच असल्यामुळे, तीहि भ्रांतच म्हटली पाहिजे. म्हणूनच श्रीज्ञानेश्वर महाराजांनी या ऐक्यरूप भ्रांत कल्पनेला "निमाली अविद्या" "वाचाऋण" असे म्हटलें आहे. आणि वेदान्तग्रंथांतून हिला "अविद्यालेश" म्हटलें आहे.

प्रेमाचा किंवा आनंदाचा असा स्वभाव आहे की, जाणीव झाली असतां, तो कमी होतो आणि जाणीव होत नाही अशा निर्विकल्पस्थितींत, पूर्ण सुखरूप किंवा पूर्ण आनंदरूप स्थिति असते. हेच "**तद्यथा प्रियया स्त्रिया**

**संपरिष्वक्तो न बाह्यं किंचन वेद नान्तरम्**" (बृ० उ० ४-३-२१) या श्रुतींत सांगितले असून, विद्यारण्यांनी आपल्या पंचदशी ग्रंथांत "**ब्रह्मानंदे योगानंदः**" या अकराव्या प्रकरणांत ही श्रुति प्रमाण देऊन हाच सिद्धान्त स्पष्ट केला आहे.

म्हणून परब्रह्माचीही निर्विकल्प अवस्था प्राप्त होण्याकरितां ब्रह्मज्ञानाने उत्पन्न होणारी ऐक्याची जाणीव नाहीशी झाली पाहिजे. ती जाणीव, ज्ञानाने उत्पन्न होते, पण नाहिशी होत नाही. म्हणूनच सोहंभावस्थितीला श्रीज्ञानेश्वर महाराजांनी "अटकु" म्हणजे निर्विकल्पस्थितीला प्रतिबंध करणारी असे म्हटलें आहे.

**मोक्षसुखालागोनि रंकु**—एकाच मोक्षाची दोन अंगें आहेत. सर्व दुःखनिवृत्ति हें एक अंग असून, परमानंदप्राप्ति हें दुसरें अंग आहे. सोहंभावरूप जीवब्रह्मैक्यज्ञान अत्यंत दृढ झालें, तर सर्वदुःखनिवृत्तिरूप मोक्ष मिळतो—म्हणजे जग अत्यंत खोटें वाटल्यामुळें, दुःखाचा भोग होत नाही—असा ज्ञानी, जर योगाभ्यास करणारा असला, तर समाधिकालीं जाणीव राहत नसल्यामुळे, तो ब्रह्मानंदरूप होतो. पण प्रारब्धाने व्युत्थान झाले असतां, व्यवहारकालीं त्याचा ब्रह्मानंद कायम राहत नाही. व्यवहारकालीं ऐक्याच्या जाणीवेचा सामान्य अहंकार असतो व त्या सामान्य अहंकाराने ब्रह्मानंद आच्छादित होतो. व्यवहाराविषयी तो उदासीन असून, आनंद आहे असे म्हणत असला तरी तो मुख्य ब्रह्मानंद नव्हे. तो "वासनानंद" आहे असे विद्यारण्यांनी पंचदशीच्या ११ व्या प्रकरणांत ९५-९६ श्लोकांनी सांगितलें आहे. आणि पूर्ण अहंकार नाहिसा झाला म्हणजे पूर्ण ब्रह्मानंद प्राप्त होतो किंवा पूर्ण ब्रह्मस्वरूप होतो. "सर्वात्मना विस्मृतः सन्······स ब्रह्मानंद इत्याह भगवानर्जुनं प्रति" (पंचदशी प्र० ११-१९-१००) सारांश ज्ञानाच्या ठिकाणीं सोहंभावामुळे परमानंदरूप मोक्ष प्राप्त झालेला नसतो, म्हणून तो परमानंदरूप मोक्षप्राप्तीकरितां विदेहमुक्ति होई-तोपर्यंत दीन होऊन राहतो.

**तयाचिये दिठीचा कलंकु। लागेल तुझिया प्रेमा**—"**प्रेमाची तंव जाती ऐसी। आठवो येवो नेदी आठवणेसी। हा भावो जाणावे सज्जनासी। जे भक्तिप्रेमासी जाणते**" (ए० भा० अ० ११-६०७) जाणीव नाहीशी करणें हा प्रेमाचा स्वभाव आहे. जीवब्रह्मैक्य झाल्यावर सगुण भगवंताची परमप्रेमरूप भक्ति करणारे संतच सोहंभावरूप जाणीवरहित होतात. माऊलींनीही या ब्रह्मैक्याने होणारी सोहंभावरूप जाणीव 'तें ऋणशेष वाचा इया। न फेडवेचि मरोनियां। तें पाया पडोनि मियां। सोडविलें' (अमृ० प्र० ३-३२) श्रीगुरूची परमप्रेमरूप भक्ति केल्याने नाहिशी होते, असा हा अनुभव या ओवींत सांगितला आहे. अर्जुन हा श्रीकृष्णाची परम प्रेमरूप भक्ति करणारा भक्त होता; म्हणून ब्रह्मविद्या जर उघडी करून सांगितली आणि अर्जुनाचे ठिकाणीं सोहंभावरूप ऐक्याची जाणीव उत्पन्न झाली, तर त्याचें भक्तिप्रेम कमी होऊन, त्याच्या भक्तिप्रेमाला कलंक लागेल असे देवाला वाटलें तें योग्यच होतें.

**विपायें अहंभाव ययाचा जाईल। मी तेंचि हा जरी होईल। तरि मग काय कीजेल। एकलेया॥ ११६॥**

**अर्थ**—(असा डाग लागून) जर या अर्जुनाचा मीपणा नाहिसा झाला व हा माझ्याशीं ऐक्य पावला (म्हणजें मीच ब्रह्म आहे अशी जाणीव उत्पन्न झाली) तर मग मला एकट्याला कसे करमेल?॥ ११६॥

**गूढार्थदीपिका—मग काय कीजेल। एकलेया**—ज्यांनी भक्तिप्रेमाचे सुख अनुभविलें आहे, त्यांना "भक्त्यर्थ कल्पित द्वैतमद्वैतादपि सुंदरम्" भक्तिप्रेमाकरितां केलेलें द्वैत अद्वैतापेक्षांही गोड वाटते. नाथांनीही "**इतर मी सांगूं कायी। मोक्षसुखाच्याहि ठायीं। या सुखाची गोठी नाही। धन्य पाही हरिभक्त**" (ए० भा० अ० १४-२०३) असेच उद्गार काढलें असून "अद्वैतीं तो नाही माझें समाधान। देवभक्तपण गोड वाटे॥" असा तुकाराम महाराजहि आपला अनुभव सांगतात. परमात्मा भक्तांच्या संगतींत व भक्त भगवंताच्या संगतींत ब्रह्मानंद लुटतात, हेंच भगवंतांनी "काय कीजेल एकलेया" इत्यादि उदगारांनी सुचविलें आहे.

**दिठीचि पाहतां निविजे। कां तोंड भरोनि बोलिजे। नातरी दाटूनि खेंव दीजे। ऐसें कोण आहे॥ ११७॥**
**आपुलिया मना बरवी। असमाई गोठी जीवीं। ते कवणेंसि चावळावी। जरी ऐक्य जाहलें॥ ११८॥**
**इया काकुळती जनार्दनें। अन्योपदेशाचेनि हातासनें। बोलामाजी मन मनें। आलिंगूं सरलें॥ ११९॥**

**अर्थ**—ज्याला नुसते डोळ्यांनी पाहिले असतां, मनाला परम समाधान होईल किंवा मनाला वाटेल तितकें तोंड

भरून ज्याच्याशीं बोलतां येईल, अथवा प्रेमाने ज्याला कडकडून आलिंगन देतां येईल, असा अर्जुनाशिवाय कोण आहे?॥ ११७॥ जर अर्जुनाचें व माझें ऐक्य झालें तर आपल्या मनाजोगी व मनात न सामावणारी, एका प्रेमाच्या मनुष्यालाच सांगण्याजोगी, जिव्हाळ्याची गोष्ट कोणापाशीं सांगतां येईल?॥ ११८॥ अशा रीतीने मन व्याकुळ झाल्यामुळें, भगवान् योगाचा उपदेश, मला करीत नसून, दुसऱ्याला करीत आहेत असे अर्जुनाला वाटेल अशा हातवटीने सांगत असतां, त्या बोलण्यात भगवंताचे मन अर्जुनाच्या मनाला, प्रेमाने आलिंगन देऊं लागलें. ॥ ११९ ॥

**गूढार्थदीपिका—बोलामाजी मन मनें। आलिंगूं सरलें**—ज्याप्रमाणे योगाने समाधि साधली जाते, त्याप्रमाणें ती भक्तीनेहि साधली जाते. "**स्वकीये हृदये ध्यायेदिष्टदेवस्य रूपकम्। चिंतयेद्भक्तियोगेन परमाल्हादपूर्वकम्। आनंदाश्रुपुलकेन दशभावः प्रजायते। समाधिःसंभवेत्तेन संभवेच्च मनोन्मनी**" असे घेरंडसंहितेत सांगितले आहे. योगांतील क्रियासाध्य समाधींतून व्युत्थान होतें पण भक्तियोगाने साधणारी समाधि, भक्तिप्रेमाच्या अखंडतेमुळे अखंड राहते. अर्जुन भक्त होता. त्याचें प्रेम अखंड होतें. अशा अखंडसमाधिस्थ भक्ताने, आपल्या प्रिय भगवंताला योगाचें निरूपण करण्याची विनंति केली.

भक्तीने अर्जुन अखंड समाधिस्थ म्हणजे भगवंताच्या ठिकाणीं त्याची वृत्तिअखंड स्थिर झाली असून, तो त्याची जाणीव वागवित नाही म्हणून त्याची निर्विकल्प अवस्था आहे, हे पाहून भगवंताला अत्यंत संतोष झाला व योगाचें निरूपण करीत असतांनाच, भगवंताचें मन अर्जुनाचे मनाला आलिंगन देऊं लागलें.

**हे परिसतां जरी कानडें। तरि जाण पां पार्थ उघडें। कृष्णसुखाचेंचि रूपडें। वोतलें गा॥ १२०॥**

**अर्थ**—हे ऐकतांना जरा विचित्र वाटेल, पण अर्जुन हा श्रीकृष्णाच्या आत्मसुखाची ओतीव मूर्ति होता. ॥ १२० ॥

**गूढार्थदीपिका**—ज्ञानीभक्ताला भगवंताची सगुण मूर्तिही आपल्या आत्मप्रेमाची मूर्ति वाटते व भगवंताला ज्ञानीभक्त म्हणजे आपल्या आत्मप्रेमाची मूर्ति वाटते "ज्ञानी त्वात्मैव मे मतम्" असें भगवंतांनी पुढे सातव्या अध्यायांत म्हटले आहे व "एऱ्हवीं ज्ञानिया जो म्हणिजे। चैतन्यचि केवळ माझे" असे माऊलीनेहि म्हटलें आहे. म्हणजे भक्त भगवंताला आत्म्याप्रमाणे परम प्रिय असतो, असा त्याचा अर्थ.

**हें असो वयसेचिये शेवटीं। जैसें एकचि विये वांझोटी। मग ते मोहाची त्रिपुटी। नाचों लागे॥ १२१॥**
**तैसें जाहलें श्रीअनंता। ऐसें तरि मी न म्हणतां। जरी तयाचा न देखतां। अतिशयो एथ॥ १२२॥**
**पाहा पां नवल कैसे चोज। कें उपदेशु केउतें झुंज। परि पुढें वालभाचें भोज। नाचत असे॥ १२३॥**

**अर्थ**—हे असो. ज्या वर्षापर्यंत संतति होऊं शकते, अशा वयाचे शेवटीं, एखाद्या वांझ स्त्रियेस संतति झाली असतां, जसे तिचे, त्या संततीवरील प्रेम हें सारखें उफाळून दिसत असतें. ॥१२१॥ त्याप्रमाणेंच भगवंताचे ठिकाणी अर्जुनाविषयींचे प्रेम उफाळून दिसत होतें, भगवान् अर्जुनावर अत्यंत लुब्ध झाले असें जें दिसत होतें, तें न दिसतें तर, मी असें म्हटलेंहि नसतें. ॥१२२॥ श्रीकृष्णाचें अर्जुनावर विलक्षण प्रेम होतें पहा! कोण तो युद्धाचा प्रसंग आणि तेथें कोण हा उपदेश! पण अर्जुनाच्या प्रेमाची मूर्ति भगवान श्रीकृष्ण, त्याच्यासमोर नाचत आहेत (म्हणजे भगवान अर्जुन जसे म्हणेल, तसे करीत आहेत.) ॥१२३॥

**गूढार्थदीपिका**—भगवंताचें प्रेम करणारा भक्त आपले यत्किंचित्हि स्वत्व न वागवितां प्रेमानें सर्वस्वीं भगवंताच्या परतंत्र होतो; म्हणूनच भगवानहि भक्तावर तसेच प्रेम करीत असल्यामुळें, तोहि भक्ताच्या सर्वस्वीं स्वाधीन होतो. सर्वस्वीं स्वाधीन होणें किंवा परतंत्र होणें हेंच प्रेमाचें लक्षण आहे. प्रेमांत नेहमीं "तत्सुखसुखित्वम्" त्याच्या सुखाने सुखी होणें हेच मुख्य तत्त्व असतें.

**आवडी आणि लाजवी। व्यसन आणि शिणवी। पिसें आणि न भुलवी। तरीं तेंचि काई॥ १२४॥**
**म्हणऊनि भावार्थु तो ऐसा। अर्जुन मैत्रियेचा कुवासा। कीं सुखें शृंगारलिया मानसा। दर्पणु तो॥ १२५॥**
**यापरी बाप पुण्यपवित्र। जगीं भक्तिबीजासि सुक्षेत्र। तो श्रीकृष्णकृपे पात्र। याचिलागीं॥ १२६॥**

**अर्थ**—आवडी असून लाज वाटेल तर ती आवडीच नव्हे, किंवा एखादे व्यसन असून त्याचा शीण वाटेल

तर, तें व्यसंनच नव्हे व वेड असून जर भ्रम होणार नाही तर, तें वेडच नव्हे. ॥ १२४ ॥ म्हणून या सर्वांचा भावार्थ किंवा अभिप्राय इतकाच की अर्जुन हा सख्यभक्तिचें पूर्ण आश्रयस्थान होता किंवा अर्जुनाची सख्यभक्ति पाहून, अत्यंत सुखसंपन्न झालेल्या भगवंताच्या मनाचा तो अर्जुन आरसाच होता. ॥ १२५ ॥ याप्रमाणे अर्जुन खरोखर थोर भाग्यवान, अत्यंत पुण्यवान व पवित्र होता आणि जणुं जगामध्यें प्रेमभक्तीचें बीज पेरण्याकरितां तयार झालेलें उत्तम शेतच होता. म्हणूनच तो भगवान श्रीकृष्णाच्या कृपेस पात्र होता. ॥ १२६ ॥

**गूढार्थदीपिका**—"कोटी जन्मार्जितै: पुण्यै: शिवे भक्ति: प्रजायते" (शि० गी०) अनंत जन्मांतील पुण्याचा सांठा पदरीं असल्यावांचून, परमेश्वराची प्रेमभक्ति प्राप्त होत नाही व अशा प्रेमभक्तीवांचून भगवानहि वश होत नाही, असा भाव.

**हो कां आत्मनिवेदनातळींची। जे पीठिका आहे सख्याची। पार्थु अधिष्ठात्री तेथिंची। मातृका गा॥ १२७॥**
**पासींचि गोसावी वर न वानिजे। मग पाइकाचा गुण घेईजे। ऐसा अर्जुनुचि तो सहजें। पढिये हरी॥ १२८॥**

**अर्थ**—किंवा अर्जुन म्हणजे आत्मनिवेदनरूप भक्तीच्या खालची जी सख्यभक्ति आहे, तेथील मुख्य देवताच होय असें म्हणतां येईल ॥ १२७ ॥ जवळच असलेल्या ब्रह्मांडाधीश भगवान श्रीकृष्णाचें वर्णन न करितां, भक्ताच्या भक्तगुणाचे गुणवर्णन करावेसे वाटावें, इतका हा अर्जुन भगवंताला स्वाभाविक प्रिय होता. ॥ १२८ ॥

**गूढार्थदीपिका**—भगवंताला आपल्या भक्ताचें नि:सीम प्रेम असल्यामुळें, आपल्यावर प्रेम करणाऱ्यापेक्षां, भक्तावर प्रेम करणाराच विशेष आवडतो, असा भाव.

**पाहा पां अनुरागें भजे। जे प्रियोत्तमें मानिजे। ते पतीहीहूनि काय न वर्णिजे। पतिव्रता॥ १२९॥**
**तैसा अर्जुनुचि विशेषें स्तवावा। ऐसें आवडलें मज जीवा। जे तो त्रिभुवनींचियां दैवां। एकायतनु जाहला॥ १३०॥**
**जयाचिया आवडीचेनि पांगें। अमूर्तुही मूर्ति आवगे। पूर्णाहि परी लागे। अवस्था जयाची॥ १३१॥**

**अर्थ**—अत्यंत प्रेमाने जी पतीची सेवा करते, म्हणून पतीला जी अत्यंत आवडते, त्या पतिव्रतेची सर्व लोक पतीपेक्षां अधिक स्तुति करीत नाहीत काय? ॥ १२९ ॥ त्याप्रमाणें त्रैलोक्यात जेवढे कांही थोर भाग्य असेल, त्या सर्व भाग्याला, एक अर्जुनच आज आश्रय झाला असल्यामुळें, अर्जुनाचीच खरोखर थोरवी गावी, असेंच माझ्या मनाला आवडलें. ॥ १३० ॥ अर्जुनाच्या प्रेमसंबंधामुळें, अव्यक्त परमात्मा, व्यक्त होतो, परिपूर्ण असूनहि त्याला त्याचा (अर्जुनाचा) ध्यास लागतो. ॥ १३१ ॥

**गूढार्थदीपिका**—अद्वैतभक्तीची प्राप्ति होणें यासारखें. थोर भाग्य नाही. भक्ताच्या नि:सीम प्रेमाला भाळूनच परमात्मा सगुण साकार होतो व भक्ताच्या सर्वस्वीं स्वाधीन होऊन राहतो. भगवंतासह सर्व संत या ज्ञानीभक्ताच्या प्रेमभक्तीची मोठ्या आवडीने गोडवी गातात. असा हा ज्ञानीभक्त परम भाग्यवान असतो. "उपमा त्या दैवाची कोण वाणी" (ज्ञान० हरिपाठ-२१) अशा भाग्यवानाच्या भाग्याला देण्याजोगी उपमाच नाही. त्याचें भाग्य निरूपम होय हेच वरील ओव्यांचें सार आहे.

**तंव श्रोते म्हणती दैव। कैसी बोलाची हवाव। काय नादातें हन बरव। जिणोनि आली॥ १३२॥**
**हां हो नवल नोहे देशी। मऱ्हाटी बोलिजे तरी ऐसी। वाणें उमटताहे आकाशीं। साहित्यरंगाचें॥ १३३॥**
**कैसें उन्मेख चांदिणें तार। आणि भावार्था पडे गार। हेचि श्लोकार्थकुमुदिनी फार। साविया होती॥ १३४॥**
**चाडचि निचाडां करी। ऐसी मनोरथीं ये थोरी। तेणें विवळले अंतरीं। तेथ डोलु आला॥ १३५॥**
**तें निवृत्तिदासें जाणितलें। मग अवधान द्या म्हणितलें। नवल पांडवकुळीं पाहलें। कृष्णदिवसें॥ १३६॥**
**देवकीया उदरीं वाहिला। यशोदा सायासें पाळिला। शेखीं उपेगा गेला। पांडवांसी॥ १३७॥**
**म्हणऊनि बहुदिवस वोळगावा। कां अवसरु पाहोनि विनवावा। हाही सोसु तया सदैवा। पडेचिना॥ १३८॥**
**हें असो कथा सांगें वेगीं। मग अर्जुन म्हणे सलगी। देवा इयें संतचिन्हें हन आंगीं। न ठकती माझ्या॥ १३९॥**
**एऱ्हवीं या लक्षणांचिया निजसारा। मी अपाडें कीर अपुरा। परि तुमचेनि बोलें अवधारा। थोरावें जरी॥ १४०॥**

**अर्थ**—हे वर्णन ऐकून श्रोते म्हणतात, महत्‌भाग्य आमचे! काय ही सुंदर भाषा! ती सासुरांच्या कोमलपणाला जिंकून आली की काय असे वाटते. ॥ १३२ ॥ अहो! यांत आश्चर्य नाही. देशी मराठी भाषा बोलायची ती अशी बोलावी की, जी बोलल्याबरोबर आकाशांत उपमाअलंकारादि साहित्याचे नाना रंग उमटलेले दिसतील. ॥ १३३ ॥ या शब्दाने ब्रह्मज्ञानरूपी चकचकित आणि भावार्थरूपी गार असा प्रकाश, कसा पडला आहे पहा! ह्याच्याचमुळें श्लोकांचे जे अर्थ तेच कोणी चंद्रविकासी कमळें, ती सहज उमललीं जातात. (दृष्टान्तरूप उपमा अलंकाराने श्लोकांचे अर्थ स्पष्ट होतात असा भाव). ॥ १३४ ॥ अशी भाषा ब्रह्मज्ञान ऐकण्याची इच्छा नसणाऱ्यालाहि ब्रह्मज्ञान ऐकण्याची इच्छा उत्पन्न करते, अशी या भाषेची थोरवी आहे. असे श्रोत्यांच्या मनोरथांत येऊन ते अंत:करणांत प्रसन्न झाले व आनंदाने डोलू लागले. ॥ १३५ ॥ हे निवृत्तिनाथांचे दास श्रीज्ञानेश्वर महाराज यांनी जाणलें व श्रोत्यांना निरूपणाकडे लक्ष देण्याची विनंति केली. आश्चर्य हे की श्रीकृष्णरूपी दिवस, पांडवांचे कुळाचे ठिकाणी उजाडला आहे. (ज्याप्रमाणे दिवस हा मनुष्याच्या कर्म करण्यास उपयोगी पडतो त्याप्रमाणें पांडवांच्या सर्व कर्मात भगवान श्रीकृष्ण उपयोगी पडत असत.-पंडूच्या सर्व वंशजावर भगवंताची अत्यंत कृपा होती असा अर्थ). ॥ १३६ ॥ देवकीने आपल्या पोटांत ज्याला वागविले, यशोदेने ज्याचे अत्यंत काळजीने संगोपन केले, पण सरते शेवटी तो पांडवांच्या उपयोगी पडला. ॥ १३७ ॥ म्हणून कांही दिवस सेवा करून किंवा समय पाहून विनंति करावी, अशी कांही त्या भाग्यवान अर्जुनाला चिंता करावी लागत नसे. ॥ १३८ ॥ हे असू द्या, आतां पुढे काय झालें तेंच सांगतो. मग अर्जुन मोठ्या लडिवाळपणाने म्हणाला, देवा! हीं आपण सांगितलेलीं संतचिन्हें माझ्या आंगीं मुळींच दिसत नाहीत. ॥ १३९ ॥ साधारणत: ''या लक्षणाचिया निजसारा'' म्हणजे या लक्षणांची खास सारभूत ज्या संतव्यक्ति, त्यांच्याशीं तुलना करून पाहतां, निश्चयाने मी त्यांच्या बरोबरीचा नाही. मी अपुरा आहे. पण तुमच्या उपदेशाने जर त्यांच्या बरोबरीचा होईन तर पहा. ॥ १४० ॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे अग्नीचा प्रकाश व उष्ण असा स्वभाव असला तरी, त्याला तरी, त्याच्या स्वभावाची जाणीव होत नाही, त्याप्रमाणेच ब्रह्मबोध झालेल्या संतांचे ठिकाणीं असलेलीं लक्षणे, त्यांचा ब्रह्मस्वभाव होत असल्यामुळें, तीं ते जाणत नसतात. वस्तुत: वस्तूचा स्वभाव, वस्तु जाणत नसते, हा नियम आहे. म्हणूनच परम भक्त अशा अर्जुनाचे ठिकाणीं, संपूर्ण संतांचीं चिन्हें स्वाभाविक असूनहि, अर्जुनाच्या मुखांतून हीं चिन्हें माझे ठिकाणीं बाणलीं नाहीत, असे अत्यंत निरहंकारपणाचे उद्गार निघावेत, हे साहजिकच आहे.

**जी तुम्ही चित्त देयाल। तरी ब्रह्म मियां होइजेल। काय जहालें अभ्यासिजेल। सांगाल तें॥ १४१ ॥**
**हां हो नेणों कवणाची काहाणी। आइकोनि श्लाघत असों अंत:करणीं। ऐसी जाहलेपणाची शिरयाणी। कायसी देवा ॥ १४२ ॥**
**हें आंगें म्यां होइजो कां। येतुलें गोसावी आपुलेपणें कीजो कां। तंव हांसोनि श्रीकृष्ण हो कां। करूं म्हणती ॥ १४३ ॥**

**अर्थ**—देवा! हें माझें म्हणणें तुम्ही मनावर घेतले तर मी ब्रह्मरूप होईन व ती ब्रह्मस्थिति प्राप्त होण्याकरितां जे कांही केलें पाहिजे म्हणून सांगाल, त्याचा अभ्यास करीन. ॥ १४१ ॥ अहो देवा! तुम्ही कोणाचें वर्णन केलें हें समजत नाही, पण तें ऐकूनच जर मन त्यांच्या स्थितीची प्रशंसा करतें तर मग, प्रत्यक्ष तशी ब्रह्मस्थिती प्राप्त झाली असतां आनंदाला पारावारच नाही. ॥ १४२ ॥ असा ब्रह्मरूपी मी स्वत: होईन काय? व प्रभो! मला आपला समजून ही ब्रह्मस्थिति प्राप्त करून द्याल काय? हें अर्जुनाचे बोलणें ऐकून, भगवान श्रीकृष्ण हसले व म्हणाले, अर्जुना! तुला ब्रह्मरूप करूं बरें! ॥ १४३ ॥

**गूढार्थदीपिका**—भक्त भगवत्प्रेमाने भगवत्स्वरूपच झालेले असतात, पण प्रेमामुळें भगवंताशीं ऐक्य पावल्याची त्यांना जाणीव उत्पन्न होत नाही किंवा जाणीवेचा अहंकार उत्पन्न होत नाही. कारण अशा अहंकारामुळें सगुण साक्षात्कार लोपला जातो. हे गोपिकांच्या रासक्रीडेंत भगवंताच्या झालेल्या अंतर्धानावरून कळून येते. भक्त भगवंताच्या प्राप्तीची जाणीव न वागवितां अज्ञान्याप्रमाणे नदी समुद्रास मिळालेली असली तरी, मिळतच राहते, त्याप्रमाणे भगवंताच्या प्राप्तीची उत्कंठा वागवित असतात.

**देखा संतोषु एक न जोडे। तंवचि सुखाचें सैंघ सांकडें। मग जोडलिया कवणेकडे। अपुरें असे॥ १४४॥**
**तैसा सर्वेश्वरु बळिया सेवकें। म्हणोनि ब्रह्मही होय तो कौतुकें। परि कैसा भारें आतला पिकें। दैवाचेनि॥ १४५॥**

**अर्थ**—पहा, मनाला संतोष जोपर्यंत प्राप्त होत नाही, तोपर्यंत सुखाचा जिकडे तिकडे दुष्काळ असतो. संतोष प्राप्त झाल्यानंतर मग सुखाची उणीव कोठे असणार?॥ १४४॥ त्याप्रमाणे अनंतब्रह्मांडाचा स्वामी सर्वसमर्थ भगवान श्रीकृष्ण, याचा अर्जुन एकनिष्ठ सेवक असल्यामुळें, तो सहज लीलीने ब्रह्मस्वरूप होणार, पण अर्जुनाच्या भाग्याला कसें बहारीचें पीक आलें व त्या पिकाच्या भाराने तो कसा संपन्न झाला, पहा!॥ १४५॥

**गूढार्थदीपिका**—प्रेमळ माता आपल्या लाडक्याचे जसें लाड पुरविते, त्याप्रमाणे भगवद्भक्ताचे स्वाधीन झालेला परमात्माहि आपल्या भक्ताचे लाड पुरवितो.

**जो जन्मसहस्त्रांचियासाठीं। इंद्रादिकांहीं महागु भेटी। तो आधीनु केतुला किरीटी। जे बोलुही न साहे॥ १४६॥**
**मग ऐका जें पांडवें। म्हणितलें म्यां ब्रह्म होआवें। तें अशेषही देवें। अवधारिलें॥ १४७॥**
**तेथ ऐसेंचि एक विचारिलें। जे या ब्रह्मत्वाचे डोहळे जाहले। परि उदरा वैराग्य आहे आलें। बुद्धीचिया॥ १४८॥**
**एऱ्हवीं दिवस तरी अपुरे। परी वैराग्यवसंताचेनि भरें। जें सोऽहंभाव महुरें। मोडोनि आला॥ १४९॥**
**म्हणोनि प्राप्तिफळें फळतां। यासि वेळु न लागेल आतां। होय विरुक्तु ऐसा अनंता। भरंवसा जाहला॥ १५०॥**
**म्हणे जें जें हा अधिष्ठील। तें आरंभींच यया फळेल। म्हणोनि सांगीतला न वचेल। अभ्यासु वायां॥ १५१॥**

**अर्थ**—हजारों जन्म तप करूनहि इंद्रादिकांना ज्या परमेश्वराची भेट होणें दुरापास्त आहे, तो परमात्मा अर्जुनाच्या किती स्वाधीन झाला, पहा! अर्जुनाने तोंडाने कांही मागावें, इतकेहि त्याला सहन होत नव्हते.॥ १४६॥ (श्रीज्ञानेश्वर महाराज श्रोत्यांना म्हणतात) पुढें ऐका. मी ब्रह्मस्वरूप व्हावें अशी आपली जी इच्छा अर्जुनाने बोलून दाखविली, ती देवाने पूर्णपणें लक्षांत घेतली.॥ १४७॥ देव आपल्याशींच विचार करूं लागले की ब्रह्मस्वरूप होण्याचे डोहळे ज्याअर्थी याला झाले आहेत, त्याअर्थी याच्या बुद्धीचे ठिकाणीं वैराग्याचा अंकुर उत्पन्न झाला आहे, हे खास.॥ १४८॥ साधारणत: ह्या अंकुराची पुरेशी वाढ झाली नाही, पण वैराग्यरूपी वसंतऋतूच्या भराने व मी ब्रह्म आहे अशा मोहराने हा डवरून गेला आहे.॥ १४९॥ म्हणून ब्रह्मप्राप्तीरूपफळाने दाटून येण्याला याला वेळ लागणार नाही व हा पूर्ण विरक्त होईल असा देवाला भरंवसा वाटला॥ १५०॥ देव मनांत म्हणतात, जो जो अभ्यास हा करील, तो तो एकदम सुरुवातीलाच याला फलद्रूप होईल, म्हणून याला जर अभ्यास सांगितला तर तो वायां जाणार नाही.॥ १५१॥

**गूढार्थदीपिका**—भगवत्प्रेमामुळे व भगवंताच्या साह्याने "**जितोत्तर भूमिकस्यच नाधरभूमिषु परचित्तज्ञानादिषु संयमो युक्त:**" (सू० ६-वि० पा०) खालच्या भूमिकेचा अभ्यास करावा न लागतां, भक्त एकदम वरच्या भूमिकेवर चढतो, असे योग सूत्रभाष्यात म्हटलें आहे; म्हणून भगवद्भक्ताला योगाभ्यासांत कष्ट पडत नाहीत. सहजच त्याला योग साधतो असा अर्थ.

**ऐसें विवरोनियां श्रीहरी। म्हणितलें तिये अवसरीं। अर्जुना हा अवधारीं। पंथराजु॥ ५२॥**

**अर्थ**—असा सर्व विचार करून देव त्यावेळीं अर्जुनाला म्हणतात, अर्जुना! आतां तुला जो श्रेष्ठ मार्ग आहे तो सांगतों ऐक.॥ १५२॥

**गूढार्थदीपिका**—सर्व योगांत "योगीनामपि सर्वेषाम्" "यो मे भक्त: स मे प्रिय:" इत्यादी अनेक श्लोकांनीं भगवंतानी भक्ताचे श्रेष्ठत्व सांगितलें आहे आणि "ब्रह्मणी हि प्रतिष्ठाऽहम्" या श्लोकांत मी ब्रह्माची प्रतिष्ठा आहे—म्हणजे मूळ आहे—असे सांगून, अनिर्वाच्य निर्गुण परब्रह्माप्रमाणेंच आपल्या सगुणस्वरूपाचें पूर्ण ब्रह्मत्व दर्शविलें आहे.

तसेंच श्रीज्ञानेश्वर महाराजांनीहि "जे उन्मनियेचे लावण्य", "वन्हि आणि ज्वाळ। दोन्ही वन्हीचि केवळ", "तरी पार्था परियेसा। मी तंव येथ ऐसा" इत्यादि ओव्यांत निर्गुणाचे व सगुणाचे अत्यंत ऐक्य आहे, असें जे सांगितलें आहे,

त्याचा साक्षात् अनुभव या योगमार्गाने घेतां येतो व त्या अनुभवामुळे, सगुणस्वरूपाचे ठिकाणीं अकृत्रिम भक्ति होते.

अशा रीतीने सर्वश्रेष्ठ भक्तियोगाला सहायक होणाऱ्या या योगमार्गाला "पंथराजु" म्हणून संबोधिलें यांत आश्चर्य नाही.

**तेथ प्रवृत्तितरूच्या बुडीं। दिसती निवृत्तिफळाचिया कोडी। जिये मार्गीचा कापडी। महेशु आझुनी॥ १५३॥**

**अर्थ**—हा मार्ग म्हणजे कर्मप्रवृत्तिरूप एक वृक्षच आहे, पण याच्या बुडाशी मात्र कर्मनिवृत्तिरूप असंख्य फळें आहेत. भगवान शंकर या मार्गाने अजून प्रवास करीत आहेत.॥ १५३॥

**गूढार्थदीपिका—तेथ प्रवृत्तितरूचां बुडी। दिसती निवृत्तिफळाचिया कोडी**—आत्मप्राप्तीकरितां केलेला योगाभ्यास हें कर्माचरणच आहे खरें, पण शेवटीं अभ्यास पूर्ण होऊन जेव्हां जीवब्रह्मैक्य होतें तेव्हा योग्याला, माझे ठिकाणीं कर्म नाही व कर्माचें कर्तृत्वहि नाही, मी सर्वकर्मकर्तृत्वरहित केवळ सच्चिदानंदस्वरूप आहे, असा अनुभव येतो, या अनुभवाने सर्व कर्माची व कर्तृत्वाची निवृत्ति होते.

**जियें मार्गीचा कापडी। महेश आजुनी**—हा योगमार्ग अत्यंत कष्टतर असल्यामुळें, जीवाला जवळ जवळ असाध्यच आहे आणि साध्य झाल्यानंतरहि मरेतोपर्यंत तो अभ्यास चालूंच ठेवावा लागतो, असा भाव.

**पैं योगिवृंदें वहिलीं। आडवीं आकाशीं निघालीं। कीं तेथ अनुभवाचां पाउलीं। धोरणु पडिला॥ १५४॥**

**अर्थ**—पण योगीलोकांनी खरोखर, मार्ग नसलेल्या अरण्यांत किंवा आकाशांत वाट चालण्याला सुरुवात केली. तेथे येत जाणारा जो अनुभव तेच पाऊल होय व अनुभवाच्या पाठी येत गेलेला अनुभव ही रुळलेली पाऊलवाट होय.

**तिहीं आत्मबोधाचेनि उजुकारें। धांव घेतली एकसरें। कीं येर सकळ मार्ग निदसुरे। सांडूनिया॥ १५५॥**

**अर्थ**—आत्मबोधाला प्रतिबंधक ऋद्धिसिद्धि प्राप्त करून घेणें इत्यादि अज्ञानी लोकांचे जे मार्ग होते, ते सोडून आत्मानुभवाचा जो सरळ मार्ग होता, त्या मार्गाने त्यांनी एकसारखी धांव घेतली.॥ १५५॥

**गूढार्थदीपिका—येर सकळ मार्ग निदसुरे। सांडूनियां—"ते ममाधावुपसर्गा व्युत्थाने सिद्धयः"** (यो० सू० वि० पा० ३७) योगाच्या अभ्यासाने प्राप्त होणाऱ्या सिद्धी समाधींत म्हणजे आत्मैक्यांत विघ्न करणाऱ्या असतात. कारण व्युत्थानात—म्हणजे आत्मस्वरूपाशीं झालेलें ऐक्य नाहिसे होऊन द्वैत भासूं लागलें असतांच-त्या अनुभवाला येतात असें योगसूत्रात सांगितलें आहे.

**आत्मबोधाचेनि उजुकारें। धांव घेंतली एकसरें।**—अर्थात् योगाने आत्म्याशीं ऐक्य साधूं पाहणारे योगी-पुरुष योगसिद्धि मिळविण्याकरितां योगाचा अभ्यास करणें, हा अज्ञानाचा मार्ग आहे असे समजून, सिद्धी मिळविण्याच्या भ्रांतींत पडत नाहीत सिद्धींचा अव्हेर करून ते आत्मैक्याचा अनुभव घेण्याचा प्रयत्न करतात.

**पाठीं महर्षी येणें आले। साधकांचे सिद्ध जाहाले। आत्मविद थोरावले। येणेंचि पंथें॥ १५६॥**

**अर्थ**—नंतर ऋषिमुनी या मार्गाने येऊं लागले व साधकदशेंतून सिद्ध दशेंत गेले. आत्मज्ञानी पुरुष देखील या मार्गाचा अवलंब करूनच थोर जगन्मान्य झाले.॥ १५६॥

**गूढार्थदीपिका—साधकांचे सिद्ध जाहाले—"ऐका सिद्धांचे लक्षण। सिद्ध म्हणजे स्वरूप जाण" "स्वरूप होऊनि राहिजे। तया नाम सिद्ध बोलिजे"** (दासबोध द० ८ स ९) सिद्ध म्हणजे स्वत:सिद्ध ब्रह्मस्वरूपच असल्यामुळें, सिद्ध हें नांव ब्रह्मस्वरूपासच आहे आणि जे असे केवळ ब्रह्मस्वरूप होऊन राहतात, त्यांनाहि सिद्ध म्हणतात. योगाभ्यासाने साधक सिद्ध होतो म्हणजे परब्रह्माशीं पूर्ण ऐक्य पावतो.

**आत्मविद थोरावले**—योगाभ्यास न करतां, केवळ तत्त्वमस्यादि महावाक्याच्या योगाने, ज्यांना 'मी' सच्चिदानंद आत्मस्वरूप आहे असे ज्ञान होते, त्यांना आत्मविद म्हणतात. पण असें हें आत्मज्ञान झालें तरी, बाह्य विषयाचा भास होऊन, ज्ञान्यांचें मन विषयाकार होत राहतें व आत्मस्वरूपाची विस्मृति राहते; म्हणून त्यांचे आत्मैक्यज्ञान आनुमानिक व अदृढ असते. बाह्य विषयांचा विसर पडून, केवळ ब्रह्मैक्याचा साक्षात् अपरोक्ष अनुभव त्यांना मिळत

नाही. योगाभ्यासाने तसा अपरोक्ष अनुभव घेतां येतो व ज्ञान दृढ होतें. म्हणून केवळ ज्ञान्यापेक्षा योगाभ्यास करणारे ज्ञानी श्रेष्ठ समजले जातात असे "आत्मविद थोरावले" या चरणाने माऊलींनी सांगितलें आहे. "**क्रियावानेष ब्रह्मविदां वरिष्ठः**" (मुं० उ० ३-१-४) अशी श्रुतिहि असून ज्ञान, ध्यान, वैराग्यादिकांनी युक्त असलेला क्रियावान ज्ञानी, ज्ञान्यात श्रेष्ठ होय असे आचार्यांनी त्यावरील भाष्यांत म्हटलें आहे.

**हा मार्गु जैं देखिजे। तैं तहान भूक विसरिजे। रात्रिदिवसु नेणिजे। वाटे इये॥ १५७॥**

**अर्थ**—या मार्गाला जो लागला, तो तहान भूक देखील विसरतो व रात्रीदिवसांचे देखील त्याला ज्ञान होत नाही. ॥ १५७॥

**गूढार्थदीपिका**—"प्राणस्य धर्मावशनापिपासे" (विवेक चूडामणि श्लो० १०४) तहान व भूक हे प्राणाचे धर्म आहेत. योगाने प्राणाचा निरोध होऊन तहानभूक विसरली जाते.

योगाभ्यासांत बाह्य पदार्थांचा विसर पडल्यामुळें रात्र व दिवस भासत नाहीत.

**चालतां पाऊल जेथ पडे। तेथ अपवर्गाची खाणी उघडे। आव्हांटलिया तरी जोडे। स्वर्गसुख॥ १५८॥**

**अर्थ**—चालत असतांना त्याचे जेथें जेथें पाउल पडेल, तेथें तेथें मोक्षाचा त्याला अनुभव येतो. यदाकदाचित् मार्ग चुकला तर स्वर्गसुख भोगायला मिळतें. ॥ १५८॥

**निगिजे पूर्वीलिया मोहरा। कीं येईजे पश्चिमेचिया घरा। निश्चळपणें धनुर्धरा। चालणें एथिंचें॥ १५९॥**

**अर्थ**—हा मार्ग म्हणजे पूर्व दिशेने निघून पश्चिम दिशेला पोहोंचावे असा आहे. या मार्गाचें चालणें म्हणजे अत्यंत दृढ श्रद्धा ठेवणें होय. ॥ १५९॥

**गूढार्थदीपिका**—या योगप्रक्रियारूप अपरोक्ष अनुभवाचा मार्ग गुरूपासूनच जाणवयाचा असतो व श्रीगुरुच्या सहायावाचून, त्या मार्गाची वाटचाल होऊं शकत नाही; म्हणून येथें विशेष स्पष्टीकरण करतां येत नाही.

**निगिजे पूर्वीलिया मोहरा। कीं येइजे पश्चिमेचिया घरा**—कुंडलिनीच्या सहायाने प्राणाचा सुषुम्नानाडींत प्रवेश करून; आधारादि षट्चक्राचे अनुसंधान व तेथील गणेशादि देवतांचें अनुसंधान व पूजन करून, त्यांच्या अनुग्रहाने सहस्रदलांचे ठिकाणीं शिवशक्तीचें ऐक्य करणें याला पूर्वमार्ग म्हणतात.

आणि कुंडलिनी शक्तीच्या सहायाने सुषुम्नामार्गाचा वळसा घेऊन त्रिकूटापासून ब्रह्मरंध्रांत गमन करणें याला पश्चिममार्ग म्हणतात.

पूर्वमार्ग साधल्यानंतर पश्चिममार्ग साधायचा असतो, म्हणून येथें "निगिजे पूर्वीलिया मोहरा। की येइजे पश्चिमेचिया घरा" असे म्हटले आहे.

**येणें मार्गें जया ठाया जाईजे। तो गांवो आपणचि होईजे। हें सांगों काय सहजें। जाणसी तूं॥ १६०॥**

**तेथ पार्थें म्हणितलें देवा। तरि तेंचि मग केव्हां। कां आर्तिसमुद्रौनि न काढावा। बुडतु जी मी॥ १६१॥**

**तंव श्रीकृष्ण म्हणती ऐसें। हें उत्सृंखळ बोलणें कायसें। आम्ही सांगतसों आपैसें। वरि पुशिलें तुवां॥ १६२॥**

**अर्थ**—या मार्गाने ज्या गांवाला पोहोंचायचें असते, तो गांव योगी आपणच होतो हे तुला काय सांगूं? तुला आपोआप पुढें कळून येईल. ॥ १६०॥ हें ऐकून अर्जुन म्हणतो, देवा! मग आतां केव्हां ती स्थिति प्राप्त करून द्याल? या उत्कंठारूप समुद्रांत मी बुडत आहे. त्यातून मला काढणार की नाहीं?॥ १६१॥ तेव्हा भगवान श्रीकृष्ण म्हणतात, अर्जुना! असे काय उतावीळपणाने बोलतोस? अरे! आपण होऊन सांगणार होतोच, आणखी तूंहि विचारलेस एवढेंच. ॥ १६२॥

**शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः। नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम्॥ ११॥**

अर्थ—अत्यंत शुद्ध पवित्र स्थळीं, अत्यंत उंच होणार नाही व अत्यंत भूमीशीं लागून होणार नाही, असे आपलें स्थिर आसन, खाली दर्भ आंथरून, त्यावर मृगचर्म व त्यावर वस्त्राची घडी टाकून, तयार करावे. ॥ ११॥

**तरी विशेषें आतांचि बोलिजेल। परि तें अनुभवें उपेगा जाईल। म्हणोनि तैसें एक लागेल। स्थान पाहावें॥ १६३ ॥**
**जेथ आराणुकेचेनि कोडें। बैसलिया उठों नावडे। वैराग्यासी दुणीव चढे। देखिलिया जें॥ १६४॥**
**जो संतीं वसविला ठावो। संतोषासि सावावो। मना होय उत्सावो। धैर्याचा॥ १६५॥**
**अभ्यासुचि आपणयातें करी। हृदयातें अनुभव वरी। ऐसी रम्यपणाची थोरी। अखंड जेथ॥ १६६॥**
**जया आड जातां पार्था। तपश्चर्या मनोरथा। पाखांडियाही आस्था। समूळ होय॥ १६७॥**
**स्वभावें वाटे येतां। जरी वरपडा जाहला अवचितां। तरी सकामुही परि माघौता। निघों विसरे॥ १६८॥**
**ऐसेनि न राहतयातें राहवी। भ्रमतयातें बैसवी। थापटूनि चेववी। विरक्तीतें॥ १६९॥**
**हें राज्य वर सांडिजे। मग निवांता एथेंचि असिजे। ऐसें शृंगारियांहि उपजे। देखतखेवों॥ १७०॥**
**जें येणेंमानें बरवंट। आणि तैसेंचि अति चोखट। जेथ अधिष्ठान प्रगट। डोळां दिसे॥ १७१॥**
**आणिकही एक पहावें। जें साधकीं वसतें होआवें। आणि जनाचेनि पायरवें। मैळेचिना॥ १७२॥**
**जेथ अमृताचेनि पाडें। मुळेंहीसकट गोडें। जोडती दाटें झाडें। सदा फळतीं॥ १७३॥**
**पाउला पाउला उदकें। वर्षाकाळावीण अति चोखें। निर्झरें कां विशेखें। सुलभें जेथ॥ १७४॥**
**हा आतपुही अळुमाळु। जाणिजे तरी शीतळु। पवनु अति निश्चळु। मंद झुळके॥ १७५॥**
**बहुत करूनि निःशब्द। दाट न रिगे श्वापद। शुक हन षट्पद। तेउतें नाहीं॥ १७६॥**
**पाणिलगें हंसे। दोनी चारी सारसें। कवणे एके वेळे बैसे। तरी कोकिळही हो॥ १७७॥**
**निरंतर नाहीं। तरि आलीं गेलीं कांहीं। होतु कां मयुरेंही। आम्ही ना न म्हणों॥ १७८॥**
**परी अवश्यक पांडवा। ऐसा ठावो जोडावा। तेथ निगूढ मठ होआवा। कां शिवालय॥ १७९॥**
**दोहींमाजि आवडे तें। जें मानलें होय चित्तें। बहुतकरूनि एकांतें। बैसिजे गा॥ १८०॥**
**म्हणोनि तैसें तें जाणावें। मन राहतें पाहावें। राहेल तेथ रचावें। आसन ऐसें॥ १८१॥**
**वरी चोखट मृगसेवडी। माजीं धूतवस्त्राची घडी। तळवटीं अमोडी। कुशांकुर॥ १८२॥**
**सकोमळ सरिसे। सुबद्ध राहती आपैसे। एकेंपाडें तैसे। वोजा घालीं॥ १८३॥**
**परि सावियाचि उंच होईल। तरी आंग हन डोलेल। नीच तरी पावेल। भूमिदोषु॥ १८४॥**
**म्हणोनि तैसें न करावें। समभावें धरावें। हें बहु असो होआवें। आसन ऐसें॥ १८५॥**

**अर्थ**—आता अर्जुना! येथून योगाचें सविस्तर रीतीनें विवेचन करणार आहे. पण तें सर्व, तसा अनुभव घेतला तर, उपयोगाचें होईल. म्हणून अभ्यास करण्याकरिता तसें एकांताचे स्थान पाहून घ्यावें. ॥ १६३ ॥ थोडा वेळ आनंदांत बसावें या इच्छेने, जेथें बसलें असतां, पुन: उठावें असें वाटणार नाही व जें पाहतांक्षणींच वैराग्य दुप्पट वाढेल. ॥ १६४ ॥ जेथें, संतसज्जनांची वस्तीं आहे व विषयांवांचून मनाच्या संतोषाला साह्य होईल आणि मनाला धैर्य धरण्याचा उल्हास वाटेल. ॥ १६५ ॥ अभ्यासच आपण योग्याकडून अभ्यास करवून घेईल व अनुभव आपणच अंत:करणाचा स्वीकार करील, अशी थोर रमणीयता सदासर्वदा जेथें असेल. ॥ १६६ ॥ सहज एखादा नास्तिक त्या ठिकाणाहून गेला असतां, त्यालाहि तेथें तपश्चर्या करावी, अशी मनापासून इच्छा उत्पन्न होईल. ॥ १६७ ॥ सहज वाटेने जात असतां, जर एखादा कामी पुरुष अकस्मात् तेथें प्राप्त झाला, तर त्यालाहि परत जाण्याचें भान राहणार नाही. ॥ १६८ ॥ याप्रमाणें, राहूं न इच्छिणाऱ्याला राहायला लावणारें, व्यर्थ भटकणाऱ्याला बसविणारें व वैराग्याला थापटून जागे करणारें. ॥ १६९ ॥ हें स्थान, पाहिल्याबरोबर संपूर्ण राज्यवैभव सोडून एकटेंच आनंदाने येथे राहावें, असें विलासी पुरुषालाहि वाटेल. ॥ १७० ॥ या सर्व रीतीने जें उत्तम आहे आणि अति पवित्र आहे व त्याचप्रमाणें जेथें सर्व जगाचें अधिष्ठान जें ब्रह्मस्वरूप तें प्रत्यक्ष डोळ्यांनी दिसतें. ॥ १७१ ॥ आणखी एक गोष्ट तेथें पाहिली पाहिजे. योगाभ्यासी, साधक पुरुषाचे जेथे राहणें असेल व विषयासक्त पुरुषांचे तेथें मुळींच येणें जाणें नसेल. ॥ १७२ ॥ जीं मुळासह अमृततुल्य गोड असून, जीं सदा फळणारीं आहेत अशा फळांचीं तेथें दाट झाडें आहेत. ॥ १७३ ॥

पावसाळा नसतांना देखील पावलापावलावर जेथें स्वच्छ पाणी किंवा झरें सुलभ सांपडतात. ॥ १७४ ॥ सूर्याचें ऊन देखील जेथें थोडें शीतळ वाटेल व वाऱ्याची सारखी मंद झुळक येंत राहील. ॥ १७५ ॥ बहुतकरून जेथें शब्दच ऐकूं येत नाहीत. जेथें श्वापदें फार नसतील. राघू किंवा भ्रमर हेंहि जेथें नाहींत. ॥ १७६ ॥ पाण्याच्या आश्रयाने राहणारे हंस, दोन चार सारस पक्षी, एखादे वेळीं कोकिळा बसली तरी चालेल. ॥ १७७ ॥ नेहमीं नाही तरी, एखादे वेळीं मधून मधून मोर येत जात असले तर आम्ही नको असें म्हणत नाही. ॥ १७८ ॥ पण असें एखादें निवांत स्थान मात्र असणें आवश्यक आहे. तेथें कोणाच्या दृष्टीस पडणार नाही, असा गुप्त मठ किंवा शिवमंदिर पहावें. ॥ १७९ ॥ यापैकीं जे आवडेल किंवा मनाला रुचेल तें घ्यावें. पण या सर्वांचें तात्पर्य हेंच आहे की योगाभ्यासाकरितां असें एकान्तात बसावें. ॥ १८० ॥ तशी त्या जागेची परीक्षा करून घ्यावी व मनाला तेथे उल्हास वाटतो किंवा नाही हें पहावे आणि उल्हास वाटत असला तर, मग तेथे बसण्याकरितां आसनाची अशी रचना करावी. ॥ १८१ ॥ सर्वांच्या वर हरिणाचे मृदु कातडें आंथरावे, त्याचे खालीं स्वच्छ धुतलेल्या वस्त्राची घडी घालावी व सर्वांच्या खालीं अग्रासह असलेले दर्भ आंथरावे. ॥ १८२ ॥ हे दर्भ कोवळे, सारख्या लांबी रुदीचे व सारखे एकमेकांस घट्ट धरून राहतील अशा रीतीने नीट सपाट जमिनीवर आंथरावे. ॥ १८३ ॥ अशा रीतीने रचलेलें आसन जर का उंच झालें तर, शरीर हालेल आणि खालीं जमिनीशीं फार लागून झालें तर, भूमीचे ओलावा इत्यादि दोष लागतील. ॥ १८४ ॥ म्हणून तसें करूं नये. सारखें ठेवावें. फार सांगत नाही. असें आसन असावें. ॥ १८५ ॥

**तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेन्द्रियक्रियः। उपविश्यासने युञ्ज्याद्योगमात्मविशुद्धये॥ १२ ॥**

**अर्थ**—नंतर त्या आसनावर बसून आत्मानुभव घेण्याकरितां, मन इंद्रियें यांच्या व्यापाराचा निरोध करून व मन एकाग्र करून योगाभ्यास करावा. ॥ १२ ॥

**मग तेथ आपण। एकाग्र अंतःकरण। करूनि सद्‌गुरूस्मरण। अनुभविजे॥ १८६ ॥**
**तैसें स्मरतेनि आदरें। सबाह्य सात्त्विकें भरे। जंव कठिणपण विरे। अहंभावाचें॥ १८७ ॥**

**अर्थ**—मग मन अत्यंत एकाग्र करावें व सदगुरूंचे अत्यंत प्रेमाने स्मरण करून अनुभव घ्यावा. ॥ १८६ ॥ ज्या सद्‌गुरूच्या अत्यंत प्रेमपूर्वक केलेल्या स्मरणाने मन सात्विक अष्टभावाने भरून आलें असतां, देहाचे आंत व बाहेर सर्व सत्वगुणाची वृद्धि होऊन अहंभावाचें काठिण्य नाहीसें होतें. ॥ १८७ ॥

**गूढार्थदीपिका-अहंभावाचें काठिण्य**—काठिण्य म्हणजे वेगळेपणा. मातीचा घट भाजला जात नाही तोपर्यंत तो मातीच असतो व मातींत मिळूं शकतो. पण एकदां भाजला गेला म्हणजे कठीण होऊन मातीहून वेगळा पडतो व मातींत मिळूं शकत नाही. "अर्जुनपण न घेतां। मी ऐसे जे पंडुसुता। उठतसे ते तत्वतां। तयाचें रूप" (ज्ञा० अ० १८-१३१५) "**तस्मात्सर्व शरीरेष्वहमहमित्येव भासते स्पष्टः। यः प्रत्ययः विशुद्धः तस्य ब्रह्मैव भवति मुख्योऽर्थः**" (स्वात्मनिरूपण श्लो० ८८). वास्तविक पाहतां आपलें ठिकाणीं 'मी' म्हणून जे वृत्तीचें स्फुरण होतें, ते त्यारूपाने परमेश्वराहून स्फुरते; पण तें स्फुरण म्हणजे मी असे जीव समजतो व परमेश्वराहून वेगळा पडतो हा वेगळेपणाचा अहंभाव जोपर्यंत असतो, तोपर्यंत जीव, परमेश्वराशीं ऐक्य पावूं शकत नाही. म्हणून 'मी' म्हणजे जीव, परमेश्वराहून निराळा आहे, अशी अहंभावरूप वेगळेपणाची जाणीव, हेंच काठिण्य होय.

**विषयांचा विसरु पडे। इंद्रियांची कसमस मोडे। मनाची घडी घडे। हृदयामाजीं॥ १८८ ॥**

**अर्थ**—अहंभाव गळला की विषयांचा सर्वस्वीं विसर पडतो. इंद्रियांची विषयसुखाविषयींची व्याकुळता नाहीशी होते व संपूर्ण मनाची हृदयाचे ठिकाणीं घडी होऊन राहते. ॥ १८८ ॥

**गूढार्थदीपिका**—इंद्रियांची बाह्य विषयांकडील धांव व मनाचे विषयाविषयीं होणारे संकल्पविकल्प, हे व्यापार बंद पडतात व अशा रीतीने मन व इंद्रियें हीं अंतःकरणरूप म्हणजे केवळ वृत्तिरूप होऊन राहतात.

**ऐसें ऐक्य हें सहजें। फावे तंव राहिजे। मग तेणेंचि बोधें बैसिजे। आसनावरी॥ १८९ ॥**
**आतां आंगातें आंग वरी। पवनातें पवनुचि धरी। ऐसी अनुभवाची उजरी। होंचि लागे॥ १९० ॥**

**प्रवृत्ति माघौति मोहरे। समाधि ऐलाडी उतरे। आघवें अभ्यासूं सरे। बैसत। खेवों॥ १९१॥**

**अर्थ**—असें हें मन, इंद्रियें व अंत:करण यांचें मूळचें ऐक्य होई पर्यंत प्रेमाने सद्‌गुरूंचे स्मरण करीत राहावें व या ऐक्यबोधाला घेऊनच आसनावर बसावें.॥ १८९॥ मग शरीराला सावरणारा दुसरा कोणी नसून, शरीरच शरीराला सांभाळतें व प्राणवायूला देखील धरून ठेवणारा दुसरा कोणी नसून, प्राणच प्राणाला धरून ठेवतो. असा पुढें पुढें उत्तरोत्तर वाढता अनुभव येऊं लागतो.॥ १९०॥ सर्व प्रवृत्ति बंद पडते व समाधिदशा अलिकडेच सांपडते किंवा हातीं लागते. अशा रीतीने आसनावर बसल्याबरोबरच सर्व समाधीपर्यंतचा अभ्यास संपून जातो.॥ १९१॥

**गूढार्थदीपिका**—शिष्याच्या मनांत श्रीगुरुविषयीं जें नितांत प्रेम असतें व त्या प्रेमामुळें श्रीगुरूंची शिष्यावर जी पूर्ण कृपा होते, त्या प्रेमानेच व त्या कृपनेच हें फळ प्राप्त होतें.

**मुद्रेची प्रौढी ऐशी। तेचि सांगिजेल आतां परियेसीं। तरि ऊरु या जघनासी। जडोनि घालीं॥ १९२॥**
**चरणतळें देव्हडीं। आधारद्रुमाचां बुडीं। सुघटितें गाढीं। संचरीं पां॥ १९३॥**
**सव्य तें तळीं ठेविजे। तेणें सिवणीमध्यु पीडिजे। वरी बैसे तो सहजें। वामचरणु॥ १९४॥**
**गुदमेढ्राआंतौतीं। चारी अंगुळें निगुतीं। तेथ सार्ध सार्ध प्रांतीं। सांडूनियां॥ १९५॥**
**माजि अंगुळ एक निगे। तेथ टांचेचेनि उत्तरभागें। नेहेटिजे वरि आंगें। पेललेनी॥ १९६॥**
**उचलिलें कां नेणिजे। तैसें पृष्ठांत उचलिजे। गुल्फद्वय धरिजे। तेणेंचि मानें॥ १९७॥**
**मग शरीरसंचु पार्था। अशेषही सर्वथा। पार्ष्णीचा माथा। स्वयंभु होय॥ १९८॥**
**अर्जुना हें जाण। मूळबंधाचें लक्षण। वज्रासन गौण। नाम यासी॥ १९९॥**
**ऐसी आधारीं मुद्रा पडे। आणि आधींचा मार्गु मोडे। तेथ अपानु आंतुलेकडे। वोहोटों लागे॥ २००॥**

**अर्थ**—अर्जुना! ज्या मुद्रेच्या थोरवीने हा अभ्यास साधतो ती मुद्रा मी आतां तुला सांगतों, ऐक. आपल्या मांड्या पोटरीशी घट्ट धराव्या.॥ १९२॥ मग एका पायाच्या तळव्यावर दुसरा पायाचा तळवा वांकडा ठेवून, आधारचक्ररूपी वृक्षाच्या बुडाशीं म्हणजे गुदस्थानाचे ठिकाणीं ते चांगले स्थिर व घट्ट लावावे.॥ १९३॥ त्यांत उजव्या पायाची टांच खाली ठेवून, त्या टांचेने शिवण मधोमध पक्की दाबावी म्हणजें सहज उजव्या पायाच्या तळव्यावर डाव्या पायाचा तळवा राहतो.॥ १९४॥ गुद आणि शिश्न यांच्यामध्यें जी चार बोटें जागा असते, त्यापैकीं इकडील व तिकडील दीड दीड बोटें जागा सोडून द्यावी.॥ १९५॥ राहिलेली मधलीं एका बोटाची ची जागा, ती उजव्या पायाच्या टांचेच्या मागल्या भागाने, शरीराचा तोल सांभाळून वर रेटावी.॥ १९६॥ शरीर वर उचललें गेलें हें समजणार सुद्धां नाही, अशा रीतीने हळूच पाठीचा खालचा भाग किंचित् वर उचलावा व तशाच रीतीने पायाचे दोन्ही घोटेहि वर धरावे.॥ १९७॥ अर्जुना! मग या संपूर्ण शरीराचा सांगाडा घोट्यांवर स्वयंभू राहतो. (त्या घोट्यांवरच संपूर्ण शरीराचा सांगाडा धरला जाईल, असा अर्थ).॥ १९८॥ अर्जुना! ज्याला मूळबंध म्हणतात, त्याचें हें लक्षण आहे. वज्रासन हेंहि त्याला दुसरें (गौण) नांव आहे.॥ १९९॥ याप्रमाणें गुदाचे ठिकाणीं असलेल्या मूलाधार चक्राचे ठिकाणीं, अशी मूळबंधाची ठेवण बरोबर बसली की, अपान वायूचा खालीं वाहण्याचा मार्ग बंद होतो व तो आंतल्या भागाने संकोचू लागतो म्हणजे वर जातो.॥ २००॥

**गूढार्थदीपिका—आधारचक्र**—हे चक्र गुदस्थानाचे ठिकाणीं असून चार दलाचें असते. हें अग्निप्रमाणें तेजस्वी आहे व याच्या 'वं शं षं सं' ह्या मातृका आहेत, याची देवता गणेश आहे.

**समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिर:। सम्प्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन्॥ १३॥**

**अर्थ**—अत्यंत निश्चल होऊन शरीर, मान व डोकें सरळ एका रेषेंत धरून इकडे तिकडे न पाहता, सरळ आपल्या नाकाच्या शेंड्याकडे दृष्टि देऊन.॥ १३॥

**तंव करसंपुट आपैसें। वामचरणीं बैसे। बाहुमूळीं दिसे। थोरीव आली॥ २०१॥**
**माजि उभारलेनि दंडें। शिरकमळ होय गाढें। नेत्रद्वारींचीं कवाडें। लागूं पाहती॥ २०२॥**

**वरचिलें पातीं ढळती। तळींचीं तळीं पुंजाळती। तेथ अर्धोन्मीलित स्थिती। उपजे तया॥ २०३॥**
**दिठी राहोनी आंतुलीकडे। बाहेर पाऊल घाली कोडें। ते ठायीं ठावो पडे। नासाग्रपीठीं॥ २०४॥**
**ऐसें आंतुचां आंतुचि रचे। बाहेरी मागुतें न वचे। म्हणोनि राहणें आधिये दिठीचें। तेथेंचि होय॥ २०५॥**
**आतां दिशांची भेटी घ्यावी। कां रूपाची वाट पहावी। हे चाड सरे आघवी। आपैसया॥ २०६॥**
**मग कंठनाळ आटे। हनुवटी हे हडौती दाटे। ते गाढी होऊनि नेहटे। वक्षःस्थळीं॥ २०७॥**
**माजि घंटिका लोपे। वरी बंधु जो आरोपे। तो जालंधरु म्हणिपे। पंडुकुमरा॥ २०८॥**
**नाभी वरी पोखे। उदर हें थोके। अंतरीं फांके। हृदयकोशु॥ २०९॥**
**स्वाधिष्ठानावरिचिले कांठीं। नाभिस्थानातळवटीं। बंधु पडे किरीटी। वोढियाणा तो॥ २१०॥**

**अर्थ**—तेव्हा दोन्ही हात आपोआप जोडले जाऊन, त्यांची ती संपुटी डाव्या पायावर टेकली जाते व हाताचे खांदे उचलले जातात. ॥ २०१ ॥ हाताचे खांदे उचलले गेल्याने, डोकें त्यांत गढलें जातें व डोळ्यांच्या पापण्या लागूं पाहतात. ॥ २०२ ॥ वरच्या पापण्या हालत नाहीत म्हणजें वर जात नाहीत व खालच्या पापण्या खालींच राहतात. त्यामुळें डोळे अर्धवट उघडे राहतात, अशी अर्धोन्मीलित स्थिति त्याला प्राप्त होते. ॥ २०३ ॥ अशा स्थितींत दृष्टि आंतच राहते व आंत राहूनच कौतुकाने ती दृष्टि बाहेर निघाली तर ती नाकाच्या शेंड्यावर पडते. ॥ २०४ ॥ अशी दृष्टि आंतल्या आंतच राहते व बाहेर जात नाही; म्हणून त्या अर्धोन्मीलित दृष्टीचें नासाग्रीच राहणें होते. ॥ २०५ ॥ मग दिशांकडे पाहावें किंवा कोण्या रूपाकडे दृष्टि द्यावी ही इच्छा आपोआप नाहिशी होते. ॥ २०६ ॥ मग कंठनाळ म्हणजे मानेचा भाग आंखडला जातो व हनुवटी ही मानेच्या खालच्या भागाला असलेल्या खळगींत गढली जाऊन, छातीला घट्ट चिकटून बसते. ॥ २०७ ॥ त्यांत नरडीचें हाड दिसेनासें होतें, असा हा जो वरील बंध सिद्ध होतो, त्याला अर्जुना! जालंधर बंध म्हणतात. ॥ २०८ ॥ बेंवी वर फुगते, पोट सपाट होतें आणि हृदयकमल आंत विकसित होतें. ॥ २०९ ॥ शिश्नाचे वर बेंबीच्या खालीं जो बंध पडतो, त्याला वोढियाणा बंध म्हणतात. ॥ २१० ॥

**गूढार्थदीपिका—स्वाधिष्ठान**—हे दुसरें चक्र असून, तें लिंगस्थानाचे ठिकाणी आहे. हें सूर्याप्रमाणें तेजस्वी असून तें षट् दलात्मक आहे. याच्या बं, भं, मं, यं, रं, लं, ह्या मातृका असून याची देवता भगवान ब्रह्मा आहे.

**प्रशान्तात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थितः। मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः॥ १४॥**

**अर्थ**—योग्याने मनाची विषयांकडील ओढ निःशेष नाहीशी करून व निःशेष भीति सोडून, नैष्ठिक ब्रह्मचारी होत्साता, मनाला आवरून, माझे ठिकाणीं चित्त स्थिर करून मत्परायण होऊन राहावे. ॥ १४ ॥

**ऐसी शरीराबाहेरलीकडे। अभ्यासाची पांखर पडे। तंव आंतु त्राय मोडे। मनोधर्माची॥ २११॥**
**कल्पना निमे। प्रवृत्ती शमे। आंग मन विरमे। सावियाचि॥ २१२॥**
**क्षुधा काय जाहाली। निद्रा केउती गेली। हे आठवणही हारपली। न दिसे वेगां॥ २१३॥**
**जो मूळबंधें कोंडला। अपानु माघौता मुरडला। तो सवेंचि वरी सांकडला। धरी फुगुं॥ २१४॥**
**क्षोभलेपणें माजे। उवाइला ठायीं गाजे। मणिपूरेंसीं झुंजे। राहोनियां॥ २१५॥**

**अर्थ**—याप्रमाणे शरीराच्या बाहेरच्या भागांत अभ्यासाचा कृपाप्रसाद घडून घेतो. व त्याबरोबर आंत सर्व मनोधर्माचें अस्तित्व नाहीसें होतें. ॥ २११ ॥ बाहेरच्या पदार्थाची आहे—नाही असे जें मन कल्पना करीत राहतें, ती कल्पना नाहीशी होते. प्रवृत्ति म्हणजे कर्म करण्याची इच्छा बंद पडते व त्याबरोबर सहजच मन व शरीर यांचा विसर पडतो. ॥ २१२ ॥ भूक कोठें गेली, निद्रा काय झाली, यांचें स्मरणहि राहत नाही व त्यांचे वेगहि दिसत नाहीत. ॥ २१३ ॥ जो अपानवायु मूळबंधामुळें कोंडला जाऊन मागे फिरला होता तो वर कैचींत सांपडला जाऊन लगेंच फुगूं लागतो. ॥ २१४ ॥ तो क्षुब्ध झालेला अपानवायु माजून तेथल्या तेथेंच गुरगुरूं लागतो व राहून राहून मणिपूरचक्राशीं झुंज घेतो. ॥ २१५ ॥

**गूढार्थदीपिका—मणिपूरचक्र**—हें तिसरें चक्र असून तें दशदलात्मक आहे. तें रक्तवर्ण असून 'डं ढं णं तं थं दं धं नं पं फं' ह्या त्याच्या मातृका आहेत. हें नाभिदेशांत असून याची देवता भगवान विष्णु आहे.

**मग थावली ते वाहटुळी। सैंघ घेऊनि घर डहुळी। बाळपणींची कुहीटुळी। बाहेर घाली॥ २१६॥**
**भीतरीं वळी न धरे। कोठ्यामाजी संचरे। कफपित्तांचे थारे। उरों नेदी॥ २१७॥**
**धातूंचे समुद्र उलंडी। मेदाचे पर्वत फोडी। आंतली मज्जा काढी। अस्थिगत॥ २१८॥**
**नाडीतें सोडवी। गात्रांतें विघडवी। साधकातें भेडसावी। परि बिहावें ना॥ २१९॥**
**व्याधीतें दावी। सवेंचि हरवी। आप पृथ्वी कालवी। एकवाट॥ २२०॥**
**तंव येरीकडे धनुर्धरा। आसनाचा उबारा। शक्ति करी उजगरा। कुंडलिनीये॥ २२१॥**

**अर्थ**—ही अपानवायूची उठलेली वाहटूळ थोडी शांत होऊन सर्व शरीर ढवळून टाकते व बाळपणांतील सांचलेली सर्व घाण बाहेर फेकते. ॥ २१६ ॥ तो अपानवायु आंत एक ठिकाण धरून मर्यादित जागेंत राहात नाही. मग तो कोठ्यांत शिरतो व कफ व पित्त यांचे नावहि ठेवीत नाही. ॥ २१७ ॥ रसरक्तादि सात धातूंचे समुद्र पालथे करून ठेवतो. मेदाचे पर्वत फोडून टाकतो. हाडांतील मज्जा देखील नाहीशी करतो. ॥ २१८ ॥ नाड्या सोडवितो, सर्व शरीराचे अवयवसंधी सैल करतो, अभ्यास करणाऱ्या साधकाला भिववितो, पण भिऊन जाऊं नये. ॥ २१९ ॥ व्याधी उत्पन्न करतो, लगेच नाहीशा करतो. शरीरांतील कफपित्त हे आपाचे अंश व मांसादि पृथ्वीचे अंश हे एकत्र कालवितो. ॥ २२० ॥ अर्जुना! अपानवायूचें असें कार्य चाललें असतांनाच इकडे काय होतें पहा! आसनाची उष्णता कुंडलिनी शक्तीला जागी करते. ॥ २२१ ॥

**गूढार्थदीपिका**—वस्तूची शक्ति वस्तूशीं समव्याप्त असते; पण ज्याप्रमाणे जलाशयातील पाणी वाहूं लागलें असतां मर्यादित होतें, त्याप्रमाणे वस्तूची शक्तिहि, कार्यरूप होतांना मर्यादित होते. तशीच जीवाची शक्ति जेव्हां कार्यरूप होते, तेव्हा ती मर्यादित होते व वाहणारें पाणी मर्यादित होण्याचे कारण जसा जमिनीचा बांध असतो, त्याप्रमाणे जीवाची शक्ति कार्यरूप होतांना जी मर्यादित होते, त्याचें कारण ती सूक्ष्म नाड्यांतून वाहाते हें होय. ह्या नाड्या मांसमय नसल्यामुळें, मनाप्रमाणे शस्त्राने तुटत नाहीत, अग्नीने जळत नाहीत व प्रेत जळल्यावरहि त्या जळत नाहीत, या नाड्यांच्याच योगाने जीव, सर्व लोकांत गमनागमन करीत असतो. या नाड्यांची जी साडे तीन वेड्यांची गुंडाळी आहे, तिला कुंडलिनी म्हणतात. ही कुंडलिनी केवळ योगाभ्यासानेच दृश्य होणारी आहे.

**नागिणीचें पिलें। कुंकुमें नाहलें। वळण घेऊनि आलें। सेजे जैसें॥ २२२॥**
**तैशी ते कुंडलिनी। मोटकी औट वळणी। अधोमुख सर्पिणी। निदेली असे॥ २२३॥**

**अर्थ**—जसे केशराने न्हालेलें नागीणसर्पाचें पिलूं वेटाळी घालून निजलेलें असावे. ॥ २२२ ॥ तसे ती साडेतीन वेढ्यांनी युक्त लहानशी सर्पासारखी कुंडलिनी वेंटाळी घालून अधोमुख अशी निजलेली आहे. ॥ २२३ ॥

**गूढार्थदीपिका**—या भगवच्छक्ति कुंडलिनीचे जे साडे तीन वेढे आहेत, ते ॐकाराच्या अ, उ, म, व अर्धमात्रा अशा साडे तीन मात्रांची मूळ स्थिति होय. ॐकार त्यावेळीं कुंडलिनी शक्तीशीं एकरूप असतो. वर सांगितल्याप्रमाणें शक्तीं ही परमेश्वराप्रमाणे शुद्ध चैतन्यस्वरूपच आहे, पण 'मी' या वृत्तीरूपाने स्फुरण पावून, अज्ञानभ्रमाने ती आपले चैतन्यस्वरूप विसरली, म्हणून "तैसी अज्ञानांगीकारे। निघाली वृत्ति विखुरे। ते सत्वरजद्वारें। तमहि होय" (ज्ञा० अ० १४-१४४) त्रिगुणात्मक होते. सत्वगुणाने ती शक्ति प्रकाशरूप असते, रजोगुणाने क्रियारूप होते व तमोगुणांमुळें जडपदार्थरूप होते. अशा या शक्तिपासून शब्दद्वारा स्थूल, सूक्ष्म व कारणरूप सृष्टि उत्पन्न होते.

कुंडलिनी निजली असते म्हणजे आपलें चैतन्यस्वरूपाशीं असलेलें ऐक्य विसरलेली असते. अधोमुख असते म्हणजे सृष्टीचें कारण जो परमात्मा, त्याला विसरून नामरूपात्मक कार्यरूपसृष्टीच्या अभिमुख असते. कार्याच्या पूर्वी कारण असतें, म्हणून कारणाला कार्याचे 'ऊर्ध्व' म्हणतात. कार्य कारणाच्या नंतर होते, म्हणून कार्याला कारणाच्या दृष्टीने 'अध' म्हणतात.

"ऊर्ध्वमूल" या वचनाने भगवंतांनीच, कारणाला 'ऊर्ध्व' म्हटले आहे. 'मी' या वृत्तीरूपाने भासणारा जीव, आपलें परमेश्वराशीं असलेलें ऐक्य विसरून, जोपर्यंत आपलें निराळें अस्तित्व मानतो, तोपर्यंत तो सृष्टिरूप कार्याशीं अहंकाराचे द्वारा ऐक्य करून राहतो, म्हणजे सृष्टींतील देहादिक जड पदार्थाशीं ऐक्य करतो. सृष्टींतील कर्माचा अहंकार धरतो व सृष्टींतील पदार्थ जाणतो. योगासनाने प्राणशक्तीचा रोध झाला असतां, बाह्य जड देहादिकांवरील अहंकार नाहीसा होतो व त्यांचा विसर पडल्यामुळें ते पदार्थ लय पावतात.

सारांश, शक्ति अधोमुख असते तेव्हा जगत् प्रसवते ऊर्ध्वमुख झाली असतां, जगाचा नाश करते व ब्रह्मरूप होते. शक्ति जागी झाली म्हणजे ती तेजोमय होते.

**विद्युल्लतेची विडी। वन्हिज्वाळांची घडी। पंधरेयाची चोखडी। घोंटीव जैशी॥ २२४॥**
**तैशी सुबद्ध आटली। पुटीं होती दाटली। ते वज्रासनें चिमुटली। सावध होय॥ २२५॥**
**तेथ नक्षत्र जैसें उलंडलें। कीं सूर्याचें आसन मोडलें। तेजाचें बीज विरूढलें। अंकुरेंशीं॥ २२६॥**
**तैशी वेढियातें सोडिती। कवतिकें आंग मोडिती। कंदावरी शक्ती। उठली दिसे॥ २२७॥**
**सहजें बहुतां दिवसांची भूक। वरि चेववीली तें होय मिष। मग आवेशें पसरी मुख। उर्ध्वा उजू॥ २२८॥**
**तेथ हृदयकोशातळवटीं। जो पवनु भरे किरीटी। तया सगळेयाचि मिठी। देऊनि घाली॥ २२९॥**
**मुखींच्या ज्वाळीं। तळीं वरी कवळी। मांसाची वडवाळी। आरोगूं लागे॥ २३०॥**
**जे जे ठाय समांस। तेथ आहाच जोडे घाउस। पाठी एकदोनी घांस। हियाही भरी॥ २३१॥**
**मग तळवे तळहात शोधी। उर्ध्वींचे खंड भेदी। झाडा घे संधी। प्रत्यंगाचा॥ २३२॥**
**अधोभाग तरी न सांडी। परि नखींचेंही सत्त्व काढी। त्वचा धुवूनि जडी। पांजरेंशी॥ २३३॥**
**अस्थींचे नळे निरपे। शिरांचे हीर वोरपे। तंव बाहेरी विरूढी करपे। रोमबीजांची॥ २३४॥**
**मग सप्तधातूंच्या सागरीं। ताहानेली घोट भरी। आणि सवेंचि उन्हाळा करी। खडखडीत॥ २३५॥**
**नासापुटौनि वारा। जो जातसे अंगुळें बारा। तो गचिये धरूनि माघारा। आंतु घाली॥ २३६॥**
**तेथ अध वरौतें आकुंचे। ऊर्ध्व तळौतें खाचे। तया खेवामाजि चक्रांचे। पदर उरती॥ २३७॥**
**एऱ्हवीं तरी दोन्ही तेव्हांचि मिळती। परी कुंडलिनी नावेक दुश्चित्त होती। ते तयातें म्हणे परौती। तुम्हीचि काय एथें॥ २३८॥**
**आइकें पार्थिव धातु आघवी। आरोगितां कांहीं नुरवी। आणि आपातें तंव ठेवी। पुसोनियां॥ २३९॥**
**ऐसी दोनी भूतें खाये। ते वेळीं संपूर्ण धाये। मग सौम्य होऊनि राहे। सुषुम्नेपाशीं॥ २४०॥**
**तेथ तृप्तीचेनि संतोषें। गरळ जें वमी मुखें। तेणें तियेचेनि पीयूषें। प्राणु जिये॥ २४१॥**
**तो अग्नि आंतूनि निघे। परि सबाह्य निववूंचि लागे। ते वेळीं कसु बांधिती आंगें। सांडिला पुढती॥ २४२॥**
**मार्ग मोडिती नाडीचे। नवविधपण वायुचें। जाय म्हणऊनि शरीराचे। धर्मु नाहीं॥ २४३॥**
**इडा पिंगळा एकवटती। गांठी तिन्ही सुटती। साही पदर फुटती। चक्रांचे हे॥ २४४॥**

**अर्थ**—विजेची जशी कडी असावी किंवा अग्नीच्या ज्वालांची जशी घडी असावी अथवा उत्तम सोन्याच्या लगडीचे घांसून चकचकीत केलेले वेढें असावे. ॥ २२४ ॥ त्याप्रमाणें जी कुंडलिनी नीट घट्ट, संकोचून साडेतीन पुटांत दाटून बसली होती. ती वज्रासनाचा चिमटा बसल्याबरोबर जागी झाली. ॥ २२५ ॥ तेव्हा तारा जसा तुटून पडावा किंवा सूर्याचें आसन सुटावे अथवा एखाद्या तेजाला अंकुर फुटावा. ॥ २२६ ॥ तशी ती कुंडलिनी आपल्या वेढ्याला सोडते व सहज आंगाला आळेपिळे देते व नाभिकंदावर उभी झालेली अनुभवाला येते. ॥ २२७ ॥ बरेच दिवसांची निजली असल्यामुळें सहजच भुकेने ती व्याकुळ असते व आणखी तिला जागे करण्याचेहि निमित्त होते. त्यामुळे ती मोठ्या आवेशाने खाण्याकरितां आपले मुख सरळ वर पसरते. ॥ २२८ ॥ मग हृदयकमळाचे खालीं जो अपानवायु भरलेला असतो त्या संपूर्ण वायुला ती मिठी मारते-म्हणजे गिळून टाकते. ॥ २२९ ॥ आपल्या मुखांतील ज्वालांनी, खाली वर व्यापते व मांसाचे घांस खाऊं लागते. ॥ २३० ॥ जे जे भाग मांससहित आहेत त्यांचे ती घांस घेते व नंतर हृदयाचेहि

एकदोन घांस घेते. ॥ २३१ ॥ मग पायाचें तळवे व तळहात येथील मांसाचे शोधन करून, वरचे भाग जे आहेत त्यांचाहि भेद करते व प्रत्येक अवयवसंधीचाहि झाडा घेते. ॥ २३२ ॥ खालचा भागहि सोडत नाही. नखाचे देखील सत्व ठेवित नाही. त्वचा धुवून पुसून हाडाच्या सांपळ्याला नेऊन चिकटविते. ॥ २३३ ॥ हाडांच्या नळ्या निरपून काढते. शिराशिरा कोरून घेते, तेव्हा बाहेर रोमरंध्रातून वाढणाऱ्या केसांचे बीज जळून जाते. ॥ २३४ ॥ इतके खाऊन तहान लागली असतां, मग ती कुंडलिनी, सप्तधातूरूपी सागरांत आपली पूर्ण तहान भागविते आणि लागलीच जिकडे तिकडे अगदीं खडखडीत उन्हाळा करते (ओलेपणाचें नांव ठेवित नाही). ॥ २३५ ॥ नाकपुड्यांतून बाहेर जो बारा अंगुळें प्राणवायु वाहतो, त्याची मानगुटी धरून त्याला माघारा आंत घालते. ॥ २३६ ॥ तेव्हा अपानवायु वर संकोचित होतो व ऊर्ध्व जाणारा प्राणवायु खाली जातो—म्हणजे अपान व प्राण या दोघांचें ऐक्य होते-त्या ऐक्यामध्ये चक्रांचे दळ तेवढे उरतात. ॥ २३७ ॥ वास्तविक पाहतां दोन्ही वायूंचे ऐक्य पहिलेच होते; पण कुंडलिनी तेव्हा क्षणभर व्यग्र होती, ती त्यांना म्हणते. आतां या पलिकडे येथे तुम्ही तरी काय राहणार? ॥ २३८ ॥ अर्जुना! ऐक पंचधातूपैकीं पृथ्वी संपूर्ण खाऊन टाकून काही शिल्लक ठेवित नाही आणि आपधातु देखील साफ पुसून ठेविली जाते. ॥ २३९ ॥ याप्रमाणे पृथ्वी व आप या दोन भूतांना खाल्ल्यावर ती कुंडलिनी पूर्ण तृप्त होते व सौम्य होऊन सूषुम्नानाडीचे मुळाशीं राहते. ॥ २४० ॥ मग तेथे ती, तृप्तीच्या संतोषामुळे जे गरळ ओकते, त्या गरळरूपी अमृताने प्राणाचें रक्षण होते. ॥ २४१ ॥ ते गरळ अग्निच होय, त्यांतून तो अग्निच बाहेर निघतो, पण तो आंत बाहेर गारवाच देतो. त्यावेळी सर्व अवयवांचे गेलेले सामर्थ्य पुनः प्राप्त होते. ॥ २४२ ॥ सुषुम्नानाडी सोडून, बाकीच्या सर्व नाड्यांचे मार्ग बंद होतात, वायूचा नवविधपणाहि नाहिसा होतो. म्हणून त्या योग्याच्या शरीराचे ठिकाणीं पूर्वीच्या शरीराचे धर्म राहत नाहीत. ॥ २४३ ॥ इडा पिंगळा एक होतात. तिन्ही नाड्यांच्या ग्रंथी सुटतात म्हणजे इडा पिंगळा ह्या नाड्यांचें वाहणे बंद पडून एक सुषुम्ना नाडीच राहते-व षट्चक्रांचा भेद होतो. ॥ २४४ ॥

**गूढार्थदीपिका**—योगशास्त्रांत जी आधारादि षट्चक्रें सांगितलीं आहेत ती षट्चक्रेंदेखील शक्तिवाहन नाड्यांचीच बनलेली आहेत. तीहि मांसमय नाहीत. म्हणून केवळ योगाभ्यासानेच त्यांचा अनुभव येतो.

आंतड्यांच्या गोळ्यांचे ठिकाणीं चक्रांची कल्पना केली आहे, असे जे विवेकसिंधुग्रंथांत सांगितलें आहे, ते अज्ञान्याकरितां स्थूलदृष्टीने म्हटलें आहे असे समजावे. म्हणजे सूक्ष्म अशा आंतड्यांच्या मांसांच्या गोळ्यांचे ठिकाणीं, चक्रांची कल्पना स्थूलारुधंतीन्यायाने करण्यास सांगितलें आहे.

**मग शशी आणि भानु। ऐसा कल्पिजे जो अनुमानु। तो वातीवरी पवनु। गिंवसितां न दिसे॥ २४५ ॥**
**बुद्धीची पुळिका विरे। परिमळु घ्राणीं उरे। तोही शक्तीसवें संचरे। मध्यमेमाजी॥ २४६ ॥**
**तंव वरिलेकडोनि ढाळें। चंद्रामृताचें तळें। कानवडोनि मिळे। शक्तिमुखीं॥ २४७ ॥**
**तेणें नाळकें रस भरे। तो सर्वांगामाजीं संचरे। जेथिंचा तेथ मुरे। प्राणपवनु॥ २४८ ॥**
**तातलिये मुसें। मेण निघोनि जाय जैसें। मग कोंदली राहे रसें। वोतलेनि॥ २४९ ॥**
**तैसें पिंडाचेनि आकारें। ते कळाचि कां अवतरे। वरि त्वचेचेनि पदरें। पांघुरली असे॥ २५० ॥**
**जैशी आभाळाची बुंथी। करूनि राहे गभस्ती। मग फिटलिया दीप्ति। धरूनि ये॥ २५१ ॥**
**तैसा आहाचवरि कोरडा। त्वचेचा असे पातोडा। तो झडोनि जाय कोंडा। जैसा होय॥ २५२ ॥**
**मग काश्मीरीचे स्वयंभ। कां रत्नबीजा निघाले कोंभ। अवयवकांतीची भांब। तैसी दिसे॥ २५३ ॥**
**नातरी संध्यारागींचे रंग। काढूनि वळिलें तें आंग। कीं अंतर्ज्योतीचें लिंग। निर्वाळिलें॥ २५४ ॥**
**कुंकुमाचें भरींव। सिद्धरसाचें वोतींव। मज पाहतां सावेव। शांतीचि ते॥ २५५ ॥**
**तें आनंदचित्रींचे लेप। नातरी महासुखाचें रूप। कीं संतोषतरूचें रोप। थांबलें जैसें॥ २५६ ॥**
**तो कनकचंपकाचा कळा। कीं अमृताचा पुतळा। नाना सासिन्नला मळा। कोंवळिकेचा॥ २५७ ॥**
**हो कां जे शारदियेचेनि वोलें। चंद्रबिंब पाल्हेलें। कां तेजचि मूर्त बैसलें। आसनावरी॥ २५८ ॥**

**तैसें शरीर होये। जे वेळीं कुंडलिनी चंद्र पिये। मग देहाकृति बिहे। कृतांतु गा॥ २५९॥**
**वृद्धाप्य तरी बहुडे। तारुण्याची गांठी विघडे। लोपली उघडे। बाळदशा॥ २६०॥**
**वयसा तरी येतुलेवरी। एऱ्हवीं बळाचा बळार्थु करी। धैर्याची थोरी। निरुपमु॥ २६१॥**
**कनकद्रुमाच्या पालवीं। रत्नकळिका नित्य नवी। नखें तैसी बरवीं। नवीं निघति॥ २६२॥**
**दांतही आन होती। परि अपाडें सानेजती। जैसी दुबाहीं बैसे पांती। हिरेयांची॥ २६३॥**
**माणिकुलियांचिया कणिया। सावियाचि अणुमानिया। तैसिया सर्वांगीं उधवती अणियां। रोमांचिया॥ २६४॥**
**करचरणतळें। जैसीं कां रातोत्पलें। पाखाळींव होती डोळे। काय सांगों॥ २६५॥**
**निडाराचेनि कोंदाटें। मोतियें नावरती संपुटें। मग शिवणी जैशी उतटे। शुक्तिपल्लवांची॥ २६६॥**
**तैशी पातियांचिये कवळिये न समाये। दिठी जाकळोनि निघों पाहे। आधिलीचि परी होये। गगना कवळिती॥ २६७॥**
**आइकें देह होय सोनियाचे। परि लाघव ये वायूचें। जे आपा आणि पृथ्वीचे। अंशु नाहीं॥ २६८॥**
**मग समुद्रापैलाडी देखे। स्वर्गींचा आलोचु आइके। मनोगत वोळखे। मुंगियेचें॥ २६९॥**
**पवनाचा वारिका वळघे। चाले तरी उदकीं पाउल न लागे। येणें येणें प्रसंगें। येती बहुता सिद्धि॥ २७०॥**
**आइकें प्राणाचा हातु धरूनी। गगनाची पाउटी करूनी। मध्यमेचेनि दादराहुनी। हृदया आली॥ २७१॥**
**तें कुंडलिनी जगदंबा। जे चैतन्यचक्रवर्तीची शोभा। जिया विश्वबीजाचिया कोंभा। साउली केली॥ २७२॥**

**अर्थ**—मग चंद्र व सूर्य हे जे डाव्या व उजव्या नाकपुडींतून वाहणारे वायू असे मानले जातात, त्यांचा नाकापुढे वात उजळुन शोध केला तरी कोठे पत्ता लागत नाही. ॥ २४५ ॥ बुद्धीची जाणीव बंद पडते व घ्राणेंद्रियाचा विषय जो परिमळ तो घ्राणेंद्रियरूप होऊन राहतो आणि तोहि कुंडलिनीबरोबर सुषुम्नानाडींत प्रविष्ट होतो. ॥ २४६ ॥ तेव्हा वरच्या बाजूने ढाळ किंवा उतार असल्यामुळे चंद्रामृताचे तळें कानवडे होऊन कुंडलिनीशक्तीच्या मुखांत तें चंद्रामृत पडतें. ॥ २४७ ॥ तेथून त्या नळींत भरलेला रस सर्व अंगांत पसरतो व प्राणवायूचें योगाने जेथला तेथे मुरतो. ॥ २४८ ॥ मेणाची मूस करून, त्या मुसेंत एखाद्या धातूचा उष्ण रस ओतला असतां रसाच्या उष्णतेने मेण पातळ होऊन निघून जाते, पण त्या धातूच्या रसाला मुसेचा आकार येऊन जातो. किंवा त्या मुसेच्या आकारांत नुसता रसच भरून राहतो. ॥ २४९ ॥ त्याप्रमाणे या पिंडरूप शरीराचे आकाराने अमृतकलाच जणूं अवतरते व वरवर त्वचेचें वस्त्र पांघरलेले असतें. ॥ २५० ॥ ज्याप्रमाणे सूर्यापुढें ढगाचें आवरण आलें असतां, त्याचें तेज झांकले जाते, पण तें आवरण निघून गेल्यावर तो आपल्या तेजोमय प्रकाशाने प्रकाशित होतो. ॥ २५१ ॥ त्या प्रमाणें वर वर दिसणारा त्वचेचा पापुद्रा कोंड्यासारखा झडून जातो. ॥ २५२ ॥ मग स्वयंभू स्फटीकाचे असावे किंवा रत्नाचे बीजालाच कोंभ निघावा, अशाप्रमाणे त्या योग्याच्या शरीराच्या कांतीची झांक दिसते. ॥ २५३ ॥ किंवा मावळणाऱ्या सूर्याचे रंग काढून योग्याचे शरीर बनविले आहे की काय? किंवा शुद्ध निर्मळ अंतर्ज्योतीचे म्हणजे चैतन्य प्रकाशाचे तें लिंग आहे की काय, असें वाटते. ॥ २५४ ॥ संपूर्ण भरीव केशराचेच किंवा सिद्ध केलेल्या पारदाचे ओतलेलें म्हणजे हरगौरीसृष्टींतील किंवा मला तर वाटतें की प्रत्यक्ष शांतीनेच ते शरीर धारण केलें की काय? ॥ २५५ ॥ आनंदाचें चित्रांत भरलेला रंग होय किंवा ब्रह्मसुखाने धरलेले रूप होय किंवा संतोषवृक्षाचे लावलेले रोप होय. ॥ २५६ ॥ तो सोनचांफ्याची कळी होंय, किंवा अमृताचा पुतळा होय; अथवा कोमळपणाच्या भरास आलेला मळा होय. ॥ २५७ ॥ योग्याचें शरीर म्हणजे शरदृतूंतील पौर्णिमेच्या थंडाव्याने विकसित झालेलें जणूं चंद्रबिंबच होय, किंवा मूर्तिमंत चंद्राचे तेजच आसनावर बसलेलें आहे. ॥ २५८ ॥ जेव्हा कुंडलिनी चंद्रामृत पिते तेव्हा योग्याचे शरीर याप्रमाणे होते. त्या देहाच्या आकृतीला यमहि भितो. ॥ २५९ ॥ वार्धक्य मागे फिरते. योग्याच्या शरीराला जरा प्राप्त होत नाही तारुण्यही राहत नाही व पूर्वीची गेलेली बाळदशा प्रगट होते (बाल्यदशेतील शरीराप्रमाणे योग्याचे शरीर अति कोमल असते). ॥ २६० ॥ वयाच्या दृष्टीने योग्याचे शरीर बालस्वरूप असलें तरी बलाचे दृष्टीने ते मूर्तिमंत बलरूपच असते. त्याच्या धैर्याला उपमाच नसते. ॥ २६१ ॥ सुवर्णवृक्षाच्या पानावर रत्नाची नित्य नवी कळी यावी, त्याप्रमाणे त्या योग्याला उत्तम नवी नखें

येतात. ॥ २६२ ॥ दांतहि नवेच येतात. पण त्यांच्या बारीकपणाशीं कोणाच्या दांताच्या बारीकपणाची तुलना करितां येणार नाही, इतके ते लहान असतात. जणूं काय दोन्ही बाजूला हिऱ्यांच्या पंक्ती बसविल्या आहेत. ॥ २६३ ॥ अणुसमान माणिकांच्या कळ्या म्हणजे अत्यंत लहान तुकडे असावे, तसे त्या योग्याचें शरीरावर रोमांचीं सूक्ष्म अग्रें निघतात. ॥ २६४ ॥ हातपायांचे तळवे तर तांबड्या कमळांप्रमाणें असतात, डोळे तर काय सांगूं, अत्यंत तेजस्वी होतात. ॥ २६५ ॥ पूर्ण वाढ झाली म्हणजे मोती शिंपल्यांच्या पुडांत सामावत नाहीत, मग त्या शिंपल्यांच्या पुडांतील शिवण उलते. ॥ २६६ ॥ त्याप्रमाणेच योग्याची दृष्टिहि दोन पापण्यांच्या मिठींत मावेनाशी होते. ती व्यापक होऊन आवेशाने बाहेर निघूं पाहते. ती पूर्वीचीच दृष्टि असते, पण ती आकाशालाहि कवळूं पाहते. ॥ २६७ ॥ अर्जुना! ऐक. देह सुवर्णमय कांतीचा होतो, पण वायूप्रमाणे हलका असतो. कारण देहाच्या जडपणाला कारण असणारे पृथ्वी आणि आप या भूतांचे अंश, त्या शरीरात नसतात. ॥ २६८ ॥ मग तो योगी समुद्रापलीकडील पाहूं शकतो. स्वर्गातील शब्द ऐकूं शकतो व मुंगीचें मनोगत देखील तो ओळखतो. ॥ २६९ ॥ वायूच्या घोड्यावर तो स्वार होतो—म्हणजे वाऱ्यासारखी त्याची गति असते. समुद्रावर तो चालतो, पण पायाला पाणी लागत नाही. अशाप्रमाणे अनेक सिद्धि योग्याला प्राप्त होतात. ॥ २७० ॥ प्राणाचा हात धरून व आकाशाची पायरी करून, सुषुम्नेच्या जिन्याने, ती कुंडलिनी हृदयाचे ठिकाणीं येते. ॥ २७१ ॥ ती कुंडलिनी जगदंबा म्हणजे जगाची माता आहे. चैतन्यरूपी सार्वभौमाची ऐश्वर्यरूप शोभा आहे. जिने जगद्रूपी बीजाच्या अंकुरावर सावली केली. ॥ २७२ ॥

**गूढार्थदीपिका—ते कुंडलिनी जगदंबा। जे चैतन्यचक्रवर्तीची शोभा।**—परमेश्वराची जी ब्रह्मांडचालक शक्ति, तीच परमेश्वरासह पिंडांत किंवा जीवाच्या शरीरांत अंश रूपाने आहे. त्या शक्तीला कुंडलिनी हें नांव आहे. ही कुंडलिनी म्हणजे जीवशक्तिवृत्ति होय. "**परास्य शक्तिर्विविधैव श्रूयते स्वाभाविकी ज्ञानबलक्रिया च**" (श्वेताश्वतर उ० ६-८) परमेश्वराची शक्ति, ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति अशी दोन रूपाने प्रतीत होते. तीच परमेश्वरशक्ति, जीवाचें शरीरांत आहे. तिलाच कुंडलिनी म्हणतात. जीवाचे ठिकाणीं ही ज्ञानशक्ति मनामध्ये जाणीवरूपाने प्रतीत होते व क्रियाशक्ति प्राणरूपाने प्रतीत होते.

मुळांत मन विभू आहे हें खरें, पण तें बाहेरचे पदार्थ जाणण्याकरितां इंद्रियरूप होऊन जेव्हा बाहेर निघतें, तेव्हा तें पूर्ण बाहेर निघत नाही. तें मन किंवा ज्ञानशक्ति मर्यादित होऊन निघते. म्हणूनच एका इंद्रियाचा व्यापार, दुसऱ्या इंद्रियाला कळत नाही. असे बाहेर निघालेलें मन मर्यादित होण्याचें कारण हें आहे की, मनाला बाहेर निघण्याकरितां मनोवाहक नाड्या आहेत. त्या मनाप्रमाणेच सूक्ष्म असून, त्या मनाप्रमाणे दिसत नाहीत. त्या योगाभ्यासानेच दिसतात, हे मागे सांगितलेच आहे.

**जया विश्वबीजाचिया कोंभा। साउली केली॥**—ब्रह्मवस्तु विश्वाचें बीज आहे व त्याठिकाणीं स्फुरणारी अहंवृत्ति हा अंकुर आहे. या अहंवृत्तिरूप ब्रह्मांकुराला सावली केली—म्हणजे अहं हा परमेश्वराचेच स्फुरण आहे; पण जीव आपल्या वेगळेपणाचा अहंकार धारण करून आपल्या ब्रह्मभावाला विसरला आहे व जीवरूप झाला आहे.

**जे शून्यलिंगाची पिंडी। जे परमात्मया शिवाची करंडी। जे प्राणाची उघडी। जन्मभूमि॥ २७३॥**

**अर्थ**—जी शून्यमय असलेलें अशा निर्विकल्प लिंगाची पिंडी होय. जी परमात्मा शिवाची संबळी होय व जी ओंकाराची जन्मभूमि होय. ॥ २७३ ॥

**गूढार्थदीपिका—शून्य लिंगाची पिंडी**—ज्याप्रमाणे अव्यक्तदशेंत असलेलें लिंग, पिंडीच्या सहायाने व्यक्त होऊन दर्शनाला योग्य होतें, त्याप्रमाणे निर्विकल्प परब्रह्मस्वरूप, शक्तीच्या सहायाने व्यक्त होऊन, साक्षात्काराला योग्य होतें.

**परमात्मया शिवाची करंडी**—ज्याप्रमाणे आपण करंडी देव ठेवण्याच्या कामाकरितां उपयोगांत आणतो, त्यांत दुसरें कांही ठेवित नाही, त्याप्रमाणे या कुंडलिनीशक्तिरूपी करंडीत देखील एका परमात्म्या शिवावांचून दुसरें कांहीच नसते. शक्ति म्हटलीं तरी शक्तींत शक्तच असतो असा अर्थ.

**प्रणवाची उघडी। जन्मभूमी**—या कुंडलिनी शक्तींतूनच अव्यक्त असलेला ॐकार प्रगट होतो.

**हें असो ते कुंडलीनी बाळी। हृदयाआंतु आली। तंव अनाहताचां बोली। चावळे ते॥ २७४॥**

**अर्थ**—असो. ही कुंडलिनी बाळी हृदयाचे ठिकाणी आली असतां ती तेथे अनाहताची बोली बोलूं लागते. ॥ २७४॥

**गूढार्थदीपिका**—हृदयदेशांत 'कं० खं गं घं ङं चं छं जं झं ञं टं ठं' या बारा वर्णांनी चिन्हित अशा बारा पांकळ्यांनी युक्त, सुवर्णवर्ण, खालीं मुख केलेलें असें अनाहतचक्र आहे. याची देवता भगवान शंकर आहे. या हृदयस्थ अनाहतचक्राचे ठिकाणी "चिणेति प्रथमो नादश्चिण्चिणीति द्वितीयकः। घंटानादस्तृतीयश्च शंखनादश्चतुर्थकः॥ ७॥ पंचमस्तंत्रिनादश्च तालनादश्च षष्ठकः। सप्तमो वेणुनादश्च मृदंगश्च तथाष्टमः॥ ८॥ नवमो भेरिनादश्च, मेघाख्यो दशमः स्मृतः" पहिला चिणनाद, दुसरा चिण्चिणिनाद् तिसरा घंटानाद, चवथा शंखनाद. पांचवा तंतुनाद, सहावा तालनाद, सातवा वेणुनाद, आठवा मृदंगनाद, नववा भेरीनाद, व दहावा मेघ नांवाचा नाद असे दशविध अनाहत नाद ऐकूं येतात.

### योगातील अनाहत नाद=वेद

कानांत बोट घातले असतां जो नाद ऐकूं येतो, तोच अनाहतनाद होय, असे कित्येक अज्ञलोक म्हणतात; पण ते बरोबर नाही, 'प्रणवरूप' ज्ञातजप व 'हंसः' हा अज्ञातजप यांचा समन्वय करून "स एवं जपकोट्यानादगनुभवति" एक कोटी अजपाजप झाला असतां, हे अनाहतनाद ऐकूं येतात, असें श्रुतीने सांगितलें आहे व "**योगी म्हणती अनाहत शब्दू। वेदांती म्हणती सूक्ष्म नादू। आम्ही म्हणों शुद्ध वेदू। असो अनुवादू हा नांवाचा.॥ ४०७॥** (ए० भा० अ० २१) या अनाहत नादापासूनच सर्व वेदांची उत्पत्ति आहे, असे नाथादि संताचें म्हणणें आहे.

ज्याप्रमाणे बाजारांत अनेक माणसें अनेक माणसाशीं बोलत असतात, दूरून ऐकणाऱ्याला त्या बोलण्याचा निरनिराळ्या रीतीने नाद ऐकायला येतो व बाजारांत जाऊन पाहिले असतां कोण कोणाशी काय बोलतो हे समजून येतें; त्याप्रमाणेच हे नादहि सुषुम्नानाडीने परमेश्वराची भेट घेण्याकरितां ब्रह्मरंध्राकडे जाणाऱ्या साधकाला ऐकू येतात. पण अनाहत चक्रावर संयम करून पाहणाऱ्याला स्पष्ट वेदरूपशब्दाने ऐकूं येतात.

**शक्तीचिया आंगा लागलें। बुद्धीचें चैतन्य होतें जाहाले। तें तेणें आइकिलें। अळुमाळु॥ २७५॥**
**घोषाचां कुंडीं। नादचित्रांचीं रूपडीं। प्रणवाचिया मोडी। रेखिलीं ऐसीं॥ २७६॥**
**हेंचि कल्पावें तरी जाणिजे। परी आतां कल्पितें कैंचें आणिजे। परी नेणों काय गाजे। तिये ठायीं॥ २७७॥**
**विसरोनि गेलों अर्जुना। जंव नाशु नाहीं पवना। तंव वाचा आथी गगना। म्हणऊनि घुमे॥ २७८॥**
**तया अनाहताचेनि मेघें। मग आकाश दुमदुमों लागे। तंव ब्रह्मस्थानींचें बेगें। सहज फिटे॥ २७९॥**
**आइकें कमळगर्भाकारें। जें महदाकाश दुसरें। जेथ चैतन्य आधातुरें। करूनि असिजे॥ २८०॥**

**अर्थ**—बुद्धि कुंडलिनी शक्तीच्या अंगाला लागली असतां ती चैतन्यस्वरूप होते व ती नाद सहज ऐकते. ॥ २७५॥ तेथे नादाचें कुंडच असते—म्हणजे सारखा घोषच होत असतो. पण त्यांत दहा प्रकारचे नाद असतात आणि ते प्रणवाच्या आकारांत जशा रेषा असतात तसे ते दशनाद नादमय घोषांत असतात. ॥ २७६॥ पण त्यांची कल्पना केली तर जाणतां येते, पण तेथे कल्पना करणारा कोण आणायचा? तरी कसा घोष होतो हें सांगतां येत नाही. ॥ २७७॥ पण, अर्जुना! सांगावयाचे राहिलें तें हें की, जोपर्यंत प्राणवायूचा लय होत नाही तोपर्यंत आकाशांत शब्द होतो, म्हणून नाद तेथे राहतो. ॥ २७८॥ त्या अनाहत नादांतील दहाव्या मेघाख्य नादाने, आकाश दुमदुमून जातें व ब्रह्मस्थानाचा मार्ग मोकळा होतो. ॥ २७९॥ अर्जुना! ऐक, जें कमळाच्या गर्भाच्या आकाराचें आहे व जें दुसरे महाकाशच म्हणतां येतें असें जें हृदयाकाश, तेथें शक्तीशी ऐक्य पावण्याकरितां चैतन्य हें उत्कंठितच असतें. ॥ २८०॥

**गूढार्थदीपिका—चैतन्य आधातुरे। होऊनि असिजे**—परमप्रेमरूप चैतन्याची शक्ति परमप्रेमरूपच असते. कुंडलिनी ही परमेश्वराची शक्ति आहे. चैतन्याचे ठिकाणी तिच्याशी ऐक्य पावण्याची प्रेमोत्कंठा व शक्तीचें ठिकाणी

आपल्या स्वरूपभूत चैतन्याशी ऐक्य पावण्याची प्रेमोत्कंठा साहजिकच असते.

**तया हृदयाचां परिवरीं। कुंडलिनिया परमेश्वरी। तेजाची शिदोरी। विनियोगिली॥ २८१॥**

**अर्थ**—मग त्या हृदयाच्या घरी कुंडलिनी शक्ति, परमेश्वराच्या ठिकाणी आपल्या तेजाची शिदोरी चैतन्याला अर्पण करते. ॥ २८१ ॥

**गूढार्थदीपिका**—वेदान्तांत परमेश्वराचा साक्षात्कार करून घेण्याकरितां ज्या ज्या ठिकाणी परमेश्वराची अभिव्यक्ति होते म्हणून स्थानें सांगितली आहेत, त्यांत हृदयकमल हें एक स्थान आहे. "**स वा एष आत्मा हृदि तस्यैतदेव निरुक्तं हृद्यमिति**" (छां० उ० ८-३-३) या हृदयापर्यंत कुंडलिनीशक्ति आली असतां, तेथेच तिचें व परमेश्वराचें ऐक्य होते—म्हणजे ह्या हृदयदेशाचे ठिकाणी कुंडलिनीशक्ति चैतन्याहून अलग राहू शकत नाही.

**बुद्धीचेनि शाकें। हातबोनें निकें। द्वैत जेथ न देखे। तैसें केलें॥ २८२॥**
**ऐसी निजकांती हारविली। मग प्राणुचि केवळ जाहाली। ते वेळीं कैसी गमली। म्हणावी पां॥ २८३॥**
**हो कां जे पवनाची पुतळी। पांघुरली होती सोनसळी। ते फेडुनियां वेगळी। ठेविली तिया॥ २८४॥**
**नातरी वायूचेनि आंगें झगटली। दीपाची दिठी निवटली। कां लखलखोनि हारपली। वीजु गगनीं॥ २८५॥**
**तैशी हृदयकमळवेन्हीं। दिसे जैशी सोनियाची सरी। नातरी प्रकाशजळाची झरी। वाहत आली॥ २८६॥**
**मग तिये हृदयभूमी पोकळे। जिराली कां एके वेळे। तैसें शक्तीचें रूप मावळे। शक्तीचिमाजी॥ २८७॥**
**तेव्हां तरी शक्तीचि म्हणिजे। एऱ्हवीं तो प्राणु केवळ जाणिजे। आतां नाद बिंदु नेणिजे। कळा ज्योती॥ २८८॥**
**मनाचा हन मारु। कां पवनाचा आधारु। ध्यानाचा आदरु। नाहीं परी॥ २८९॥**
**हे कल्पना घे सांडी। ते नाहीं इये परवडी। हे महाभूतांची फुडी। आटणी देखा॥ २९०॥**
**पिंडें पिंडाचा ग्रासु। तो हा नाथसंकेतींचा दंशु। परि दावूनि गेला उद्देशु। महाविष्णु॥ २९१॥**

**अर्थ**—बुद्धीच्या शाकेसह शिदोरीचा उत्तम नैवेद्य अर्पण करून, तेथें द्वैताचा मागमूसहि दिसणार नाही असे करून, टाकते. ॥ २८२ ॥ आपले तेज समर्पण करून ती कुंडलिनीशक्ति, केवळ प्राणस्वरूप होऊन राहते तेव्हा ती कशी दिसते असे म्हणतां येईल तें सांगतों. ॥ २८३ ॥ एखाद्या वायूच्या केलेल्या बाहुलीला सोन्यासारखा पीतांबर पांघरावा व तो सोडून मग तिला वेगळे करून ठेवावे. ॥ २८४ ॥ किंवा वायूची झुळुक लागून दिव्याची ज्योति विझली जावी अथवा आकाशांत वीज चमकून एकदम आकाशांतच नाहीशी व्हावी. ॥ २८५ ॥ त्याप्रमाणें हृदयकमलावर ती सोन्याच्या सरी सारखी दिसते किंवा प्रकाशरूप जळाचा थोडासा झरा वाहत असावा. ॥ २८६ ॥ व मग तो हृदयरूपी भूमीच्या पोकळीत एकदांचा जिरावा, त्याप्रमाणें शक्तीचें रूप शक्तींतच मावळते. ॥ २८७ ॥ तेव्हा तरी ती शक्तिच म्हटली जाते. एरव्ही ती प्राणरूपाने जाणली जाते. याठिकाणी नादबिंदु, कळाज्योति हा प्रकार किंवा भेद कांही एक राहत नाही. ॥ २८८ ॥ मन मारावें लागत नाही. वायूचा आधार घ्यावा लागत नाही किंवा ध्यानाचाहि आदर राहत नाही—म्हणजे ध्यान करावें लागत नाही. ॥ २८९ ॥ एक कल्पना करायची किंवा एखादी कल्पना सोडायची हाहि प्रकार या स्थितींत होत नसतो. ही स्थिति म्हणजे पंचमहाभूतांची स्पष्ट आटणी किंवा लय होय. (याला लययोग म्हणतात). ॥ २९० ॥ पिंडाने म्हणजे चैतन्यमय देहाकृतीने, पिंडाचा म्हणजे पांच भौतिक देहाकृतीचा, ग्रास म्हणजे नाश करण्याचा हा नाथसंप्रदायांत जो अद्वैतदृष्टीचा अनुभव घेण्याचा मार्ग आहे, त्याचा भगवंतांनी हेतुपूर्वक थोडा उल्लेख केला. ॥ २९१ ॥

**गूढार्थदीपिका**—या योगाचा अभ्यास करणाऱ्या योग्यांचा पांचभौतिक देह जर सच्चिदानंदमय होतो तर सर्व योग्यांचा प्रणेता जो भगवान, त्याचा अवतार देह पांचभौतिक राहतो असे मानणें कसे शक्य आहे?

**तया ध्वनिताचें केणें सोडुनी। यथार्थाची घडी झाडुनी। उपलविली म्यां जाणुनी। ग्राहीक श्रोते॥ २९२॥**
**ऐकें शक्तीचें तेज जेव्हां लोपे। तेथ देहींचें रूप हारपे। मग तो डोळियांचि माजीं लपे। जगाचिया॥ २९३॥**
**एऱ्हवीं आधिलाचि ऐसें। सावयव तरी असे। परि वायूचें कां जैसें। वळिलें होय॥ २९४॥**

**नातरी कर्दळीचा गाभा। बुंथी सांडोनी उभा। कां अवयवचि नभा। तो॥ २९५॥**
**तैसें होय शरीर। तैं तें म्हणिजे खेचर। हें पद होतां चमत्कार। पिंडजनीं॥ २९६॥**
**देखें साधकु निघोनि जाये। मागां पाउलांची वोळ राहे। तेथ ठायीं ठायीं होये। हे अणिमादिक॥ २९७॥**
**परि तेणें काय काज आपणपयां। अवधारीं ऐसा धनंजया। लोप आथी भूतत्रया। देहींचा देहीं॥ २९८॥**
**पृथ्वीतें आप विरवी। आपातें तेज जिरवी। तेजातें पवनु हरवी। हृदयामाजीं॥ २९९॥**
**पाठीं आपण एकला उरे। परि शरीराचेनि अनुकारें। मग तोही निगे अंतरें। गगना मिळे॥ ३००॥**
**ते वेळीं कुंडलिनी हे भाष जाये। मग मारुत ऐसें नाम होये। परि शक्तिपण तें आहे। जंव न मिळे शिवीं॥ ३०१॥**
**मग जालंधर सांडी। ककारांत फोडी। गगनाचिये पाहाडीं। पैठी होय॥ ३०२॥**
**ते ॐकाराचिये पाठी। पाय देत उठाउठी। पश्यंतीचिये पाउटी। मागां घाली॥ ३०३॥**
**पुढां तन्मात्रा अर्धवेरी। आकाशाचां अंतरीं। भरती गमे सागरीं। सरिता जैशी॥ ३०४॥**

**अर्थ**—त्याच उल्लेखरूपी मालाची घडी तुम्हां संतांसारखे गिऱ्हाईक पाहून मी संपूर्ण उकलून दाखिविली. ॥ २९२ ॥ अर्जुना! ऐक. जेव्हा शक्तीचें तेज नाहीसें होतें, तेव्हा मग देहाचें पांचभौतिक स्थूलरूपहि राहात नाही. मग तो योगी जगाच्या डोळ्यामध्यें लोपूं शकतो (म्हणजे तो असून देखील लोकांच्या डोळ्याने दिसत नाही) ॥ २९३ ॥ एरव्हीं पूर्वीप्रमाणेच त्याचें शरीर सावयव दिसतें, पण जणूं काय वायूचेंच बनलें आहे असें तें होतें. ॥ २९४ ॥ किंवा केळीच्या गाभ्याचा भाग, जसा वरील पापुद्रे निघाल्यानंतर उभा असावा किंवा आकाशालाच अवयव व्हावे, तसा तो योगी राहतो. ॥ २९५ ॥ याप्रमाणें योग्याचें शरीर झालें असता, योगी आकाशांत संचार करीत असतो व हे पद त्याला प्राप्त झालें असतां शरीरधारी जीवांना तो चमत्कार वाटतो. ॥ २९६ ॥ अर्जुना! पहा. योगाचा अभ्यास करणारा साधक अभ्यास करीत पुढें निघून जातो. पण जातांना मागें त्याच्या पावलांच्या चिन्हांची जी रांग राहते, तेथे ठिकठिकाणीं अणिमादिक सिद्धी असतात—म्हणजे योग्याच्या मागें अणिमादिक सिद्धी धावत राहातात (समाधि साधणाऱ्याने सिद्धीच्या नादीं लागूं नये असा या चरणाचा अर्थ.) ॥ २९७ ॥ पण या सिद्धीचे आपल्याला काय करावयाचे? पुढें ऐक. याप्रमाणें देहांतील पृथ्वी, आप, तेज, या तीन भूतांचा देहांतच लय होतो. ॥ २९८ ॥ पृथ्वी आपांत विरते. आपाला तेज खातें व तेजाला हृदयामध्यें वायु खातो. ॥ २९९ ॥ नंतर नुसता प्राणवायु राहतो; पण तो शरीराच्या आकाराचा होऊन राहतो. मग पुढे तोहि आंत आकाशांत मिळण्याकरितां जातो. ॥ ३०० ॥ तेव्हां कुंडलिनी हें नांव जाऊन, त्या शक्तीला वायु हें नाव प्राप्त होते, पण जोपर्यंत ती शिवांत मिळत नाही, तोपर्यंत तिचे शक्तिपण मात्र जात नाही. ॥ ३०१ ॥ मग जालंधर बंध टाकून, सुषुम्ना नाडीचें मुख फोडून आकाशाच्या बरोबरीची म्हणजे आकाशरूप होऊन जाते. ॥ ३०२ ॥ पुढें प्रणवाचे पाठीवर पाय देऊन लगेच पश्यंतिवाणीलाहि मागें टाकते (येथें ॐकार अनुच्चारित होतो असा अर्थ). ॥ ३०३ ॥ पुढें अर्धमात्रापर्यंत आकाशामध्यें राहून ज्याप्रमाणे समुद्रांत नदी पाण्याची भरती घेऊन वेगाने मिळूं पाहाते, त्याप्रमाणे. ॥ ३०४ ॥

**गूढार्थदीपिका**—कंठ देशात अ आ इ ई उ ऊ ऋ ॠ लृ ॡ ए ऐ ओ औ अं अः या सोळा वर्णांनी अंकित अशा सोळा पाकळ्यांनी युक्त चंद्रवर्णासमान असे विशुद्धि चक्र आहे.त्याच्या डाव्याबाजूस इडा व उजव्या बाजूस पिंगला व मध्यभागीं सुषुम्ना आहे. यांची देवता रुद्र आहे. तसेंच दोन्ही भुंवयांमध्ये हं आणि क्षं या दोन अक्षरांनी अंकित अशा दोन्ही पाकळ्यांनी युक्त रक्तवर्ण असे आज्ञाचक्र आहे. याला बिंदुस्थान असेहि म्हणतात. हे नासिका मूलाच्या नादोत्पतीचे स्थान आहे. योगी या दोन्ही चक्रांचा भेद करून आकाशांत प्रविष्ट होतो.

**युञ्जन्नेवं सदाऽऽत्मानं योगी नियतमानसः। शान्तिं निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति॥ १५॥**

**अर्थ**—असा अखंड माझ्याठिकाणीं मन लावून राहणारा जो योगी असतो, त्याला माझ्या ठिकाणीं नित्य असणारी व जी शेवटली स्थिति म्हटली जाते, ती परम निर्वासन स्थिति प्राप्त होते. ॥ १५ ॥

**मग ब्रह्मरंध्रीं स्थिरावोनी। सोहंभावाच्या बाह्या पसरुनी। परमात्मलिंगा धांवोनी। आंगा घडे॥ ३०५॥**

**तंव महाभूतांची जवनिक फिटे। मग दोहींसि होय झटे। तेथ गगनासकट आटे। समरसीं तिये॥ ३०६॥**
**पैं मेघाचेनि मुखीं निवडला। समुद्र कां वोघीं पडिला। तो मागुता जैसा आला। आपणपेयां॥ ३०७॥**
**तेवीं पिंडाचेनि मिषें। पदीं पद प्रवेशे। तें एकत्व होय तैसें। पंडुकुमरा॥ ३०८॥**

**अर्थ**—पुढें ब्रह्मरंध्राचे ठिकाणीं स्थिर होऊन व सोहंभावाचे बाहू पसरून परमात्मलिंगाला धांवून आलिंगन देते व अंगरूप होऊन जाते. ॥ ३०५॥ इतक्यांत महाभूतांचा पडदा दूर होतो व दोघांचेहि ऐक्य होतें व त्या समरसस्थितीमध्यें आकाशासहित सर्व भूतांचा लय होतो. ॥ ३०६॥ ज्याप्रमाणे मेघाचे रूपांत गेलेला समुद्र जमिनीवर पडून ओघाचे रूपाने वाहूं लागतो व पुन: सर्व ओघ शेवटी समुद्रात मिळतात, म्हणून तो पुन: आपण आपल्याच मूळच्या समुद्ररूपाला येतो. ॥ ३०७॥ त्याप्रमाणे अर्जुना! पिंडाचेनि मिषें म्हणजे चैतन्यमय शरीराकृतीनेच-पद म्हणजे त्वंपद जीव-पदीं म्हणजे परमेश्वराशीं-प्रवेशे म्हणजे ऐक्य पावतो. अशा प्रकारें तें जीवशिवाचें ऐक्य होतें. ॥ ३०८॥

**गूढार्थदीपिका**—या लययोगाने जीवाचे पांचभौतिक शरीर जाऊन, त्याचें तें शरीर चैतन्यमय होतें व ज्याप्रमाणे नदी समुद्राला मिळतेवेळी, आपल्या मर्यादितपणामुळें समुद्राच्या एका भागांत मिळते व समुद्राच्या तेवढ्या भागाला साकार करते, त्याप्रमाणे चैतन्यमय शरीरधारी 'त्वंपद' जीव हा 'तत्पद' परमेश्वराशी ऐक्य पावतेवेळी आपल्या साकारपणामुळें 'तत्पद' परमेश्वराला साकार करतो व त्या साकार परमेश्वराशीच ऐक्य पावतो.

नदी समुद्राच्या एका भागांत मिळते, तरी तो समुद्राचा भाग सर्व समुद्राहून निराळा नसून, समुद्राशीं एकरूप असल्यामुळें, ती नदी सर्व समुद्रांतच मिळते, त्याप्रमाणे 'त्वंपद' जीव चैतन्यमय साकार होऊन, चैतन्यमय तत्पद साकार परमेश्वराशीं ऐक्य पावत असला तरी, चैतन्यमय साकार जीव चैतन्यमय परमेश्वराच्या ज्या भागाशीं ऐक्य पावतो, तो भाग निराकार चैतन्यस्वरूपापासून निराळा नसून, त्याच्याशीं एकरूपच असल्यामुळें, तो 'त्वंपद' जीव पूर्ण निराकार ब्रह्माशींच ऐक्य पावतो. म्हणजे परमेश्वराचें निर्गुण निराकार व रामकृष्णादि सगुण साकार स्वरूप हीं दोन्ही शुद्ध असून, त्यांचें ऐक्यच असल्यामुळें, सगुण स्वरूपाशीं ऐंक्य पावणें, हें निर्गुणस्वरूपाशीं ऐक्य पावणेंच होय असा भाव.

वेदान्तसूत्रांतील चवथ्या अध्यायाच्या चवथ्या 'मुक्ति' पादांत भगवान व्यासांनी "जीव चैतन्यमात्रपरब्रह्मात मिळतो (वे० सू० ४-४-६) व "जीव सगुण परमेश्वरांत मिळतो" (वे० सू० ४-४-५) अशीं दोन्ही मतें देऊन, शेवटीं "एवमप्युपन्यासात् पूर्वभावादविरोधं बादरायण:" (वे० सू० ४-४-७) या सूत्राने जीव हा भगवंताच्या सगुणनिर्गुणस्वरूपापैकीं कोणत्याहि स्वरूपांत मिळाला तरी तो पूर्ण ब्रह्मस्वरूपच होतो, असा सिद्धान्त केला आहे.

**आतां दुजें हन होतें। कीं एकचि हें आइतें। ऐशिये विवंचनेपुरतें। उरेचिना॥ ३०९॥**
**गगनीं गगन लया जाये। ऐसें जें कांहीं आहे। तें अनुभवें जो होये। तो होऊनि ठाके॥ ३१०॥**
**म्हणोनि तेथिंची मातु। न चढेचि बोलाचा हातु। जेणें संवादाचिया गांवाआंतु। पैठी कीजे॥ ३११॥**
**अर्जुना एऱ्हवीं तरी। इया अभिप्रायाचा जे गर्व धरी। ते पाहें पां वैखरी। दुरी ठेली॥ ३१२॥**
**भ्रूलता मागलीकडे। तेथ मकाराचेंचि आंग न मांडे। सडेया प्राणा सांकडें। गगन येतां॥ ३१३॥**
**पाठीं तेथेंचि तो भेसळला। तंव शब्दाचा दिवो मावळला। मग तयाहिवरी आटु भविन्नला। आकाशाचा॥ ३१४॥**
**आतां महाशून्याचिया डोहीं॥ जेथ गगनासीचि ठावो नाहीं। तेथ तागा लागेल काई। बोलाचा या॥ ३१५॥**
**म्हणूनि आखरामाजि सांपडे। कीं कानावरी जोडे। हें तैसें नव्हे फुडें। त्रिशुद्धी गा॥ ३१६॥**
**जैं कहीं दैवें। अनुभविलें फावे। तैं आपणचि हें ठाकावें। होऊनियां॥ ३१७॥**
**पुढती जाणणें तें नाहींचि। म्हणोनि असो किती हेंचि। बोलावें आतां वायांचि। धनुर्धरा॥ ३१८॥**
**ऐसें शब्दजात माघौतें सरे। तेथ संकल्पाचें आयुष्य पुरे। वाराही जेथ न शिरे। विचाराचा॥ ३१९॥**
**जें उन्मनियेचें लावण्य। जें तुर्येचें तारुण्य। अनादि जें अगण्य। परमतत्त्व॥ ३२०॥**
**जे विश्वाचें मूळ। जें योगद्रुमाचें फळ। जें आनंदाचें केवळ। चैतन्य गा॥ ३२१॥**

**जें आकाराचा प्रांतु। जें मोक्षाचा एकांतु। जेथ आदि आणि अंतु। विरोनी गेले॥ ३२२॥**
**जें महाभूतांचें बीज। जें महातेजाचें तेज। एवं पार्था जें निज। स्वरूप माझें॥ ३२३॥**
**ते हे चतुर्भुज कोंभेली। जयाची शोभा रूपा आली। देखोनि नास्तिकीं नोकिलीं। भक्तवृंदें॥ ३२४॥**

**अर्थ**—आतां दुसरें कांही होते की मूळचे हें एकच सिद्ध आहे असा विचार करण्यापुरतें कांही उरत नाही. ॥ ३०९ ॥ आकाशांत आकाशाचा लय होतो, अशी जी कांही वस्तूस्थिति आहे ती अनुभवाने प्राप्त करून घेतो व तो त्या स्थितिरूप होऊन राहतो. ॥ ३१० ॥ ज्या शब्दाच्या योगाने आपण एखाद्या वस्तूचा संवाद किंवा चर्चा करतो, त्या शब्दाचा हात या स्थितीचे ठिकाणीं पोहोचूं शकत नाही म्हणजे ती स्थिति शब्दांनी सांगतां येत नाही. ॥ ३११ ॥ अर्जुना! कोणताहि अनुभव बोलून दाखविण्याचा अभिमान धारण करणारी वैखरी वाणी तीच या स्थितीपासून फार दूर असते. ॥ ३१२ ॥ भृकुटीच्या मागल्या भागांत मकार म्हणजे जेथें कारणदेहहि राहत नाही नुसत्या एकट्या प्राणाला देखील आकाशांत मिळण्याकरितां येतांना त्रास होतो. ॥ ३१३ ॥ नंतर तो तेथेंच मिसळतो. तेव्हा शब्दच राहत नसल्यामुळें शब्दाने कळणे नाहिसें होतें व त्यानंतर आकाशाचीहि आटणी होते. ॥ ३१४॥ जेथें आकाशाचा पत्ता लागत नाही, अशा महाशून्यस्थितींत शब्दाचा ठावठिकाण राहूं शकेल काय ?॥ ३१५ ॥ म्हणून ती स्थिति शब्दाने सांगतां येईल किंवा कानाला ऐकतां येईल, अशी मुळींच नाही, हे त्रिवार सत्य आहे. ॥ ३१६ ॥ महद्भाग्याने हा अनुभव प्राप्त झाला असतां, केवळ आपण अनुभवरूप होऊन राहावें, एवढेंच. ॥ ३१७ ॥ पुढें जाणीवच बंद पडते, म्हणून अर्जुना! हेंच व्यर्थ कितीदां पुन: पुन: सांगायचें. ॥ ३१८ ॥ या प्रमाणे सर्व शब्दप्रवृत्ति नाहिशी होते. त्याठिकाणीं संकल्पहि जिवंत राहत नाही व विचाररूपी वाऱ्याचा स्पर्शहि तेथें होत नाही. ॥ ३१९ ॥ जे उन्मनीदशेचें सौंदर्य होय. जें तूर्येचें तरुणपण होय. जें अनादि अमर्याद असें परमतत्वच होय. ॥ ३२० ॥ जें विश्वाचें मूळ होय. जें योगवृक्षाचें फळ होय. जें आनंदाचें सोलीव चैतन्य होय. ॥ ३२१ ॥ जें आकाराचा शेवट होय. जो मोक्षाचा अद्वैत भाव होय. ज्या ठिकाणीं आदि आणि अंत लय पावले. ॥ ३२२ ॥ जें महाभूतांचे मूळ कारण आहे. जें महातेजाचेंहि तेज होय. असे जें अर्जुना! माझें मूळरूप आहे. ॥ ३२३ ॥ तेंच हें माझें प्रगट झालेलें चतुर्भुज रूप होय. जेव्हां नास्तिक माझ्या प्रेमळ भक्तांना अत्यंत पीडा देतात. तेव्हा ती परब्रह्माची संपूर्ण शोभा किंवा सौंदर्यच, या सगुण साकार चतुर्भुज रूपाने प्रगट होते. ॥ ३२४ ॥

**गूढार्थदीपिका**—या ओव्यांत श्रीज्ञानेश्वर माऊलींनी अनुभवी पुरुषांना भगवंताचें सगुण साकार रामकृष्णादि स्वरूप कसें पूर्ण ब्रह्मरूपाने प्रत्ययाला येतें, हें सांगितलें आहे. व सगुण साकार रामकृष्णादि रूप भौतिक आहे किंवा मायिक आहे असें जें कित्येक शाब्दिक ज्ञान्यांना वाटतें, त्यांना चोख उत्तर दिलें आहे.

ज्याप्रमाणे "सोऽयं देवदत्त:" तोच हा देवदत्त होय या वाक्याने, पूर्वी पाहिलेल्या व वर्तमानकाळीं दृष्टीसमोर असलेल्या देवदेवत्ताचें अत्यंत ऐक्य दाखविलें जातें, त्याप्रमाणे श्रीज्ञानेश्वर माऊलींनी, पंचभूतांचा लय करून ज्या अत्यंत निरुपाधिक आत्मस्वरूपाचा अनुभव येतो, तें निरुपाधिक आत्मस्वरूप भक्ताकरितां चतुर्भुज साकार झालें आहे, असें विधान करून, अनुभवाने निर्गुणसगुण यांचें पूर्ण ऐक्य असतें, यांचें मुळींच भिन्नत्व नसतें, निर्गुणाची शोभा म्हणजे सगुण होय असें स्पष्ट शब्दांत सांगितलें आहे. रत्नाची कांति रत्नाला सोडून कधीच राहत नाही. ती रत्नासह नेहमी राहते. त्याप्रमाणेच निर्गुण परब्रह्माची शोभा, निर्गुण परब्रह्माला सोडून कधीं राहत नाही व ती शोभाच सगुण चतुर्भुजरूप होय—म्हणजे भगवंताचें सगुण स्वरूपहि निर्गुणाला सोडुन राहत नाही. रत्न व त्याची कांति मिळूनच एक रत्नवस्तु जशी असते, त्याप्रमाणे सगुण निर्गुण मिळूनच एक परब्रह्म वस्तु आहे. रत्न आहे तोपर्यंत त्याची कांति राहते, त्याप्रमाणे निर्गुण आहे तोपर्यंत सगुण राहते; म्हणून सगुणहि नित्य मानणें भाग आहे व तसा अनुभवी पुरुषाचा अनुभवहि असतो.

श्रीज्ञानेश्वरी अ० १४ ओवी ३७३-३८० यांत श्रीज्ञानेश्वर महाराजांनी स्वमुखांनेच निर्गुणसगुणाचें ऐक्य व समता दाखविली आहे.

गीता अ० १४ यावरील भाष्यांत श्रीभगवान आचार्यांनीहि निर्गुण परब्रह्माचें सगुण अवतार यांचा शक्तिमान व शक्ति यासारखा संबंध असून त्यांचें ऐक्य व पूर्ण निरुपाधिकत्व असतें असें स्पष्ट म्हटलें आहे.

**तें अनिर्वाच्य महासुख। पैं आपणचि जाहले जे पुरुष। जयांचे कां निष्कर्ष। प्राप्तिवेरीं॥ ३२५॥**
**आम्हीं साधन हें जें सांगितलें। तेंचि शरीर जिहीं केलें। ते आमुचेनि पाडें आले। निर्वाळलेया॥ ३२६॥**
**परब्रह्माचेनि रसें। देहाकृतीचिये मुसें। वोतींव जाहले तैसे। दिसती आंगें॥ ३२७॥**
**जरि हे प्रतीति हन अंतरीं फांके। तरी विश्वचि हें अवघें झांके। तंव अर्जुन म्हणे निकें। साचचि जी हें॥ ३२८॥**

**अर्थ**—शब्दाने ज्याचें वर्णनच होऊं शकत नाही असें जें अनिर्वचनीय महासुख तेंच जे पुरुष स्वत: झाले व ज्यांच्या अभ्यासाचा शेवट त्या सुखाच्या प्राप्तींतच झाला. ॥ ३२५॥ अर्जुना! आम्हीं हें जें लययोगाचें साधन सांगितलें, तेंच ज्यांनी आपल्या शरीराकडून केलें, ते आमच्या अत्यंत शुद्ध निरुपाधिक सगुणनिर्गुण स्वरूपासारखेंच शुद्ध निरुपाधिक सगुण निर्गुणस्वरूप झाले. ॥ ३२६॥ देहाकृतीचे मुंशीमध्यें निरुपाधिक परब्रह्माचा रस ओतून त्यांचें शरीर घडलेलें आहे असे ते होतात. ॥ ३२७॥ अर्जुना! हा अनुभव अंत:करणांत प्रगट झाला की संपूर्ण जडविनाशी विश्वाचा प्रत्यय नाहीसा होतो. तेव्हा अर्जुन म्हणतो, भगवंता! आपलें म्हणणे अगदी सत्य आहे. ॥ ३२८॥

**गूढार्थदीपिका—जरी हे प्रतीति हन अंतरीं फाके**—मागें १५२ ओवीवर सांगितल्याप्रमाणे, या योगाभ्यासाने निरुपाधिक निर्गुण परमात्मा आपल्या स्वरूपाशी एकरूप असलेल्या सच्चिदानंदशक्तीनेच नामरूपात्मक होतो, म्हणून नामरूपें देखील जडविनाशी नसून सच्चिदानंदस्वरूपच आहेत. असा जेव्हा अनुभव येतो, तेव्हा सच्चिदानंद परब्रह्माहून भिन्न अशा जडविनाशी जगताचा प्रत्यय संपूर्ण नाहीसा होतो, असे श्रीज्ञानेश्वरमाऊलींनी स्पष्ट सांगून, हा योगमार्ग, षट्चक्रभेदरूप किंवा लययोगमार्ग सगुणभक्तीला कसा पोषक आहे आणि याला 'पंथराज' कां म्हणतात हे त्यांनी स्पष्ट केले आहे.

**कां जे आपण आतां देवो। हा बोल्लिले जो उपावो। तो प्राप्तीचा ठावो। म्हणोनि घडे॥ ३२९॥**
**इये अभ्यासीं जे दृढ होती। ते भरवसेनि ब्रह्मत्वा येती। हें सांगतियाचि रीती। कळलें मज॥ ३३०॥**
**देवा गोठीचि हे ऐकतां। बोधु उपजतसे चित्ता। मा अनुभवें तल्लीनता। नव्हेल केवीं॥ ३३१॥**
**म्हणऊनि एथ कांहीं। अनारिसें नाहीं। परी नावभरी चित्त देईं। बोला एका॥ ३३२॥**
**आतां कृष्णा तुवां सांगितला योगु। तो मना तरी आला चांगु। परि न शके करूं पांगु। योग्यतेचा॥ ३३३॥**
**सहजें आंगिक जेतुली आहे। तेतुलियाची जरी सिद्धि जाये। तरी हाचि मार्गु सुखोपायें। अभ्यासीन॥ ३३४॥**
**नातरी देवो जैसें सांगतील। तैसें आपणपां जरी न ठकेल। तरी योग्यतेवीण होईल। तेंचि पुसों॥ ३३५॥**
**जीवींचिये ऐसी धारण। म्हणोनि पुसावया जाहलें कारण। मग म्हणे तरी आपण। चित्त देइजो॥ ३३६॥**
**हां हो जी अवधारिलें। हें जें साधन तुम्हीं निरूपिलें। तें आवडतयाहि अभ्यासिलें। फावों शके॥ ३३७॥**
**कीं योग्यतेवीण नाहीं। ऐसें हन आहे कांहीं। तेथ श्रीकृष्ण म्हणती तरी काई। धनुर्धरा॥ ३३८॥**
**हें काज कीर निर्वाण। परि आणिकही जें कांहीं साधारण। तेंही अधिकाराचे वोडवेविण। काय सिद्धि जाय॥ ३३९॥**
**पैं योग्यता जे म्हणिजे। ते प्राप्तीची अधीन जाणिजे। कां जे योग्य होऊनि कीजे। तें आरंभीं फळे॥ ३४०॥**
**तरी तैसी एथ कांहीं। सावियाची केणी नाहीं। आणी योग्यतेची काई। खाणी असे॥ ३४१॥**
**नावेक विरक्तु। जाहला देहधर्मीं नियतु। तरि तोचि नव्हे व्यवस्थितु। अधिकारिया॥ ३४२॥**
**येतुलालिये आयणीमाजी येवढें। योग्यपण तूंतेंही जोडे। ऐसें प्रसंगें सांकडें। फेडिलें तयाचें॥ ३४३॥**
**मग म्हणे गा पार्था। ते हे ऐसी व्यवस्था। अनियतासि सर्वथा। योग्यता नाहीं॥ ३४४॥**

**अर्थ**—आतां आपण जो उपाय सांगितला, तो ब्रह्मप्राप्तीचें ठिकाणच होय; म्हणूनच तसा अनुभव येतो. ॥ ३२९॥ या योगाभ्यासाचे ठिकाणी जे दृढनिश्चयाने लागतात, ते खात्रीने ब्रह्मरूप होतात; हें आपण सांगितलेल्या रीतीवरून मला कळून आलें. ॥ ३३०॥ देवा! या मार्गाचें निरूपण ऐकूनच जर जीव ब्रह्मस्वरूप आहे असें ज्ञान

होतें, तर अनुभव आला असतां तद्रूपता कां होणार नाही. ॥ ३३१ ॥ म्हणून येथें आपलें म्हणणें अन्यथा नाही, पण क्षणभर माझ्या एका बोलण्याकडे लक्ष द्या. ॥ ३३२ ॥ आतां देवा! तुम्ही जो योग सांगितला तो माझ्या मनाला बरा वाटला, पण अभ्यास करण्याची जी योग्यता पाहिजे त्या योग्यतेचा आश्रय मी करूं शकत नाही. ॥ ३३३ ॥ सहजपणें जेवढें अंगचें सामर्थ्य आहे, तेवढ्या सामर्थ्यानें, जर अभ्यास सिद्ध होत असेल, तर या योमार्गाचाच आनंदाने अभ्यास करीन. ॥ ३३४ ॥ किंवा देवा! आपण जसें सांगितलें तसे माझ्याकडून होण्याजोगे नसेल, तर योग्यतेची आवश्यकता नाही, असेंच एखादें साधन विचारीन. ॥ ३३५ ॥ माझ्या मनाची अशी समजूत झाली, म्हणून पुसण्याला कारण झालें. मग अर्जुन म्हणाला, देवा! इकडे लक्ष द्या. ॥ ३३६ ॥ अहो देवा! तुम्ही हें जें सांगितलें ते माझ्या पूर्ण लक्षांत आलें, पण अभ्यास केला असतां, वाटेल त्याला हा योग प्राप्त होतो!॥ ३३७ ॥ की योग्यते वांचून साधूं शकत नाही असे कांही आहे? तेव्हा श्रीकृष्ण म्हणाले, अर्जुना! हे काय विचारतोस?॥ ३३८ ॥ हें, तर अंतिम प्राप्तीचें साधन आहे, पण आणखीहि ज्या कांही साधारण प्राप्ती असतात, त्याहि देखील अधिकाराची योग्यता असल्यावांचून सिद्धीस जातात काय?॥ ३३९ ॥ आणि योग्यता जी आपण म्हणतो, ती तरी प्राप्तीवरूनच जाणली जाते. आपण योग्य होऊन कार्याला आरंभ केला की तो प्रयत्न सफल होतोच. ॥ ३४० ॥ म्हणून या योगमार्गांत, खरोखर तसा कांही प्रकार नाही आणि योग्यतेची खाण असते की काय?॥ ३४१ ॥ योगाभ्यास सिद्ध होईपर्यंत विषयसुखाचा वीट येऊन, देहादिकांच्या व्यापारांचे नियमन केलें, तर तोच योग्य अधिकारी होणार नाही काय?॥ ३४२ ॥ अशा प्रकारच्या प्राप्तीची इच्छा झाल्यास एवढी लागणारी योग्यता, तुझ्या ठिकाणींहि आहे, असें म्हणून त्याच्या संशयरूप संकटाचें निवारण केलें. ॥ ३४३ ॥ मग भगवान म्हणतात, अर्जुना! योगाभ्यासाची योग्यता संपादन करण्याकरितां अशी व्यवस्था असायला पाहिजे. जो स्वैर वागणारा आहे, त्याला योग्याभ्यासाची योग्यता नसतें. ॥ ३४४ ॥

**नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकान्तमनश्नतः । न चाति स्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ॥ १६ ॥**

**अर्थ**—अति खाणाऱ्याला, मुळींच न खाणाऱ्याला, अति झोंपणाऱ्याला किंवा मुळींच झोंप न घेणाऱ्याला अर्जुना! योग साधत नाही. ॥ १६ ॥

**जो रसनेंद्रियाचा अंकिला। कां निद्रेसी जीवें विकला। तो नाहीं एथ म्हणितला। अधिकारिया ॥ ३४५ ॥**
**अथवा आग्रहाचिये बांदोडी। क्षुधा तृषा कोंडी। आहारातें तोडी। मारूनियां ॥ ३४६ ॥**
**निद्रेचिया वाटा न वचे। ऐसा दृढिवेचेनि अवतरणें नाचे। तें शरीरचि नव्हे तयाचें। मा योगु कवणाचा ॥ ३४७ ॥**
**म्हणोनि अतिशयें विषय सेवावा। तैसा बोधु नहावा। कां सर्वथा निरोध करावा। हेंही नको ॥ ३४८ ॥**

**अर्थ**—जो भेदाच्या सर्वस्वीं स्वाधीन आहे किंवा झोंपेला विकला गेला, असा पुरुष योगाभ्यासाचा अधिकारी सांगितला नाही. ॥ ३४५ ॥ किंवा आग्रहाचे तावडींत जाऊन भूक तहानेचा कोंडमारा करून, आहारादि न घेतां भूक तहान मारतो. ॥ ३४६ ॥ निद्रेच्या मार्गानें कधी जायचें नाही-म्हणजे झोप घ्यायची नाही-असा दृढ निश्चय अंत:करणांत धरून जो वागतो, त्याचें शरीरच, त्याचे स्वाधीन राहत नाही, मग योग कोठून साधला जाणार?॥ ३४७ ॥ म्हणून योगाभ्यासाकरितां मन मानेल तसे विषय भोगले तरी हरकत नाही, असा समज करून घेऊं नये. किंवा सर्वथा विषयसेवन वर्ज्य केलें पाहिजे, असेहि समजूं नये. ॥ ३४८ ॥

**युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु । युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥ १७ ॥**

**अर्थ**—शास्त्रोक्त आहारविहार करणारा, शास्त्रानुसार नियमित देहादिकांचे व्यापार करणारा, झोंपणें व जागणें हेंहि जो नियमितच करतो, त्याला योग हा दु:खांचा नाश करणारा होतो. ॥ १७ ॥

**आहार तरी सेविजे। परी युक्तीचेनि मापें मविजे। क्रियाजात आचरिजे। तयाचि स्थिती ॥ ३४९ ॥**

**अर्थ**—आहार घ्यावा तो देखील परिमित युक्तीच्या मापाने मोजलेला घ्यावा त्याचप्रमाणे सर्व क्रियाहि शरीराला थकवा वाटणार नाही अशा नियमित कराव्या. ॥ ३४९ ॥

**गूढार्थदीपिका—युक्तीचेनि मापें मविजे**—आळस, निद्रा वाढणार नाही, क्षुधेची पीडा होणार नाही आणि

शरींराचे ठिकाणी हलकेपणा राहून अभ्यास करावयास उल्हास वाटेल इतका व असा आहार असावा.

**मापितला बोली बोलिजे। मितलिया पाउलीं चालिजे। निद्रेही मानु दीजे। अवसरें एकें॥ ३५०॥**
**जागणें जरी जाहलें। तरी व्हावें तें मितलें। येतुलेनि धातुसाम्य संचलें। असेल सुखें॥ ३५१॥**
**ऐसें युक्तीचेनि हातें। जैं इंद्रियां वोपिजे मातें। तैं संतोषासी वाढतें। मनचि करी॥ ३५२॥**

**अर्थ**—बोलणेंहि नियमित मोजकें असावें. तसेंच चालणे देखील नियमित असावें. निद्रेच्या वेळीं तिलाहि मान द्यावा. ॥ ३५० ॥ जागणेंहि परिमितच असावें. अशा रीतीने शरीर योग्य रीतीने चालण्याकरितां शरीरांतील धातूंचें जें प्रमाण असायला पाहिजे तें कायम राहील व प्रकृतिस्वास्थामुळें सुखहि होईल. ॥ ३५१ ॥ अशा युक्तीरूपी हातानें इंद्रियांना विषयाचा भोग दिला असतां, मनाचा संतोष वाढत जातो. ॥ ३५२ ॥

**गूढार्थदीपिका**—"धर्मस्य ह्यापवर्गस्य" (भाग स्कं० १-२-९) धर्म हा परमेश्वर प्राप्तीकरितांच सांगितला आहे असें स्मृतिवचन आहे. ह्या वचनानुसार आर्षधर्मशास्त्रांतून सर्वत्र परमेश्वर प्राप्तीला अनुकूल होतील अशाच रीतीने मनुष्यांनी आपल्या मनइंद्रियांचा निग्रह करून, आहारविहारादि सर्व कर्मे करावीं असें सांगितलें आहे. म्हणून धर्मशास्त्रांचे नियम पाळून, आहारविहार करणारा पुरुष युक्त होतो व त्याला कर्मयोगाची सिद्धि मिळते; असा भाव.

**यदा विनियतं चित्तमात्मन्येवावतिष्ठते । निःस्पृहः सर्वकामेभ्यो युक्त इत्युच्यते तदा॥ १८॥**

**अर्थ**—जेव्हां बाह्य विषयांपासून आवरलेलें चित्त सर्व विषयसुखाची इच्छा सोडून, आत्मस्वरूपाचे ठिकाणीं स्थिर होतें तेव्हा तें युक्त म्हटलें जातें. ॥ १८ ॥

**बाहेर युक्तीची मुद्रा पडे। तंव आंत सुख वाढे। तेथें सहजेंचि योगु घडे। नाभ्यासितां॥ ३५३॥**

**अर्थ**—बाहेर मन, इंद्रिये व शरीर यांचा शास्त्रमर्यादेने व्यापार झाला असतां, अंतःकरणांत सुख वाढत जाते. अशा रीतीने अभ्यास न करतांच योग घडत जातो. ॥ ३५३ ॥

**गूढार्थदीपिका**—योगाभ्यासाने आत्मस्वरूपाचे ठिकाणीं, मन ऐक्य पावून जें आत्मसुख प्राप्त होतें, तेंच आत्मसुख, विषयसुख भोगण्याची इच्छा सोडून, केवळ परमेश्वर आज्ञा समजून, परमेश्वराचे ठिकाणीं चित्त ठेवून, अत्यंत निष्ठेने शास्त्रमर्यादा पाळणाऱ्या कर्मयोग्यांना प्राप्त होतें, असा भाव.

**जैसें भाग्याचिये भडसें। उद्यमाचेनि मिसें। मग समृद्धिजात आपैसें। घर रिघे॥ ३५४॥**
**तैसा युक्तिमंतु कौतुकें। अभ्यासाचिया मोहरा ठाके। आणि आत्मसिद्धीचि पिके। अनुभवु तयाचा॥ ३५५॥**
**म्हणोनि युक्ति हे पांडवा। घडे जया सदैवा। तो अपवर्गीचिये राणिवा। अळंकरिजे॥ ३५६॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे भाग्याचा उदय होण्याचा काल आला असतां, भाग्य भरभरून येतें न नुसतें प्रयत्नाचें निमित्त होऊन आपोआप सर्व संपत्ति घरांत शिरते. ॥ ३५४॥ त्याप्रमाणे मित आहारविहारादि युक्तीने वागणारा पुरुषहि, सहजच अभ्यासाच्या मार्गासच लागला असतो आणि त्याच्या अनुभवाला आत्मसिद्धीचें पीक येतें. ॥ ३५५ ॥ म्हणून ज्या भाग्यवानाला मनइंद्रियें स्वाधीन ठेवण्याची ही युक्ति साधली तो मोक्षाच्या राज्यप्राप्तीने शोभिवंत होतो. ॥ ३५६ ॥

**यथा दीपो निवातस्थो नेङ्गते सोपमा स्मृता । योगिनो यतचित्तस्य युञ्जतो योगमात्मनः॥ १९॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे निर्वात ठिकाणच्या दिव्याची ज्योति यत्किंचित् न हालतां सरळ राहते, तशा ज्योतीचीच उपमा, चित्त स्वाधीन करून तें आत्मस्वरूपाकडे लावणाऱ्या योग्याच्या चित्ताला दिलेली आहे. ॥ १९ ॥

**युक्ति योगाचें आंग पावे। ऐसें प्रयाग जेथ होय बरवें। तेथ क्षेत्रसंन्यासें स्थिरावें। मानस जयाचें॥ ३५७॥**
**तयातें योगयुक्त म्हण। हेंही प्रसंगें जाण। तें दीपाचें उपलक्षण। निर्वातींचिया॥ ३५८॥**
**आतां तुझें मनोगत जाणोनि। कांहीं एक आम्ही म्हणोनि। तें निकें चित्त देऊनी। परिसावें गा॥ ३५९॥**
**तूं प्राप्तीची चाड वाहसी। परि अभ्यासीं दक्षु नव्हसी। तें सांग पां काय बिहसी। दुवाडपणा॥ ३६०॥**
**तरी पार्था हें झणें। सायास घेशी हो मनें। वायां बागूल इये दुर्जनें। इंद्रियें करिती॥ ३६१॥**
**पाहें पां आयुष्याचा अढळ करी। जें सरतें जीवित वारी। तया औषधातें वैरी। काय जिव्हा न म्हणे॥ ३६२॥**

**ऐसें हितासि जें जें निकें। तें सदाचि या इंद्रियां दुखे। एऱ्हवीं सोपें योगासारिखें। कांहीं आहे॥ ३६३॥**

**अर्थ**—गंगा यमुना यांचा प्रयागक्षेत्रांत जसा संगम झाला, तसा परिमितपणा हे योगाचें अंग होऊन झालेल्या उत्तम प्रयागक्षेत्राचे ठिकाणीं, ज्याचें मन कायमचे स्थिर झालें.॥ ३५७॥ अर्जुना! त्यालाच योगयुक्त तूं जाण. हेहि प्रसंगोपात्त तूं लक्षात ठेव की त्यां योग्याच्या चित्ताच्या स्थिरतेला निर्वात ठिकाणच्या दिव्याचीच उपमा देतां येईल.॥ ३५८॥ आतां तू ज्या अभिप्रायाला धरून शंका काढलीस, तो तुझ्या मनांतील अभिप्राय जाणून जे कांही मी म्हणेन, ते लक्ष देऊन ऐक.॥ ३५९॥ तुला ब्रह्मस्थिति प्राप्त व्हावी असें तर वाटतें, पण योगाभ्यास करायला कचरतोस. योगमार्गात फार कष्ट आहेत असें समजून भितोस की काय? सांग बरें॥ ३६०॥ कदाचित् तूं आपल्या मनांत हा योगमार्ग फार कष्टदायक आहे अशी समजूत करून घेशील, पण अर्जुना! हीं दुर्जय इंद्रियें, या योगाभ्यासाचा बागुलबोवा निर्माण करितात.॥ ३६१॥ अर्जुना! पहा. जे आयुष्याला स्थिर करते व जीवितयात्रेंचें संपणें टाळतें, त्या औषधाला ही आपली जिव्हा वैरी समजत नाही काय?॥ ३६२॥ याप्रमाणे जे जें आपल्या कल्याणाचें असतें तें तें या इंद्रियांना दुःखदायक वाटतें वास्तविक योगासारखे सोपें कांही आहे काय?॥ ३६३॥

**यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया। यत्र चैवात्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति॥ २०॥**

**अर्थ**—या योगाभ्यासाने निरुद्ध झालेलें मन विषयाला विसरतें व चित्ताला आत्मदर्शन होऊन, तें आत्म्यातच तल्लीन होते.॥ २०॥

**म्हणोनि आसनाचिया गाढिका। जो आम्हीं अभ्यासु सांगितला निका। तेणें होईल तरी हो कां। निरोधु यया॥ ३६४॥**
**एऱ्हवीं तरी येणें योगें। जैं इंद्रियां विंदाण लागे। तैं चित्त भेटों रिगे। आपणपेयां॥ ३६५॥**
**परतोनि पाठिमोरें ठाके। आणि आपणियांतें आपण देखे। देखतखेवों वोळखे। म्हणे तत्त्व तें मी॥ ३६६॥**

**अर्थ**—म्हणून सांगितलेल्या दृढ आसनाच्या सहायाने आम्ही जो उत्तम अभ्यास सांगितला, त्याच्याने मन इंद्रियें यांचा निरोध झाला तर होईल.॥ ३६४॥ येऱ्हवीं या योगाभ्यासाने जेव्हा इंद्रियांना नियमितपणाचा वेध लागतो, तेव्हा चित्त आपल्या मूळ स्वरूपाला आपोआप भेटायला जातें.॥ ३६५॥ परतून पाठमोरें होतें, तेव्हा आपणच आपल्याला पाहतें. पाहिल्याबरोबर हेंच तत्त्व मी आहे-म्हणजे हेच माझें स्वरूप आहे—असें तें म्हणते.॥ ३६६॥

**सुखमात्यन्तिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतीन्द्रियम्। वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः॥ २१॥**

**अर्थ**—इंद्रियांच्या पलीकडे असलेलें, बुद्धीनेच ज्याचें ग्रहण केलें जातें असें जें आत्यंतिक सुख, तें तो अनुभवितो व त्या सुखांतच राहून तेथून कधी बाहेर येत नाही.॥ २१॥

**तिये ओळखीचिसरिसें। सुखाचियां साम्राज्यीं बैसे। चित्तपण समरसें। विरोनि जाय॥ ३६७॥**
**जयापरतें आणिक नाहीं। जयातें इंद्रियें नेणती कहीं। तें आपणचि आपुला ठायीं। होऊनि ठाके॥ ३६८॥**

**अर्थ**—त्या ओळखी बरोबर सुखाच्या साम्राज्यावर तो आरूढ होतो व मग त्या सुखाशीं समरस होऊन विरून जातो.॥ ३६७॥ ज्या समरस सुखस्थितीपेक्षां दुसरे कांही श्रेष्ठ नाही व ज्या स्थितीला इंद्रियें कधींच जाणत नाहीत, ती सुखस्थिति आपणच आपल्या ठिकाणीं होऊन राहतो.॥ ३६८॥

**यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः। यस्मिन्स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते॥ २२॥**

**अर्थ**—जें सुख प्राप्त झालें असतां, त्यापेक्षां त्याला कोणताच सुखलाभ श्रेष्ठ वाटत नाही व त्या सुखांत निमग्न राहून, अत्यंत भयंकर दुःखानेहि ती स्थिती नाहिशी होत नाही.॥ २२॥

**मग मेरूपासूनि थोरे। देह दुःखाचेनि डोंगरें। दाटिजो पां परि भारें। चित्त न दटे॥ ३६९॥**
**कां शस्त्रवरी तोडिलिया। देह अग्निमाजी पडलिया। चित्त महासुखीं पहुडलिया। चेवोचि नये॥ ३७०॥**
**ऐसे आपणपां रिगोनि ठाये। मग देहाची वास न पाहे। आणिकचि सुख होऊनि जाये। म्हणूनि विसरे॥ ३७१॥**

**अर्थ**—मग मेरुपर्वताहून थोर अशा दुःखाच्या डोंगराच्या भाराने खालीं जरी दडपला गेला, तरी त्याचें चित्त दडपलें जात नाही—म्हणजे तो दुःखी होत नाही.॥ ३६९॥ किंवा शस्त्राने त्याचें शरीर तोडलें अथवा त्याचा देह

अग्नींत पडला, तरी त्याचें चित्त जें महासुखांत निंजलें असतें, तें जागे होत नाही. ॥ ३७० ॥ याप्रमाणे योगी आपल्यांतच मिळून राहतो व त्याला देहाची आठवणच होत नाही; कारण तो अनिर्वाच्य सुखस्वरूप होऊन राहतो म्हणून त्याला सर्व विसर पडतो. ॥ ३७१ ॥

**तं विद्याद् दु:खसंयोगवियोगं योगसञ्ज्ञितम् । स निश्चयेन योक्तव्यो योगोऽनिर्विण्णचेतसा ॥ २३ ॥**

**अर्थ**—नि:शेष दु:खसंबंधरहित होणे यालाच योग हें नांव आहे, असें जाणावें. दृढ निश्चयाने व यत्किंचित्हि न कंटाळता उल्हासयुक्त मनाने योगाचा अभ्यास करावा. ॥ २३ ॥

**जया सुखाचिया गोडी। मन आर्तीची सेचिं सोडी। संसाराचिया तोंडीं। गुंतलें जें ॥ ३७२ ॥**
**जें योगाची बरव। संतोषाची राणीव। ज्ञानाची जाणीव। जयालागीं ॥ ३७३ ॥**
**तें अभ्यासिलेनि योगें। सावयव देखावें लागे। देखिलें तरी आंगें। होइजेल गा ॥ ३७४ ॥**

**अर्थ**—संसारांतील विषयसुखाच्या ठिकाणीं आसक्त असलेले मन, ज्या योगसुखाच्या गोडीने विषयसुखाची आठवण विसरतें. ॥ ३७२ ॥ जें सुख योगाचें सर्वस्व सार होय, जें समाधानाचें राज्य होय, ज्याच्याकरितां ज्ञानाची जाणीव प्राप्त करावयाची असतें. ॥ ३७३ ॥ तें योगाचा अभ्यास केल्याने साक्षात् अनुभविलें जाते व अनुभवले असतां, आपण स्वत:च तद्रूप होऊन जातो. ॥ ३७४ ॥

**संकल्पप्रभवान्कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषत: । मनसैवेन्द्रियग्रामं विनियम्य समन्तत: ॥ २४ ॥**
**शनै: शनैरुपरमेद्बुद्ध्या धृतिगृहीतया । आत्मसंस्थं मन: कृत्वा न किञ्चिदपि चिन्तयेत् ॥ २५ ॥**

**अर्थ**—विषयांत सुख आहे या संकल्पापासून उत्पन्न झालेल्या विषयभोगाच्या वासना नि:शेष सोडून देऊन व सर्व बाजूने मनाने इंद्रियांचें नियमन करून. ॥ २४ ॥ धैर्यानें हळुहळु बुद्धीलाही आवरावे म्हणजे बुद्धीला अत्यंत धैर्ययुक्त करावें व मनाला आत्मस्वरूपाचे ठिकाणीं स्थिर करून, कशाचेंहिं चिंतन करू नये. ॥ २५ ॥

**परि तोचि योगु बापा। एके परी आहे सोपा। जरी पुत्रशोकु संकल्पा। दाखविजे ॥ ३७५ ॥**

**अर्थ**—बा अर्जुना! या एका मार्गानें योग सोपा होऊं शकतो-म्हणजे सुलभ प्राप्त होऊं शकतो. संकल्पाला पुत्रशोक उत्पन्न करून द्यावा. ॥ ३७५ ॥

**गूढार्थदीपिका**—"श्रुते दृष्टेऽपि वा भोग्ये यस्मिन्कस्मिंश्च वस्तुनि। समीचीनत्वधी" शास्त्रांतून किंवा दुसऱ्याच्या मुखाने ऐकलेल्या पाहिलेल्या अशा कोणत्याहि भोग्य वस्तूविषयीं, ही चांगलीं आहेत अशी जी बुद्धि होते त्याला संकल्प म्हणतात व त्या वस्तूच्या प्राप्तीची इच्छा हा काम होय. संकल्पापासून काम होतो—म्हणजे वस्तु चांगली आहे असे मनाला वाटतें, तेव्हाच त्या वस्तूच्या प्राप्तीची इच्छा होते. म्हणून काम हा संकल्पाचा पुत्र होय.

**हा विषयांतें निमालिया आइके। इंद्रियें नेमाचिया धारणीं देखे। तरी हियें घालूनि मुके। जीवितासी ॥ ३७६ ॥**

**अर्थ**—हा संकल्प, विषय नाहीसे झाले असें ऐकून व इंद्रिये नेमाच्या बंधांत सांपडलीं आहेत असें पाहून, हाय खाऊन एकदम प्राण सोडतो. ॥ ३७६ ॥

**गूढार्थदीपिका—विषयांते निमालिया**—अद्वैत आत्मस्वरूपाचे ठिकाणीं आत्मस्वरूपाहून भिन्न असे विषय राहणें शक्य नाही; म्हणून ते केवळ मन:कल्पित आहेत असे आत्मविचाराने कळून येते व विषयांचे अस्तित्व नाहीसे होतें.

**इंद्रियें नेमाचिया धारणीं देखे**—पण विषयांचे ठिकाणीं आसक्त असलेल्या इंद्रियांमुळें, पुन: पुन: अविवेकाने विषयांचे अस्तित्व स्वीकारलें जातें. इंद्रियांचीं स्वैर विषयप्रवृत्ति, शास्त्रनियमाने नियमित केली असतां, इंद्रियांची विषयासक्ति क्षीण होत जाते. याप्रमाणे "तेसें संसारा या समस्तां। जाणिजें जै अनित्यता। तै वैराग्य दवडितां। पाठी लागे" (ज्ञा० अ० १५-३९) आत्मविचाराने विषय हे अनित्य म्हणजे मन:कल्पित आहेत, हे बुद्धींत दृढ झाले असतां, विषयवैराग्य उत्पन्न होतें आणि त्या वैराग्यानेच "विरक्तीवांचूनि कहीं। ज्ञानासी तगणेचि नाहीं" ज्ञान दृढ होते. अशा रीतीने ज्ञानाने वैराग्य व वैराग्याने ज्ञान दृढ झाले असतां, संकल्प नाहीसा होतो व त्याबरोबर सर्व विषयवासना नाहीशा होऊन बुद्धि आत्मस्वरूपाचे ठिकाणीं स्थिर होते.

**ऐसें वैराग्य हें करी। तरी संकल्पाची सरे वारी। सुखें धृतीचिया धवळारीं। बुद्धि नांदे॥ ३७७॥**
**बुद्धि धैर्या होय वसौटा। तरी मनातें अनुभवाचिया वाटा। हळु हळु करी प्रतिष्ठा। आत्मभुवनीं॥ ३७८॥**
**याही एके परी। प्राप्ति आहे विचारीं। हें न ठके तरी सोपारी। आणिक ऐकें॥ ३७९॥**

अर्थ—वैराग्य हातीं आलें असतां संकल्पाची यात्राच संपते—म्हणजे संकल्पच उठत नाही आणि बुद्धि आनंदाने धैर्याच्या मंदिरात नांदते (म्हणजे ती धैर्य कधी सोडतच नाही व अत्यंत धैर्यसंपन्न होते असा अर्थ) ॥ ३७७ ॥ याप्रमाणे जर बुद्धि धैर्याला आश्रय होऊन बसली, तर तीं अनुभवाच्या मार्गाने हळुहळु आत्मस्वरूपाचे ठिकाणीं स्थिर होते. ॥ ३७८ ॥ याहि एका मार्गाने, अर्जुना! ब्रह्मप्राप्ति होऊं शकते. पहा, हाहि मार्ग साधत नसेल, तर आणखीं दुसरा मार्ग सांगतो, ऐक. ॥ ३७९ ॥

**यतो यतो निश्चरति मनश्चञ्चलमस्थिरम्। ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत्॥ २६॥**

**अर्थ**—हे चंचल व अस्थिर मन ज्या ज्या विषयाकडे बाहेर धावते त्या त्या विषयापासून त्याला आवरून आत्म्याचे स्वाधीन करावें म्हणजे स्थिर करावें. ॥ २६ ॥

**आतां नियमुचि हा एकला। जीवें करावा आपुला। जैसा कृतनिश्चयाचिया बोला-। बाहेरा नोहे॥ ३८०॥**
**जरी येतुलेनि चित्त स्थिरावें। तरी काजा आलें स्वभावें। न राहे तरी घालावें। मोकलुनी॥ ३८१॥**
**मग मोकलिलें जेथ जेथ जाईल। तेथूनि नियमूचि घेऊनि येईल। ऐसेनि स्थैर्याची होईल। सवे यया॥ ३८२॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे केलेला निश्चय टळूं देऊं नये त्याप्रमाणे साधकाने आपण एक नियमरूपच होऊन राहावे. ॥ ३८० ॥ जर एवढ्याने चित्त स्थिर झालें तर सहज कार्य झालें. जर तें तेवढ्याने स्थिर झाले नाहीं, तर मनाला मोकळें सोडावे. ॥ ३८१ ॥ मग तें मोकळें सोडलेलें मन, जेथे जाईल तेथून नियमित होऊनच येईल. अशा रीतीने निश्चयाने मनाचे स्थैर्य साधेल. ॥ ३८२ ॥

**गूढार्थदीपिका**—स्वैर सोडलेल्या मनाला दु:खच प्राप्त होतें व त्या दु:खाने तें शेवटीं विषयभोगास कंटाळून स्थिर होते.

**प्रशान्तमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम्। उपैति शान्तरजसं ब्रह्मभूतमकल्मषम्॥ २७॥**
**युञ्जन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मषः। सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यन्तं सुखमश्नुते॥ २८॥**

**अर्थ**—अशा शांतचित्त झालेल्या योग्याला ज्यांत रजोगुणात्मक मोहादि दु:ख नाही व अधर्मरूप पापहि नसून जें ब्रह्मस्वरूप आहे असें परम सुख प्राप्त होतें. ॥ २७ ॥ जो योगी पापपुण्यरहित होऊन सदा आपलें मन आत्मस्वरूपाकडे लावतो, त्याला ब्रह्मप्राप्तीने होणारे अत्यंत सुख अनायासें प्राप्त होतें. ॥ २८ ॥

**पाठीं केतुलेनि एके वेळे। तया स्थैर्याचेनि मेळें। आत्मस्वरूपाजवळें। येईल सहजें॥ ३८३॥**
**तयातें देखोनि आंगा घडेल। तेथ अद्वैतीं द्वैत बुडेल। आणि ऐक्यतेजें उघडेल। त्रैलोक्य हें॥ ३८४॥**

**अर्थ**—नंतर कांही काळाने चित्त अत्यंत स्थिर झाल्यामुळे तें सहजच आत्मस्वरूपाजवळ येईल. ॥ ३८३ ॥ नंतर आत्मस्वरूपाला पाहून तें त्याच्या अंगाशीं मिळून जाईल—म्हणजे तद्रूप होईल. अशा स्थितींत द्वैत नाहीसें होऊन एक अद्वैतच राहील व हें सर्व त्रैलोक्य ऐक्यरूपज्ञानप्रकाशाने प्रकाशित होईल—म्हणजे जीव, जगत्, ब्रह्म असा भेद न राहतां, एक सर्वत्र ब्रह्मचैतन्यच भरलें आहे असा अनुभव येईल. ॥ ३८४ ॥

**गूढार्थदीपिका—ऐक्यतेजें उघडेल। त्रैलोक्य हें**—येथें श्रीज्ञानेश्वर माऊलींनी आत्मज्ञानाचा किंवा ब्रह्मज्ञानाचा पूर्ण अपरोक्ष अनुभव सगुणच असतो, असें दाखविलें आहे. ज्याप्रमाणें अव्यक्त किंवा निर्गुण सोन्याचें ज्ञान, सोनें आहे असें केवळ सत्ता रूपाने होतें, पण त्याचें प्रत्यक्ष ज्ञान मात्र अलंकाराचे रूपाने होतें, त्याप्रमाणे निर्गुणब्रह्माचें ज्ञानहि सच्चिदानंद ब्रह्म आहे असे केवळ सत्तारूपानेच होते आणि जेव्हा जगाशीं अद्वैतरूपाने त्याचें ज्ञान होते तेव्हाच तें पूर्ण अपरोक्ष होते. हे "ऐक्य तेजें उघडेल। त्रैलोक्य हें" या चरणांनी दाखविलें आहे.

"म्हणे म्यां सोनेंचि पहावें दिठीं। तरी पुढें ठेविजेल खोटी। परी खोटी वेगळी भेटी। सुवर्णी न घडे"॥ ८६॥

(स्वात्मसुख) नाथांनीहि म्हटलें आहे की सोनें प्रत्यक्ष पहावयाचें असल्यास कोणत्या तरी आकारांत तें समोर घ्यावयास पाहिजे. आकारावांचून सोनें प्रत्यक्ष होणें शक्य नाही'' ''तैसें जगदाकारें प्रकाशे। निर्विकार आत्मा'' त्याप्रमाणे निर्विकार आत्मस्वरूपाचें प्रत्यक्ष ज्ञानहि आत्मस्वरूपाला जगद्रूपाशीं अभिन्न पाहूनच होऊं शकतें. दुसऱ्या रीतीनें होऊं शकत नाही. सोन्याचें ज्ञान व अलंकाराचें ज्ञान जसें अभिन्नरूपानेच होतें, म्हणजे सोन्याच्या ठिकाणी अलंकाराच्या आकाराचें ज्ञान व अलंकाराच्या आकाराचे ठिकाणी सोन्याचें ज्ञान होतें, त्याप्रमाणे निर्गुणाचें ज्ञान व सगुणाचें ज्ञान नेहमीं अभिन्नरूपानेंच होतें, एकमेकांपासून निराळे काढून होत नाही.

**आकाशीं दिसे दुसरें। तें अभ्र जैं विरे। तैं गगनचि कां भरे। विश्व जैसें॥ ३८५॥**
**तैसें चित्त लया जाये। आणि चैतन्यचि आघवें होये। ऐसी प्राप्ति सुखोपायें। आहे येणें॥ ३८६॥**
**या सोपिया योगस्थिती। उकलु देखिला गा बहुतीं। संकल्पाचिया संपत्ती। रुसोनियां॥ ३८७॥**
**ते सुखाचेनि सांगातें। आलें परब्रह्मा आंतौते। तेथ लवण जैसें जळातें। सांडूं नेणे॥ ३८८॥**
**तैसें होय तिये मेळीं। मग सामरस्याचिया राउळीं। महासुखाची दिवाळी। जगेंसि दिसे॥ ३८९॥**

**अर्थ**—आकाशांत अभ्र आलें असतां, तें अभ्र आकाशाहून निराळें दिसतें, मग अभ्र जेव्हा नाहीसें होतें, तेव्हा सर्वत्र जिकडें तिकडे जगांत आकाशच भरलेलें दिसतें. ॥ ३८५ ॥ त्याप्रमाणें चित्ताचा लय झाला की सर्व दूर चेतनाचाच अनुभव येतो. या योगाने अशा सुलभ रीतीने आत्मप्राप्ति होते. ॥ ६८६ ॥ संकल्पानुसार प्राप्त होणाऱ्या संपत्तीचा—म्हणजे सर्व प्रकारच्या विषयसुखाच्या कामनेचा—कंटाळा उत्पन्न होऊन, पुष्कळ लोकांनी या सोप्या योगस्थितीच्या द्वारा आत्मस्वरूपाचा उलगडा किंवा निर्णय करून घेतला—म्हणजे आपल्या खऱ्या आत्मस्वरूपाचा अनुभव घेतला. ॥ ३८७ ॥ ते आत्मस्वरूपाच्या अत्यंत सुखाचा अनुभव घेऊन परब्रह्मांत मिळतात; मग मीठ पाण्यांत मिळाल्यावर जसें पाण्याहून अलग होत नाही. ॥ ३८८ ॥ त्याप्रमाणेच परब्रह्माशीं मिळणें होतें. त्या समरसतेच्या मंदीरांत जगासह ते महासुखाची दिवाळी पाहतात. ॥ ३८९ ॥

**गूढार्थदीपिका**—जगाची जडविनाशी दुखरूप व ब्रह्माहून भिन्न जी वस्तुस्थिति ती नाहीशी होऊन, तो सर्व संसार ब्रह्मसुखाचा होतो.

**ऐसें आपुले पायवरी। चालिजे आपुले पाठीवरी। हें पार्था नागवे तरी। आन ऐकें॥ ३९०॥**

**अर्थ**—अर्जुना! असा हा आपल्या पायाने आपल्या पाठीवर चालण्याचा मार्ग आहे. मार्ग आटोक्यांत येत नसेल, तर दुसरा मार्ग ऐक. ॥ ३९० ॥

**सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि। ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः॥ २९॥**
**यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति। तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति॥ ३०॥**

**अर्थ**—जो, सर्व भूतांचे ठिकाणीं मी आहे व माझे ठिकाणीं सर्व भूतें आहेत असे पहातो. किंवा सर्व चराचर सृष्टीचे ठिकाणीं एक ब्रह्मच भरलें आहे असें जो पाहतो त्याचें अंतःकरण आत्मस्वरूपाचे ठिकाणीं स्थिर झालेलें असतें. ॥ २९ ॥ जो मला सर्व वस्तुमात्रांत पाहतो व सर्व वस्तुमात्र माझे ठिकाणी पाहतो, त्याला मी अंतरत नाही व तो मला अंतरत नाही. ॥ ३० ॥

**तरि मी तंव सकळ देहीं। असें एथ विचारु नाहीं। आणि तैसेंचि माझ्या ठायीं। सकळ असे॥ ३९१॥**
**हें ऐसेंचि संचलें। परस्परें मिसळलें। बुद्धि घेपे एतुलें। होआवें गा॥ ३९२॥**
**एऱ्हवीं तरी अर्जुना। जो एकवटलिया भावना। सर्वभूतीं अभिन्ना। मातें भजे॥ ३९३॥**
**भूतांचेनि अनेकपणें। अनेक नोहे अंतःकरणें। केवल एकत्वचि माझें जाणे। सर्वत्र जो॥ ३९४॥**
**मग तो एक हा मियां। बोल्तां दिसतसे वायां। एऱ्हवीं न बोलिजे तरि धनंजया। तो मीचि आहें॥ ३९५॥**
**दीपा आणि प्रकाशा। एकवंकीचा पाडु जैसा। तो माझां ठायीं तैसा। मी तयामाजीं॥ ३९६॥**
**जैसा उदकाचेनि आयुष्यें रसु। कां गगनाचेनि मानें अवकाशु। तैसा माझेनि रूपें रूपसु। पुरुषु तो गा॥ ३९७॥**

**अर्थ**—अर्जुना! तरी मी सर्व देहांत आहे, तसेंच सर्व प्राणिमात्र माझ्या ठिकाणीं आहेत यांत शंकाच नाहीं. ॥ ३९१ ॥ अशी कायमचीच स्थिति आहे व परस्परात मिसळलेले आहेत असें बुद्धीने ग्रहण केलें जाईल, एवढें आपण व्हावयास पाहिजे. ॥ ३९२ ॥ एरव्हीं अर्जुना! जो, सर्व भूतांचे ठिकाणीं एक परमात्मवस्तुच भरली आहे, अशा एकवस्तुभावनेने किंवा अद्वैत भावनेने सर्व भूतांचे ठिकाणीं असणाऱ्या माझें भजन करतो. ॥ ३९३ ॥ भूतांचे अनेकपण दिसत असलें, तरी अंत:करणाने भूतांचे अनेकपण घेतलें जात नाही; उलट सर्वत्र मी केवळ एकच आहे असेंच तो जाणतो. ॥ ३९४ ॥ तो मग माझ्याशीं एक झाला हें बोलणेंच व्यर्थ आहे, कारण हें बोललें नाही, तरी अर्जुना! तो मीच आहे (म्हणजे माझ्याशी ऐक्य पावलेलाच आहे). ॥ ३९५ ॥ दिवा व दिव्याचा प्रकाश, या दोन्ही ठिकाणीं दोघांचें ऐक्य मानण्याजोगी, ज्या तऱ्हेची त्यांची बरोबरी आहे, त्याप्रमाणे तो माझ्या ठिकाणीं आहे व मी त्याचे ठिकाणीं आहे. ॥ ३९६ ॥ ज्याप्रमाणे पाण्याचें आयुष्य म्हणजेच रसाचें आयुष्य होय किंवा आकाशाची व्यापकता म्हणजे अवकाश अथवा पोकळीची व्यापकता असते, त्याप्रमाणे माझ्या रूपानेच तो पुरुष असतो. ॥ ३९७ ॥

**सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थितः। सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते॥ ३१ ॥**

**अर्थ**—सर्व भूतमात्राचे ठिकाणीं माझेंच एक वस्तुत्व किंवा मीच एक वस्तु आहे असें जाणून जो माझें भजन करतो, तो देहादिकांसह असला तरी सर्वथा तो माझ्याशींच मिळालेला असतो. ॥ ३१ ॥

**जेणें ऐक्याचिये दिठी। सर्वत्र मातेंचि किरीटी। देखिला जैसा पटीं। तंतु एकु॥ ३९८॥**
**कां स्वरूपें तरी बहुतें आहाती। परी तैसीं सोनीं बहुवें न होती। ऐसी ऐक्याचळाची स्थिती। केली जेणें॥ ३९९ ॥**
**नातरी वृक्षांचीं पानें जेतुलीं। तेतुलीं रोपें नाहीं लाविलीं। ऐसी अद्वैतदिवसें पाहली। रात्री जया॥ ४०० ॥**
**तो पंचात्मकीं सांपडे। तरि मग सांग पां कैसेनि अडे। जो प्रतीतीचेनि पाडें। मजसीं तुके॥ ४०१ ॥**
**माझें व्यापकपण आघवें। गवसलें तयाचेनि अनुभवे। तरी न म्हणतां स्वभावें। व्यापकु जाहला॥ ४०२ ॥**
**आतां शरीरीं तरी आहे। परी शरीराचा तो नोहे। ऐसें बोलवरी होये। तें करूं ये काई॥ ४०३ ॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे सर्व वस्त्रांत एक सूतच असतें, त्याप्रमाणे सर्वत्र एक मीच भरलों आहे, अशा या अद्वैत दृष्टीने ज्याने सर्वत्र मला एकालाच पाहिलें. ॥ ३९८ ॥ किंवा ज्याप्रमाणे सोन्यापासून होणाऱ्या अलंकाराचे आकार, पुष्कळ प्रकारचे असले तरी सोनें बहु होत नाही, तें एकच राहतें, त्याप्रमाणे ज्याने आपल्या बुद्धींत माझ्या ऐक्यरूप पर्वताची स्थिति मानिली. ॥ ३९९ ॥ किंवा ज्याप्रमाणे झाडाची जितकीं पानें असतात, तितकीं कांही झाडाची रोपें लाविलीं जात नाहीत. त्याप्रमाणे अशा अद्वैतदृष्टीच्या प्रकाशाने ज्याचा जगत्‌रूपी द्वैतआंधार नाहीसा झाला. ॥ ४०० ॥ अशा रीतीने जो आपल्या अद्वैतज्ञानदृष्टीने माझ्या तुल्य झाला, तो या पांचभौतिक देहात सांपडला असला, तरी त्यांतच कसा अडकून राहील? (म्हणजे मी देहापुरता आहे असें तो आपल्याला मर्यादित कसा समजूं शकेल?) ॥ ४०१ ॥ माझें संपूर्ण व्यापकपण त्याने आपल्या अद्वैत अनुभवाने प्राप्त करून घेतलें असतें; म्हणून तो व्यापक झाला असें न म्हणतां देखील स्वभावत: तो व्यापक होतो. ॥ ४०२ ॥ आतां तो शरीरांत तरी राहतो, पण शरीराचा होत नाही, हे शब्दाने सांगतां येईल असे करतां येईल काय? ॥ ४०३ ॥

**आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन। सुखं वा यदि वा दु:खं स योगी परमो मत:॥ ३२ ॥**

**अर्थ**—सर्व प्राणिमात्र व सुखदु:ख देखील जो आत्मस्वरूप पहातो, तो परमयोगी होय. ॥ ३२ ॥

**म्हणोनि असो तें विशेषें। आपणपेयासारिखें। जो चराचर देखे। अखंडित॥ ४०४॥**
**सुखदु:खादि वर्मे। कां शुभाशुभें कर्मे। दोनी ऐसीं मनोधर्मे। नेणेचि जो॥ ४०५॥**
**हे समविषम भाव। आणिकही विचित्र जें सर्व। तें मानी जैसे अवयव। आपुले होती॥ ४०६॥**
**हें एकैक काय सांगावें। जया त्रैलोक्यचि आघवें। मी ऐसें स्वभावें। बोधा आलें॥ ४०७॥**

**अर्थ**—परंतु अर्जुना! हे विशेष वर्णन असो, किंवा जो पुरुष सर्व चराचरसृष्टि अखंड आपल्यासारखीच पाहतो. ॥ ४०४ ॥ सुखदु:खादिक जीवदशेचें वर्म किंवा पापपुण्यकर्मे ही दोन्ही मनाचे धर्म आहेत असे तो जाणत

नाही. ॥ ४०५ ॥ हें सुखदु:ख व पापपुण्यासारखे समविषम भाव आणि याहून विविध प्रकारचे जे भाव असतील ते सर्व तो आपलेच अवयव आहेत असे मानतो. ॥ ४०६ ॥ अर्जुना! हे एक एक किती सांगू! ज्याला संपूर्ण त्रैलोक्यच मी झालों आहे असा अनुभव आला. ॥ ४०७ ॥

**गूढार्थदीपिका**—ज्याप्रमाणे शरीराचे ठिकाणीं अनेक अवयव असले, तरी ते सर्व अवयव मिळूनच एक शरीर आपण समजतों आणि तें मी आहे असें समजून त्या शरीरावर प्रेम करतों. त्यामुळेच कोणतेहि अवयव आपल्याला आपल्याहून भिन्न वाटत नाहीत व सर्व अवयवांवर आपलें सारखें प्रेम असतें. त्याप्रमाणे सर्व जगतांतील पदार्थमात्र मिळून एक मी अद्वैतवस्तु आहे असा अद्वैतबोध ज्याच्या ठिकाणीं झाला, तोहि ब्रह्मस्वरूपच होतो.

**तयाही देह एकु कीर आथी। लौकिकीं सुखदु:खी तयातें म्हणती। परी आम्हांतें ऐसीचि प्रतीती। परब्रह्मचि हा॥ ४०८ ॥**
**म्हणोनि आपणपां विश्व देखिजे। आणि आपण विश्व होईजे। ऐसें साम्यचि एक उपासिजे। पांडवा गा॥ ४०९ ॥**
**हें तूतें बहुतीं प्रसंगीं। आम्ही म्हणों याचिलागीं। जे साम्यापरौती जगीं। प्राप्ति नाहीं॥ ४१० ॥**

**अर्थ**—त्यांचे ठिकाणींहि देह असतो, साधारण माणसें त्याला सुखदु:ख होतें असें म्हणतात, पण, अर्जुना! तो परब्रह्मच आहे असा आमचा अनुभव असतो. ॥ ४०८ ॥ म्हणून आपल्या ठिकाणीं संपूर्ण जग पाहावें किंवा आपणच सर्व विश्व आहों अशा समदृष्टीचेंच अर्जुना! चिंतन करावें. ॥ ४०९ ॥ साम्यस्थितीपेक्षा दुसरी जगांत श्रेष्ठ प्राप्ति कोणती नाही, हें वेळोवेळीं तुला याच कारणामुळें मी सांगत आलों आहे. ॥ ४१० ॥

*अर्जुन उवाच*

**योऽयं योगस्त्वया प्रोक्तः साम्येन मधुसूदन। एतस्याहं न पश्यामि चञ्चलत्वात्स्थितिं स्थिराम्॥ ३३ ॥**
**चञ्चलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद् दृढम्। तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम्॥ ३४ ॥**

**अर्थ**—अर्जुन म्हणतो, मधुसूदना! हा जो आपण साम्यबुद्धिरूप योग सांगितला त्याची मनाच्या चंचलपणामुळें स्थिर स्थिति राहील असें मला दिसत नाही. ॥ ३३ ॥ हे कृष्णा! हें मन अति चंचल असून, शरीर इंद्रियें यांना क्षोभविणारें आहे, बलवान् आहे व लवकर स्वाधीन होत नाही. अशा मनाचा निग्रह करणें, वायूचा निग्रह करण्यासारखें दुष्कर आहे. ॥ ३४ ॥

**तंव अर्जुन म्हणे देवा। तुम्ही सांगा कीर आमुचिया कणवा। परी न पुरों जी स्वभावा। मनाचिया॥ ४११ ॥**
**हें मन कैसें केवढें। ऐसें पाहों म्हणों तरी न सांपडे। एऱ्हवीं राहाटावया थोडें। त्रैलोक्य यया॥ ४१२ ॥**
**म्हणोनि ऐसें कैंसें घडेल। जे मर्कट समाधी येईल। कां राहे म्हणितलिया राहेल। महावातु॥ ४१३ ॥**
**जें बुद्धीतें सळी। निश्चयातें टाळी। धैर्येसीं हातफळी। मिळऊनि जाय॥ ४१४ ॥**
**जें विवेकातें भुलवी। संतोषासी चाड लावी। बैसिजे तरी हिंडवी। दाही दिशा॥ ४१५ ॥**
**जें निरोधलें घे उवावो। जया संयमुचि होय सावावो। तें मन आपुला स्वभावो। सांडील काई॥ ४१६ ॥**
**म्हणोनि मन एक निश्चळ राहेल। मग आम्हांसि साम्य येईल। हें विशेषेंही न घडेल। याचिलागीं॥ ४१७ ॥**

**अर्थ**—तेव्हा अर्जुन म्हणतो, देवा! खरोखर तुम्ही आमच्या अत्यंत प्रेमाने आमची कींव करतां व हा उपदेश करतां यांत शंका नाही, पण आम्ही या मनाच्या स्वभावाला पुरें पडत नाही. ॥ ४११ ॥ हें मन कसें आहे, केवढें आहे, हें जर पाहूं म्हटलें तर हातीं सांपडत नाही; पण त्याच्या भटकण्यास त्रैलोक्यहि कमीच पडतें. ॥ ४१२ ॥ म्हणून जें हें मन अत्यंत मर्कट-म्हणजे चंचल-आहे तें स्थिर होईल असें कसें शक्य आहे? सोसाट्याच्या वाऱ्याला, वाहणें थांबीव म्हटल्यास त्याचें वाहणें बंद होईल काय. ॥ ४१३ ॥ जें बुद्धीलाहि छळतें जें निश्चय बाणूं देत नाही, धैर्यालाहि हातोहातीं आपल्यांत मिळवून घेतें-म्हणजे आपल्या स्वाधीन करून घेते. ॥ ४१४ ॥ जें मन विवेकालाहि भ्रम उत्पन्न करितें, संतोषालाहि इच्छा उत्पन्न करतें, स्वस्थ बसूं म्हटलें, तरी दाही दिशेला हिंडवितें. ॥ ४१५ ॥ जें निरोधिलें असतां अधिक उसळतें, ज्याला संयम देखील सहायभूत होतो, असें हें मन आपला स्वभाव टाकून स्थिर होईल काय? ॥ ४१६ ॥ म्हणून मन एकदाचें स्थिर होऊन, आपली बुद्धि सम होईल हें विशेषेंकरून घडून येणार नाही. ॥ ४१७ ॥

*श्रीभगवानुवाच*

**असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् । अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येण च गृह्यते॥ ३५॥**
**असंयतात्मना योगो दुष्प्राप इति मे मतिः । वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः॥ ३६॥**

**अर्थ**—भगवान म्हणतात, हे महाबाहो अर्जुना! मन अत्यंत चंचल आहे व त्याचा निग्रह करणें अत्यंत कठीण आहे, यांत शंकाच नाही, पण कौंतेया! अभ्यास व वैराग्य यांच्या सहायाने तें आवरलें जातें.॥ ३५॥ अभ्यास व वैराग्य यांनीं आपलें मन जे आवरूं पाहत नाहीत, त्यांना साम्यबुद्धिरूप योग साधणें शक्य नाहीं, असें माझेहि मत आहे. पण अभ्यास व वैराग्य या उपायांनी ज्यांनी आपलें मन ताब्यांत आणण्याचा प्रयत्न केला, त्याला हा योग साधणें शक्य आहे.॥ ३६॥

**तंव कृष्ण म्हणती साचचि। बोलत आहासि तें तैसेंचि। यया मनाचा कीर चपळचि। स्वभावो गा॥ ४१८॥**
**परि वैराग्याचेनि आधारें। जरि लाविलें अभ्यासाचिये मोहरें। तरि केतुलेनि एके अवसरें। स्थिरावेल॥ ४१९॥**
**कां जें यया मनाचें एक निकें। जे हें देखिले गोडीचिया ठाया सोके। म्हणोनि अनुभवसुखचि कवतिकें। दावीत जाइजे॥ ४२०॥**
**एऱ्हवीं विरक्ति जयांसि नाहीं। जे अभ्यासीं न रिघती कहीं। तयां नाकळे हें आम्हीही। न मनूं कायी॥ ४२१॥**
**परि यमनियमांचिया वाटा न वचिजे। कहीं वैराग्याची से न करिजे। केवळ विषयजळीं ठाकिजे। बुडी देउनी॥ ४२२॥**
**यया जालिया मानसा कहीं। युक्तीची कांबी लागली नाहीं। तरी निश्चळ होईल काई। कैसेनि सांगें॥ ४२३॥**
**म्हणोनि मनाचा निग्रहो होये। ऐसा उपाय जो आहे। तो आरंभीं मग नोहे। कैसा पाहों॥ ४२४॥**
**तरी योगसाधन जितुकें। तें अवघेंचि काय लटिकें। परि आपणपयां अभ्यासूं न ठाके। हेंचि म्हणे॥ ४२५॥**
**आंगीं योगाचें होय बळ। तरि मन केतुलें चपळ। काय महदादि हें सकळ। आपु नोहे॥ ४२६॥**
**तेथ अर्जुनु म्हणे निकें। देवो बोलती तें न चुके। साच योगबळेंसीं न तुके। मनोबळ॥ ४२७॥**
**तरि तोचि योगु कैसा केवीं जाणों। आम्ही येतुले दिवस याची मातुही नेणों। म्हणोनि मनातें जी म्हणों। अनावर हें॥ ४२८॥**
**हा आतां अघवेया जन्मा। तुझेनि प्रसादें पुरुषोत्तमा। योगपरिचयो आम्हां। जाहला आजी॥ ४२९॥**

**अर्थ**—अर्जुनाचें भाषण ऐकून, भगवान म्हणतात, अर्जुना! खरोखरच तूं म्हणतोस तसेंच तें आहे. या मनाचा स्वभाव चंचल आहे हें निश्चित.॥ ४१८॥ पण वैराग्याच्या सहायाने, जर त्याला अभ्यासाकडे लाविलें, तर कांही काळाने तें स्थिर होईलच.॥ ४१९॥ कारण मन हें चंचल आहे, तरी त्याचा एक उत्तम स्वभाव आहे, तो हा की, जेथे त्या मनाला गोडी लागेल, तेथें तें आपण होऊन चिकटतें म्हणजे स्थिर होते; म्हणून त्याला आत्मानुभवाचे सुख दाखवित जावें.॥ ४२०॥ एऱ्हवीं ज्यांना वैराग्य बाणलें नाहीं, म्हणून जे मनाचा निग्रह करण्याचा अभ्यास करण्यास प्रवृत्त होत नाहीत, त्यांना हा साम्यबुद्धिरूप योग साधणें शक्य नाही हे आम्ही मानित नाही काय?॥ ४२१॥ यमनियमांच्या मार्गाने कधीं जायचें नाही, कधीं वैराग्याची आठवणहि करायचीं नाही आणि केवळ विषयरूपी पाण्यांतच बुडून राहायचें.॥ ४२२॥ या मनाला जन्मापासून कधीं आवरण्याचा चिमटा बसलाच नाही, तर ते कशा रीतींने स्थिर होईल, सांग बरें!॥ ४२३॥ म्हणून ज्या उपायांने मनाचा निग्रह होतो असे सांगितले आहे, तो करायला सुरुवात कर, मग कसें मन स्थिर होत नाही, ते पाहूं!॥ ४२४॥ योगमार्गात जेवढे मनोनिग्रहाचे उपाय सांगितले आहेत ते सर्वच निरर्थक आहेत काय? पण माझ्याच्याने अभ्यासाचे कष्ट होत नाहीत, असें म्हण.॥ ४२५॥ आपल्या आंगी योगाभ्यासाचें सामर्थ्य आलें, तर सर्व महदादिब्रह्मांड स्वाधीन होत नाही काय! अशा योगाच्या सामर्थ्यापुढें त्या मनाची चपलता काय पदार्थ आहे!॥ ४२६॥ तेव्हां अर्जुन म्हणाला, देवा! खरोखर तुमचें म्हणणें खोटें नाही. खरोखर मनाचें सामर्थ्य, योग सामर्थ्याची बरोबरी करूं शकत नाही.॥ ४२७॥ पण तो योग कसा असतो व कसा जाणायचा, याची वार्ताहि इतके दिवस आमच्या कानावर नसल्यामुळें, आम्ही मन अनावर आहे असें म्हणत होतो.॥ ४२८॥ सर्व आयुष्यांत ही आतांच तुझ्यां कृपाप्रसादाने योगाची आम्हांला ओळख झाली.॥ ४२९॥

*अर्जुन उवाच*

**अयतिः श्रद्धयोपेतो योगाच्चलितमानसः। अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छति॥ ३७॥**
**कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति। अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रह्मणः पथि॥ ३८॥**
**एतन्मे संशयं कृष्ण छेत्तुमर्हस्यशेषतः। त्वदन्यः संशयस्यास्य छेत्ता न ह्युपपद्यते॥ ३९॥**

**अर्थ**—अर्जुन म्हणतो, कृष्णा! श्रद्धेने योग करायला लागला, पण इंद्रियनिग्रह साधला नसल्यामुळें, मरणकाळीं योग, म्हणजें ब्रह्माचे ठिकाणीं स्थिर बुद्धि, राहिली नाही, असा योगसिद्धि प्राप्त न झालेला पुरुष कोणत्या गतीला जातो?॥ ३७॥ आधारापासून पडलेल्या अभ्राप्रमाणे कर्ममार्ग व योगमार्ग या दोन्हीपासून भ्रष्ट निराधार व ब्रह्मप्राप्तीच्या मार्गांत मोह पावलेला असा हा पुरुष नाश तर पावत नाही!॥ ३८॥ हा माझा संशय, श्रीकृष्णा! निःशेष नाहीसा करण्यास तूंच एक योग्य आहेस. तुझ्यावाचून माझ्या संशयाचें निराकरण करणारा दुसरा कोणी दिसत नाही.॥ ३९॥

**परि आणिक एक गोसांविया। मज संशयो असे साविया। तो तूंवांचूनि फेडावया। समर्थु नाहीं॥ ४३०॥**
**म्हणोनि सांगें श्रीगोविंदा। कवण एकु मोक्षपदा। झोंबत होत श्रद्धा। उपायेंविण॥ ४३१॥**
**इंद्रियग्रामोनि निगाला। आस्थेचिया वाटा लागला। आत्मसिद्धीचिया पुढिला। नगरा यावया॥ ४३२॥**
**तंव आत्मसिद्धि न ठकेचि। आणि मागुतें न येववेचि। ऐसा अस्तु गेला माझारींचि। आयुष्यभानु॥ ४३३॥**
**जैसें अकाळीं आभाळ। अळुमाळु सपातळ। विपायें आलें केवळ। वसे ना वर्षे॥ ४३४॥**
**तैसीं दोन्ही दुरावलीं। जे प्राप्ति तंव अलग ठेली। आणि अप्राप्तिही सांडवली। श्रद्धा तया॥ ४३५॥**
**ऐसा दोहोंळा अंतरला का जीं। जो श्रद्धेच्या समाजीं। बुडाला तया हो जी। कवण गति॥ ४३६॥**

**अर्थ**—पण हे स्वामी भगवंता! आणखी एक खराच मला संशय आहे. तो नाहीसा करणारा तुझ्यावांचून दुसरा समर्थ नाही.॥ ४३०॥ म्हणून तुला विचारतों, भगवंता, सांग. कोणी पुरुष इंद्रियांचा निरोध न करितां केवळ श्रद्धेच्या बळावर योगाभ्यासाने मोक्षपद मिळविण्याचा प्रयत्न करीत आहे.॥ ४३१॥ इंद्रियांच्या गांवाहून निघून, पुढील आत्मसिद्धीच्या नगराला जाण्याकरितां श्रद्धेच्या वाटेने जाऊं लागला.॥ ४३२॥ पण आत्मसिद्धि प्राप्त झाली नाही आणि मागें पाऊलहि घेववत नाही, अशा स्थितींत आयुष्यरूपी सूर्य मध्येंच मावळला.॥ ४३३॥ ज्याप्रमाणे अकाळीं केव्हां केव्हां जे अभ्र येते ते फार दाट राहत नाही व त्यामुळें ते फार वेळ राहत नाही व वर्षावहि होत नाही.॥ ४३४॥ त्याप्रमाणे दोन्ही अंतरली, कारण आत्मप्राप्ति दूर राहिली व श्रद्धेमुळें आत्मप्राप्ति होणार नाही असेंहि वाटत नाही.॥ ४३५॥ याप्रमाणे दोहोलाहि जो पुरुष अंतरला, तरी जो श्रद्धा धरूनच मेला, त्याची गति काय होईल?॥ ४३६॥

*श्रीभगवानुवाच*

**पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते। न हि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति॥ ४०॥**

**अर्थ**—भगवान म्हणतात, बा अर्जुना! इहलोकांत किंवा परलोकांत त्याची अधोगति होत नाही. कारण पुण्यकर्मे करणारा, बाबा! कधीं दुर्गतीला जात नाही.॥ ४०॥

**तंव कृष्ण म्हणती पार्था। जया मोक्षसुखीं आस्था। तया मोक्षावांचूनि अन्यथा। गती आहे गा॥ ४३७॥**

**अर्थ**—तेव्हा श्रीकृष्ण म्हणतात, अर्जुना! ज्याला मोक्षाच्या ठिकाणीं दृढ श्रद्धा आहे. त्याला मोक्षावांचून दुसरी गति कशी राहील?॥ ४३७॥

**गूढार्थदीपिका**—भगवत्प्राप्तीकरितां केलेला प्रयत्न, कांही प्रतिबंधामुळें तात्काळ फलदायी झाला नाही, तरी विषयसुखाच्या प्राप्तीकरितां केलेल्या प्रयत्नाप्रमाणे तो खंडित होऊन निष्फळ होत नाही. भगवत्कृपेने, पुढें त्या प्रयत्नाकडे तो अनायासें वाहविला जातो व शेवटीं त्याला भगवत्प्राप्ति होते.

**परि एतुलेंचि एक घडे। जें माझारीं विसवावें पडे। तेंही परी ऐसेनि सुरवाडें। जो देवां नाहीं॥ ४३८॥**
**एऱ्हवीं अभ्यासाचां उचलता। पाउलीं जरी चालता। तरि दिवसाआधीं ठाकिता। सोऽहंसिद्धीतें॥ ४३९॥**

**परि तेतुला वेगु नव्हेचि। म्हणऊनि विसांवा तरी निकाचि। पाठीं मोक्षु तंव तैसाचि। ठेविला असे॥ ४४०॥**

**अर्थ**—पण एवढेंच मात्र होतें की, मध्यें थोडी त्याला विश्रांति घ्यावी लागते व तीहि विश्रांति देवालाहि प्राप्त होणार नाही, अशी श्रेष्ठ सुखरूप असते. ॥ ४३८ ॥ जर अभ्यासाच्या उचलत्या पावलाने तो चालतां तर त्याने दिवस म्हणजे आयुष्य संपण्याचे अगोदर सोहंसिद्धि गांठली असती. ॥ ४३९ ॥ पण तेवढा वेग नव्हता म्हणून झालेला विसावा ही योग्यच ठरतो. पण शेवटीं त्याला मोक्षप्राप्ति ठेविलीच असते. ॥ ४४० ॥

**प्राप्य पुण्यकृतां लोकानुषित्वा शाश्वतीः समाः। शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते॥ ४१॥**
**अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम्। एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम्॥ ४२॥**

**अर्थ**—पुण्यवान पुरुष ज्या लोकांना जातात, त्या लोकांना जाऊन, तेथें पुष्कळ वर्षे राहतात व मग पवित्र व श्रीमंत अशा घरी ते योगभ्रष्ट जन्म घेतात. ॥ ४१ ॥ किंवा बुद्धिमान योग्यांचे कुळांत जन्म घेतात पण हे असे आहे की, अशा प्रकारचा जन्म इतरांना या लोकामध्ये दुर्लभ असतो. ॥ ४२ ॥

**ऐकें कवतिक हें कैसें। जे शतमखा लोक सायासें। ते तो पावे अनायासें। कैवल्यकामु॥ ४४१॥**
**मग तेथिंचे जे अमोघ। अलौकिक भोग। भोगितांही सांग। कांटाळे मन॥ ४४२॥**
**हा अंतरायो अवचितां। कां वोढवला श्रीभगवंता। ऐसा दिविभोग भोगितां। अनुतापी नित्य॥ ४४३॥**
**पाठीं जन्मे संसारीं। परी सकळ धर्मांचिया माहेरीं। लांबा उगवे आगरीं। विभवश्रियेचां॥ ४४४॥**
**जयातें नीतिपंथें चालिजे। सत्यधूत बोलिजे। देखावें तें देखिजे। शास्त्रदृष्टी॥ ४४५॥**
**वेद तो जागेश्वरु। जया व्यवसाय निजाचारु। सारासार विचारु। मंत्री जया॥ ४४६॥**
**जयाच्या कुळीं चिंता। जाली ईश्वराची पतिव्रता। जयातें गृहदेवता। आदि ऋद्धि॥ ४४७॥**
**ऐसी निजपुण्याचिया जोडी। वाढिन्नली सर्वसुखाची कुळवाडी। तिये जन्मे तो सुरवाडी। योगच्युतु॥ ४४८॥**
**अथवा ज्ञानाग्निहोत्री। जे परब्रह्म श्रोत्री। महासुखक्षेत्रीं। आदिवंत॥ ४४९॥**
**जे सिद्धांताचिया सिंहासनीं। राज्य करिती त्रिभुवनीं। जे कूजती कोकील वनीं। संतोषाच्या॥ ४५०॥**
**जे विवेकद्रुमाचे मुळीं। बैसले आहाति नित्य फळीं। तया योगियांचियां कुळीं। जन्म पावे॥ ४५१॥**

**अर्थ**—अर्जुना! कशी मौज आहे, ती ऐक. जे इंद्रादिलोक, शंभर यज्ञ करणाऱ्यांनाहि मोठ्या कष्टाने मिळतात, ते लोक, कैवल्याची इच्छा करणाऱ्या या योगभ्रष्टाला अनायासें मिळतात. ॥ ४४१ ॥ मग त्या लोकांतील अलौकिक व इच्छा केल्याबरोबर मिळणारे दिव्य भोग भोगत असतांना त्याचें मन पूर्ण कंटाळतें. ॥ ४४२ ॥ आणि स्वर्गातील भोग भोगित असतांना तो, "भगवंता! तुझ्या प्राप्तींत हें विघ्न अकस्मात् कसें उत्पन्न झालें," असा नित्य अनुताप करीत असतो. ॥ ४४३ ॥ पण सर्व धर्माचें केवळ माहेरघर व सर्व संपत्तीचें कोठार असे जे कुळ असेल, त्या कुळांत तो, नव्या कोंभाप्रमाणे नंतर पुनः मृत्युलोकांत जन्म घेतो. ॥ ४४४ ॥ ज्या कुळांतील माणसांचें वागणें नीतीच्या मार्गानेच आहे, सत्याने शुद्ध केलेलेंच बोललें जातें, जे जे पहावयाचे ते ते शास्त्रदृष्टीनेच पाहिले जाते. ॥ ४४५ ॥ ज्या कुळांत वेद हे जागतें दैवत आहे, विहित धर्माचरण हा ज्यांचा धंदा व सारासार विचार हा ज्या कुळांत सल्ला देणारा मंत्री आहे. ॥ ४४६ ॥ ज्या कुळांत चिंता ही ईश्वराची पतिव्रता झाली—म्हणजे पतिव्रतेला जशी अखंड पतीची चिंता असते त्याप्रमाणे ज्या कुळांत ईश्वरप्राप्तीचीच चिंता वागवितात—आणि ज्या कुळांत ऋद्धि ह्या गृहदेवता आहेत. ॥ ४४७ ॥ याप्रमाणे आपल्या पुण्याच्या योगाने, ज्या कुळांतील पुरुषांनी अशी जोडी करून घेतली व जें कुळ म्हणजे संपूर्ण सुखाचें साक्षात् उदीमच होय, अशा उत्तम कुळांत तो जन्म घेतो. ॥ ४४८ ॥ अथवा ज्या कुळांत ज्ञानरूपी अग्नि ठेवून अग्निहोत्र चाललें आहे असे परब्रह्माचे उपासक आहेत व महासुखरूपी म्हणजे ब्रह्मसुखरूपी क्षेत्रांतील मूळचे रहिवासी आहेत. ॥ ४४९ ॥ जें अद्वैतब्रह्मसिद्धान्ताचे सिंहासनावर त्रैलोक्याचें राज्य करितात—म्हणजे सर्व ब्रह्मांड अद्वैतरूप पाहतात व जे परमसमाधानाचे वनामधील मधुर स्वर काढणारे कोकिळा आहेत—म्हणजे जे सदा प्रसन्नचित्त असतात. ॥ ४५० ॥ मोक्षरूपी फळांनी युक्त अशा आत्मानात्मविवेकरूपी वृक्षाचे मुळाशीं जे बसलेले असतात, अशा योग्यांच्या कुळांत ते जन्माला येतात. ॥ ४५१ ॥

**तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् । यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनन्दन॥ ४३॥**

**अर्थ**—त्याठिकाणीं त्यांना पूर्वदेहांतील सात्विकबुद्धि प्राप्त होते व अर्जुना! त्या सात्विकबुद्धीच्या संस्काराने तो या जन्मांत पुनः मोक्षसिद्धीकरितां अधिक नेटाने प्रयत्न करतो.॥ ४३॥

**मोटकी देहाकृति उमटे। आणि निजज्ञानाची पहाट फुटे। सूर्यापुढां प्रगटे। प्रकाशु जैसा॥ ४५२॥**
**तैशी दशेची वाट न पाहतां। वयसेचिया गांवा न येतां। बाळपणींच सर्वज्ञता। वरी तयातें॥ ४५३॥**
**तिये सिद्धप्रज्ञेचेनि लाभें। मनचि सारस्वतें दुभे। मग सकळ शास्त्रें स्वयंभें। निघती मुखें॥ ४५४॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणे सूर्य उगवण्यापूर्वी उजेड पडतो त्याप्रमाणे योगभ्रष्टालाहि जन्मल्याबरोबर जें बाळशरीर प्राप्त होतें, त्या शरीरातच आत्मज्ञानाचा उदय होतो.॥ ४५२॥ तशीच प्रौढ दशा प्राप्त होण्याची वाट न पाहतां किंवा वयस्कपणाच्या गांवाला येण्यापूर्वी, बाळपणींच त्याला सर्वज्ञता माळ घालते.॥ ४५३॥ अशा सिद्धबुद्धीच्या प्राप्तीमुळें त्याचें मनच सर्व विद्यासंपन्न होतें व अध्ययनावांचून आपोआप त्याचे मुखांतून सर्व शास्त्रें प्रगट होतात.॥ ४५४॥

**गूढार्थदीपिका—सिद्ध प्रज्ञेचेनि लाभे**—योगशास्त्रांतील समाधिपदांत जी ऋतंभरा' प्रज्ञा म्हणून सांगितली आहे तिलाच येथे श्री ज्ञानेश्वर माऊलींनी 'सिद्धप्रज्ञा' हें नांव देऊन उल्लेख केला आहे.

बुद्धि ही मुळांत सत्वगुणाचें कार्य असल्यामुळें शुद्ध स्वच्छ कांचेंतून ज्याप्रमाणे वस्तूचें यथार्थ ज्ञान होतें त्याप्रमाणे बुद्धिहि मूळच्या स्वरूपांत यथार्थ पदार्थज्ञान ग्रहण करणारीच आहे. पण जीवाच्या ठिकाणीं असणाऱ्या आवरणादि दोषामुळे ती मलीन झाली आहे. विपरीत कांचेंतून जसा पदार्थ विकृत दिसतो, त्याप्रमाणे जीवाची बुद्धि विपरीतार्थ ग्रहणकरणारी झाली आहे. अत्यंत श्रद्धेने शास्त्रैकनिष्ठ होऊन, परमेश्वर प्राप्तीकरितां निष्कामचित्ताने कर्मयोगादिकांचे साधन करणाऱ्या पुरुषाची बुद्धि, शुद्ध होऊन आपल्या पूर्वरूपाला येते.

बुद्धीचें हें पूर्वरूप म्हणजे तिचें मूळचें सिद्धस्वरूप असल्यामुळें या रूपाला आल्यानंतर तिला सिद्धप्रज्ञा म्हणतात. पूर्वरूपाला आलेली बुद्धि जें खरें असेंल तेच जाणते व तेच ग्रहण करते. तिच्या ठिकाणी कधीं विपरीत ज्ञानाचा गंध नसतो; म्हणूनच तिला योगशास्त्रांत 'ऋतंभराप्रज्ञा' म्हणतात. याच बुद्धीच्या सहायाने अध्यात्मप्रसाद किंवा आत्मज्ञान होत असते.

**ऐसें जें जन्म। जयालागीं देव सकाम। स्वर्गीं ठेले जप होम। करिती सदा॥ ४५५॥**
**अमरीं भाट होईजे। मग मृत्युलोकातें वानिजे। ऐसें जन्म पार्था गा जें। तें तो पावे॥ ४५६॥**

**अर्थ**—अशा प्रकारचा जन्म प्राप्त व्हावा अशी देवांना देखील इच्छा राहते व म्हणून स्वर्गामध्यें ते देव, अशा जन्माच्या प्राप्तीकरितां जपहोमादि कर्मे सदा करीत असतात.॥ ४५५॥ देवहि भाट होऊन ज्या अशा प्रकारच्या जन्माकरितां मृत्युलोकाची प्रशंशा करतात, तसा जन्म त्या योगभ्रष्टाला प्राप्त होतो.॥ ४५६॥

**पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः। जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते॥ ४४॥**

**अर्थ**—योगभ्रष्ट पुरुष आपल्या पूर्वजन्मातील योगाभ्यासाचे संस्काराने पुनः या जन्मांत अभ्यास परतंत्र होऊन अभ्यासाकडे आपोआप ओढला जातो व शब्दब्रह्म म्हणजे वेद, यांच्याहि पलीकडे जातो (म्हणजे शब्दब्रह्म जे वेद, त्यांनी सांगितलेल्या कर्मफळाच्या पलीकडे जातो कर्मफळापेक्षां त्याला श्रेष्ठ फळ प्राप्त होतें)॥ ४४॥

**आणि मागील जे सद्बुद्धि। जेथ जीविता जाहाली होती अवधि। मग तेचि पुढती निरवधि। नवी लाहे॥ ४५७॥**
**तेथ सदैवा आणि पायाळा। वरि दिव्यांजन होय डोळां। मग देखे जैसीं अवलीळा। पाताळधनें॥ ४५८॥**
**तैसे दुर्भेद जे अभिप्राय। कां गुरुगम्य हन ठाय। तेथ सौरसेंवीण जाय। बुद्धि तयाची॥ ४५९॥**
**बळियें इंद्रियें येती मना। मन एकवटे पवना। पवन सहजें गगना। मिळोंचि लागे॥ ४६०॥**
**ऐसें नेणों काय आपैसें। तयातेंचि कीजे अभ्यासें। समाधि घर पुसे। मानसाचें॥ ४६१॥**
**जाणिजे योगपीठीचा भैरवु। काय हा आरंभरंभेचा गौरवु। कीं वैराग्यसिद्धीचा अनुभवु। रूपा आला॥ ४६२॥**
**हा संसार उमाणितें माप। कां अष्टांगसामग्रीचे दीप। जैसें परिमळेंचि धरिजे रूप। चंदनाचें॥ ४६३॥**

**तैसा संतोषाचा काय घडिला। कीं सिद्धभांडारींहूनि काढिला। दिसे तेणें मानें रूढला। साधकदशे॥ ४६४॥**

**अर्थ**—आणि पूर्वजन्मांतील, जी योगमार्गाकडे प्रवृत्त झालेली बुद्धि होती व जी आयुष्य संपल्याबरोबर नाहीशी झाली होती, ती पुन: नवीन व अमर्याद अशी होते. ॥ ४५७॥ ज्याप्रमाणे एखादा पुरुष आधींच भाग्यवान व पायाळु आहे व त्याच्या डोळ्याला आणखी मंत्रविलेलें अंजन लावले, तर त्याला जमिनींतील कोठलेंहि धन सहज दिसूं लागतें. ॥ ४५८ ॥ त्याप्रमाणे योगभ्रष्टाची बुद्धिहि इतकी सूक्ष्म होते की, साधारण बुद्धीला जी रहस्यें अगम्य असतात किंवा जे गुरुवांचून कळूंच शकत नाही, तेथे त्याची बुद्धि न चांचपडतां अचूक प्रवेश करते. ॥ ४५९ ॥ इंद्रियें बलवान आहेत खरी, पण तीं आपोआप मनाच्या स्वाधीन होतात. मन प्राणाशीं ऐक्य पावून, प्राण आकाशांत मिळूं लागतो. ॥ ४६० ॥ असें कसें होतें हें सांगतां येत नाही; पण योगाभ्यास आपण होऊन त्याला बाणत जातो व समाधि त्याच्या मनाच्या घराचा शोध करीत येते. ॥ ४६१ ॥ हा योगभ्रष्ट साधक म्हणजें जणूं काय योगस्थानावरची अधिदेवता किंवा योगाच्या आरंभास लागणाऱ्या उल्हासाचा आदर किंवा पूर्ण वैराग्याने साध्य होणारा अनुभवच रूपाला आला. ॥ ४६२ ॥ किंवा जणूं काय संपूर्ण संसार मोजून काढणारें मापच होय किंवा योगाच्या अष्टांगसाधन सामग्रीचें बेटच होय. ज्याप्रमाणे सुगंधाने चंदनाचें रूप घ्यावें. ॥ ४६३ ॥ त्याप्रमाणे तो संतोषाची जणूं काय घडलेली मूर्ति होय किंवा तो साधकदशेपासूनच सिद्धीचें भांडार घेऊन आला आहे, अशा प्रकारचा संपन्न असलेला दिसतो. ॥ ४६४ ॥

**प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः । अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम्॥ ४५॥**

**अर्थ**—योगाचा प्रयत्न करणारा योगी, योगाभ्यासाने अत्यंत शुद्ध पापरहित होऊन, अनेक जन्मांत सिद्ध होऊन, परम अशा ब्रह्मगतीला प्राप्त होतो. ॥ ४५ ॥

**जे वर्षशतांचिया कोडी। जन्मसहस्रांचिया आडी। लंघिता पातला थडी। आत्मसिद्धीची॥ ४६५॥**

**अर्थ**—वयाच्या शेंकडो वर्षांच्या चळथी व हजारो जन्मांचे प्रतिबंध ओलांडून, आत्मसिद्धीचा किनारा ज्याने गांठला. ॥ ४६५ ॥

**गूढार्थदीपिका**—सगुण भगवंताच्या नामस्मरणादि भक्तीचा आश्रय न करितां केवळ कर्मज्ञानमार्गाने आत्मप्राप्ति करून घेऊं पाहणाऱ्याविषयी हे माऊलीचें विधान आहे. कारण भगवंताच्या निरपराध नामस्मरणादि भक्तिमार्गाने मनुष्य लवकरच आत्मप्राप्ति करून घेऊं शकतो; म्हणून त्यांच्याविषयीं हें विधान लागूं शकत नाही.

किंवा "बहुतां सुकृताची जोडी। म्हणूनि विठ्ठलीं आवडी" भगवंताच्या नामस्मरणादिभक्तीचे ठिकाणीं आवड उत्पन्न होण्याकरिताच अनंत जन्माचें सुकृत पदरीं असावयास पाहिजे; म्हणून भगवंताच्या नामस्मरणादि भक्तिविषयीं आवड उत्पन्न होण्यापूर्वीविषयीं हें विधान लागूं आहे असें समजावें.

**म्हणोनि साधनजात आघवें। अनुसरे तया स्वभावें। मग तो आयतिये बैसे राणिवे। विवेकाचिये॥ ४६६॥**
**पाठीं विचारितया वेगा। तो विवेकुही ठाके मागां। मग अविचारणीय तें आंगा। घडोनि जाय॥ ४६७॥**
**तेथ मनाचें मेहुडें विरे। पवनाचें पवनपण सरे। आपणपां आपण मुरे। आकाशही॥ ४६८॥**
**प्रणवाचा माथा बुडे। येतुलेनि अनिर्वाच्य सुख जोडे। म्हणोनि आधींचि बोलु बहुडे। तयालागीं॥ ४६९॥**
**ऐसी ब्रह्मींची स्थिती। जे सकळा गतींसी गती। तया अमूर्ताची मूर्ति। होऊनि ठाके॥ ४७०॥**
**तेणें बहुतीं जन्मीं मागिलीं। विक्षेपांची पाणिवळें झाडिलीं। म्हणोनि उपजतखेवों बुडाली। लग्नघटिका॥ ४७१॥**

**अर्थ**—म्हणून योगाभ्यासाचीं सर्व साधनें स्वभावत:च त्याचे ठिकाणीं प्रगट होतात व मग तो आयत्या आत्मानात्मविवेकाच्या राज्यावर बसतो. ॥ ४६६ ॥ नंतर विचाराचा जो वेग वाढतो, तेथें विवेकहि मागें राहतो व विचाराच्या पलीकडे असणाऱ्या ब्रह्मवस्तूशीं एकरूप होतो. ॥ ४६७॥ तेथें मनरूपी मेघ नाहिसे होतात, प्राणवायूचें प्राणपण राहात नाही, आकाशहि जागच्या जागीं नाहिसें होतें. ॥ ४६८॥ प्रणवाची अर्धमात्राबिंदूस्थिति मावळते- म्हणजे नादबिंदू, कळाज्योति हे कांही राहत नाही. एवढ्याने जाणीव नाहीशी होऊन अपार सुख प्राप्त होतें, म्हणून तेथें शब्दाची प्रवृत्ति होत नाही व बोलणें बंद पडतें. ॥ ४६९ ॥ याप्रमाणे संपूर्ण गतीची गति अशी जी ब्रह्मस्थिति,

त्या अमूर्त ब्रह्मस्थितीची मूर्ति होऊन, तो योगी राहतो. ॥ ४७० ॥ त्याने मागील अनेक जन्मांत सत्कर्मे करून चित्तरूपी पाण्यांतील चांचल्यरूपी केरकचरा साफ केल्यामुळे जन्मल्याबरोबरच लग्नघटिका बुडली-म्हणजे त्याचें ब्रह्माशीं ऐक्य झालें. ॥ ४७१ ॥

**गूढार्थदीपिका**—वधुवरांचें लग्न ज्या वेळेला लागायचे असतें, ती वेळ जाणण्याकरितां ज्योतिषी लग्नघटिका लावून ठेवतात व लग्नघटिका बुडल्याबरोबर वधुवराचे लग्न लागलें म्हणून वधुवरावर अक्षता टाकतात; तसेंच योगभ्रष्ट पुरुषाचा अभ्यास, पूर्वजन्मांपासून चालू असल्यामुळें व चित्त अत्यंत शुद्ध होऊन सहज एकाग्र होत असल्यामुळें जन्मल्याबरोबरच त्याला ब्रह्मैक्याचा अनुभव येतो.

**आणि तद्रूपतेसी सुलग्न। लागोनि ठेलें अभिन्न। जैसें लोपलें अभ्र गगन। होऊनि ठाके॥ ४७२॥**
**तैसें विश्व जेथ होये। मागौतें जेथ लया जाये। तें विद्यमानेंचि देहें। जाहला तो गा॥ ४७३॥**

**अर्थ**—आणि ज्याप्रमाणे नाहिसें झालेलें अभ्र आकाशाशीं एकरूप होऊन जातें-म्हणजे आकाशरूप होतें-त्याप्रमाणे तद्रूपतेचें सुलग्न लागलें की तो साधक ब्रह्माशीं एकरूप होऊन राहतो. ॥ ४७२ ॥ ज्या ब्रह्मस्वरूपाचे ठिकाणीं विश्व भासतें व जेथे लय पावतें, तें ब्रह्मस्वरूप तो योगी आपल्या असलेल्या देहासह होतो. ॥ ४७३ ॥

**गूढार्थदीपिका**—शिष्याचे डोक्यावर हात ठेवून श्रीगुरु शिष्याला आपल्या केवळ सामर्थ्याने कृतार्थ करतात, या मूर्ख समजुतीचा येथे निरास करून, शिष्याने प्रयत्न केल्यावांचून तो कृतार्थ होऊं शकत नाही, हें या श्लोकांत व त्यावरील ओव्यांत श्रीज्ञानेश्वर महाराजांनी प्रतिपादिलें आहे.

''उपदेशक्रमो रामव्यवस्थामात्रपालनम्। ज्ञप्तेस्तु कारणं शुद्धा शिष्यप्रज्ञैव केवला॥'' (योगवासिष्ठ) असें योगवासिष्ठांत श्रीरामाला सांगितलें असून ''रघुराया उपदेश तत्वतां। दाखवी नानापरी व्यवस्था। परी शिष्याचा प्रयत्न नसतां। होय वृथा सकळही॥ २६ ॥ जरी शिष्यप्रयत्नावीण। गुरूपदेशें होईल कल्याण। तरी श्वान आणि वृक्षपाषाण। जावोत उद्धरोन क्षणमात्रे.॥ २७॥ मग वेदीं मनुष्यजन्मप्रशंसा। ही व्यर्थ कां केली दंतमीमांसा। एवढा आयाता मोक्षठसा। असतां हातीं॥ २८॥ जरी मस्तकीं हस्त ठेवून। मुक्त होऊं शकेल जाण। तरी ''ज्ञानादेव तु कैवल्यम्'' हें श्रुतिवचन। पावलें मरण सर्वस्वीं.॥ २९ ॥ 'उपदेशं विनाऽपि' कृपें करून। जरी होतें म्हणावें ज्ञान। तरी महावाक्याचे कारण। नाहींच जाण सर्वथा॥ ३०॥ आतां श्रवण केलियावीण निश्चिती। महावाक्येही येतील चित्तीं। हे मनसाही कल्पितां नये स्थिति। मग घडेल ती रीती आम्ही नेणों. ॥ ३१ ॥'' (श्रीगुलाबरावमहाराजकृत भगवद्भक्ति सौरभ-पंचम पराग) असे आमच्या श्रीसद्‌गुरु आईचेंहि म्हणणें आहे; म्हणून परमार्थांत श्रीगुरूच्या सांगण्याप्रमाणे प्रयत्न करायला पाहिजे.

वेदान्तश्रवण करतांना विविध वचनांची एकवाक्यता कशी करायची, मननामध्ये कोणत्या युक्तीने वेदान्तसिद्धान्त दृढ करायचा, निदिध्यासन करतांना वृत्ति कशी असायला पाहिजे आणि अनुभव कसा असतो व कसा घ्यावा इत्यादि व्यवस्था सांगण्याकरितां परमार्थांत श्रीगुरूची आवश्यकता असते.

निषिद्धाचरणरूप पापकर्माच्या योगाने संशय, विपर्यय, वासना, बुद्धिमांद्य इत्यादि प्रतिबंध परमार्थांत उत्पन्न होत असतात.

**संशय**—म्हणजे परमेश्वराच्या अस्तित्वाविषयीं किंवा परमेश्वर प्राप्तिच्या सांगितलेल्या मार्गाविषयीं संशय असणें.

**विपर्यय**—म्हणजे मी देह आहे अशी बुद्धि असणें.

**वासना**—म्हणजे विषयांकडे चित्ताची धांव. व

**बुद्धिमांद्य**—म्हणजे परमेश्वराच्या स्वरूपाविषयींचा सूक्ष्मविचार बुद्धीला ग्रहण न होणें.

हें दोष जोपर्यंत आहेत तोपर्यंत परमेश्वरप्राप्ति होत नाही. सगुण रामकृष्णादि परमेश्वराचे भक्तीने हीं विघ्नें क्रमाक्रमाने दूर होऊन, मनुष्य कांही जन्मांनीं कृतार्थ होतो; म्हणून ईश्वरभक्तीची आवश्यकता आहे.

सारांश ''सद्‌गुरु उपदेश व्यवस्थिती। यत्ननिश्चय आपुल्या चित्तीं। ईश्वर दूर करी विघ्नपंक्ती। तैं जीवन्मुक्ति

सांपडे॥ २४॥ (श्रीगुलाबरावमहाराजकृत भगवद्भक्तिसौरभ-पंचमपराग) याप्रमाणे श्रवण मनन निदिध्यासन यांची व्यवस्था व अनुभवरहस्य सांगणाऱ्या श्रीगुरूची प्राप्ति, आपला निश्चयपूर्वक प्रयत्न व ईश्वरभक्ति या तिघांचा संगम झाला असतांच जीवन्मुक्तस्थिति प्राप्त होते.

अशा रीतीने परमार्थाचा प्रयत्न करणारा पुरुष, प्रतिबंधामुळें त्याच जन्मांत मुक्त झाला नाही, तर पुढील जन्मांत बाळपणींच त्याला जीवन्मुक्ति वरते.

श्रीगुरूच्या शक्तिपाताने शिष्य कृतार्थ होतो असे वेदान्तांत सांगितलें नसलें, तरी आगमांत सांगितलें आहे. हा शक्तिपातहि परमेश्वरप्राप्तीची उत्कट तळमळ लागलेल्याला व श्रीगुरूशीं प्रतारणा न करणाऱ्या अनन्य व प्रेमळ शिष्याचे ठिकाणींच होऊं शकतो. याचे पुढें योग्य स्थळीं सविस्तार निरूपण करूं.

**तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः। कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन॥ ४६ ॥**

**अर्थ**—योगी हा तपस्व्यापेक्षां, ज्ञान्यापेक्षां व कर्म करणाऱ्या पुरुषापेक्षांहि श्रेष्ठ होय, म्हणून अर्जुना! तूं योगी हो.॥ ४६ ॥

**जया लाभाचिया आशा। करूनि धैर्यबाहूंचा भरंवसा। घालीत षट्कर्मांचा धारसा। कर्मनिष्ठ॥ ४७४॥**
**कां जिये एकी वस्तूलागीं। बाणोनि ज्ञानाची वज्रांगी। झुंजत प्रपंचेंशीं समरंगीं। ज्ञानिये गा॥ ४७५॥**
**अथवा निलागें निसरडा। तपोदुर्गाचा आडकडा। झोंबती तपिये चाडा। जयाचिया॥ ४७६॥**
**जें भजतियांसी भज्य। याज्ञिकांचें याज्य। एवं जें पूज्य। सकळां सदा॥ ४७७॥**
**तेंचि तो आपण। स्वयें जाहला निर्वाण। जें साधकांचें कारण। सिद्ध तत्त्व॥ ४७८॥**
**म्हणोनि कर्मनिष्ठां वंद्यु। तो ज्ञानियांसी वेद्यु। तापसांचा आद्यु। तपोनाथु॥ ४७९॥**
**पैं जीवपरमात्मसंगमा। जयाचें येणें जाहलें मनोधर्मा। तो शरीरीचि परी महिमा। ऐशी पावे॥ ४८०॥**
**म्हणोनि याकारणें। तूतें मी सदा म्हणें। योगी होय अंतःकरणें। पंडुकुमरा॥ ४८१॥**

**अर्थ**—ज्या ब्रह्मप्राप्तीच्या आशेने धैर्यरूपाचा भरंवसा बाळगून, कर्मनिष्ठ पुरुष षट्कर्माचरणाचा (अध्ययन, अध्यापन, यजन, याजन, प्रतिग्रह, व दान ही ब्राह्मणाची षट्कर्में होत) सारखा प्रवाह चालूं ठेवतात.॥ ४७४॥ किंवा ज्या एका ब्रह्मवस्तूच्या प्राप्तीसाठी आत्मज्ञानाचें दृढ कवच घालून ज्ञानी पुरुष प्रपंचाशीं समरंगणांत युद्ध करतात.॥ ४७५॥ अथवा ज्याच्या प्राप्तीच्या इच्छने, जेथें पाय रोवण्याला आधार नाही व पाय ठेविला की पाय घसरतोच अशा तपरूपी किल्ल्याच्या तुटलेल्या कड्याचा जे आश्रय करतात.॥ ४७६॥ भजन करणारे, ज्याचें भजन करतात, यज्ञ करणारे ज्याचें यजन करतात, याप्रमाणे जो सर्वांना सदा पूज्य आहे.॥ ४७७॥ ज्याच्या करितां साधक साधनें करतात व जे स्वयंसिद्ध तत्व होय, असे जें परब्रह्म, तें केवळ परब्रह्मच योगी होऊन राहतो.॥ ४७८॥ म्हणून कर्मनिष्ठ ज्यांना वंदन करतात व ज्ञानी ज्याला जाणतात व तपस्वियांचा मूळ स्वामी जो परमात्मा तो, योगी होऊन राहतो.॥ ४७९॥ ज्याचा मनोधर्म जीव व परमात्मा यांच्या ऐक्याच्या ठिकाणीं आला-म्हणजे ज्याच्या मनाने जीवपरमात्मैक्य जाणून अनुभविलें-तो शरीरधारी असतानांच, वर वर्णन केलेल्या योग्यतेचा होतो.॥ ४८०॥ म्हणून या कारणास्तव, अर्जुना! मी तुला अंतःकरणाने योगी हो असे म्हणत असतो—म्हणजे अखंड चित्तवृत्ति आत्मस्वरूपी ठेव असें सदा म्हणत असतो.॥ ४८१॥

**योगिनामपि सर्वेषां मद्गतेनान्तरात्मना। श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्ततमो मतः॥ ४७॥**

*ॐतत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे आत्मसंयमयोगो नाम षष्ठोऽध्यायः॥ ६॥*

**अर्थ**—सर्व योग्यामध्यें माझ्या सगुणस्वरूपाचे ठिकाणीं अंतःकरण ठेवून प्रेमपूर्वक जो माझ्या सगुणस्वरूपाचें भजन करतो, तो माझ्याशीं अत्यंत समरस होऊन निर्विकल्प ऐक्य पावतो.॥ ४७॥

**अगा योगी जो म्हणिजे। तो देवांचा देव जाणिजे। आणि सुखसर्वस्व माझें। चैतन्य तो॥ ४८२॥**

**अर्थ**—बा अर्जुना! जो योगी आहे तो देवांचा देव आहे असे समज आणि तो माझे चैतन्यच होय व आत्मसुखहि होय. ॥ ४८२ ॥

**गूढार्थदीपिका**—सगुण भगवंताचे ठिकाणीं ज्याचें अत्यंत प्रेम जडलें, तो ऐक्याच्या जाणीवेवांचून केवळ चिदानंदस्वरूप होऊन राहतो असा अर्थ.

**तेथ भजता भजन भजावें। हें भक्तिसाधन जें आघवें। तें मीचि जाहलों अनुभवें। अखंडित॥ ४८३॥**
**मग तया आम्हां प्रीतीचें। स्वरूप बोलीं निर्वचे। ऐसें नव्हे गा तो साचें। सुभद्रापती॥ ४८४॥**
**तया एकवटलिया प्रेमा। जरी पाडें पाहिजे उपमा। तरी मी देह तो आत्मा। हेचि होय॥ ४८५॥**

**अर्थ**—तेथें भजन करणारा, भजन करणें, ज्याचें भजन करायचें तो देव, ही जी भक्तीची साधनरूप संपूर्ण त्रिपुटी ती तो अखंड स्वानुभवाने मद्रूपच पाहतो-म्हणजे त्याला, त्याचा प्रिय परमात्मा जो सगुण भगवान त्यावांचून दुसरें कांही दिसत नाही, असा भाव. ॥ ४८३ ॥ तेव्हां आम्हां दोघांत परस्परांचे जें प्रेम असतें ते शब्दानें सांगतां येईल असा तो, अर्जुना! खरोखर राहत नाही. ॥ ४८४ ॥ त्या आमच्या ऐक्यप्रेमाला बरोबरीची उपमा पाहिजे असल्यास मी देह व तो आत्मा हीच उपमा द्यावी लागेल. ॥ ४८५ ॥

**गूढार्थदीपिका**—"**मी देह तो आत्मा**"-योग म्हणजे परमेश्वराच्या ठिकाणीं चित्त स्थिर करून, त्याचें परमेश्वराशीं ऐक्य करणें होय, हे मागें सांगितलेंच आहे. कर्मद्वारा परमेश्वराचे ठिकाणीं चित्तवृत्ति स्थिर करणें याला कर्मयोग म्हणतात. ज्ञानद्वारा परमेश्वराशीं ऐक्य करणें याला ज्ञानयोग म्हणतात व प्रेमद्वारा परमेश्वराच्या ठिकाणीं चित्तवृत्ति स्थिर करणें ह्याला भक्तियोग म्हणतात. सगुण परमेश्वराच्या नि:सीम प्रेमाने केलेल्या भक्तियोगांत जाणीवरहित निर्विकल्प ऐक्य होत असल्यामुळें व इतर योगांत जाणीवसहित ऐक्य होत असल्यामुळें, सर्व योग्यामध्यें भक्तियोगी युक्ततम होय असे भगवान म्हणतात आणि श्रीज्ञानेश्वर माऊलींनी "मी देह तो आत्मा" या चरणाने तोच भाव दाखविला आहे.

**ऐसें भक्तचकोरचंद्रें। तेथ त्रिभुवनैकनरेंद्रें। बोलिलें गुणसमुद्रें। संजयो म्हणे॥ ४८६॥**
**तेथ आदिपासूनि पार्था। ऐकिजे ऐसीचि आस्था। दुणावली हें यदुनाथा। भावों सरलें॥ ४८७॥**
**कीं सावियाचि मनीं संतोषला। जे बोला आरिसा जोडला। तेणें हरिखें आतां उपलवला। निरूपील॥ ४८८॥**
**तो प्रसंगु आहे पुढां। तेथ शांतु दिसेल उघडा। तो पालविजेल मुडा। प्रमेयबीजाचा॥ ४८९॥**
**जे सात्त्विकाचेनि वडपें। गेलें आध्यात्मिक खरपें। सहजें निडारलें वाफे। चतुरचित्ताचे॥ ४९०॥**
**वरी अवधानाचा वाफसा। लाधला सोनया ऐसा। म्हणोनि पेरावया धिंवसा। श्रीनिवृत्तीसी॥ ४९१॥**
**ज्ञानदेव म्हणे मी चाडें। सद्गुरुनी केले कोडें। माथां हात ठेविला तें फुडें। बीजचि वाइलें॥ ४९२॥**

**अर्थ**—संजय म्हणतो, राजा धृतराष्ट्रा! याप्रमाणे भक्तरूपी चकोरांचा चंद्र, अनंत सद्गुणांचा सागर व त्रैलोक्याचा स्वामी जो भगवान श्रीकृष्ण, तो अर्जुनाला म्हणाला. ॥ ४८६ ॥ प्रथमपासूनच अर्जुनाला निरूपण ऐकण्याची आवडी होती, ती आवडी माझ्या मुखाने निरूपण ऐकल्यावर आणखी दुप्पट वाढली आहे, असे भगवंताला दिसून आलें. ॥ ४८७ ॥ किंवा माझ्या निरूपणाला अर्जुन हा आरसा झाला (आरशांत जसें प्रतिबिंब पडतें, तसें मी जें निरूपण करतों, तें तसेंच्या तसेंच अर्जुनाच्या अंत:करणांत बिंबतें) हे पाहून भगवंताला फार संतोष वाटला. आतां पुढे त्या आनंदाने उचंबळून जाऊन भगवान निरूपण करतील. ॥ ४८८ ॥ तो प्रसंग पुढें असून त्यांत शांतरस (ज्ञान निरूपण) इतका स्पष्ट दिसेल की ते सिद्धान्तरूपी प्रमेयाला अंकुर उत्पन्न करील म्हणजे अंत:करणांत वेदान्तसिद्धान्ताचा पूर्ण प्रकाश पडेल. ॥ ४८९ ॥ कारण शांतरसांतील सात्विक गुणांच्या वृष्टीमुळें अंत:करणांतील

वासनारूपी आध्यात्मिक तापांची ढेंकळे विरालीं आणि श्रोत्यांच्या विवेकसंपन्न चित्ताचे वाफे तयार केले गेले. ॥ ४९० ॥ त्यांत पुन: एकाग्र चित्ताने श्रवण करण्याची सोन्यासारखी त्याला ऊन मिळाली, म्हणून श्रीनिवृत्तिनाथांना पेरण्याचा हुरूप वाटतो. ॥ ४९१ ॥ श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात, मी बीज पेरण्याचे चाडे आहे. श्रीनिवृत्तिनाथानी असें कांही नवल केलें की, त्यांनी माझ्या डोक्यावर जो हात ठेवला ते माझ्या अंत:करणांत सिद्धान्तरूपी बीजच घातलें. ॥ ४९२ ॥

**गूढार्थदीपिका**—श्रीज्ञानेश्वर महाराजांनी अमृतानुभव ग्रंथांतील मंगलाचरणाच्या ''गुरुरित्याख्यया लोके विद्या साक्षाद्धि शांकरी'' या श्लोकांत श्री गुरु म्हणजे साक्षात् ब्रह्मविद्या होय असे म्हटलें आहे. श्रीगुरु आपल्या शिष्यावर, त्याच्या अनन्यसेवेने व अनन्यप्रेमाने प्रसन्न होऊन जेव्हा त्याच्या डोक्यावर हात ठेवितात तेव्हा साक्षात् ब्रह्मविद्यारूपाने म्हणजे ''अहंब्रह्मास्मि'' या वृत्तिरूपाने शिष्याचे अंत:करणांत प्रगट होतात. ''अहंब्रह्मास्मि'' ही ब्रह्मविद्या सर्व अद्वैतसिद्धान्ताचें बीज आहे. शिष्याचे अंत:करणात ''अहंब्रह्मास्मि'' या विद्यावृत्तीने श्रीगुरुं राहत असून, तेच बाहेर निरुपाधिक सगुण साकाररूपाने शिष्याला प्रतीत होतात.

**म्हणऊनि येणें मुखें जे जें निगे। तें संतांच्या हृदयीं साचचि लागे। हें असो सांगो श्रीरंगे। बोलिलें जें॥ ४९३ ॥**
**परीं तें मनाच्या कानीं ऐकावें। बोल बुद्धीच्या डोळां देखावें। हे साटोवाटीं घ्यावे। चित्ताचिया॥ ४९४॥**
**अवधानाचेनि हातें। नेयावें हृदयाआंतौतें। हे रिझवितील आयणीतें। सज्जनांचिये॥ ४९५ ॥**
**हे स्वहितातें निववितीं। परिणामातें जीववितीं। सुखाची वाहवितीं। लाखोली जिवा॥ ४९६ ॥**
**आतां अर्जुनेंसीं मुकुंदें। नागर बोलिजेल विनोदें। तें ओवियेचेनि प्रबंधें। सांगेन मी॥ ४९७॥**

*इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां षष्ठोऽध्याय: ॥ ६ ॥*

**अर्थ**—श्रीज्ञानेश्वर माऊली म्हणतात की, म्हणूनच या माझ्या मुखावाटें जें बोललें जातें, तें संतश्रोत्यांच्या हृदयाला खरें वाटतें-म्हणजे सिद्धान्तभूतच वाटतें. हे आतां असो. पुढें श्रीभगवंतांनी काय सांगितले तेच सांगतों. ॥ ४९३ ॥ पण तें मनाच्या कानांनी ऐकावें-म्हणजे संपूर्ण मन एका कर्णेंद्रियाचे ठिकाणीं आणून ऐकावें आणि माझें बोलणें बुद्धीच्या डोळ्यांनी पहावें-म्हणजे अर्थाकडे दृष्टि द्यावी किंवा बोल ऐकल्याबरोबर बुद्धि अर्थाकार व्हावी हें सर्व चित्ताच्या मोबदल्यांत व्हावें-म्हणजे चित्त मला देऊन, त्याच्या मोबदल्यांत माझ्या बोलण्यातील अर्थ घ्यावा. (अत्यंत एकाग्रतेने श्रवण करा हा भाव). ॥ ४९४ ॥ एकाग्र अंत:करणाचे हाताने हे माझें बोल हृदयांत नेऊन ठेवल्यास संतजनांची ब्रह्मानुभवाची इच्छा सफल होईल (अत्यंत एकाग्र चित्ताने श्रवण केल्यास तें श्रवणच अनुभव पर्यवसायी होतें असा अर्थ). ॥ ४९५ ॥ ह्या बोलांनी स्वहिताची तळमळ शांत होते, ब्रह्मस्थिति दृढ होते व त्यायोगें जीवाला आत्मसुखाची लाखोली वाहिली जाईल-म्हणजे अखंड आत्मसुख मिळेल. ॥ ४९६ ॥ आतां भगवान श्रीकृष्ण अर्जुनाला सुंदर निरूपण ऐकवील. तेंच मी ओवीप्रबंधाने तुम्हाला सांगतों. ॥ ४९७ ॥

*श्रीसद्‌गुरुकृपेने श्रीज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायाचा गूढार्थदीपिकेसह अनुवाद पूर्ण झाला तो सद्‌गुरुचरणीं समर्पण असो.*



## समारोप

ज्ञानेश्वरींतील हा सहावा अध्याय म्हणजे जीवाचे मूळस्वरूप जें ब्रह्म, त्याचा प्रत्यक्ष साक्षात्कार करून घेण्याचा मार्ग होय. वास्तविक ब्रह्मस्थिति ही शब्दानें सांगण्यासारखी नाहीं, तरी श्रीज्ञानेश्वर माऊलींनी अत्यंत सुरस व सूक्ष्मार्थरूप ब्रह्माचा, अंत:करणांत बोध उत्पन्न होईल, अशा कोमल व अनुभवानें भरलेल्या शब्दांनी, प्रेमळ व एकाग्र चित्तांच्या श्रोत्यांना योगाचे निरूपण करण्याची प्रतिज्ञा केली आहे. कोमल शब्दाचें योजनेनें चित्त शब्दाकडे ओढलें जातें व ब्रह्मासारखा सूक्ष्म अर्थ ग्रहण करण्याला योग्य असे चित्त बनतें.

**कर्मयोग व संन्यास यांचे आंतरदृष्टीनें ऐक्य**—नुसते कर्म करणारा कर्मयोगी नव्हे व अग्नीचे विसर्जन करून कर्म सोडले म्हणजे संन्यासी झाला असाहि अर्थ नाही. भगवंताचे ठिकाणी चित्त स्थिर करून कर्मानुष्ठान करणाऱ्याला कर्मयोगी ही संज्ञा आहे. पण विषयांत आसक्त असलेले चित्त जोपर्यंत विषयसुखाची नि:शेष इच्छा सोडत नाही, तोपर्यंत ते भगवंताचे ठिकाणी स्थिर होत नाही; म्हणून कर्मयोगी होण्याकरितां नि:शेष विषयकामना सुटली पाहिजे. त्याचप्रमाणे खरोखर कर्मसंन्यास होण्याकरितां माझ्या सच्चिदानंद आत्मस्वरूपाचे ठिकाणी कर्म नाही व कर्तृत्व नाही. मी कर्म व कर्तृत्व याहून साक्षीस्वरूप अत्यंत निराळा आहे असे ज्ञान झालें पाहिजे. हें ज्ञान होण्याकरितां आत्मस्वरूपाचे ठिकाणी चित्तवृत्ति स्थिर झाली पाहिजे व आत्मस्वरूपाचे ठिकाणी चित्त स्थिर होण्याकरितां विषयसुखाकरितां बाहेर विषयाकडे धावणाऱ्या चित्तांतून विषयसुखाची किंवा कर्मफळाची इच्छा समूळ नाहीशी झाली पाहिजे म्हणजे कर्मयोगी व संन्यासी या दोघांच्याहि ठिकाणी असलेली नि:शेष विषयसुखाची कामना नाहिशी झाली पाहिजे. विषयकामनारहित चित्त झाले असतां चित्त परमेश्वराचे ठिकाणी स्थिर होते व योगी व संन्यासी हे दोघेहि आपल्याला कर्म व कर्तृत्व याहून निराळे पाहतात व सर्वकर्मसंन्यासी होतात. सर्वकर्मसंन्यास याचा अर्थ देहाचे ठिकाणी कोणतेहि कर्म न होणें असा नसून, शरीर, मन, इंद्रिये याची कर्में होत राहिली, तरी मी, त्या सर्व कर्मांहून व कर्तृत्वाहून निराळा आहे, माझ्याशीं त्यांचा कांही संबंध नाही असा अनुभव येणें, असा आहे. परमेश्वर जसा कर्म करून आंतरप्रतीतीने सर्वकर्मसंन्यासी असतो, तसाच कर्मयोगी व संन्यासीहि कर्म करीत असतांना दिसला, तरी सर्वकर्मसंन्यासी असतो. ''सर्वकामपरित्यागे च सर्वकर्मसंन्यास: सिध्दो भवति'' (गीताभाष्य अ० ६ श्लो० ४) या भाष्यपंक्तींत आचार्यांनी हेंच प्रतिपादिलें आहे.

**योग साधनेने चित्त निष्काम होतें**—''अगा करितेनिविण कर्म। तेचि जाणिजे निष्कर्म'' कर्म नाही व त्याचा कर्ताहि कोणी नाही असा जेव्हा अनुभव येतो तेव्हा कर्म निष्काम होतें, असा गुरुगम्य अनुभव माऊलींनी मागे सांगितला आहे. विषय सत्य वाटतात व त्यांत सुख आहे अशी जोपर्यंत बुद्धि आहे, तोपर्यंत विषयसुखाची वासना जात नाही व विषयसुखाची इच्छा आहे, तोपर्यंत त्याकरिता कर्म होणार व त्या कर्माचें कर्तृत्वहि उत्पन्न होणारच. अल्प देखील विषयवासना असली, तरी निष्काम कर्मानुष्ठान होणे शक्य नाही. योगसाधनाने आत्मवस्तूचे ठिकाणीं चित्त स्थिर होतें व तसे तें स्थिर झालें असतां तेथे एका आत्मवस्तूवांचून दुसरें कर्म, कर्तृत्व व विषय यापैकीं कशाचेंहि अस्तित्व प्रत्ययाला येत नाही. त्यामुळे बुद्धि एका आत्म्यावांचून दुसऱ्या कशाचेंहि अस्तित्व ग्रहण करीत नाही व आत्मस्वरूपाचे ठिकाणींच स्थिर होते. आत्मस्वरूपाचे ठिकाणीं चित्त स्थिर करून कर्म कर म्हणजे कर्म निष्काम होतें असेच भगवंतांनी ''योगस्थ: कुरु कर्माणि'' या श्लोकांत सांगितलें आहे.

**जीवच स्वत:चा शत्रु व मित्र**—जीवाचें मूळ स्वरूप अद्वैत सच्चिदानंदरूप आहे. त्याची ही मूळची स्थिति दुसऱ्याने कोणी नाहीशी केली नाही. त्यानेच स्वत: त्या सच्चिदानंदरूपाहून आपल्या निराळेपणाची कल्पना केली व त्या निराळेपणाचा अहंकार धरिला, म्हणून ती त्याची मूळची सच्चिदानंदस्थिति, त्याला प्रतीत होत नाहीं. अशा

रितीने तोच आपला शत्रु बनला. पुन: ही कल्पना सोडून दिल्यास तोच आपल्या पूर्वपदावर आरूढ़ होतो. अनंत जन्मांतल्या दृढ संस्कारामुळे केलेली विपरीत कल्पना लवकर सुटत नाही, म्हणून योगाभ्यासाने आपल्या मूळ स्वरूपाचा प्रत्यय आल्यावर ती कल्पना नाहीशी होते. एकदा असा आत्मस्वरूपाचा प्रत्यय आला म्हणजे त्या योग्याला सर्वत्र एक आत्मस्वरूपच दिसतें. सच्चिदानंद आत्मस्वरूपावांचून दुसरें कशाचेंच ज्ञान होत नाही. सर्वत्र एक आत्मस्वरूपच पाहणाऱ्या दृष्टीला समदृष्टि म्हणतात.

**योगसाधनेला श्रीगुरूचें ठिकाणीं अत्यंत प्रेम पाहिजे**—अर्जुनाच्या प्रेमाला भाळलेला श्रीकृष्ण भगवान, येथे योगाचें साधन अर्जुनाला सांगत आहे. भगवद्भक्ताला किंवा गुरुभक्ताला योग साधायला कष्ट पडत नाही. भक्तीने विरक्तिहि साधते. भगवत्प्रेमाने विषयाचें प्रेम जसे नि:शेष नाहिसे होतें, तसें कोणत्याहि साधनाने नाहीसे होत नाही. म्हणून भगवद्भक्त अर्जुनाला योगसाधन सांगितलें तर वाया जाणार नाही असें भगवंताला वाटलें. योग साधन करितांना जें कांही या अध्यायांत सांगितलेले अनुभव येतात, ते ज्यांचा गुरूचे वचनावर अत्यंत विश्वास असेल, त्यांनाच येतात गुरुविश्वासावांचून व गुरुप्रेमावांचून हा मार्ग असाध्य आहे.

**योगाभ्यास**—योगाभ्यासाकरितां एकाग्र, पवित्र व रमणीय स्थळाची आवश्यकता आहे. तेथे सांगितल्याप्रमाणे अभ्यास करण्याकरिता अत्यंत प्रेमाने श्रीगुरूचें चिंतन करून आसन मांडावे लागते. त्या आसनाने शरीराचे ठिकाणीं जें योगाचें कार्य होतें, त्यामुळे खाली, वर, मध्ये, असें तीन बंध पडून प्राणवायूचा बाहेर पडण्याचा मार्ग बंद होतो व बाहेरचे सर्व विसरलें जाते. देहावर वृत्ति येत नाही. कोंडलेला प्राणवायु अत्यंत क्षुब्ध होऊन सर्व शरीर ढवळून काढितो व मृत्यूचें भय दाखवितों, पण श्रीगुरूच्या विश्वासाने तेवढेहि सहन करण्याचें धैर्य येतें. प्राणवायु कोंडल्यामुळे व क्षुब्ध झाल्यामुळे उष्णता अत्यंत वाढते व त्यामुळे कुंडलिनी जागी होते. ती शरीराचे आंत असलेलें पृथ्वीतत्त्व व आपतत्त्व दोन्ही नाहिसे, करिते. मग शरीराचे ठिकाणीं शरीराचे जडधर्म राहत नाहीत व ते अत्यंत हलके होऊन तेजस्वी व सामर्थ्य संपन्न होते. योगाभ्यासाने सिद्धी प्राप्त होतात.

**कुंडलिनी विचार**—श्रीज्ञानेश्वर माऊली म्हणतात कीं ''ते कुंडलिनी जगदंबा। जे चैतन्यचक्रवर्तीची शोभा। जिया विश्वबीजाचिया कोंभा। साउली केली॥'' कुंडलिनी ही जगदंबा परमेश्वराची शक्ति होय. ती जगताला जन्म देते, चक्रवर्तीराजा जसा सर्व पृथ्वीचे राज्य करितो, त्याप्रमाणे चैतन्यरूप परमात्मा अनंत ब्रह्मांडाचा शास्ता आहे. कुंडलिनी त्या चैतन्यरूप परमेश्वराचे सर्व सौंदर्य आहे व सर्व वैभव आहे. हिच्या योगानेंच परमेश्वराचे परमेश्वरत्व आहे असें अमृतानुभवग्रंथांतहि ''ऐश्वर्येंसि ईश्वरा। जियचे अंग संसारा'' या ओवीने माऊलींनी सांगितलें आहे. ज्या प्रमाणे एका सपाट मैदानावर जेवढी घरें बांधलीं जातील त्या प्रत्येक घरांत त्या सपाट मैदानाचा भागच शिरलेला असतो, त्याप्रमाणें चैतन्यचक्रवर्ती परमेश्वराचे सत्तेवर जेवढी कांहीं ब्रह्मांडरूपाने जीवसृष्टि भासते, तींत परमेश्वर व त्याची शक्तीच भरलेली आहे. परमेश्वराच्या या शक्तीने जगताचे बीज जो शिव, त्याचे ठिकाणीं मी वृत्तिरूपाने स्फुरणारा अंकुर झांकून टाकिला व त्याला जीव बनविले. तीच शक्ति येथे कुंडलिनी या नांवाने संबोधिली आहे. ही परमेश्वराची कुंडलिनीशक्ति, जीवाचे ठिकाणीं 'मी' वृत्तिरूपाने स्फुरत असते. किंवा जीव हा 'मी' वृत्तिरूपच असल्यामुळें अहं अहं म्हणणारा जीवच परमेश्वराची शक्ति होय असे म्हटले तरी वावगे होत नाही व भगवंतांनी जीवभूत माझी पराप्रकृति होय असें म्हटलेहि आहे. मूळांत ही शक्ति सच्चिदानंद परमेश्वराची असल्यामुळें तीहि सच्चिदानंदरूपच आहे, पण जीवशरीराचे ठिकाणीं ती साडेतीन वेढे करून अधोमुख निजलेली आहे, असे माऊलींनी सांगितले आहे.

कुंडलिनी जागृत झाली म्हणजे ती षट्चक्रावरून ब्रह्मरंध्रांत जाते व तेथे ब्रह्मरूप होते ही निर्विकल्प व स्थिर आहे. श्रीज्ञानेश्वर माऊलींनी येथे सुंदर रहस्य सांगितले आहे. श्रीज्ञानेश्वर माउली म्हणतात ''ऐसे पार्था जे निज स्वरूप माझे'' शक्तीचा शक्तीत लय करून ज्या माझ्या निर्विकल्प स्वरूपाचा अनुभव येतो ते निर्विकल्प स्वरूपच ''ते हे

चतुर्भुज कोंभेली। जयाची शोभा रूपांसी आली। देखोनि नास्तिकी नोकिली भक्तवृंदें" अंकुरित झालें. निर्विकल्प स्वरूपाच्या शोभेनेच चतुर्भुजरूप धारण केलें आहे. कर्मयोगांत ज्या भगवंताच्या रूपाचे ठिकाणीं चित्त स्थिर करून कर्म केलें असतां निष्कामकर्मानुष्ठान सिद्ध होतें, त्या भगवंताचे चतुर्भुज स्वरूपहि अत्यंत निर्विकल्पच आहे असा लययोगानेंच अनुभव येतो. हा अनुभव सांगण्याचे कारण असे की, अर्जुन हा सगुणभक्त असल्यामुळें सगुण भक्ताचें चित्त सगुण भगवंताचे ठिकाणींच स्थिर असलें तरी तें निर्विकल्प स्वरूपाचे ठिकाणींच स्थिर आहे व त्याला लय योग करण्याची गरज नाही. सगुण भगवंताच्या भक्तीने भगवद्ध्यान दृढ झाले असतां एका भगवंतावांचून दुसरे जग वगैरे कांहीं दिसत नाहीं असा भक्तीनें जगाचा नि:शेष लय होतो.

**साम्ययोगाचे आणखी प्रकार**—परमात्मा समस्वरूप आहे, पण त्याचे ठिकाणी सर्व विषम सृष्टि निर्माण झाली. या विषम सृष्टिकडे जोपर्यंत बुद्धि जाते, तोपर्यंत ती विषमच राहते. सांगितलेल्या लययोगानें सृष्टीचा लय झाला की, ती बुद्धि समस्वरूप भगवंताचे ठिकाणीं स्थिर होऊन सम होते. ही साम्यस्थिति इंद्रियांचे जो नियमन करीत नाही त्याला प्राप्त होत नाही. योगांत इंद्रियाचा व मनाचा निरोध करणें हेच मुख्य कर्तव्य आहे; म्हणून युक्ताहारविहार राहून इंद्रियें स्वाधीन करावी व सर्व विषयसुखाची वासना सोडून देऊन, चित्त परमेश्वराचे ठिकाणीं स्थिर करावे म्हणजे परमसुखाचा लाभ होतो. हा अभ्यास हळूहळू सावकाश करीत राहीले असतां मन वश होते. किंवा सर्व भूताचे ठिकाणीं एक परमेश्वरच भरला आहे व तीं भूतें परमेश्वरसत्तेवरच कल्पनेनें भासतात, अशी दृष्टि केली तरी चित्त परमेश्वराचे ठिकाणीं स्थिर होते. चित्त परमेश्वराचे ठिकाणीं स्थिर झाले की जीव ब्रह्मस्वरूप होतो किंवा ब्रह्म सम असल्यामुळे त्याला साम्यदशा प्राप्त होते, सर्व भूतांचे ठिकाणी परमात्मा एकरूप आहे अशी दृष्टि ठेवली असताही बुद्धीला साम्यदशा येते किंवा आपल्याप्रमाणेच सर्व जीवालाहि सुखदु:ख होते हे अखंड चित्तांत वागविले असताहि समदृष्टि होते. मीच सर्व सृष्टिरूप झालों आहे, म्हणून सुखदु:खादि कांही एक माझ्याहून भिन्न नाहीत असे जो अखंड पाहतो त्याचीहि समदृष्टि होते.

**योगभ्रष्टाची गति**—योगाभ्यास करीत असलेल्या पुरुषाला योगसिद्धि न होतांच मरण आले, तरी त्याचा मार्ग सुटत नाही. पुढल्या जन्मीं त्याला भगवत्कृपेने तो अभ्यास सहज साध्य होतो म्हणजे योगसिद्धि होईल अशीच सर्व सामुग्री प्राप्त होते. कितीहि जन्म गेले किंवा लागले तरी परमार्थ मार्गाला म्हणजे परमेश्वर प्राप्तीच्या मार्गाला-निश्चयपूर्वक लागलेल्या पुरुषाचा प्रत्येक जन्मांतील प्रयत्न उपयोगी पडतो. कोणताच सत्प्रयत्न वायां जात नाही.

**सर्व योग्यांत भक्तियोगी श्रेष्ठ**—कर्म करणारा, तपस्वी, शाब्दिक ज्ञानी या सर्वांपेक्षां ज्याने आत्मस्वरूपाचे ठिकाणीं चित्त स्थिर करून प्रत्यक्ष ब्रह्मसुखाचा अनुभव घेतला तो श्रेष्ठ होय आणि आत्मस्वरूपाचें ठिकाणीं चित्त स्थिर करून, ब्रह्मसुख अनुभविण्याचे जेवढे मार्ग आहेत, त्या मार्गाने जाणाऱ्या सर्व योगापेक्षां, सगुण भगवंताचे ठिकाणीं ज्याचे प्रेम बसलें व त्या प्रेमानेच सर्व कांही साधतें अशी श्रद्धां ठेवून जो अहर्निश भगवंताचे भजन करितो, त्याचें चित्त अत्यंत निर्विकल्प अशा साम्यदशेला प्राप्त होत असल्यामुळे, तो सगुणभक्त सर्व योग्यांत श्रेष्ठ व भगवंताशी अत्यंत एकरूप झालेला होय.

**॥ श्रीमद्सद्गुरू श्रीज्ञानेश्वरमहाराजार्पणमस्तु ॥**

